ॐ

# श्रीमद्भागवत

दशमस्कंध

व

त्यावरील शिवकल्याणांची प्राकृत टीका.

---

६

# रासपंचाध्यायी.

---

मूळ पोथ्यांवरून

**गणेश बळवंत मोडक, बी. ए.**

यांनीं छापून प्रसिद्ध केली.

---

आकोला ( वऱ्हाड. )

चैत्र शुद्ध प्रतिपदा, शके १८२६.

---

किंमत १ रुपया.

# प्रस्तावना.

मृद्वीका रसिता सिता समशिता स्फीतं निपीतं पयः ।
स्वर्यातेन मया सुधाप्यधायि कतिधा रंभाधरः खंडितः ॥
सत्यं ब्रूहि मदीय जीव भवता भूयो भवे भ्राम्यता ।
कृष्णेत्यक्षरयोरयं मधुरिमोद्गारः क्वचिल्लक्षितः ॥ *

जगन्नाथराय.

इतर सांप्रदायिक ग्रंथाप्रमाणें श्रीमद्भागवत हा सांप्रदायिक ग्रंथ होय, परंतु इतर सांप्रदायिक ग्रंथाप्रमाणेंच तोही सर्वांच्या हातांत पडून भागवताची मराठी अवतरणें छापून प्रसिद्ध झालीं. मुद्रणकलेनें श्रीमद्भागवतास इतकी प्रसिद्धि मिळाली असल्यामुळें या अद्वितीय ग्रंथाची ओळख मराठी वाचकांस करून देण्याची गरज नाहीं. या ग्रंथाच्या द्वादश स्कंधापैकीं दशम स्कंधांत श्रीकृष्ण परमात्म्याचे गुणवर्णन केलें आहे, हें सर्वविश्रुतच आहे. दशमस्कंधावर ज्या मराठी टीका आहेत, त्यांपैकीं शिवकल्याणांची टीका ही उत्कृष्टांपैकीं एक आहे. ही अद्याप छापली गेली नाहीं, व ती फार विस्तृत असल्यामुळें व अशा ग्रंथाविषयीं आमच्या लोकांच्या अनास्थेमुळें ती छापून काढण्याचें कामही कठीणच आहे. तथापि तें आम्ही हातीं घेतलें आहे व तें तडीस नेण्यास परमेश्वर समर्थ आहे.

दशम स्कंधाच्या नव्वद अध्यायांपैकीं पूर्वार्धांत एकूणपन्नास अध्याय आहेत. त्यांतून रासपंचाध्यायीचे पांच अध्याय आम्ही वाचकांस प्रथम सादर करीत आहों. एकंदर पूर्वार्धाची नऊ पुस्तकें करण्याचा आमचा विचार आहे.

---

* द्राक्षासवाची चव घेतला, साखर खाल्ली, पांढरें स्वच्छ दूधही प्यालों, स्वर्गांत जाऊन अमृतसेवनानें तृप्त झालों व रंभेचें अधरखंडन पण कितीदां तरी केलें, तथापि संसारांत पुनः पुनः घोंटाळणाऱ्या हे माझ्या जीवा खरेंच सांग कीं त्वां कृष्ण या अक्षरद्वयाच्या उच्चाराच्या गोडीवर केव्हां तरी लक्ष दिलें काय ?

रासपंचाध्यायी हें त्यांतील सहावें पुस्तक होय; यानंतर सर्व पुस्तकें प्रथम-पासून क्रमानें छापून काढण्याचा विचार आहे. रासाचें पुस्तक वर्षप्रतिपदेच्या सुमुहुर्तावर बाहेर निघत आहे व सवडीनुसार इतर पुस्तकेंही बाहेर पड-तील. एक पुस्तक वर्षप्रतिपदेस तर दुसरें गणेश चतुर्थीस या क्रमानें पुस्तकें निघावीं असा अंदाज आहे.

शिवकल्याणाच्या सुरस टीकेच्या सहाय्येंकरून **श्रीकृष्ण परमात्म्याच्या** सुस्वर वेणुनादानें सर्व रसिक वाचकवृन्दाच्या चित्तवृत्ती क्षणभर तरी तल्लीन व्हाव्या, हा या ग्रंथप्रकाशनाचा मुख्य हेतु आहे. अंतःकरण शुद्ध करून व चित्तवृत्ति लीन करून जो कोणी या ग्रंथाकडे येईल त्याला श्रीकृष्णाच्या मुर-लीचा कर्णमधुर ध्वनि शिवकल्याण खचित ऐकवितील अशी आमची खात्री आहे. परमात्म्याच्या वेणुरवाच्या आड येऊन कर्णकटु बेसुर उत्पन्न करणाऱ्या अनेक आक्षेपांचे योग्य निरसन शिवकल्याणांनीं स्थळोंस्थळीं केलें आहे. पाश्चात्यांचे अथवा पाश्चात्यविद्याप्रकाशितांचे आक्षेप शिवकल्याणांना अर्था-तच माहीत नव्हते; किंबहुना श्रीकृष्णास परमात्म्याचा अवतार समजणाऱ्या भाविक लोकांसाठींच शिवकल्याणांनीं टीका लिहिली आहे. तथापि प्रतिभा-वान कर्ते हे आपले ग्रंथ सर्वत्रांसाठीं निर्माण करितात व शिवकल्याणांचाही ग्रंथ या कोटींतीलच होय. जे कोणी लक्षपूर्वक ग्रंथ वाचतील व पाश्चात्य विद्येनें नव्हे, तर विद्याभासानें जे कोणी आपले नेत्र जाणूनबुजून मुद्दाम झां-कणार नाहींत, त्यांना खचित या रासवर्णनापासून बोध होईल.

शिवकल्याण हे मोठे योगी होते व संपूर्ण दशम स्कंधाचा परमार्थरीत्या यांनीं अर्थ समजाऊन दिला आहे. जगाच्या उत्क्रांतीसाठीं परमेश्वरानें जे अनेक अवतार धारण केले, त्यांपैकीं श्रीकृष्णाचा पूर्णावतार होय. रामावतारानें उत्तम साधकाचें चित्र उत्कृष्टपणें लोकांच्या मनावर वठतें, व कृष्णावतार सिद्धपुरुषलक्षणें समजाऊन देण्यासाठींच झाला असें ह्मटल्यास चालेल. पापपुण्याचीं बंधनें सिद्धास कशीं असणार? ज्याचा भेदभाव समूळ नष्ट झाला, त्याला कर्म आणि अकर्म असें कांहींच उरलें नाहीं.

तेव्हां या दृष्टीनें पाहतां ज्या परमात्म्याच्या ठायीं स्त्रीपुरुष हा भावच नाहीं, त्यानें रासप्रसंगीं केलेल्या क्रीडा या केवळ ईशलीलाच होत. श्रीकृष्णानें केलेल्या क्रीडा आपण करूं ह्मणणाऱ्या ग्राम्य पुरुषास तसें करण्यास हक्कच पोंचत नाहीं. रासक्रीडेच्या प्रसंगीं श्रीकृष्णाचें वय अवघें ७ वर्षांचें होतें, त्यामुळें आक्षेप घेण्यास अवकाशच नाहीं असें जें ह्मणणें आहे तें जरी एकीकडे ठेविलें, तरी वरिष्ठ कोटीच्या पुरुषांस जीं कृत्यें करण्यास मोकळीक असते, तीं कृत्यें हीन कोटीच्या लोकांस करितां येत नाहींत, हें तत्व सर्वत्र प्रचलित आहे. घरांतील वडील माणसांशीं अज्ञानानें स्पर्धा करणारें लहान मूल अनेक प्रसंगीं पश्चात्ताप पावतें, हें आपण नेहेमीं पहातों. आपल्या कर्तव्याकर्तव्यतेचा विचार न करतां व आपलें बलाबल न पहातां, तसेंच आपल्या स्थितीकडे दुर्लक्ष्य करून जे कोणी आपणास अनुचित, परंतु वरवर पहाणाराच्या दृष्टीनें योग्य, अशीं कृत्यें करण्यास धजावतात,* त्यांना अनुभवांतीं कर्माकर्माचा विचार अनेकतः करावा लागतो असेंच कळून येईल. श्रीकृष्णपरमात्म्याच्या क्रीडेचा गूढार्थ न समजून, व स्वार्थसाधू लोकांचे धर्माच्या नांवाखालीं मोडणारे कांहीं पंथ पाहून, तेवढयावर श्रीकृष्णास नावें ठेवणारांनीं या गोष्टीचा शांतपणें निदान विचार तरी करावा. रासरंगाचा प्रसंग हा केवळ दूषणास्पद असून त्याचा विचार करणें सुद्धां भावी पिढीच्या नीतीस विघातक आहे, असें ह्मणणें ह्मणजे सध्देतूनेंच कां होईना परंतु आपलें अज्ञत्व व आग्रही स्वभाव व्यक्त करणें होय. अशा प्रकारानें भागवतांतील या प्रकरणावर पांघरूण घालूं इच्छिणाऱ्या लोकांचे हेतू सिद्धीस जाणें हें सध्यांच्या काळांत शक्य नाहीं. रासरंगाची कथा व त्यावरील चर्चा हीं लहान मुलांच्या कानावर पडतां नये, तसें झाल्यास त्यांच्या कोमल व निर्मल अंतःकरणावर घातुक परिणाम होऊन त्यांच्या नीतीस धक्का बसेल असें ह्मणणाऱ्या

* कां जें अन्य देहाचें सामर्थ्य : अन्य देहीं नसे उमटत ॥ हें नेणोनि जन उन्मत्त : यथेष्टाचारि प्रवर्ततसे ॥ १६९ ॥—रास. ५. शिवकल्याण.

लोकांस सध्याची आमच्या समाजाची स्थिति कळत नाहीं, असें तरी ह्मणावें किंवा नीतिमत्तेचें मान वाढविण्याच्या सदिच्छेनें सध्याच्या मनूंत नसणारें अज्ञान लहान मुलांमध्यें गृहीत धरून तो एक प्रकारचा नकली निर्मळपणा कायम ठेवण्यासाठीं हे लोक व्यर्थ प्रयत्न करतात, असें असावें. श्रीकृष्णाच्या बाललीला लहान मुलांच्या कानावर सुद्धां जाऊं नयेत असा प्रयत्न करणें जरी स्तुत्य मानलें तरी शक्य नाहीं; कारण या गोष्टी कोणच्या तरी रूपानें आबालवृद्धांस अवगत असतात; फरक येवढाच कीं कोणास त्या भाविक लोकांच्या तोंडून दैवीकृत्यें ह्मणून कळतात व कित्येकांस त्या जुन्या धर्माची चेष्टा करणाऱ्या कुटाळांच्या मध्यस्तीनें अश्लील ह्मणून कळतात. कसेंही असो, लहान मुलांच्या कानावर या गोष्टी पडूं नयेत असा प्रयत्न करणें हें सूर्यावर पांघरूण घालण्यासारखेंच होणार आहे. अर्जुनासारखा भक्त अकृत्रिम प्रेमानें, तर शिशुपालासारखा शत्रु अनुपम वैरानें, कृष्णमहिमा वाढविण्यासच कारणीभूत होतो. तद्वतच सध्यांच्या मनूंत सुद्धां धर्माभिमानी भक्तीनें, तर अल्पविद्यादूषित टवाळकी करण्याच्या दुर्बुद्धीनें, कृष्णकथा प्रचलित ह्या करतातच. तेव्हां कृष्णलीला झांकून ठेवण्याचा प्रयत्न व्यर्थ होय. योग्य प्रयत्न ह्मणजे कृष्णकृत क्रीडेच्या तत्वार्थाची मीमांसा करणें व तो नीट समजून घेणें हाच, असें आह्मीं समजतों. श्रीकृष्ण परमात्म्याचीं कृत्यें दूषणार्ह आहेत असें स्थापन करूं पहाणाऱ्या जनांच्या दृष्टीनें सुद्धां असेंच ठरेल, कीं जर एकादी वाईट गोष्ट प्रचलित झाली हें निश्चित असेल तर मग ती झांकण्याचा प्रयत्न न करितां तिचा विस्फोट व खंडण जोरानें कसें होईल याचाच विचार केला पाहिजे.

आमच्या पुराणांतील वर्णनें सर्व लाक्षणिक अर्थानेंच समजलीं पाहिजेत, असें एक मत अलीकडे प्रचलीत आहे, व त्यांत पुष्कळ सत्यांश आहे. पुराणांचा अर्थ लाक्षणिक घेतल्यानें त्यांची गोडी विशेष समजते हें खरें आहे, व त्यांमधील खरा बोध करून घेणें असल्यास लाक्षणिक अर्थावरच मुख्यत्वें लक्ष असलें पाहिजे हें उघड आहे. परंतु परमेश्वर जेव्हां अवतारकृत्यासाठीं मनुष्यदेह धारण करितो, तेव्हां त्याच्या हातून सर्व कृत्यें सत्यत्वानें घडतातच.

त्या कृत्यांचा लाक्षणिक व गूढ अर्थ निराळा असतो म्हणून तीं कृत्येंच मुळीं घडलीं नाहींत असें मात्र नव्हे. उदाहरणार्थ, अक्कलकोटच्या स्वामींनीं कोणा बाई-चें कुंकू पुसून टाकिलें म्हणजे त्याचा लाक्षणिक अर्थ त्या बाईचा नवरा मेला असा असूं शकेल, परंतु त्यामुळें कुंकू पुसून टाकिलें या गोष्टीच्या सत्यत्वास बाध येत नाहीं. ती गोष्ट घडली हें खरें, व त्या गोष्टीचा प्राकृत कृत्याच्या पलीकडे गूढार्थ असूं शकेल हेंही खरें, हेंच तत्व शिवकल्याणांच्या ग्रंथांत सर्वत्र दिसून येईल. पुराणांतील गोष्टी निवळ रूपकें होत, हें मत आ-म्हांस तरी पसंत नाहीं. परमेश्वराची अवतारकृत्येंच सर्व रूपकात्मक असतात असें आम्हीं समजतों. अर्थात् रासक्रीडेच्या वर्णनांत सांगीतलेलीं कृत्यें श्रीकृष्णांच्या हातून मुळींच घडलीं नाहींत, हें म्हणणें आम्हास संमत नाहीं. तीं कृत्यें प्रत्यक्ष घडलीं नाहींत असा कविकटाक्ष कोठेंही नाहीं. मूळ भागवतांत ही नाहीं व शिवकल्याणांच्या टीकेंतही नाहीं.

प्रपंचांतील सर्व संबंधांत स्त्रीपुरुष संबंध हा विशेष महत्वाचा व विशेष पवित्र मानलेला आहे. आर्य वाङ्मयांत अनेक प्रसंगीं प्रकृति-पुरुष किंवा माया-ब्रह्म यांचे स्पष्टीकरण करण्यासाठीं स्त्री व पुरुष याच सांसारिक संबं-धाची योजना केलेली असते. प्रकृतिपुरुषाचें ऐक्य स्पष्ट करून दाखविण्यास दुसरा कोणताही प्रेमाचा प्रकार समर्थ नसतो. स्त्रीचें पतीवर असणारें प्रेम केवळ निष्कपट व सर्वतोपरी पूर्ण असतें. प्रेमाच्या इतर प्रकारांत कोठें ना कोठें तरी न्यूनता भासतेच, परंतु पतिव्रतेच्या पतीवरील प्रेमांत स्वार्थत्याग ओतप्रोत भरलेला असतो. पत्नी पतीच्या आज्ञेबाहेर जावयाची नाहीं; पती शिवाय भार्येस दुसरा प्रेमाचा विषय नाहीं; तिचें अपत्यावरील प्रेमसुद्धां दु-सऱ्या प्रतीचेंच किंबहुना पत्नीचें अस्तित्वच केवळ पतीसाठीं. जीवशिवाचें ऐक्य प्रतिपादन करण्यास स्त्रीपुरुषसंबंधच योग्य होय, व याचमुळें श्रीकृ-ष्णांनीं आपल्या अवतारकृत्यांत जीं अनेक कार्यें केलीं, त्यांत रासक्रीडेंतील मधुर भक्तीचें वर्णन सर्व साधुसंत प्रमुखत्वानें करितात. परमेश्वरास आपलें सर्वस्व अर्पण केलें पाहिजे, ही कल्पना कोणत्याही धर्मांत सांपडेल व ती

हल्लीं सुधारलेल्या राष्ट्रांतील धर्मांतही पण आहेच. या ह्मणण्याचें सत्यत्व त्या त्या धर्मांची पुस्तकें वाचल्यास कळून येणार आहे तेव्हां ज्या गोपींनीं आपलें सर्वस्व परमेश्वरचरणीं अर्पण केलें होतें, त्यांची भक्ति उच्चतम कोटीची होती हें उघड होय. कोणच्याही मार्गानें परमेश्वराचें अक्षय्य चिंतन करणारास तो कृपावन परमात्मा प्राप्त होतो, हें श्रीमद्भगवद्गीतेंत स्पष्ट करून सांगितलें आहे.* भगवंतांनीं अनेक लोकांशीं अनेक प्रकारचे संबंध आणून त्या सर्वांचा उद्धार केला हें श्रीमद्भागवताच्या वाचकांस निराळें सांगावयास नको.

येवढें मात्र येथें मुद्दाम सांगून ठेवलें पाहिजे, कीं या विषयाचा स्वस्थपणें विचार करण्याच्या हेतूनेंच हा ग्रंथ वाचल्यास त्यापासून फायदा होणार आहे. ग्राम्य बुद्धिनें मात्र हा ग्रंथ कोणी हातीं घेऊं नये, अशी सविनय प्रार्थना आहे. पतिपत्नी संबंधाची पवित्रता न समजून हे शब्द उच्चारतांच पशुवृत्तीचा मनांत संचार होण्याइतक्या ज्यांच्या प्रकृती नाजुक व चंचल झाल्या असतील, त्यांनीं या ग्रंथाच्या नादीं लागूं नये, व तशाच प्रकृतीच्या आपल्या आप्तइष्टांच्या हातीं हें पुस्तक पडूं नये अशी खबरदारी घ्यावी.

आतां प्रस्तुत आवृत्तीबद्दल दोन शब्द लिहिले ह्मणजे झालें. शिवकल्याणांच्या चरित्रासंबंधीं माहिती फारच थोडी मिळते. पैठण व दौलताबाद या दोन प्रसिद्ध शहरांशीं त्यांचा संबंध होता हें स्पष्ट आहे. श्रीमद्भागवत दशमस्कंधावरील त्यांची टीका समग्र छापून निघाल्यावर त्यांच्या संबंधीं जी माहिती सांपडेल तेवढी देण्याचा आमचा विचार आहे. तोंपर्यंत ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवावर टीका लिहिणारे तेच हे शिवकल्याण, येवढें सांगितलें ह्मणजे पुरे. अकोल्यापासून सुमारें ६ मैलांवर उगवें नांवाचें एक लहानसें खेडें आहे. तेथील देशमुखांजवळ या भागवताच्या पूर्वार्धाची प्रत आह्मांस प्रथम मिळाली. त्या प्रतीच्या शेवटीं शक १७०६ आहे. उत्तरार्ध येथें मिळाला

---

* शिवकल्याणांनीं दिलेल्या वर्णनाशिवाय वाचकांनीं ज्ञानेश्वरींतील नवव्या अध्यायांतील बत्तिसाव्या श्लोकावरचें व्याख्यान पहावें.

नाहीं. पुढें खुद्द अकोल्यांतील रामदास स्वामींच्या मठांतील पोथ्या तपासतां तेथें समग्र दशमस्कंधाची प्रत आह्मांस सांपडली. या प्रतींत पूर्वार्धाचे कांहीं अध्याय सांपडत नाहींत. ही प्रत उगव्याच्या प्रतीपेक्षां सुमारें ४९ वर्षांनीं जुनी आहे व पुष्कळ शुद्ध आहे. प्रत काळजीपूर्वक सुवाच्य लिहिली आहे, व ही उगव्याच्या प्रतीपेक्षां सर्वतोपरी चांगली आहे. यांतील रासपंचाध्यायीचा शक १६६१ हा आहे. या प्रतीबरहुकुम आह्मीं हें पुस्तक छापून काढलें आहे. शिवकल्याणांची स्वतःची प्रत मिळती तर शुद्धांशुद्धतेबद्दल अधिक खात्री वाटती; तथापि येऱ्हवीं सुद्धां जुन्या प्रतीची शुद्धलेखनपद्धति ठेविल्यानें भावी व्याकरणकर्त्यांस उपयोग होईल असें वाटून जुनें शुद्धलेखन कायम ठेविलें आहे. रा. रा. वि. का. राजवाडे यांनीं ही सुचना प्रथम आह्माला केली याबद्दल आह्मी त्यांचे आभारी आहों. मुळाबरोबर प्रत करण्याची काळजी घेतली आहे, तरी कांहीं चुका राहिल्या आहेत त्यांच्याबद्दल वाचक क्षमा करितील अशी आशा आहे.

आकोल्यांतील आमचे रसिक मित्र डा. दत्तात्रय कृष्ण कोलटकर यांच्या प्रोत्साहनानेंच केवळ हा ग्रंथ बाहेर पडत आहे. त्यांचे आभार मानण्याचें धाष्टर्य आह्मीं करीत नाहीं, कारण ग्रंथप्रकाशक वास्तविक तेच आहेत ह्मटलें असतां चालेल. आमचे मित्र रा. रा. कृ. ग. सहस्रबुद्धे, रा. रा. गो. द. खंडकर व रा. रा. ह. रा. पिटके यांनीं ग्रंथाचा शेवटचा अध्याय लिहून काढण्याच्या कामीं आह्मांस मदत केली हे त्यांचे आमच्यावर उपकार आहेत. ग्रंथप्रकाशनास मदत केलेल्या सद्गृहस्थांची यादी पुढें जोडलीच आहे.

**आकोला**

फाल्गुन वद्य २ शके १८१८. } **ग. ब. मोडक.**

ॐ

श्रीमद्भागवतांतर्गत

# रासपंचाध्यायी.

---

## अध्याय १*

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीनित्यानंदसद्गुरुश्रीविठ्ठलाय नमः ॥ आतां स्मरोनि नित्यानन्दचरण : करुं हरिगुणकीर्तन ॥ करिजैतें पावन : निजवाग्देवतेतें ॥१॥ तो वृंदावनविलासी : गोपीमानसनिवासी ॥ श्रीकृष्ण सुखराशी : भक्तैकसखा ॥ २ ॥ अधष्ठुनि मायेतें : प्रवर्तोनि जनक्रीडापंथें ॥ साधारण चित्तें : निजस्थें करावि ॥ ३ ॥ आणि या भवार्णवापासुन : त्रासले जे मुमुक्षु जन ॥ त्यांसि विशेषें शांतसदन : योजिलें पाहिजे ॥ ४ ॥ ऐसें चित्तिं धरुन : आणि प्रस्तुत व्रजवासिजन ॥ सर्वथा जो शरण : सर्वत्याग करुनि ॥ ५ ॥ तयासि पाववावया विश्रांति : प्रकटावी रमणमूर्ति ॥ यास्तव तो गोपीपती : गोपिकांसवें ॥ ६ ॥ धरुनि उत्तमा विग्रहातें : अधिष्ठुनि वृंदावनातें ॥ क्रीडला तें मुनिनाथें : संग्रहिलें अत्र्यें ॥ ७ ॥ जे जे कांहि मुनिभावा : लोकोद्धाराचिया आशा ॥ श्रीशुकें कौरवेशा : परीक्षिती प्रति ॥८॥ निवेदिली कृष्णकीर्ति : उत्तम कथा भागवती ॥ ते सूतें शौनकांप्रति : अनुवादिली असे ॥ ९ ॥ तोचि मज अतिमन्दातें : नित्यानंदें दीननाथें ॥ आदेशिली माझीं दुरितें : निरसावया आवर्डी ॥ १० ॥ यया गुणरासि निक्षित मन : असे सांडुनि इतर वणवण ॥ न देखों हें विषयसाधन : जेणें कृतार्थलें बहु ॥ ११ ॥ असो मीं स्वधर्मरहित : वेदशास्त्र अनधीत ॥ अव्युत्पन्न असंमत : अनधिकारि ॥ १२ ॥ तया म्यां निस्तरावि दुरितें : असावें सद्गुरुमार्गेनी सरतें ॥ क्षणांभि

---

* श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधाच्या पूर्वार्धांतील २९ ते ३३ अध्यायांस **रासपंचाध्यायी** ही संज्ञा आहे. एकोणतिसाव्या अध्यायास येथें पहिला अध्याय असें म्हटलें आहे.

मनार्थे : कृपा करूनि ॥ १३ ॥ योजिलें वरदानिं : मग हरिगुणवर्णनीं ॥ प्रवर्तविली माझी वाणी : मनहिं तत्पर केलें ॥ १४ ॥ ह्मणौनि मिं प्रवंर्तलों येथें : परि इतुकेंचि असो मातें ॥ न स्मरावें आणिकातें : माझेनि मनें ॥ १५ ॥ हे अयंत विलासवती : भागवती भव्य मूर्ति ॥ कटींतें कवळुनि हस्तिं : माझया हृत्पीठिं ॥ १६ ॥ तिष्ठत असो अनपाइनी : न स्मरो विषयादिकांहिं ॥ सदां सत्प्रेमरसडोहिं : निमग्न असो मन ॥ १७ ॥ मग मीं त्रिगताभीमान : करीन तद्गुणकीर्तन॥वाचा होईल पावन : निस्तरेण(न) दुरितें ॥ १८ ॥ आठउनि रमालीळ : नित्यानंदे क्रमेल काळ ॥ हें व्यर्थ विषयजाळ : न गोविल मातें ॥ १९ ॥ विचारिलें या अर्थातें : प्रवर्तलों येथें ॥ जे गतकथा संबंधातें : सूचिजे ऐसें ॥ २० ॥ मागें वरुणालया पासुन : जालें नंदाचें आगमन ॥ मग निजलोकदर्शन : नन्दादिकांसि केलें ॥ २१ ॥ स्वरुपाचिया अभिव्यक्ति : या अध्यस्ताचिया निवृत्ति ॥ ते सर्व गोपपंक्ति : स्वरूपालोकारुढ केली ॥ २२ ॥ मागुती स्वपदानुचारी : आणुनि पूर्ववृत्तिवरि ॥ मग तो वृंदावनविहारी : स्वयें क्रीडता झाला ॥ २३ ॥ यावरि त्या गोपकांता : सदा ज्या स्वसांनिध्यार्ता ॥ सांडुनियां समस्ता : गृहकृत्यातें ॥ २४ ॥ अवलोकावया कृष्णवदन : तृषित ज्यांचे नयन ॥ वाचा गुणपरायण : सदां ज्यांचि ॥ २५ ॥ त्यांचिया आर्तिशमनातें : विचारुनि नन्दसुतें ॥ स्वसांनिध्यें त्यांतें : परम शांत करावें ॥ २६ ॥ या हेतु रासरंगिं : ठाण मांडुनि त्रिभंगिं ॥ विचरोनि नाना भंगी : तो कंदर्पभंगिं क्रीडता जाला ॥ २७ ॥ नाना तो रमारमण : कंदर्पदर्पहरण ॥ हें प्रकटावया खुण : युक्ति रचिलि ॥ २८ ॥ मिळोनि गोपिकांचें शतें: विंधितां नेत्रकटाक्षशरपातें ॥ अणुमात्राहि त्यातें : नव्हेचि विकारु ॥ २९ ॥ जेवि तो पर्वतपति : वायुवेगें तिळरति ॥ न क्षोभोनि निर्वृत्ती : न सेंडीतु असे ॥ ३० ॥ तेवि तो यशोदानन्दन : कंदर्पदर्पापशमन ॥ रासमण्डळमंडन : विस्तारिता जाला ॥ ३१ ॥ नाना तया कामदर्पहरातें : भजोनि गोपिकाशतें ॥ निजकामनिवृत्तीतें : पावतीं जालिं ॥ ३२ ॥ ऐसें संपादावया कांहिं : प्रवर्तालि हे पंचाध्याई ॥

शृंगाररसयुक्त शांतिडोहिं : श्रवणाऋर्डि आसिजे ॥ ३३ ॥ ऐसे सुचना जे काहिं : प्रकटिजेल ठाइं ठाइं ॥ हा श्रृंगाररसुचे पाहिं : शांतरसें मांडला ॥ ३४ ॥ त्यांतु प्रथम इये अध्याइं : सम्पादिजेल इतुकें काहिं ॥ त्या गोपांगना स्वगृहिं : असतां कृष्णें ॥ ३५ ॥ प्रवेशोनि वृंदावनातें : गाउनि सुरसें वेगुगीतें ॥ त्या गोपिकांचि चित्तें : आकर्षुनि अवधि ॥ ३६ ॥ आपण होता तेथें : नेउनि त्यां प्रेमळांतें ॥ उक्तिप्रयुक्ति त्यांतें : प्रेमसंप्लुत करुनि ॥ ३७ ॥ रासममारंभाचेनि पंथें : सादर करुनि त्यांतें ॥ नावेक वंचुनिया तेथें : अप्रकट जाला ॥ ३८ ॥ ऐसि कथा जे काहिं : बोलिजेल इये अध्यायिं ॥ त्यांतु प्रथम श्लोकें काइ : राया परीक्षितीप्रति ॥ ३९ ॥ बोलिजेल मुनिनाथें : श्रीशुकें व्याससुतें ॥ तेंचि म्यांहि वर्णिजेतें : नित्यानंदकृपा ॥ ४० ॥ नातरि ज्याचें हें गुणकीर्तन : तो सादर असो रमारमण ॥ भीमातरिमंडन : विलासिया हारि ॥ ४१ ॥ आपली मति प्रमाण : वर्णिजेति हरिगुण ॥ कृपा करुत सज्जन : पावउत पार ॥ ४२ ॥ प्रत्यक्ष शांतस्वरूप : जो नित्यानंद निर्विकल्प ॥ तो सफळ करुं संकल्प : कीर्तनविषइं ॥ ४३ ॥ असोनि शुद्धचित्त : वर्णावें निर्विक्षिप्त ॥ न चुकावा पदपदार्थ : निरसावि विघ्नें ॥ ४४ ॥ बहु काय बोलों येथें : अवलोकावें मज दीनातें ॥ कृपा करावी समर्थें : श्रीनित्यानंदें ॥ ४५ ॥

॥ श्रीशुकउवाच ॥

**भगवानपि ता रात्रीः शरदोत्फुल्लमल्लिकाः**
**वीक्ष्य रंतुं मनश्चक्रे योगमायामुपाश्रितः ॥ १ ॥**

श्रीशुकें रायातें : ऐसें येथें बोलिजेतें ॥ स्मरोनि पुर्वकथेतें : अपिशब्दें करुनि ॥ ४६ ॥ जें ते नंदादि व्रजवासी : केले ब्रह्मलोकदर्शि : अनुभउनि स्वरुपासि : विस्मित जाले ॥ ४७ ॥ यावरि तो नन्दसुत : श्रीकृष्णाख्य भगवंत ॥ स्मरोनि प्रतिश्रुत : देखोनि त्या रात्रि ॥ ४८ ॥ पुर्वि ज्या गोपसुता : निजप्राप्तीलागि वितता ॥ असोनि व्रतस्था : जलमज्जनाचा ठाइं ॥ ४९ ॥ वस्त्राहरणनिमित्तें : आकर्षूनि त्यांचि चित्तें ॥ आश्वासिलें त्यांतें :

जें आगामिनि रात्री ॥ ९० ॥ माझेनि वो सांगातें : क्रमतील त्या तुमतें ॥ ऐसें त्यां कुमारीतें : प्रतिश्रुत जें केलें ॥ ९१ ॥ त्या ज्यां रात्री नियमिता : देखोनि लक्षणोक्ता ॥ तो संकेत जाला स्मरता : जे रमावें येथें ॥ ९२ ॥ स्वता तो कामपुर्ण : सर्वथा कर्तव्यशून्य ॥ तथापि तो भक्तभावन : भक्तवत्सळ सदां ॥ ९३ ॥ भक्तांसि जें प्रीर्थ्य : तेंचि त्यासि कृत्य ॥ ह्मणौनि प्रतिसु(श्रु)तांत सत्य : करणें पडलें ॥ ९४ ॥ त्या रात्री ज्या नियमिता : कैशा ह्मणाल आतां ॥ तरि शरत्काळयुक्ता : विकासितसुमना ॥ ९५ ॥ ह्मणिजे तयां निशांतवर्ति : उगवल्या पुष्पजाति ॥ एवं त्या बहु शोभति : शरदाक्षपा ॥ ९६ ॥ तियां देखोनि रात्रींतें : स्मरलि कुमारींचि इप्सितें ॥ ते इच्छापुर्णार्थ क्रीडेतें : अवलंबिलें कृष्णें ॥ ९७ ॥ जेंविं कोण्हि साधक जन : भगवंतिं सदां शरण ॥ साधनातें निस्तरोन : मोक्षाधिकारि जाले ॥ ९८ ॥ मग त्यांचा कार्यार्थ : विचारुनि गुरुनाथ ॥ बोधउनि वाक्यार्थ : तत्पदातें पाववि ॥ ९९ ॥ तेंवि तेणें नन्दसुतें : गोपिकांचि प्रशस्तें चित्तें ॥ त्यक्तविषयकामयुक्तें : जाणोनियां पैं ॥ ६० ॥ स्मरोनि संकेतातें : आरंभिलें क्रीडेतें ॥ या प्रसंगीं त्यांतें : निजस्थ करावें ॥ ६१ ॥ नातरि रात्रिसंज्ञे करुन : निजप्राप्तिचें लक्षण ॥ जें काळिं गोपीजन : अधिकारी जाला ॥ ६२ ॥ तो जो काळ प्रशस्त : स्वरूपाशरयुक्त ॥ शुभसम्भारभारित : देखोनि कृष्णें ॥ ६३ ॥ नातरि रात्रि हें अनुवादन : सुचिलें एकांतलक्षण ॥ जे काळिं निर्विक्षिप्त मन : धैर्यातें पावे ॥ ६४ ॥ असो देखोनि उत्तम काळातें : स्मरोनि त्यांचि प्रतिश्रुतें ॥ श्रीकृष्णें विहारातें : धरिलें मनिं ॥ ६५ ॥ ह्मणाल तो आत्माराम : अवाप्तसर्वकाम ॥ योगीमनविश्राम : साक्षात् ब्रह्म सनातन ॥ ६६ ॥ त्यासि या कर्माचा ठाइं : प्रवृत्तीसि हेतु काई ॥ या ग्राम्य व्यवहारें नाहिं : प्रयोजन कदापि ॥ ६७ ॥ तरि अंगींकरुनि योगमायेतें : हें अघटितही घडों येतें ॥ सर्व व्यवहार येथें : त्याची सत्ता ॥ ६८ ॥ हा मायतें नांगीकारिता : तरि कैंचि हे विश्वता ॥ निःसंगत्वादि प्रथा : कैसेन होति ॥ ६९ ॥ हे योगमाये करिं पाहिं : जालें तें जालेंचि नाहिं ॥ अनादि आभासें काई :

काय येक न घडे ॥ ७० ॥ जरि आभासि हें जगद्भान : तरि यासि भगवंत-पण ॥ उपाधीतें विलासउन : अनुपहितताही घडली ॥ ७१ ॥ आणि जें उपाधिभान : तें उपहितें सहवर्तमान ॥ तो उपहितार्थहि आपण : आभासरूपें जाला ॥ ७२ ॥ एवं जीवोपाधि जीवत्व : आणि अनुपहित जें शुद्धत्व ॥ हें न विकारोनि महत्व : निजविलासें घडतें ॥ ७३ ॥ हे जे विलासशक्ति : तेचि योगमाया हे ख्याति ॥ निर्विशेष भगवंति : अनादि असे ॥ ७४ ॥ अग्नीचा ठाइं उष्णांश : कीवां उदकामाजि रस ॥ आकाशीं अवकाश : निर्विशेष जेवि ॥ ७५ ॥ तेवीचि भगवंतिं : निर्विशेष हे शक्ति ॥ योगमाया हे ख्याति : अनादि असे ॥७६॥ असो निर्विशेष द्वक्स्थिति : तेथेंचि जे चिच्छक्ति ॥ जियेच्या अभिव्यक्ति : निर्विशेषता आली ॥ ७७ ॥ तेंचि योगमायेचें लक्षण : तिया आपणा आपण ॥ विशेषें भासमान : तो अंगिकारु तिचा ॥ ७८ ॥ असो बहु बोलों किति : सविशेषें भेदप्रतीति ॥ तेचि विश्वघटनेचि युक्ती : योगमाया जाणावी ॥ ७९ ॥ तियेतें आश्रुन : भगवंतु विश्वकारण ॥ सर्पादि भासाचें कारण: रज्वादि जेवि ॥ ८० ॥ ऐसी हे अनादि रचना : नाना विलासकल्पना ॥ तदंतःपाति हाही जाणा : भगवंताचा विहारु ॥ ८१ ॥ ह्मणाल हें भासलें असतां भान : चैतन्य सर्वत्र साधारण ॥ सर्वदा विकारशून्य : निष्क्रियत्वें असे ॥ ८२ ॥ यथें श्रीकृष्णाचा ठाईं : विशेष तो काइ ॥ ऐसा जरि काहिं : आक्षेप जाला ॥ ८३ ॥ तरि हा न होनि माये अधिन : मायेते अंगीकरून ॥ सविग्रह दाविलें दर्षण (र्शन): लोकपाळनार्थ ॥ ८४ ॥ या लोकाचा ठाईं : विडंबन दावितुसें काहिं ॥ परि कृतकर्मधर्मबंधनाहिं : प्रवृत्ति यासि ॥ ८५ ॥ हें कर्मनिबंधन जीव : तैसा नव्हे हा अभिप्राव ॥ कर्मवशेंजीव सर्व : संसरति सदा ॥ ८६ ॥ कींवा या जीवाचि माझारि : जे मोक्षाधिकारि ॥ अविद्या निवृत्तीही वरि : तिष्ठती यावद्दैवभोग ॥ ८७ ॥ उक्तसाधनपंथें : पाउनि अविद्यानिवृत्तीतें ॥ कर्तव्यार्थ काहिं त्यातें : नुरोनि सुखें असति ॥ ८८ ॥ स्थितिमात्र संरक्षण : तिष्ठती क्रियांशून्य ॥ ऐसेंहिं न येजिल क्षण ; श्रीकृष्णाचा ठाईं ॥८९॥ योगमायेतें अधिष्टुन :

जैसा हा रचिला सविकार जन ॥ तैसाचि विकारशून्य : विग्रहाभास हा ॥ ९० ॥ ऐसि हे अनादि स्थिति : तेंचि हे श्रीकृष्णमुर्ति ॥ नाना विलास वर्ति : स्थिति देवता हे ॥ ९१ ॥ (?) पाहातां या रमणरूपातें : दुःखातें तरतां भक्ति शतें ॥ आसुरांचि अयुतें : विरोनि जाति ॥ ९२ ॥ साधारण चित्सत्ता जे कांहिं : तियेसि निपटुनि भेद नाहिं ॥ हा विस्तारला असताहिं : लोकरमणविग्रह ॥ ९३ ॥ हें सामर्थ्यविशेषवशें : सर्वांसिहि भासत असें । श्रीकृष्ण साक्षाद्ब्रह्म ऐसें : वेदप्रतिपाद्य ॥ ९४ ॥ जयाच्या चरणांबुजलेशा : सदा ब्रह्मादिकांसि आशा ॥ हा जगदाभास ठसा : निजमुखिं दाविला ॥ ९५ ॥ आणि विश्वरुपदर्शनप्रसंगें : जग जाला आपण आंगें : नातरि अनंतें जगें : दाविलिं निजरूपिं ॥ ९६ ॥ नातरि तो सत्यलोकपति : एकली हे शामसुन्दरमूर्ति ॥ असंख्यात आकृति : देखता जाला ॥ ९७ ॥अनंता गुणवर्णनिं : नुपरे विधींची वाणी ॥ भृ (भ्रू) भंगमात्रें श्रेणी : असुरांच्या वधिल्या ॥ ९८ ॥ एवं हा नन्दानन्दन श्रीकृष्ण : योगमायेतें पुर : सरून ॥ रासरीती करून : विहरता जाला ॥९९॥

**तदोडुराजः ककुभः करैर्मुखं प्राच्या विलिंपन्नरुणेन शंतमैः**
**सचर्षणीनामुदगाच्छुचो मृजन् प्रियः प्रियाया इव दीर्घदर्शनः॥२॥**

पूर्वोक्तिं करुनि : श्रीकृष्णें जवं धरिलें मनिं ॥ तव उडुराज उदेला गगणीं (नीं) : त्या क्षणाचा ठाईं ॥ १०० ॥ असो तो नक्षत्रपती : चंद्र ऐसी ख्याति ॥ तो घेउनि स्वसंपत्ति : कृष्णार्थ आला ॥ १ ॥ नाना ते नक्षत्रगण : कृष्णाचे बंदीजन ॥ श्रीकृष्ण जें क्रीडापरायण । उदैल तेथें ॥ २ ॥ येऱ्हविं चंद्राचें लक्षण : त्या रात्रि दीर्व दर्शन ॥ तें सांडुनि उदयमान : कृष्णानुचर जाला ॥ ३ ॥ निजमर्यादेतें सांडुनि : कृष्णें जें क्रीडेतें धरिलें मनिं ॥ तेचि काळिं तो उडुमणि : उदैला आकाशिं ॥ ४ ॥ कोणे येके कर्माचे फळ : जोडला आजि रमालीळ ॥ ह्मणोनि मर्यादाभंग विकळ : मानिला नाहिं तेणें ॥ ५ ॥ जेवि भगवंति रंगलें मन : उक्त धर्म विसर्जुन ॥ जाणते जे जन : परिव्राजन करिती ॥ ६ ॥ तेवि तो उडुनाथ : केवळ श्रीकृष्णप्रीत्यर्थ ॥

सांडुनि काळ नियत : ऐलाडाचि उदैला ॥ ७ ॥ आतां ते उदयाची स्थिती : कोण लक्षणें उमटति ॥ काय करित होंत्साता उडुपति : उदैला आकाशिं ॥ ८ ॥ तरि करशब्दें करुन : शुद्ध जे स्विकरण ॥ तयां किरणीं उत्पन्न : अरुणता जाली ॥ ९ ॥ तेजे लोहितप्रभा : तिया प्राचीमुखा आली शोभा ॥ असो उदयसंबंधी नभा : प्राची संज्ञा ॥ ११० ॥ तें जें दिशावदन : त्यातें निज किरणोत्पन्न ॥ त्या अरुणतेचें विलेपन : करित होंत्साता ॥ ११ ॥ एवं उदैते वेळे : प्राचीमुख आरक्त केलें ॥ नातरि तेणें आणिलें : उपायेण श्रीकृष्णजीतें ॥ १२ ॥ निजकिरणिंची अरुणता : अर्पिली श्रीकृष्णनाथा ॥ तेणें प्रसंगे जाला सरता: रासविहारिं ॥ १३ ॥ नाना त्या गोपींचि मनें : कृष्णें करितां स्वाधीनें ॥ त्यासंबंधें तेनें : संतोषविजेतें जाले ॥ १४ ॥ आपण मनोभिमानी दैवत : तें मन जालिया कृष्णस्थ ॥ तरि सर्वथा मि कृतार्थ : जालों हें मानिलें ॥१५॥ ह्मणोनि न गणूनि स्वकाळ : उगउनि अति प्रांजळ ॥ स्वचारितिं रमालीळ : पूजिला तेणें ॥ १६ ॥ नातरि पुरःसरोनि चंद्रातें : आलिंगिलि गोपिकांचि चित्तें ॥ कां जें वैकुंठदैवतें : आपणातें स्मरिलें ॥१७॥ आह्मि तव जडजाती : सत्वर न पावों त्या एकांतिं ॥ यालागी प्रार्थूनि उडुपति : पाठविला तिहिं ॥ १८ ॥ ह्मणोनि चंद्रें तेणें : गोपिकामनोहरणें ॥ सनर्थिं उगवनें : राया कृष्णजीतें ॥ १९ ॥ असो त्या नक्षत्रनाथें : निजउदये निमित्तें ॥ उद्भउनि अरुणतेतें : त्या रंगें करुन ॥ १२० ॥ प्राचीमुखातें लिंपिलें : निजरागें सुरंग केलें ॥ जेवि कुंकुमरागें रंगिलें : प्रमदामुखातें प्रियें ॥ २१ ॥ आणिक तो उडुमाळी : काये करिता जाला ते काळिं : सर्व हे जन मंडळी : निज अवलोकनार्थे ॥ २२ ॥ तो जो साधारण जन : अर्कतापें तप्यमान ॥ त्या तापाचें निवारण : करित होंत्साता ॥ २३ ॥ नातरि जै क्रीडला कृष्ण : तैं उत्साह पावला जन ॥ ग्लानि गेली निवोन : शांति जालीं मनें ॥ २४ ॥ तो उत्साह त्याच्या मनिं : प्रेरिता जाला उडुमणि ॥ निजरश्मी स्पर्शोनि : सावध केले ॥ २५ ॥

तत्संबंधी कृष्णकथा : येउनि ज्या श्रवणपंथा ॥ निवारेल भवव्यथा : तयाची जाणा ॥ २६ ॥ नाना तेणें सीतकरें : चेवविलिं त्यांचि अंतरें ॥ रास आरंभिला रमेश्वरें : हे सुचना केली ॥ २७ ॥ ते जे पवित्र गुणकीर्ति : तेथें असावें श्रवणार्थि ॥ दुरितांच्या पंक्ती : सरोनि जाति ॥ २८ ॥ ऐसी होतां जाणवणी : तिहिं सांडिली ग्लानि ॥ उदय केला कृष्णगुणिं : आतां काय चिंता ॥ २९ ॥ या गुणकीर्तनपोतें : उतरों वृजिनार्णवातें ॥ या लक्षणें ग्लानीतें : सांडिलें जनें ॥ १३० ॥ एवं तेणें रमानाथें : श्रीकृष्णें नन्दसूतें॥ स्मरोंनि तें प्रतिश्रुतें : त्रीडा धरिली मनिं ॥ ३१ ॥ एवं तो पूर्वोक्तलक्षाणिं : उदैला नक्षत्रमणि ॥ त्या रासमण्डळमण्डनि : उपकरता जाला ॥ ३२ ॥ त्या शोभे सहवर्तमान : शोभलें कैसें वृंदावन ॥ आणि तो नन्दनन्दन : काय करिता जाला ॥ ३३ ॥

**दृष्ट्वा कुमुद्वंतमखंडमंडलम् रमाननाभं नवकुंकुमारुणम् ।**
**वनं च तत्कोमलगोभिरंजितम् जगौ कलंवामदृशां मनोहरम् ॥ ३॥**

पूर्वोक्तें करुनी : उदैला जो उडुमणि ॥ ऐसिया लक्षणि : लक्षिला राया ॥ ३४ ॥ ज्या उदयातें प्रतीक्षुनि : मुकुलिता होत्या कमळिनी ॥ या रश्मिस्पर्शें करुनि : विकासलिया ॥ ३५ ॥ या अर्थें कुमुद्वंत : बोलिला तो निशानाथ ॥ जो मंडळअखंडित : संपूर्ण कळा ॥ ३६ ॥ असतांहिं कळान्यूनता : तो उगवला पुरता : अकाळींचि समस्ता : कळापूर्ण जाला ॥ ३७ ॥ नातरि विचारुनि कृष्णोद्देशातें : सांडिलें क्रमातें ॥ जेविं सांडिजे क्रमज्ञानातें : बुद्धि जडे भगवंति ॥ ३८ ॥ तेवि समय न गणून जाला तो कळापुर्ण ॥ पाहावया कृष्णवदन : उगवला चन्द्र ॥ ३९ ॥ कृष्णीं उत्सुक जाला : कळाविभागातें विसरला ॥ सम्पूर्ण उगवला : अखंडितमंडळ ॥ ४० ॥ नाना सानुभव सर्वज्ञान : जेवि भगवंतिं भजे विज्ञान ; तेवि तो कळापूर्ण : प्रकटला तेव्हां ॥ ४१ ॥ परि तो जोत्स्नामाळी : उगवेचा होता जे काळिं ॥ तेव्हां कैसी योजली : मंडळ कृतितें ॥ ४२ ॥

रमादेवीचें वदन : जें सर्वशोभासदन ॥ न्यून्याधिक्यविहीन : अतिवर्तुळ जैसें ॥ ४३ ॥ तेवि येणें क्षमानाथें : स्मरोनि रमामुखातें ॥ काहिं एक आपणयातें : सादृश्य आणिलें ॥ ४४ ॥ आणि ते नवकुंकुमयुक्त : सुरंग-रागरंजित ॥ तेवि किंचित् उडुनाथ : साम्यता पावला ॥ ४५ ॥ असो तें शशिमंडळ कैसें : तरि वर्तुळ रमानना ऐसें ॥ नव कुंकुम शोभे तैसें : सुलोहित जें ॥ ४६ ॥ उदयरागें रंगोनि : तो उगवला गगनिं ॥ नातरि प्रेमा भरला मनिं : श्रीकृष्णाजिचा ॥ ४७ ॥ कृष्णिं जो अनुराग : तेणें तो शोभला सुरंग ॥ लोपोनिया निजरंग : स्वस्थ जाला ॥ ४८ ॥ असो रमेचेनि चिंतनें : जोडिलिं उभय लक्षणें ॥ कां जे मनि धरिलें तेणें : मिहिं आवडेन ॥ ४९ ॥ नातरि हें असो येचि ठाईं : सर्व सौंदर्यें कृष्णपाईं ॥ तेथें हे शोभा ते काई : परि दाविला विलासु ॥ ५० ॥ सांडुनि विषयरति : जरि काहिं उपजे भक्ति ॥ भगवत्प्रीतीची युक्ती : इतुकीचि असे ॥ ५१ ॥ प्रेमा उपजे प्रबळ : तरि वश्य होय रमालीळ ॥ वांचुनि इतर पाल्हाळ : नसरे तेथें ॥ ५२ ॥ असो हे भावार्थकथा : चालती कथाचि वदुं आतां ॥ कृष्ण क्रीडापर असतां : उगवला जो चंद्र ॥ ५३ ॥ तया उक्त लक्षणाते : आणि रश्मिरंजित वनातें ॥ देखोनि नन्दसुतें : काय करिजेतें जालें ॥ ५४॥ चन्द्राचें लक्षण : पूर्वोक्तें करुन ॥ यावरि तें वन : शोभलें कैसें ॥ ५५ ॥ उदेला जो सुधाकर : त्याचे कोमळ रश्मिकर ॥ जे सुधासमर्पणद्वार : ता-पशमक ॥ ५६ ॥ तयां सोज्वळि रश्मियुक्त : तें वन शोभले दीप्तिमन्त ॥ शांत श्रीमण्डित : सुधाप्राय ॥ ५७ ॥ उक्तलक्षणा चन्द्रातें : आणि तन्मंण्डिता वनातें ॥ देखोनि मधुरां गीतातें : तो नन्दानन्दन ॥ ५८ ॥ विचित्रा गायनकळा : प्रकटूनि गाता जाला ॥ तो कमळनयन सावळा : विलासिया कृष्ण ॥ ५९ ॥ त्या गीताचें लक्षण : तरि वामशब्दें स्त्रीजन ॥ नातरि वक्र अवलोकन : या निमित्तें वामदृशा ॥ ६० ॥ त्या स्त्रियांचें मनोहर : ऐसें गाइले मधुर ॥ पापतापापहर : ग्लानिनाशक ॥ ६१ ॥ नातरि नयन मिषें करुन : आकारलें त्यांचें मन ॥ असतें जाले प्रसन्न : दैवताप्रसादें

॥ ६२ ॥ ह्मणोनि त्या वामनयना : निर्देशिल्या गोपांगना ॥ अधिकार-सम्पन्ना : गीतासिं जाल्या ॥ ६३ ॥ कां जे तो गीतप्रभाव काहिं : साधारण ऐसा नाहिं ॥ त्या सुलोचनाचि पाहिं : अंगींकेल्या येथें ॥ ६४ ॥ एवं त्या वामलोचना : शुद्धचित्ता गोपांगना ॥ अधिकारसंपन्ना : कृष्णसान्निध्याते ॥ ६५ ॥ त्यांसि कृष्णगीत मधुर : जालें असे मनोहर ॥ सांडोनि व्यवहार : कृष्णपरा जाल्या ॥ ६६ ॥ एवं उडुनाथें स्पर्शित : देखोनि वन प्रशस्त ॥ कृष्णें गाईले गीत : गोपीमनोहर ॥ ६७ ॥

**निशम्य गीतं तदनंगवर्धनं व्रजस्त्रियः कृष्णगृहीतमानसाः ॥ आजग्मुरन्योन्यमलक्षितोद्यमाःस यत्र कांतो जवलोलकुंडलाः ॥ ४ ॥**

मग त्या व्रजकांता : श्रीकृष्णें गृहीताचित्ता ॥ स्वगृहिं अनासक्ता : त्यक्त-गृहधर्मा ॥ ६८ ॥ त्या अइकोनि कृष्णगीतातें : जाल्या जाल्या तेथें ॥ योगी प्रत्यक्पंथे : पावती जेवि ॥ ६९ ॥ ते कृष्णगीत कौंलक्षण : तरि तत्कामाचें वर्धन ॥ असो आइकोनि गायन : दर्शनार्ता जाल्या ॥ ७० ॥ जेवि कोण्हि शोधित मन : आइकोनि वेदवचन ॥ वाक्यार्थपरायण : मुमुक्षु होति ॥७१॥ तेंवि त्या कृष्णाचित्ता : आईकोनि तया गीता ॥ असत्या जाल्या आर्ता : जाकळलिया विरहें ॥ ७२ ॥ केव्हां श्रीकृष्णसुधाकरें : तृप्ती कीजे तन्नेत्रच-कोरें ॥ केव्हां अमृतमधुरें : कीजेल तृप्तकाम ॥ ७३ ॥ श्रीकृष्णीं होउनि रता नाइकों संसारवार्ता ॥ केव्हां विरहव्यथा : शमवील कृष्ण ॥ ७४ ॥ जंव्हि आह्मि कृष्णचिंत्ता : जवं नाहिं केलों स्वस्था ॥ तंवरि हा भवपंथा : दुःसह आह्मा ॥ ७५ ॥ त्या गीतातें आइकोनि : विरहकातरा कामिनी ॥ निजगृहा-पासुनि : कृष्णा निकट आल्या ॥ ७६ ॥ तें जें आगमन काहिं : परस्परें प्र-कट नाहिं ॥ येका कृष्णाचा ठाईं : बहुतींची आशा ॥ ७७ ॥ लालसेचेनि भरें : चोरिलिं तिहिं अंतरें ॥ कां जें आपणाचि जावें एकसरें : साधिल कृष्ण ॥ ७८ ॥ या कृष्णसंगाचा ठाईं : बहुतें काजकाई ॥ लौकिकें चाड नाहिं । जरि आवडे श्रीकृष्ण ॥ ७९ ॥ कृष्णप्रीति जरि पुरी : वृत्तीसिहि चोरि ॥ एकाकी कृष्ण सेजारीं : पहुडावें सुखें ॥ ८० ॥ एवं त्या गोपकांता : पृथ

कल्वें कृष्णाचित्ता ॥ येकीसि येक न कळतां : आल्या तेथें ॥ ८१ ॥ जेथें तो लक्ष्मीरमण : करित होता कलगायन ॥ तेथें तो गोपीगण : न जाणत आला राया ॥ ८२ ॥ त्यांचें गमनलक्षण : अति वेगें करुन ॥ तेणें जालें अन्दोलन : कुण्डलयुग्माचें ॥ ८३ ॥ असो सत्वर चालतां चाली : कुण्डलें हालों लागलीं ॥ नाना त्यामिषें विलासली : श्रीकृष्णभक्ती ॥ ८४ ॥ अन्तरीं प्रेमा उसळला : तो कुंडलिं प्रकट केला ॥ देहभाव शिथिळ जाला : हें जाणवलें नावेक ॥ ८५ ॥ एवं त्या गतिचपळा : गोपी त्रिलोलकुंडला ॥ होता जेथें वनसावळा : तेथें आल्या मिळाल्या ॥ ८६ ॥ जेवि योगी कृष्ण-परायण : करावया तत्वविवेचन ॥ संसारभूमीतें सांडुन : सद्गुरुप्रति येति ॥ ८७ ॥ तेवि त्या कृष्णकामिनी : गृहसंगातें सांडुनि ॥ श्रीकृष्ण होता विजनिं । तेथें सर्व आल्या ॥ ८८ ॥ आतां चालतां ते चाली : कर्में शि-थिलें जालिं ॥ कोणा चिन्हि वोळखिलिं : तेंहिं आइका ॥ ८९ ॥ असो आइकोनि कृष्णगीतें : गृहकर्में असमाप्तें ॥ सांडुनि त्या प्रत्यक्पंथें : तत्काळ आल्या तेथें ॥ ९० ॥

**दुहंत्योभिययुः काश्चिद्दोहं हित्वा समुत्सुकाः ॥**
**पयोधिश्रित्य संयावमनुद्वास्यापरा ययुः ॥ ५ ॥**

किंतिएक गोपांगना : करित होत्या गोदोहना ॥ ते सांडुन उत्सुकमना : आल्या तेथें ॥ ९१ ॥ किंतिएक गोपगृहिणी : पात्रें दुग्धि भरोनि ॥ ठेविलिंहिं जे क्षाणिं : चुलीचा ठाइं ॥ ९२ ॥ तवं अकस्मात् आइकिला ध्वनि : त्यातें गेल्या विसरोनि ॥ तें दुध न उतरोनि : त्वरित गेल्या ॥ ९३ ॥ आणि संयावशब्दें जाण : जें गोधूमखंडकण ॥ देशभा-षाविशेषण : सांजा ऐसें ह्मणति ॥ ९४ ॥ तो तप्त उदकेंसि युक्त : चुली-वरि पाकार्थ ॥ ठेविला तवं अकस्मात : आइकिला सुस्वर ॥ ९५ ॥ त्या कलगीतें वेधितमना : विव्हळ ज्या गोपांगना ॥ नुतरितां गोधुमकणां : तत्का-ळ गेल्या ॥ ९६ ॥

**परिवेषयंत्यस्ताद्धित्वा पाययंन्त्यः शिशून्पयः ॥**
**शुश्रूषंत्यः पतीन्काश्चिदश्नंत्योपास्य भोजनम्॥ ६ ॥**
**लिंपत्यः प्रमृजंत्योन्या अंजंत्यः काश्च लोचने ॥**
**व्यत्यस्तवस्त्राभरणाः काश्चित्कृष्णांतिकं ययुः ॥ ७ ॥**

आणिकही गोपकांतां : पतिसुतादि समस्तां ॥ परिवेषण करितां : चतुर्विधें अन्नें ॥ ९७ ॥ आइकतां गीतध्वनि : तें गेल्या विसरोनि ॥ गीतें खोंचलिया मनीं : चालिल्या तेथुनि ॥ ९८ ॥ जेवि तत्वमस्यादिवाक्यार्थें : भेदिलें मुमुक्षुचि चित्तें ॥ सांडुनि दृश्य भुमीतें : प्रत्यगर्थि रमति ॥ ९९ ॥ तेवि त्या भामिनी : आइकोनि कृष्णध्वनि ॥ त्या परिवेषणातें सांडुनि : त्या निकट गेल्या ॥ २०० ॥ कितियेक पुत्रवंत्या : पुत्रातें दुग्ध पाजितां ॥ याहुनि इतर कृत्या : विसर्जुनि ॥ १ ॥ तवं आइकोनि कृष्णगीतें : टाकोनि त्या कर्मातें ॥ श्रीकृष्ण होता तेथें : आलिया त्या ॥ २ ॥ आणिका गोपगृहिणी : स्वस्थचित्तें करुनि ॥ असोनि निजभवनि : पतीतें सेवितां ॥ ३ ॥ आइकोनि कृष्णगीता : तेथूनि जाल्या निवृत्ता ॥ श्रीकृष्ण होता : तेथें आलिया ॥ ४ ॥ जेवि एकवाटुनि सर्व वृत्ती : चिदाभासपरा होति ॥ सांडुनि दृश्य संपत्ति : एकनिष्ठ बुद्धि ॥ ५ ॥ ते साधनाचेनि पंथें : त्वंपदशोधननिमित्तें ॥ निजावच्छिन्ना चैतन्यातें : भजोनि विचारिं योग्य जाली ॥ ६ ॥ तें आइकोनि गुरुवाक्यातें : सांडुनि चिदाभासातें ॥ अनुसरोनि तत्पदार्थातें : तदाकार होयें ॥ ७ ॥ सांडुनि परिच्छिन्नाभिमान : स्वस्वरुपिं संस्थान ॥ पावावयाचें साधन : निदिध्यास कीजे ॥ ८ ॥ तैसें सांडुनि पतिसेवेतें : गोपिका प्रत्यक् पंथें ॥ कृष्ण होता तेथें : चालिल्या राया ॥ ९ ॥ नातरि सेवाफळभूत : तें आइकिलें कलगीत ॥ कृष्णनिकट त्वरित : येत्या जाल्या ॥ १० ॥ आणि सांडुनि अन्य कृत्या : भोजनें करित होत्या ॥ गीति वेधल्या होत्सात्या : तत्काळ आल्या ॥ ११ ॥ असो सांडुनि भोजनातें : गेल्या कृष्ण होता तेथें ॥ मुमुक्षु निजकर्मातें : विसर्जिती जेवि ॥ १२ ॥ नागीकरुनि प्राणधर्म : मुमुक्षु आत्माराम ॥ सेविति तेवि निः-

काम : आलिया गोपी ॥ १३ ॥ कितिएक गोपस्त्रिया : विलेपने करित होतिया ॥ उद्वर्तनादि क्रिया : संपादितां ॥ १४ ॥ कितिएक सुलोचना : शुद्धदृष्टि गोपांगना ॥ कज्जळें भरोनि नयना : शोभवितां ॥ १५ ॥ तवं आईकोनि कृष्णध्वनि : नेत्रांजन विसर्जोनि ॥ जेथें होता यदुमणी : तेथें आल्या ॥ १६ ॥ एवं कृष्णकळावंतें : प्रेरुनि कलगीतें ॥ तिया गोपिकांतें : निजवश केले ॥ १७ ॥ त्या सुगीतवेधितमना : व्यत्यस्तवस्त्रभूषणा ॥ चालिल्या व्रजांगना : कृष्णा निकट ॥ १८ ॥ असो वस्त्रें भूषणें जें काहिं : होति त्यांचा ठाईं ॥ ते त्या काळिं सर्वांहिं : विपरीत धरिलिं ॥ १९ ॥ कृष्णगीतें वेधिलिं चित्तें : विसरल्या तारतम्यातें ॥ वस्त्रें नेसल्या विपरीतें : तैसिच भूषणें ॥ २० ॥ कर्णभूषणें जें काहिं : तें लेइल्या अंगुळीचा ठाईं ॥ आणि कटिभूषणें तिहिं : वाइली गळां ॥ २१ ॥ करभूषणें जें कांहिं : त्यांतें लेइल्या पाइं ॥ आणि नासाभूषणें तिहि : खोंविलि सिरिं ॥ २२ ॥ नेसत वस्त्रें परिधानें : वेढिलिं तिहिं प्रावर्णें ॥ किंवा वस्त्रें सांडुनि आस्तरणें : नेसल्या त्या ॥ २३ ॥ एकीं अनुसंधानराहित्यें : शिरिं धरिलें वस्त्रांतें ॥ शिरोभूषणें कटितें : अळंकारिलिं कितियेकिं ॥ २४ ॥ कंठिं माळांचिया भावना : लेइल्या रशना ॥ कटीचा ठाइं अंगना : माळा लेइल्या ॥ २५ ॥ एवं इत्यादि लक्षणें : व्यत्यस्त वस्त्राभरणें ॥ वेणुगीतें वेधिलि मनें : कृष्णाजवळि आल्या ॥ २६ ॥ नाना कृष्णप्राप्तिचिये वेळे : संसारिकें पडलिं विकळें ॥ परि अंतरिं रूप सावळें : ठसावलें विशेषें ॥ २७ ॥ दृश्याहुनि परतली वृत्ती : ते जाली कृष्णा सवती ॥ तेणें त्याची बाह्यस्थिती : वोडवली विकळ ॥ २८ ॥ एवं त्या व्रजांगना : विकळवसनभूषणा ॥ मुरलि-ध्वनिविव्हळमना : कृष्णाप्रति आल्या ॥ २९ ॥ आतां त्यांसि जातिये वेळे : राया एक नवल जालें ॥ कृष्णिं चित्त रंगलें : ते न फिरेचि मागें ॥ ३० ॥

**ता वार्यमाणाः पतिभिः पितृभिर्भ्रातृबंधुभिः ॥**
**गोविंदापहृतात्मानो नन्यवर्तंत मोहिताः ॥ ८ ॥**

त्या कृष्णाप्रति गोपगृहिणी : चालिल्या राया जे क्षणीं ॥ तेव्हां त्यांचे भर्तार येउनि : वारिलें त्यांतें ॥ ३१ ॥ या रात्रीचा ठाईं : कृष्णा जवळ काज काइ ॥ ऐसें बहुं कांहिं : वार्जिलें त्यांतें ॥ ३२ ॥ आणि भाउ सोइरे जे कोण्हि : बापेंहिं त्या कामिनी ॥ निवारिल्या परि मनीं : संचरला कृष्ण महद्भुत ॥ ३३ ॥ असो कृष्णें मोहिल्या अंतरिं : न येतीच वृत्तीवरि ॥ त्या वार्जिल्या सुंदरी : न फिरती ॥ ३४ ॥ नाना कृष्णप्राप्तीचा ठाइं : विघ्न वोडवलें जें कांहिं ॥ परि तें न मानिले तिहिं : कृष्णस्थ चित्तें ॥ ३५ ॥ अगा विषयिं जरि आसक्ति : तरि त्याज्य नव्हे विधिशास्ति । आतां कृष्णभक्तां प्रति : निवृत्तीच इष्ट ॥ ३६ ॥ असो लक्षुनि विषयासक्ति : कर्मकांडाची प्रवृत्ती ॥ येथें शिष्टाचारां प्रति : हा संकोच केला ॥ ३७ ॥ आतां कृष्णिं रंगलीं चित्तें : कर्तव्य नुरेचि त्यातें ॥ देहनिर्वाहहि ज्यांतें : नयेचि आड ॥ ३८ ॥ ऐस्या कृष्णरतचित्तातें : जन्हि आलिं विघ्नशतें ॥ तें नचलती प्रवृत्तीपंथें : निवृत्तिपर जे ॥ ३९ ॥ एवं त्या गोपकांता : कृष्णमोहिचित्ता ॥ कृष्णानिकट जातां : निवारिल्या तिहिं जन्हि ॥ ४० ॥ तथापि त्या निषेधातें तिहिं : सर्वथा मानिलें नाहिं ॥ गृहादि सम्बन्ध जिहिं : सांडिला निःशेष ॥ ४१ ॥

अंतर्गृहगताः काश्चिद्गोप्योलब्धविनिर्गमाः ॥
कृष्णं तद्भावनायुक्ता दध्युर्मीलितलोचनाः ॥ ९ ॥
दुःसहप्रेष्ठविरहतीव्रतापधुताशुभाः ॥
ध्यानप्राप्ताच्युताश्लेषनिर्वृत्या क्षीणमंगलाः ॥ १० ॥
तमेव परमात्मानं जारबुद्ध्यापि संगताः ॥
जहुर्गुणमयं देहं सद्यः प्रक्षीणबंधनाः ॥ ११ ॥

त्यांमाजि ज्या कोण्हि : अन्तर्गृहातें अधिष्ठुनि ॥ असो दुःप्रवेश जेथुनि : निर्गम नव्हे ॥ ४२ ॥ ऐशा गृहा माझारि : कोणी होत्या व्रजनारी ॥ त्या मधुर गीतातें जन्हि : आइकिले तिहिं ॥ ४३ ॥ तन्हि तयांसि ते क्षणि : निर्गमुचि न पुरे तेथुनि ॥ पति सुतादि जनीं : निरोधिलें बहु ॥ ४४ ॥

मग त्या कृष्णचित्ता : सर्वदा तद्भावयुक्ता ॥ जर्‍हि कृष्णमायामोहिता : परि अलब्धनिर्गमा ॥ ४५ ॥ येकवाटुनि सर्व वृत्ती : आठविली कृष्णमती ॥ असो कृष्णातें त्या सति : ध्यात्या झाल्या ॥ ४६ ॥ त्या सभाग्या अंगना : असोनि मिळितलोचना ॥ हृदयमंदिरिं यदुराणा : आणिला तिहिं ॥ ४७ ॥ त्या ध्यानमयी कृष्णमुर्तीतें : आळिंगुनि स्वचित्तें ॥ या गुणमया देहातें : सांडित्या जाल्या ॥ ४८ ॥ त्यांसि साक्षात् रमानाथ : ध्यानप्रसंगें जो आप्त ॥ त्यातें पावोनि तें स्त्रिजात : उद्धरलें राया ॥ ४९ ॥ आणि इतरा ज्या कामिनी : कर्मसाम्यातें पावोनि ॥ आइकतांचि वेणुध्वनि : त्यक्ताशा जाल्या ॥ ५० ॥ कृष्णस्मरणनिमित्तें : पुण्योत्कर्षसामर्थ्यें ॥ पूर्वीचिं सर्वं दुरितें : सरिलिं होतिं ॥ ५१ ॥ न्याहाळितां कृष्णवदन : सदा तटस्थ नयन ॥ गुंतलें ज्यांचे मन । श्रीकृष्णशोभे ॥ ५२ ॥ सदां ज्यांची वाणी : गुंतली गुणवर्णनि ॥ कर्ण गुणश्रवणि : गुंतले राया ॥ ५३ ॥ श्रीकृष्णें ज्यांचा काळ : सदां क्रमला प्रांजळ ॥ रागद्वेषादि सकळ : मुराले तत्संगें ॥ ५४ ॥ कृष्णभजनतीव्राग्नि : तेणें दुरिततृणश्रेणि ॥ जाळुनि कृष्णकामिनी : त्या शुद्धचित्ता होत्या ॥ ५५ ॥ गृहसंगातें अतिक्रमुन : कृष्णवाक्य प्रतिक्षुन ॥ किंचित् आश्रमावलंबुन : होत्या स्वगृहिं ॥ ५६ ॥ तंव आइकोनि कृष्ण-गीतें : सांडुनि सर्वाश्रयातें ॥ श्रीकृष्ण होता तेथें : आलिया राया ॥ ५७ ॥ सांडितां सर्व बंधातें : कृष्ण जोडला त्यांतें ॥ आतां येणेंजाणें तो येथें : विलासमात्र ॥ ५८ ॥ आतां ज्या गोपकांता : प्रस्तुत प्रतिबंधयुक्ता ॥ होत्या अंतर्गृहगता : गोविल्या भर्तारिं ॥ ५९ ॥ त्या सांडुनि सद्यःप्राप्तीतें : पावोनि ध्यानमार्गातें ॥ आळिंगुनि कृष्णातें : त्यजिलें उपाधि ॥ ६० ॥ आइकोनि वाक्यवृत्ती : श्रीकृष्णेंसि प्रतियुक्ती ॥ चाळुनि अविद्यानिवृत्ती : जाली नाहिं ॥ ६१ ॥ मग ध्यानाचिया तीव्रगति : प्रांतिं प्रसन्न कृष्णमूर्ति ॥ करुनि त्या सती : कृष्णास्था जालिया ॥ ६२ ॥ असो ध्याना-चेनि बळें : अंतरिं कृष्णें आलंगिलें ॥ त्याभिषें प्रेरिलें : आत्मज्ञानातें ॥ ६३ ॥ त्या ज्ञानें अज्ञाननिवृत्ति : पावोनि सांडिलि देहाकृति ॥ श्रीकृष्णि अवस्थिति:

पावल्या त्या ॥ ६४ ॥ ह्मणाल नसोनि अविद्यानिवृत्ति : कृष्णि जारबुद्धि होति ॥ जारबुद्धिने त्या सति : पावल्या कैशा ॥ ६५ ॥ ऐसें मानेल तुमतें : तरि जारबुद्धि जऱ्हि त्यांतें ॥ तऱ्हि हा परमात्मा येथें : विरुद्ध नव्हे ॥ ६६ ॥ असो कृष्ण मानिला जार : जो पतीहुनि पर ॥ त्या परबुद्धिनें नंदकुमार : सेविला तिहिं ॥ ६७ ॥ प्राकृतें लक्षणें काहिं : न देखोनि कृष्णाचा ठाइं ॥ तो उत्तमत्वें मानिला तिहिं : परमपुरुष ऐसें ॥ ६८ ॥ नाना आईकोनि गुरुवाक्य : शोधिलें नाहिं सविवेक ॥ न जाणती तात्विक : कृष्णआत्मा ऐसें ॥ ६९ ॥ जेवि प्रपंचाहुन विलक्षण : वेदें वर्णिलें निर्गुण ॥ तें वेदवाक्यें करुनि प्रमाण : मुमुक्षु भजति ॥ ७० ॥ नाना विशेष विग्रहाचा आकृती : मुमुक्षुहि तेचि स्मरती ॥ तऱ्हि स्वरुपप्रभावशक्ति : मुख्य मतीच त्यांचि ॥ ७१ ॥ तेवी परमात्मा श्रीकृष्ण : हें तवं नव्हे अप्रमाण ॥ त्या परमात्मत्विं स्त्रीजन : परत्वें पावला ॥ ७२ ॥ आतां निजात्मा श्रीपति : तो काये देईल अन्य गति ॥ बुद्धीहुनि बळवती : वस्तुशक्ति येथें ॥ ७३ ॥ वस्तुशक्तीचा ठाईं : बुद्धीची अपेक्षा नाहीं ॥ ऐसा न्याय जो काहिं : तो अन्यथा नव्हे ॥ ७४ ॥ श्रीकृष्ण प्रत्यक्पदार्थ : तेथें परत्वें जऱ्हि चित्त ॥ तऱ्हि फळ तों यथावत : आत्मत्वें देइल ॥ ७५ ॥ कां जें ज्यारबुद्धीहीसाटिं : साक्षात् कृष्णोंसिंच भेटि ॥ फळहि त्यांतें शेवटिं : श्रीकृष्णसंग ॥ ७६ ॥ ह्मणाल कर्मनिबंधन : जीवासि देहधारण ॥ तरि भोगिल्या वांचुन : टाकिला कैसा ॥ ७७ ॥ तरि तें प्रारब्धबंधन : तत्काळ जालें क्षीण ॥ कर्मक्षय आणि कृष्णध्यान : एके काळीं जालें ॥ ७८ ॥ ह्मणाल त्या होत्या गृहगता : काहिं असेल गृहास्था ॥ येणें लक्षिलि आसक्तता : त्यांते प्रथम तों सत्वशुद्धि कैंचि ॥ ७९ ॥ अहो त्यांतें ध्यानगत : कैसा जोडला भगवंत ॥ शुभाशुभसंचित : क्षीण जालें नसतां ॥ ८० ॥ तरि प्रेष्ठविरह जो काहिं : त्यांचेनि साहावेला नाहिं ॥ कृष्णवियोगें त्यांसि पाहिं : अवस्था जे जाली ॥ ८१ ॥ तेचि जाले तपपर्यंत : तेणें नाशिलें कर्मजात ॥ त्या तीव्रतापें विधुत : कल्मषा जाल्या ॥ ८२ ॥ असो तीव्रताप जाला :

तोचि सुकृतें फळला ॥ पापार्णव आटला : जालिया शुद्धचित्ता ॥ ८३ ॥ तें जें शुद्धचित्तें : कृष्ण प्रकटला तेथें ॥ एवं एककाळें त्यांतें : उभय योग घडले ॥ ८४ ॥ तीव्र ध्यानगति : प्रारब्धाचि समाप्ति ॥ तेव्हां तया शुद्ध-चित्तिं : प्रकटिजेते कृष्णें ॥ ८५ ॥ ऐसें जें शास्त्रश्रवण : तें येथें योजिलें प्रमाण ॥ आतां पुण्य जें जालें उत्पन्न : कृष्णविरहें ॥ ८६ ॥ त्या पुण्याच्या उन्नति : जेव्हां व्हावी वैकुंठप्राप्ति ॥ तेथें त्यांसि सद्योमुक्ति : योजलि कैसि ॥ ८७ ॥ तरि ध्यानयोगें करून : प्रत्यक्ष जें कृष्णदर्शन ॥ तेणें तें पुण्य क्षीण : तया ज्ञानें जालें ॥ ८८ ॥ साक्षात् कृष्णिं आळिंगिलें : त्या मिषें ज्ञानातें प्रेरिलें ॥ सुख देउनि नाशिलें : अज्ञान त्यांचें ॥ ८९ ॥ त्या ज्ञान-शक्तीचा ठाइं : शुभाशुभ कैंचें काइ ॥ जीवन्मुक्ति सुखहि : नुधवीच माया ॥ ९० ॥ त्या येणे लक्षणें अबळा : योजल्या सुमंगळा ॥ साक्षात् ब्रह्मी घडला : अवसरु त्यांतें ॥ ९१ ॥ एवं कृष्णविरहतापें : जळालिं निःशेष पापें ॥ आणि श्रीकृष्णें निजरुपें : आळिंगिलें सद्य ॥ ९२ ॥ त्या आळिं-गनसुखप्राप्ति : स्वता कृष्ण जाला गति ॥ पुण्याची पंक्ती : विरोनि गेली ॥ ९३ ॥ येथें मंगळलक्षण : जाणावी पुण्याची खुण ॥ तें कृष्णिं पावउन : आपण विरालें ॥ ९४ ॥ अथवा विरहतापें करुन : पापें गेलिं जळोन ॥ मग पुण्यचय सम्पुर्ण : पूर्वार्जित उरला ॥ ९५ ॥ प्रारब्धभोगाचा अंतिं : ध्यानाचिया उन्नति ॥ श्रीकृष्णातें त्रियासती : आळिंगित्या जाल्या ॥ ९६ ॥ त्या आळिंगनप्रभावकळा : पुण्यचयही विराला ॥ त्या भाग्याच्या प्रेमळा : पावल्या कृष्णिं ॥ ९७ ॥ एवं या प्रकारें करुन : केलें मंगळाशुभाचें व्याख्यान ॥ आतां कोण्हि अभिज्ञ जन : ऐसें ह्मणति ॥ ९८ ॥ जें प्रारब्धक्षये नसतां : त्या कैशा पावल्या श्रीनाथा ॥ तरि कर्मक्षय तों अर्थता : तेचि काळिं लक्षिला ॥ ९९ ॥ असो जिहिं तीव्रध्यान बळें : आयुष्यातें संकोचिलें ॥ हें स्थुळहि नाहिं केलें : गोपाळा आधिन ॥ २०० ॥ कां जे ते अत्यंत मुर्ख : कृष्ण-प्राप्तिचे निरोधक ॥ हें जन्हीं अतात्विक : यां आधिन नसो ॥ १ ॥ किंवा हे या जडाचे पति : यावरीच यांची शास्ति ॥ तरि असो यांचिया हातिं :

होंचि सांडावें ॥ २ ॥ ऐसें जड अर्पावें यांतें : स्वताचि साधुं कृष्णातें ॥ तिहिं विचारुनि आयुष्याते : संकोचिले तेव्हां ॥ ३ ॥ परि प्रारब्धभोग बळवंत : तो भोगक्षय अवस्य प्राप्त ॥ जाला त्याची यथावत : गति योजिलि ॥ ४ ॥ आइकोनि त्या गीतातें : कृष्णदर्शनार्तचित्तें॥जालिं परि प्रस्तुत त्यांतें : गोविलें त्या संबंधें ॥ ५ ॥ तया कृष्णविरहानाळिं : संतप्तता भोगासि आली ॥ तया तापें सरलिं : पुर्विल दुःकर्मे ॥ ६ ॥ आनि ध्यानमार्गे करुन : कृष्णिं जालें आळिंगन ॥ तेणें जो काहिं उत्पन्न : सुखविशेष ॥ ७ ॥ त्या सुखभोगाचिया प्राप्ति : सरली सुकृतांची पंक्ति ॥ हें देहारंभकें ये रिति : नासलिं शुभाशुभें ॥ ८ ॥ आतां या व्याख्यानें करुन : ऐसेंहि जालें निष्पन्न ॥ जें स्वधर्मानुष्ठान : करितिये वेळे ॥ ९ ॥ ब्राह्मणादि दोहिं : क्लेश जे क्रमिले काहिं ॥ त्या क्लेशद्वारें तिहिं : पुर्वदुरितें सारिलिं ॥ १० ॥ किंवा वैराग्यमुळें करुन : केलें जरि परिव्राजन ॥ शीतोष्णादि सहन : तेणे घडलें ॥ ११ ॥ तें दुरितांचें फळ भोगिलें : हें न्यायें प्राप्त जालें ॥ आतां अधर्माचरणिं घडलें : सुख जें कांहिं ॥ १२ ॥ स्नानादि त्याग वेळे : शरीरक्लेश जे चुकले ॥ तें त्यांसि आलें : फळासि प्राक्पुण्य ॥ १३ ॥ऐसें करितां निरुपण : खण्डेल हें सत्साधन ॥ किंवा साधनरुपें दुराचरण : फळले जरि ॥ १४ ॥ तरि तें पुण्याचरण : सर्वथा नव्हे क्रियमाण ॥ कर्माचें फळ कारण : फळांतरासि कैसें ॥ १५ ॥ फळासि फळप्रसंग जाला : ऐसा विरुद्धार्थ घडला ॥ तरि यदर्थिं योजिला : निर्णय ऐसा ॥ १६ ॥ शरीराचा ठाइं : सुखदुःखें जालिं जें काहिं ॥ तें पुण्यापुण्य फळें नाहिं : संदेह येथें ॥ १७ ॥ आणि स्वधर्माचरण : तें कर्म क्रियमाण ॥ हेंहिं नव्हे अप्रमाण : सर्व शास्त्रयुक्त ॥ १८ ॥ तैसेंच वैराग्यादि उत्पन्न : हें महत्पुण्याचें महिमान ॥ ईश्वरार्थ अनुष्ठान : तेहिं तैसेंचि ॥ १९ ॥ ऐसा उभयता विसंवाद : एक एकेसि विरुद्ध ॥ आतां ये रिती निर्विवाद : करिजे आइका ॥ २० ॥ स्वधर्माचरणाचा ठाईं : मन जरि वश नाहिं ॥ तरि निष्पन्नचि नव्हे काहिं : साधनप्रसंग ॥ २१ ॥ वश जालियां मना : नुपजे क्लेशादि भावना ॥ एवं मन प्रवर्ते शुभसाधना :

तो पुण्यमहिमा ॥ २२ ॥ तया शुभाचरणप्रवाहिं : स्थूळ शरीराचा ठाईं ॥ दुःख सुखाभाव जो काहिं : तो शरीरदोष ॥ २३ ॥ कोण्हि यका काळें : साहिजे तो तेजोबळें ॥ सीतचि त्या वेळें : प्रशस्तें सेवि ॥ २४ ॥ किंवा बळवीर्या होतां हाणि : सीतेंचि उपजे ग्लानि ॥ उष्ण लाभें मानें : अत्यंत सुरवाड ॥ २५ ॥ आणि कोणें काळें करुनि : उष्णोंहिं उपजे ग्लानि ॥ एवं शीतोष्णादि दोंन्हि : व्यभिचारें फळति ॥ २६ ॥ तस्मात् दैववशें : शरीर संबंध दोषें ॥ शरीराश्रयेंचि उमटतसे : सुखदुःखादि आकार ॥ २७ ॥ परि प्रारब्धाचेंनि बळें : सुखास्पदहि काहिं आलें ॥ आणि अंतरिं उपजलें : वैराग्य तेथें ॥ २८ ॥ तें शरीरासि सुखकर : पारे मनासि दुष्कर ॥ न करिजेचि अंगीकार : सुखेंकरिं त्यांचा ॥ २९ ॥ किंवा अंतरिं भोगासक्ति : आणि शरीरिं दोषोत्पत्ति ॥ तेणें विरुद्धत्वें फळा येति : सुखास्पदहि भोग ॥ ३० ॥ त्या सुखाभासें करुन : निस्तरणें पडे वृजिन ॥ जंवि मिष्ट पक्वान्न : तेणें प्राणसंकट जालें ॥ ३१ ॥ किंवा पंचाग्निज्वाळा : सोसितां मानिती सोहळा ॥ ऐसी क्रियमाण कळा : मनाचा ठाईं ॥ ३२ ॥ आणि भोगक्षणाचा ठाईं : सुखदुःखें उपजती देहिं ॥ त्या भोगिंहिं नाहिं : एकहि नेम ॥ ३३ ॥ शरीरिं शक्ति अशक्ति : भोगीं सुखदुःखें होति ॥ तया उभयें निस्तरती : पुण्यपापें जन ॥ ३४ ॥ किंवा एकाचें कर्मफळ : दोहिंसहि अनुकुळ ॥ शरीरभोगही प्रांजळ : मनासही मानें ॥ ३५ ॥ किंवा एकाचां कर्मगति : उभयताहि सुखदुःखदाति ॥ एवं प्रसंगें उपपात्ति : दाविली ऐसी ॥ ३६ ॥ आतां असो हे येथें : अनुसरो प्रकृत कथेतें ॥ गीतश्रवणें गोपिकातें : जाली जे अवस्था ॥ ३७ ॥ त्यां माजि तन्तर्गृहगता : कोण्हिएकी गोपकांता ॥ तिहिं स्मरोनि नन्दसुता : टाकिलें निजदेह ॥ ३८ ॥ असो सद्यः श्रीकृष्णातें : भेटावया निर्गमातें ॥ *न देखोनि ध्यानमार्गातें : अवलंबिलें तिहिं ॥ ३९ ॥ तया ध्यानमार्गें करुन : श्रीकृष्णातें आलिंगुन : उपाधीतें सांडुन : मिळालिया कृष्णि ॥ ४० ॥ आनि त्या तीव्र ध्यान बळें : प्रारब्धातें नाहिं गणिलें : तेणें योगें सारिलें : शुभाशुभ

---

* " न देखोनि "च्या बद्दल मुळांत बरेच ठिकाणीं ' नेंदखोनि ' असें आहे.

भोग ॥ ४१ ॥ ऐसें राया परीक्षितीतें : निवेदिलें व्याससुतें : आइकोनि रायातें : उपजली शंका ॥ ४२ ॥ जें पूर्वोक्तें ग्रंथें : प्रशंसिलें वस्तुस्वभावातें ॥ जान्हिं त्या गोपिकांतें : जारबुद्धि कृष्णिं ॥ ४३ ॥ तथापि वस्तुप्रभावकळा : ब्रह्मत्वें कृष्ण फळला ॥ असो श्रीकृष्णिं फावला : अवसरु त्यांतें ॥ ४४ ॥ तरि पतिसुतादि जन : हे काये होसि अभिन्न ॥ '**सर्व ब्रह्म**' हें वेदवचन : व्यर्थ असे कायि ॥ ४५ ॥ तरि पतिसुतादि भजनिं : मोक्ष कां न पवति प्राणि ॥ सन्यासादि विधि याजनिं : व्यर्थ प्रवर्तला काई ॥ ४६ ॥ एसें रायाचा चित्तिं : उपजोनि श्री शुकेंद्राप्रति ॥ बोलतुसेतें यथामति : वाखाणिजेतें ॥ ४७ ॥

**॥ राजोवाच ॥**

**कृष्णं विदुः परं कांतं न तु ब्रह्मतया मुने ॥**
**गुणप्रवाहो परमस्तासां गुणधियां कथम् ॥ १२ ॥**

अहो आइकावें मुनिनाथें : ऐसें गमतसे मज येथें ॥ जें त्या गोपी श्रीकृष्णातें : ऐसें जाणत होत्या ॥ ४८ ॥ हा आम्हा पासुनि पर : किंवा निजपतिहुनि इतर ॥ रमणीय अति सुंदर : मनोनयनरंजन ॥ ४९ ॥ ऐसें त्या सुंदरा : यशोदानंदकुमारा ॥ मुनिजनमनोहरा : जाणतीया जाल्या ॥ ५० ॥ परि साक्षात् सच्चिदानंदघन : केवळ ब्रह्म सनातन ॥ ऐसें तो गोपीजन : जाणता नाहिं जाला ॥ ५१ ॥ का जे त्या गुणबुद्धि गोपकांता : रजसत्वादि गुणयुक्ता ॥ देहादिकिं अहंममता : परिच्छिन्नाभिमान ॥ ५२ ॥ ह्मणौनिं स्वरूपभुताकृष्णातें : जाणितलें परत्वें त्यातें ॥ सर्पबुद्धी रज्जूतें : सर्पत्वेंसि परत्व ॥ ५३ ॥ तेवि त्यागोपगृहिणीं कृष्णासि परत्वें मानुनि ॥ आपण जाल्या विरहिणी : श्रीकृष्णार्थ ॥५४॥ कृष्णविषयकि अज्ञान : जे किं गुणप्रवाहसंज्ञ ॥ तेणें त्यांसि आत्मा कृष्ण : परत्वें गमला ॥५५॥ तया कृष्णिं त्यांसि मति : ब्रह्मत्वें नव्हती पुरति ॥ तरि अज्ञानाची निवृत्ति : कोणे रिति जाली ॥ ५६ ॥ अधिष्टान ज्ञानेंविण : कैसें नाशलें अज्ञान ॥ हें देहादि प्रपंचभान : नाशलें कैसें ॥५७॥ अज्ञानाचिया अनिवृत्ति :

कैशा त्या प्राप्तगति ।। श्रीकृष्णि विश्रांति : कैशा गोपी पावल्या ।। ५८ ।। एवं एतल्लक्षण : रायाच्या मनिं प्रश्न ।।उपजला तें निवेदन : श्री शुकाप्रति केलें।।५९।। तया प्रश्नाचें परिहरण : उत्तर ग्रंथें करुन ।। करावया व्यासनंदन : बोलताति ऐसें ।। ६० ।।

।। श्रीशुक उवाच ।।

**उक्तं पुरस्तादेतत्ते चैद्यः सिद्धिं यथा गतः ।**

**द्विषन्नपि हृषीकेशं किमुताधोक्षजप्रियाः ।। १३ ।।**

राया हें पुर्वी तुतें : बोलिलें उपपत्तिपंथें ।। तो चैद्य पावला सिद्धीतें : द्वेषित होत्सांता कृष्णातें ।। ६१ ।। असो विख्यात शुशुपाळ : चैद्य देशाचा भुपाळ ।। अनुजन्मि रमालीळ : द्वेषिला तेणें ।। ६२ ।। त्या संबंधेंचि येथें : पावला परम गतीतें ।। ते साद्यंत कथा तुतें : सांगीतली पूर्वि ।। ६३ ।। एवं द्वेषबुद्धि भगवंतिं : पावला तो चैद्यपति ।। मां या तरि गोपिकासती : प्रेमपात्रा कृष्णाचिया ।। ६४ ।। पाहावया कृष्णवदन : सदां तृषार्तनयन ।। वाचा ज्यांचि पावन : कृष्णगुण वर्णितां ।। ६५ ।। सदा ज्यांचें मन : असोनि कृष्णा अधिन ।। काहिंहिं त्यांवाचुन : चिंतिलेंचि नाहिं ।।६६।। राया पाहोनि कृष्ण-जीतें : तृणप्राय केलिं जीवितें ।। सांडुनि सर्व आशेतें : सदां कृष्णकामा त्या।।६७।। ह्मणसी कृष्णि ब्रह्मबुद्धि नसतां : कैशा त्या गोपकांता ।। गति पावल्या यासि आतां : पुशिला हेतु ।।६८।।जें जीवमात्र साधारण : परमार्थें चैतन्यघन ।। परि जीवबुद्धी करुन : असत्य जालें ।। ६९ ।। तेवींचि कृष्णाचा ठाइं : ब्रह्मबुद्धि त्यांसि नाहिं ।। तरि परमार्थें कृष्णपाई : पावल्या कैशा ।। ७० ।। ऐसें आक्षेपिलें असतां : रायें त्या मुनिनाथा ।। तेंचि प्रश्न उत्तर पुनः आतां : सिद्ध जालें ।। ७१ ।। द्वेशाचिया अनुवृत्ति : कृष्णि ब्रह्मबुद्धि नव्हति ।। तरि तो चैद्य-पति : कैसा ब्रह्मत्व पावला ।। ७२ ।। ऐसें राया जरि तुतें : मानलें असेल येथें ।। तरि विशेषणद्वयें कृष्णातें : याचिलागि वर्णिलें ।। ७३ ।। द्वेषबुद्धी करुन : चैद्याचें जेथें होतें मन ।। तो कृष्णराया जाण : हृषीकेश स्वयें ।। ७४ ।। जयाचिया सत्ते करुन : वर्तत असे इंद्रियगण ।। नव्हे जो-

इंद्रियां अधीन : अनावृतस्वरूप ॥ ७५ ॥ जयाचिया दृष्टि काहिं : हा प्रपंचुचि जाला नाहिं ॥ स्वस्वरूपाचाचि ठाइं : अभिगमन सदां ॥ ७६ ॥ तैशाचि त्या गोपकांता : सदां श्रीकृष्णिं अभिरता ॥ श्रीकृष्णें ज्या निजाता : मानिल्या राया ॥ ७७ ॥ असो त्या सुन्दरा : कृष्णाच्या प्रियकरा ॥ सदा नंदकुमारा : आवडती बहुं ज्या ॥ ७८ ॥ अधोक्षज हें विशेषण : जो अनावृतज्ञान ॥ शब्दातें घेउनि मन : परतलें जेथुनि ॥ ७९ ॥ मनें सहवर्तमान : इंद्रियें जे अक्षगण ॥ त्या मनेंद्रियजनित ज्ञान : तें अक्षज ह्मणिजे ॥ ८० ॥ तें जेणें अधः केलें : ह्मणिजे तेणें नाहिं प्रकाशिलें ॥ अधोक्षज बोलिलें : या हेतु कृष्णातें ॥ ८१ ॥ एवं श्रीकृष्णाचा ठाईं : उपाधीचा स्पर्श नाहिं ॥ केवळ लीलाविग्रही : सच्चिदानन्दस्वरूप ॥ ८२ ॥ इतर जीव जे कोण्हि : सदा परिच्छिन्नात्मज्ञानी ॥ उपाधिधर्मेंचि करुनिः निजग्रहण ज्यांचें ॥ ८३॥ देहादिकाहुनि परतें : स्वण (?) नाहिं ज्यांच्या चित्तातें ॥ देहादिकचि ज्यांतें : स्वरुपत्वें मानलें ॥ ८४ ॥ त्या देहसंबंधे करुनि : शुभाशुभ आचरोनि : त्या शुभाशुभें जन्मश्रेणी : सोसिती जीव ॥ ८५ ॥ एवं आपणातें नेणते : नाना दुःखातें सोसिते ॥ हे विषयसुखाचि ज्यातें : परमगतित्वे मानलें ॥ ८६ ॥ तयां जीवांतें जे भजति : ते, तियेचि गतीतें पावती ॥ आतां हा सच्चिदानन्दमूर्ति : विलासविग्रही कृष्ण ॥ ८७ ॥ अनादि प्रवाहें करून : सृष्टयादिकांचें आयतन ॥ प्रपन्नार्तिहरण : साक्षात् ब्रह्म ॥ ८८ ॥ हे जे मनोहराकृति : ते प्रपन्नांची विश्रांति ॥ परि स्वता नाहिं प्रतीति : काळत्रइं ऐसी ॥ ८९ ॥ निरसोनि अविद्येतें : ब्रह्मत्वें जें राहिलें चित्तें ॥ हा प्रपंचाभास जयातें : राहिला भासों ॥ ९० ॥ जे योगिराज कोण्हि : सदां ज्यातें वाहती मनिं ॥ जयाचि गुणकथा आइकोनि : क्रमिती काळ॥९१॥ तोचि हा नंदानंदन : साक्षात् ब्रह्म सनातन ॥ सदां अलुप्तमहिमान विलासिया कृष्ण ॥ ९२ ॥ नेणोनिहिं महिमानातें : जे कोण्हि भजती यातें॥ त्याचे गतिविषयिं तुतें : संदेह काय राया ॥ ९३ ॥ द्वेषाचियाहि भावना : पावला ज्यातें चैद्यराणा ॥ मां या तवं गोपांगना : अतिप्रिया कृष्णा ॥ ९४ ॥

ऐराया त्या गोपकांता : ब्रह्मादिकाहुनि आता ॥ मानुनि ययां अधीनता : विचरला कृष्ण ॥ ९५ ॥ त्या नेणती कृष्णमहिमान : हें व्यवहारें आलें घडोन ॥ परि कृष्ण नव्हे प्राकृत जन : हा निश्चयो होता ॥ ९६ ॥ या जगदाभासाहुनि पर : आकृति श्यामसुंदर ॥ नव्हे हा नंदकुमार : हें मानलें होतें त्यांतें ॥ ९७ ॥ या त्रैलोक्यामाजि काहीं : कृष्णासमान वस्तु नाहीं ॥ सें निजमतें तिहीं : मानिलेंचि होतें ॥ ९८ ॥ असो परोक्षज्ञानाचिया परि : श्रीकृष्णातें त्या सुंदरी ॥ भजोनि विरहकातरी : असत्या जाल्या ॥ ९९ ॥ आतां उपाधित्यागाचेनि पंथें : साक्षात् श्रीकृष्णजीतें ॥ भजोनि निजजीवितें : साठविलीं कृष्णिं ॥ ४०० ॥ एवं लीलाविग्रही कृष्ण : येथें विग्रहावें अनुकरण ॥ तें नव्हे कर्मजन्य : प्राकृताचे परि ॥ १ ॥ भलतेही रिति : याचा ठाईं अनुवृत्ति ॥ तेचि सर्व साधन संपत्ति : होउनि फळे ॥ २ ॥ असो हें रूप मनोहर : साक्षात् मोक्षाचें द्वार ॥ हा नव्हे गुणविकार : भजनीय भक्तांचें ॥ ३ ॥

**नृणां निःश्रेयसार्थाय व्यक्तिर्भगवतो नृप ॥**
**अव्ययस्याप्रमेयस्य निर्गुणस्य गुणात्मनः ॥ १४ ॥**

राया या लोकत्रयाचा ठाईं : प्राणिजात जितुकें काहीं ॥ असो देही सर्व ही पाहिं : मनुष्यादिक जे ॥ ४ ॥ तयांचया कल्याणार्थ : भगवंत जाला व्यक्तिमंत ॥ ह्मणौनि नरांच्या निःश्रेयसार्थ : व्यक्ति हे भगवंताचि ॥ ५ ॥ त्यामाजि साधारण जन : कलिमोहाकलितमन ॥ सुखाभासेंहि करुन : दुःखचि भोगिति ॥ ६ ॥ त्यांसि येणें प्रसंगें करुन : आपुलें अलौकिकाचरण ॥ अद्भुत जे काहि गुण : अति मनोरम्य ॥ ७ ॥ तिये रमणीय गुणकथेतें : प्रकटउनि राखिजेतें ॥ संसारीही होत्सातें : जे रंजती गुणश्रेणी ॥ ८ ॥ तया श्रवणप्रभावें करुन : न्यायातें अधिष्ठुन ॥ अनुक्रमेंचि ते साधारण : निःपाप होत्साते ॥ ९ ॥ अधिष्ठुनि भगवद्भक्ति : सांसारिकातें विसर्जिति ॥ आठउनि भगवद्व्यक्ति : रमती तेथें ॥ १० ॥ मग त्याचें जें कल्याण : त्याहुनि काय आन ॥ ये रिति साधा-

रण जन : व्यक्तिप्रसंगे तरति ॥ ११ ॥ आणि जे कोण्हि कृतपुण्य : अत्यंत सभाग्ये जन : या दुःखापासुन : सुटों जे, ह्मणति ॥ १२ ॥ जे विषयातें विटले : भगवंतातें विकले ॥ हें कमळनयन सावळें : कृष्णाख्य ब्रह्म ॥१३॥ या विग्रहाचा ठाइं : संन्यासिलें जिहिं सर्वहि ॥ मोक्षाचिहि काहिं : न धरुनि भीड ॥ १४ ॥ केवळ कृष्णाचेचि होति : स्वताचि ते परमगति ॥ आतां कल्याण तयांप्रति : दुसरें कैचे ॥ १५ ॥ एकं व्यक्तिशब्दें करुन : भगवंताचें रूप रमण ॥ असो हा यदुवंशभुशण : विग्रह जो काहिं ॥ १६ ॥ नातरि प्रस्तुत व्रजजनाच्या प्रीति : आकारलि हे व्यक्ति ॥ असो हे गोपाळमूर्ति : नयनभाग्य व्रजस्थाचे ॥ १७ ॥ यां कैवल्य विग्रहातें : लक्षुनि जनहितातें ॥ अधिष्ठुनि निजलीळेतें : भगवंते धरिलें ॥ १८ ॥ आतां हा विग्रहो जो काहिं : तो प्राकृताचे परिं कायि ॥ मानुनि दुःख डोहिं : पडावें कां राया ॥ १९ ॥ आतां जनहितातें लक्षुन : हें जे रुप रमण ॥ येथे प्राकृताचें खंडण : कोणे रिति केलें ॥ २० ॥ ऐसें जरि ह्मणसी येथें : तरि आइक परिहारातें ॥ अव्यय हें तयातें : या हेतु ह्मणतिलें ॥ २१ ॥ हे परमउदारमुर्ति : जया भगवंताचि व्यक्ति ॥ तया कृष्णातें श्रुती : अव्ययत्वें प्रतिपादिति ॥ २२ ॥ अव्ययशब्दें करुन : बोलिलें विचारशून्य ॥ स्वरुपासि विलक्षण : कोणेहिं काळें नव्हे ॥ २३ ॥ ह्मणौनि न होन विलक्षण : या विग्रहाचें विडंबन ॥ स्वरुपें नसोनि आवरण : दाविला हा विलासु ॥ २४ ॥ हा मूर्त्याभास भासला असतां : नयेचि जो दृश्यपंथा ॥ बुद्ध्यादिकाच्या हाता : न चढे जे वस्तु ॥ २५ ॥ एवं अव्ययत्वहेतु होउन : अप्रमेयत्व विशेषण : या पदेंहिं करुन : अप्राकृतताचि साधिली ॥ २६ ॥ आतां अप्राकृतत्वासि कारण : आणिकहीं विशेषण ॥ सत्वादिगुणशून्य : निर्गुण जें वस्तु ॥ २७ ॥ सत्वादिगुणाची मूर्ति : तितुकीच मात्र प्रकृती ॥ ते सत्वादिगुणस्फुर्ति : पुरुषाचें दृश्य ॥ २८ ॥ तो पुरुष तंव प्रस्तुत : योजला गुणातीत ॥ आतां जरि राया तुज येथें : होइल आशंका ॥ २९ ॥ जे गुणाहूनि विलक्षण : दृश्याहुनि वस्तु भिन्न ॥ तें न्यायेंकरिं परिच्छिन्न :

योबळें असे ॥ ३० ॥ तरि तो गुणात्मा भगवंत : गुणेंसि नाहिं पृथग्भूत ॥ नातरि हा गुणाभासही जेथें : गुणत्वें नाहिं उपकरला ॥ ३१ ॥ गुणाहूनि विलक्षण : गुणेंसि जें अभिन्न ॥ असो अपरिच्छिन्न : अधिष्ठान गुणांचें ॥ ३२ ॥ नातरि या गुणाभासामाजि काहिं : यावीण अर्थचि नाहिं ॥ हे गुण ज्याचा ठाईं : अध्यस्तमान ॥ ३३ ॥ तो गुणात्मा भगवंत : भेदत्रय-विवर्जित ॥ वेदें जो प्रतिपादिजेत : अनंता विशेषणीं ॥ ३४ ॥ त्या भगवंताचि हे व्यक्ती : मनोनयनांची विश्रांति ॥ अवलंबुनि निजयुक्ति : जनहितार्थ ॥ ३५ ॥ विलासविली हे भगवंतें : सर्वहि स्वसामर्थ्यें ॥ उपकरिली येथें : संदेह काय राया ॥ ३६ ॥ जेथें ब्रह्मत्वासि न योनि उणें : भक्तांचि वाचामनें ॥ सुखाडती येणे मानें : हे योजिली युक्ती ॥ ३७ ॥ ह्मणौनि भलतेहि रिति : येथें जे उपजेल आसक्ति ॥ ते परमगती आरौती : फळोंचि नेयें ॥ ३८ ॥ याचि आशयातें धरुन : उत्तर श्लोकें करुन ॥ रायाप्रति व्यासनंदन : बोलताति आइका ॥ ३९ ॥

**कामं क्रोधं भयं स्नेहमैक्यं सौहृदमेवच**
**नित्यं हरौ विदधते यांति तन्मयतां हि ते ॥ १९ ॥**

जरि कामासक्त जालें मन : तरि इच्छावा श्रीकृष्ण॥ यावांचुनि जें आन : तें तृणप्राय मानावें ॥ ४० ॥ असो कामाची उपशांति : कृष्णापासुनि जे प्रार्थिती ॥ ते सर्वथा पावती : मनोरथ पूर्ण ॥ ४१ ॥ पाहोनि श्रीकृष्णवदन : अतिशयें उल्हासे मन ॥ विरहाकुलित चिंतन : कृष्णाचेंचि कारिती ॥ ४२ ॥ त्यांची होउनि इच्छापूर्ति : श्रीकृष्णचि होय गति ॥ एवं तन्मयता पावति : कामाचेनिहि मिषें ॥ ४३ ॥ असो प्रत्यक्ष या गोपकांता : कृष्णकामाकलिता ॥ होउनि परम आर्ता : मिळालिया कृष्णिं ॥ ४४ ॥ राया यया गोपीगृहिणी : भक्तांमाजि शिरोमणि ॥ असोनियां निर्वाणि : पावलिया कृष्णिं ॥ ४५ ॥ एवं कामाचियाही प्रवृत्ती : साधिला तिहिं श्रीपति ॥ पावलिया परम गति : योगियांसि जे ॥ ४६ ॥ तैसेंचि या श्रीकृष्णें : तीव्रद्वेषें भजले जे कोणिहि ॥ ते पावले निर्वाणि : भक्त जैसे ॥ ४७ ॥ असो

तेणें चैद्यरायें : द्वेषाचेनि उपायें ॥ जोडिले कृष्णपाये : पावला परम गति ॥ ४८ ॥ कां जे जन्मांतराचा ठाईं : कृष्णेंवीण स्मरलेंचि नाहिं ॥ त्यासि राज्यादिक तेहि : कृष्णमये जालें ॥ ४९ ॥ त्या तिव्र ध्यानाचे रिति : द्वेषाची होऊनि निवृत्ति ॥ प्रांति तो परमगति : पावला राया ॥ ५० ॥ तैसेंचि भयें करुनि चित्तिं : कृष्णातें जे सदा स्मरति ॥ ते भयेमिषें पावति : साक्षात् कृष्णि ॥ ५१ ॥ पाहें भयाचेनि मिषें : कंस पावला हें कैसें ॥ कृष्णें वांचुनि मानसें : स्मरलेंचि नाहिं तेणें ॥ ५२ ॥ पदार्थमात्राचा ठाइं : आणिक स्मरलेंचि नाहिं ॥ त्या तीव्र भयें कृष्णपाईं : पावला तो कंस ॥ ५३ ॥ तैसेंचि कृष्णाचा ठाइं : स्नेह संपादिला जिहिं ॥ त्यावीण अन्यत्र नाहिं : प्रीतीसि थार ॥ ५४ ॥ ते स्नेहाचिया तीव्रवृत्ति : साक्षात् पावति भगवंतिं ॥ योगियांची गती : पावती तेहि ॥ ५५ ॥ असो देवकी वसुदेव : प्रमुख सर्व यादव ॥ श्रीकृष्णि त्यांसि स्नेहभाव : अतिशयें होता ॥ ५६ ॥ या त्रैलोक्याचा ठाईं : कृष्णेंवीण आवडलें नाहिं ॥ सर्वस्वें प्रेम तिहिं : अर्पिलें श्रीकृष्णीं ॥ ५ ॥ असो स्नेहाचिया भावना : श्रीकृष्ण वैकुंठराणा ॥ आवडला जीवा मना : करुनि कुरवंडि ॥ ५८ ॥ शेखिं तया स्नेहवृत्ति : निदिध्यासनयुक्ति ॥ पावले ते परम गति : योगियांसि जे योग्ये ॥ ५९ ॥ तैसेंचि नंद जो व्रजपति : तत्पत्नी यशोदासति ॥ आणिकही गोपपांक्ति : स्नेहेंकरिं भजिनले ॥ ६० ॥ असो स्नेहस्वभावेंचिकरिं : साक्षात् आवडला हरि ॥ आतां गति काइ दुसरी : कल्पावी त्यांतें ॥ ६१ ॥ तैसेंचि जे संबंधी जन : ह्मणती सोइरा कृष्ण ॥ कोण्हि ह्मणती हा नंदन : बंधुचा आमच्या ॥६२॥ असो जामातादि भावना : पूजिला वैकुंठराणा ॥ त्यांसि गतिविषईं कल्पना : करणें नलगे ॥ ६३ ॥ जामातादि बुद्धीकरुन : भजले भीमकादि राजन्य ॥ आणि भ्रातृजत्वें मानुन : भजले कुंत्यादिक ॥ ६४ ॥ त्या संबंधभेदाच्या संप्राप्ति : त्यांसि गति जाला यदुपति ॥ एवं संबंधेंहि भगवंति : भजती जे ॥ ६५ ॥ ते कृष्ण तन्मयतेतें : पावती हे जाण निरुतें ॥ ऐक्यपदें संबंधातें : सूचिलें ऐसें ॥ ६६ ॥ आतां सुहृत् शब्दें करुन : हृदयनिवासी कृष्ण ॥ किंवा

मित्रत्वें जाण सुग्रीवादि भजले ॥ ६७ ॥ ऐसिया क्षुद्रप्रकृति : नारदादि पुण्यकीर्ति ॥ भजिनले त्यांसि श्रीपति : आइताचि होता ॥ ६८ ॥ किंवा आत्मभावनेकरुन : भजले श्रुतदेवादि ब्राह्मण ॥ तैसेचि कोण्हि राजन्य : जनकादिक ॥ ६९ ॥ या कृष्णाच्या चरणिं : सुहृद्भावयुक्त जे कोण्हि ॥ असो स्वप्रीतीची वोंवाळनि : सदा जे कारिति ॥ ७० ॥ अहंकाराचिया शांति : श्रीकृष्णि आत्ममति ॥ भाउनि ते पावती : तन्मयतेतें ॥ ७१ ॥ येथें सहज संदेह नाहिं : विचारावेंचि नलगे कांहिं ॥ भलते प्रकारें कृष्णपाइं : चित्त जरि जडे ॥ ७२ ॥ तरि कृष्णप्राप्ती आरोतें : अवसान नाहिंचि त्यांतें ॥ भलतयापारि कृष्णातें : पावती ते राया ॥ ७३ ॥ सर्वथा सहाय करुन : त्याचे अविद्येचें निवारण ॥ संपादूनि स्वता श्रीकृष्ण : गति होय त्यांतें ॥ ७४ ॥ एवं कामादि निमित्तें करुनि : जे भजति साक्षात् कृष्णिं ॥ ते पावती निर्वाणिं : तन्मयतेतें ॥ ७५ ॥ नातरि कामादि जे सर्वहि : ते निवेदावे कृष्णपाइं ॥ मग तन्मयत्वि नाहिं : संदेह येथें ॥ ७६ ॥

**नचैवं विस्मयः कार्यो भवता भगवत्यजे ॥**
**योगेश्वरेश्वरे कृष्णे यत एतद्विमुच्यते ॥ १६ ॥**

एवं उक्त प्रकारें करुन : श्रीकृष्णाचें माहिमान ॥ केवळ ब्रह्म सनातन : लीळाविग्रही ॥ ७७ ॥ या विग्रहाचा ठाइं : वस्तुत्वासि पालट नाहिं ॥ गुणविकाराचा कांहिं : स्पर्शही नसे ॥ ७८ ॥ असो तो जो मुर्त्याकार : प्रत्यक्ष मोक्षाचें द्वार ॥ जन्मादि विकार : जेथें नाहिं ॥ ७९ ॥ तिये अजन्मे भगवंतिं : काइसी राया विप्रातिपत्ति ॥ हा विस्मयो तुझा चित्तिं : पूर्वोक्त जाला ॥ ८० ॥ जे कृष्णिं ब्रह्मबुद्धि नसोन : भजला गोपीजन ॥ तो पावला निर्वाण : हें आश्चर्य जालें ॥ ८१ ॥ तरि भगवंतांचा ठाइं : हें आश्चर्या ऐसें नाहिं ॥ तुवां न करावा कांहिं : संदेह राया ॥ ८२ ॥ जन्मसंबंधें वांचुन : प्रकटलें हें रुप रमण ॥ हें जरि जालें उपपन्न : भगवंतिं थिये ॥ ८३ ॥ तरि तत्संबंधी सामर्थ्यें : जे कांहिं अलौकिकाचारितें ॥ तें काये असंमतें : मानुं येती राया ॥ ८४ ॥ जे कोण्हि योगानिपुण : जे अष्ट-

तर्क्यमहिमान ॥ ऐसे जे योगेश्वर जन : ते हृदयीं वाहाती ॥ ८५ ॥ ह्मणोनि हा नंदकुमार : योगेश्वरांचा ईश्वर ॥ गुण ज्याचे अपार : शेषासही अगम्य ॥ ८६ ॥ तया भगवंताच्या चरणीं : अनुसरोनि गोपगृहणी ॥ निस्तरलिया जन्मश्रेणीं : कामप्रसंगें ॥ ८७ ॥ असो चिंतनादिकें करून : या भवार्णवातें तरोन ॥ पावल्या परम सदन : गोपिका त्या ॥ ८८ ॥ हें आश्चर्य ऐसें नाहिं : विस्मयो न करावा कांहिं ॥ हें भगवंताचा ठांई : सिद्धचि असे ॥ ८९ ॥ असो त्या गोपकांता : निरंतर कृष्णाचित्ता ॥ त्या पावल्या एतावता : नवल काई ॥ ९० ॥ कां जें स्थावरादि जात : जडहि ज्ञानरहित ॥ तेंहि जरि कदाचित : पादस्पर्श लाहे ॥ ९१ ॥ संसारबंधापासुन : तेंहिं पावे मोचन ॥ मां गोपी तव स्वजन : आप्त कृष्णासि ॥ ९२ ॥ एवं प्रसंगें करुन : केलें प्रश्नाचें परिहरण ॥ यावरी तो गोपीजन : कृष्णानिकट जो आला ॥ ९३ ॥

**ता दृष्ट्वांतिकमायाता भगवान्व्रजयोषितः ॥**
**अवदद्वदतां श्रेष्ठो वाचःपेशैर्विमोहयन् ॥ १७ ॥**

पूर्वोक्त त्या गोपकांता : श्रीकृष्णगायनरता ॥ ज्या तया निकट येतां : निवारिल्या भर्तारिं ॥ ९४ ॥ त्यांत ज्या अंतर्गृहगता : प्रारब्धप्रतिबंधयुक्ता ॥ स्मरोनियां नन्दसूता : राहिल्या गृहिं ॥ ९५ ॥ तिहिं ध्यानमार्गे करुनि : श्रीकृष्णातें आलिंगुनि ॥ स्वदेहातें टाकुनि : कृष्णिं मिळाल्या ॥ ९६ ॥ आणि ज्या तीव्रतापें कोण्हि : प्रतिबंधातें निस्तरोनि ॥ तें निवारण न मानुनि : कृष्णानिकट आल्या ॥ ९७ ॥ त्यांतें निकट येतां : देखोनि रमाभर्त्ता ॥ राया जाला बोलता : सुन्दरां वचनिं ॥ ९८ ॥ असो त्या गोपकांता : सांडुनि पुत्रादि स्वार्था ॥ निजवियोगतप्ता : आलिया जाणोनि ॥ ९९ ॥ त्यांसि मोहवित होत्साता : जाला मंजुळ बोलता ॥ जेणें त्यांचिया चित्ता : प्रेमोद्रेक होये ॥ १०० ॥ नाना परीक्षेतें अनुसरोनी : नावेक मधुरां वचनि ॥ बोलोनि त्या गोपगृहिणी : सादरा कराविया ॥ १ ॥ या लागि कृपाकलितचित्तें : मोहकां वचनपंथें ॥ श्रीकृष्ण त्या गोपिकांतें :

बोलता जाला ॥ २ ॥ कां जे शास्त्रादि अभ्यासुनि : चतुर जे या जनि ॥ त्यां मानि वक्तृत्व शिरोमणी : अति प्रेमें गंभीर ॥ ३ ॥ ऐसा भ्रमकरां वचामें : मोहगता विलासिनी ॥ कराविया हें धरुनि मानें : बोलिला त्यांसि ॥ ४ ॥ आणिक एक निपुणता : दाउनि अर्थकर्कशता ॥ आणि वचनिं मधुरता : जाणउंनियां ॥ ५ ॥ ज्या वचनामृतें करुनि : शांति उपजे मानें ॥ आणि विवेकारूढ होउनि : स्वरुपातें पाविजे ॥ ६ ॥ तैशा प्रेमळां वचनिं : तो चतुरशिरोमणी ॥ आलिया ज्या गोपगृहिणी : टाकुनि सर्वस्व ॥ ७ ॥ कैसा बोलिला तयांप्रति : जेवि मुमुक्षुसीं आचार्योक्ति ॥ प्रवर्तोनि होय शोधिती : अधिकारातें तया ॥ ८ ॥ तेवि निश्चयनिर्धारार्थ : गोपी प्रति नंद-सूत ॥ बोलतुसें तें प्रस्तुत : अवधारिजे ॥ ९ ॥

॥श्रीकृष्ण उवाच॥

**स्वागतं वो महाभागाः प्रियं किं करवाणि वः ॥**
**व्रजस्यानामयं कच्चिद्ब्रूतागमन कारणम् ॥ ८ ॥**

अवो तुह्मी व्रजवासिनी : भाग्यवंता गोपगृहिणी ॥ बरवें प्रकारें करुनि : आल्यात किं येथें ॥ १० ॥ असो स्वागततातें पुसोनि : आश्वासिल्या मृदुवचनिं ॥ ज्या स्वविरहे पीडोनि : निज सांनिध्या आलिया ॥ ११ ॥ जेवि गुरु जें शिष्यार्तिहरण : शिष्यातें करउनि विवेचन ॥ मग स्वस्थांतकरण : अनुष्ठिविती संन्यास ॥ १२ ॥ तेवि कृपाळुवें कमळाकांतें : गोपिकांचिं स्वागतें ॥ पुसोनि विरहतप्तें चित्तें : आश्वासिलिं त्यांचि ॥ १३ ॥ नातरि पुसोनि स्वागते : प्रेरिलें धीरातें ॥ मोहकां वचनि त्यांतें : नोहावी विप्रतिपत्ति ॥ १४ ॥ असो त्या गोपिकांप्रति : पुसता जाला श्रीपती ॥ जे तुह्मी बरवे रीति : आल्यात किं ॥ १५ ॥ आतां आपुलिं अभिप्रेतें : तुह्मी कां आल्याति येथें ॥ तें निवेदावि मातें : जे इच्छा असेल ॥ १६ ॥ असो तुमचें जें प्रिय : तें अवश्य मज करणीय ॥ तें निवेदावें गुह्य : अवघें वो सती ॥ १७ ॥ महां संभ्रमें करून : लक्षिजेतें आगमन ॥ अति विव्हळ मन : जाणवतें तुमचें ॥ १८ ॥ तरि ते व्रजवासी जन : आहेत किं क्षेमसंपन्न ॥ कांहिं

उपद्रवागमन : नाहिं किं व्रजिं ॥ १९ ॥ असो त्या व्रजाचे स्वास्थ्य : आहे किं पुर्ववत् ॥ या आगमनासि प्रस्तुत : हेतु कवण ॥ २० ॥ कोणे निमित्ते करुन : केलें वो तुह्मी आगमन ॥ तें अवघें निवेदन : करावें मज ॥ २१ ॥ एवं तो सर्वज्ञ सर्वसत्ता : सर्व वृत्तातें जाणता ॥ परि नावेक जाला पुसता : व्यवहारानुसार ॥ २२ ॥ या अभिप्रायातें सुचोन : उत्तर-ग्रंथें करुन ॥ करावया वृत्तशोधन : लाविला संबंधु ॥ २३ ॥ असो त्या गोपीं लागुन : पुसता जाला श्रीकृष्ण ॥ या अभिप्रायाचें कारण : वदावें मज ॥२४॥ ह्मणाल या वदनशोभेते : नयनचकोरें तृषातें ॥ निवाळें नावेक यातें : असोंदे स्वस्थ ॥ २५ ॥ निहाळूनि हें सुंदर वदन : असोंदे निजस्थ मन ॥ पुसावया हें कारण : त्वरा काये कृष्णा ॥ २६ ॥ सोसुनि अवघड पंथें : बहु भाग्यें आलों येथें ॥ आतां काये आमुतें : जाणे आहे ॥ २७ ॥ हें वृत्त पुसावयाचा ठाईं : एवढी त्वरा काई ॥ राहिलों तुझा पाईं : हें प्रकटचि असे ॥ २८ ॥ ऐसें कांहिं वो भामिनी : जरि असेल तुमच्या मनि ॥ या रात्रिं तरि ये वनि : राहों नये तुमतें ॥ २९ ॥

**रजन्येषा घोररूपा घोरसत्वनिषेविता ॥**
**प्रतियात व्रजं नेह स्थेयं स्त्रीभिः सुमध्यमाः ॥ १९ ॥**

आइका वो सुमध्यमा : सुकुमारा तुह्मि रामा ॥ असोनि शुद्धकामा : आल्याति ज्या येथे ॥ ३० ॥ सुमध्यमा हें संबोधुन : जें मध्यदेशि सूक्ष्मपण ॥ जेवि अधिकारसंपन्न : सुक्ष्मबुद्धि जे ॥ ३१ ॥ न तरि वर्णुनि सूक्ष्मता : सुचिली निजयोग्यता ॥ तत्परिक्षार्थ आता : बोलिजेतें ऐसें ॥ ३२ ॥ अवो हे घोर रजनी : सेविली घोरीं प्राणि ॥ सेव्य नव्हे तुह्मा लागुनि : जावें व्रजाप्रति ॥ ३३ ॥ असो हे महानिशा : सेव्य नव्हे तुह्मा सहसा ॥ हें सर्वां बालिशा : महा भयंकर जे ॥ ३४ ॥ हे निशेची आकृती : परि सेव्य नव्हे अयोग्याप्रति ॥ तेथें महासत्वें जागति : आत्मसौकर्यैकरिं ॥ ३५ ॥ महासत्वांसि हा दिवस : परि तुह्मासि तों निशाभास ॥ आतां सत्वर प्रवेश : करावा व्रजाप्रति ॥ ३६ ॥ असो बहु बोलों किति : पर-

तोनि जावें. व्रजाप्रति ॥ क्षणमात्र ही अवस्थिति : करुं नये येथें ॥ ३७ ॥ अवो या काळि ये वनि : मज वांचुनि नाहिं कोण्हें ॥ किंवा जे असती प्राणी : अलौकिकाचारी ॥ ३८ ॥ तया वांचुनि येथें : अधिकार नसे आणिकांतें ॥ जेवि गृहासक्ति परमपंथे : विचरों नये कदा ॥ ३९ ॥ अंतरि गृहासक्ति : जे परिव्राजन करिति ॥ त्यांसि विघ्नें बाधिती : संदेह नाहिं ॥ ४० ॥ न तुटे संसारबंधन : शुभलोकिं कैंचें गमन ॥ न वर्तती जरि जन : अधिकारानुसार ॥ ४१ ॥ तेवि तुह्मांसि येथें प्रस्तुत : न राहणेचि उचित ॥ बोलावें किंबहुत : उपद्रव दिसति ॥ ४२ ॥ अवो हे महां रजनी : आकीर्ण घोरिं प्राणिं ॥ वृकादिक इये वनिं : विघ्नकारी बहुत ॥ ४३ ॥ येऱ्हवीं भि येथें एकांतिं : परि विघ्नाची सदा व्याप्ति ॥ अनधिकारी भ्रंशती : निजहिता पासुनि ॥ ४४ ॥ असो तुह्मी तों स्त्रीजाती : सत्वर जा व्रजाप्रति ॥ उचित कार्यें जें असति : तेंचि संपादावें ॥ ४५ ॥ आतां असो हेंहिं परतें : तुमचा ठाइं ज्यांचि चित्तें ॥ तेनें देखोनि तुमतें : कदर्थिलें बहु ॥ ४६ ॥ या आशयातें धरुन : उत्तरश्लोकें करुन ॥ तो येशोदानंदनंदन : बोलतुसे राया ॥ ४७ ॥

**मातरः पितरः पुत्रा भ्रातरः पतयश्च वः ॥**
**विचिन्वति ह्यपश्यंतो मा कृध्वं बंधुसाध्वसम् ॥ २० ॥**

अवो तुमचे जननीजनक : आणि पुत्रबंधु सकळिक ॥ पति जे सेव्य अवश्यक : तुह्मां स्त्रियांसि ॥ ४८ ॥ ते तुमतें न देखोन : करितील वो गवेषण ॥ असा ते चिन्तापन्न : धुंडितील इतस्तता ॥ ४९ ॥ तुह्मीं असाल मजपासिं : हें न सुचेल त्यांसि ॥ पडोनि बहु सायासि : क्रंदतील ते ॥ ५० ॥ तुमचा ठाइं त्यांचें मन : तुह्मांसही तदभिमान ॥ ऐसें आत्मत्वें ग्रहण : परस्परें असें ॥ ५१ ॥ ह्मणौनि हे बंधुसाहस : जे येणें त्यांसि अति क्लेश ॥ ऐसें नसो अवश्य : जावें वो तेथें ॥ ५२ ॥ त्यांसि जे क्लेशप्राप्ति : ते उमटेल तुमच्या चित्तिं ॥ या लागि व्रजाप्रति : जावें अवश्य ॥ ५३ ॥ जेवि नसोनि अधिकारसंपन्न : केवळ औत्सुक्यें करुन ॥ केलें

जरि व्रजजन : तें सुखातें नेदि ॥ ५४ ॥ तेवि आतां इये ठाई : तुम्हासि अविकार नाहीं ॥ तरि उचित जे काहिं : स्वगृहासि जागें ॥ ५५ ॥ ऐसिया गूढार्थां उक्ति : बोलत असतां श्रीपति ॥ त्या गोपिकांच्या चित्तिं : उपेक्षा जाणवली ॥ ५६ ॥ आम्हि दैवयोगें करून : याचा ठाई असोनि मन ॥ गृहादिकिं वर्तमान : जऱ्हि होतों ॥ ५७ ॥ तऱ्हि हा आमुची गति : ऐसा निश्चयो होता चित्तिं ॥ हा उपेक्षीना अन्ति : सर्वज्ञ श्रीकृष्ण ॥ ५८ ॥ तो प्रतिबंध निवारुन : यासि करावें संनिधान ॥ निहाळावें सुंदर वदन : साव-कासें याचें ॥ ५९ ॥ थिया आशाआकाळितमना : होतों कण्ठगतप्राणा ॥ सेवटीं आह्मी अतिदीना : उपेक्षिलों येणें ॥ ६० ॥ निस्तरोनि हें संकट : आह्मीं आलों या निकट ॥ परि दैव जालें दुर्घट : न फळती साधनें ॥ ६१ ॥ ऐसीं गोपिकांचिं चित्तें : जाणोनि क्षोभाकळितें ॥ तेणें यशोदानंदसुतें : सुजाणें कृष्णें ॥ ६२ ॥ कांहिं एक आश्रयातें : करुनि जालें बोलिजेतें ॥ आइक राया तुतें : तें सांगतो ऐसे ॥ ६३ ॥

**दृष्टं वनं कुसुमितम् राकेशकररंजितम् ॥**
**यमुनानिललीलैजत्तरुपल्लवशोभितम् ॥ २१ ॥**

अवो तुमाचें आचारितें : इतुकेनिचि जालिं सफळितें ॥ जें देखिलें या वनातें : क्रीडास्थान माझें ॥ ६४ ॥ नानापुष्पिं आकीर्ण : पाहा हें सुशो-भित वन ॥ आणि कोमळ जे शशिकिरण : तयांकरिं मंडित ॥ ६५ ॥ जैसी पौर्णिमेची निशि : कळापूर्ण तैसा शशी ॥ तेणें आजि या वनासि : शोभविलें बहु ॥ ६६ ॥ आणि यमुनाजळस्पर्शित : शीतळ मंदगति वात ॥ तेणें हे पल्लववंत : या वनिचे वृक्ष ॥ ६७ ॥ आपुले लीळेकरुन : शोभती दोलायमान ॥ पावविले चलन : मंदोर्मिवातें ॥ ६८ ॥ ऐसे या लक्षणिं युक्त : वन जें शोभावंत ॥ हें देखिलें प्रस्तुत : सफळ यात्रा जाली तुमची ॥ ६९ ॥ अवो तुह्मी सकळ : आल्यति तें जालें सफळ ॥ जे देखिलें क्रीडा-स्थळ : शिसेव्य ॥ ७० ॥ या वनशोभेसहित : माझा ठाई असो चित्त ॥

सांडोनि भाव प्राकृत : यथाचारें असावें ॥ ७१ ॥ याचि अर्थातें उद्देशुन : पुढेंहि कृष्णाचें वचन ॥ आइकावें सावधान : रहस्यकथेतें ॥ ७२ ॥

**तद्यात मा चिरं गोष्ठम् शुश्रूषध्वं पतीन्सतीः ॥**
**क्रंदंति वत्सा बालाश्च तान्पाययत दुह्यत ॥ २२ ॥**

अवो आइका सती : देखीली वनसंपत्ती ॥ आतां जावें व्रजाप्रति : न करावा विलंब ॥ ७३ ॥ कर्तव्य सरलें नाहिं : तिहिं न राहवें ये ठाइं ॥ ज्याचें विहित जें काहिं : तें केलेंचि पाहिजे ॥ ७४ ॥ प्रस्तुत तुह्मा स्त्रियातें : सेव्य नाहिं पतिपरतें ॥ तस्मात् सेवावे पतीतें : शुश्रूषामार्गें ॥ ७५ ॥ आणि माझे आज्ञाबळें : सांतवावि वत्सें बाळें ॥ तुह्मावांचुनि तें सकळें : क्रंदतें असतील ॥७६॥ करउनि स्तन्यपान : स्वबाळांचें समजावण ॥ आणि गोदोहनें करुन : पाजावि वासुरें ॥ ७७ ॥ असो क्रंदमानें वत्सें बाळें : तें पाजावि सकळें ॥ आणि गोदोहनहिं केलें : पाहिजे अवश्य ॥ ७८ ॥ ऐसें बोलिलें कृष्णनाथें : तेणें मागुती ताचित्तें ॥ क्षोभलिं जे आमुतें : उपेक्षिलें खरें ॥ ७९ ॥ एवं जाणोनि त्रिकाळचित्त : त्यांचया आश्वासनार्थ ॥ बोलतुसे नन्दसुत : तें आइकावें संति ॥ ८० ॥

**अथवा मदभिस्नेहाद्भवंत्यो यंत्रिताशयाः ॥**
**आगता ह्युपपन्नं वः प्रीयंते मयि जंतवः ॥ २३ ॥**

अथवा पुत्रादिकिं काहिं : जरि आसक्ति नाहिं ॥ परस्परें वेधु तोहि : लक्षिला आह्मि ॥ ८१ ॥ ऐसें नसो वो आतां : ज्या तुम्ही सर्वाशात्यक्ता ॥ गृहादिकिं अनासक्ता : मत्कामा गोपी ॥ ८२ ॥ त्या ग्राम्य जनाची काहिं : सर्वथा आस्था नाहिं ॥ मज पूर्ण कामाचा ठाइं : अनुसरोनियां ॥ ८३ ॥ असो या स्नेहाची उन्नति : माझा ठाइं चित्तवृत्ति ॥ वश होउनि मजप्रति : आलियाति ज्या ॥ ८४ ॥ हें तुह्मासि उचित जालें : जन्म सार्थक केलें ॥ कृतपुण्य फळासि आलें : भाग्य तुमचें ॥ ८५ ॥ अवो जाणते जे होति : त्यांसि माझीच प्रीति ॥ सर्व सांडुनि भजति : मजाचि एकातें ॥ ८६ ॥ हें अविद्याग्रस्त जन : यामाजि जो कृतपुण्य ॥ हें दुःख अनुभउन : मा/चाचा

ठाई ॥ ८७ ॥ सांडुनि सर्वस्वातें : जो नें चाले अविद्यापंथें ॥ तया त्यागें जयातें : मिंचि उरे प्रियत्वें ॥ ८८ ॥ ऐसा विरळा कोण्हि : तुह्मि भाग्याच्या भामिनी ॥ येथें मंज अनुसरोनि : आलियाति ॥ ८९ ॥ एवं प्रपंचाचा ठाई : सर्वथा प्रीति नाहिं ॥ जीवितें माझा पाई : वोपिलि अवधि ॥ ९० ॥ तथापि वेदविहित : धर्म जो काहिं उचित ॥ त्याज्य नव्हे प्रस्तुत : केला पाहिजे ॥ ९१ ॥ या अर्थि अनुसरोन : आणिकहि श्रीकृष्ण ॥ बोलताति तें सावधान : आइकावें ॥ ९२ ॥

**भर्तुः शुश्रूषणं स्त्रीणां परो धर्मो ह्यमायया ॥**
**तद्बंधूनां च कल्याण्यः प्रजानां चानुपोषणम् ॥ २४ ॥**

अवधारा वो समस्ता : कल्याणरूपा गोपकांता ॥ कल्याणाची अवस्था : आइका सांगतों ॥ ९३ ॥ करितां धर्मविचार : त्यांत हाचि धर्म थोर ॥ तुमचे जे भर्तार : तयांची सेवा ॥ ९४ ॥ असो स्त्रीजातीचा धर्म : हाचि जाणा उत्तम ॥ सुखदुःखीं समानसम : उपासावे भर्तार ॥ ९५ ॥ धर्मतेंच अनुसरोन : करावे भर्तृसेवन ॥ मानादि दोष टाकुन : सेवावें त्यांतें ॥ ९६ ॥ ऐसे मानावें निश्चित : किं हेचि आह्मासि उचित ॥ येणेचि मोक्षाचा पंथ अतिक्रमुं भगवंतिं ॥ ९७ ॥ चित्तिं भाव धरुन : करावें भर्तृसेवन ॥ आणि तत्संबंधी जन : तद्बंधू जे ॥ ९८ ॥ मातापितादि करुन : त्यासि जे इष्ट जाण ॥ सहोदर सखे स्वजन : अवघे पुज्य ॥ ९९ ॥ तयांचे शुश्रूषण : भर्ताराचि समान ॥ परि यथान्यायें करुन : कर्तव्य जें जाणें ॥ १०० ॥ त्याचि प्रसंगें करुन : करावें प्रजापाळन ॥ जैसे भर्तारादि सेवन : तैसेंच तेंहि ॥ १ ॥ असो भर्तार प्रधान : तद्बंधुसेवा प्रजापाळन ॥ ऐसें आलें घडोन : जे त्याज्य नव्हेत कोण्हि ॥ २ ॥

**दुःशीलो दुर्भगो वृद्धो जडो रोग्यधनोपि वा ।**
**पतिः स्त्रीभिर्न हातव्यो लोकेप्सुभिरपातकी ॥ २५ ॥**

जो न मानुनि स्वधर्मातें : वर्तो लागे जो दुःपंथें ॥ दुराचारीही स्त्रियांतें : त्याज्य नव्हे भर्तार वो ॥ ३ ॥ असो न करी वर्णरक्षण : दुराचारि विशेषें

मन ॥ परि तो निजपती ह्मणोन : त्याज्य नव्हे ॥ ४ ॥ अथवा लौकिका माझारि : जर्‍हि तो भिकारी ॥ दैव सहाय न करि : जन्मदरिद्रि ॥ ५ ॥ तर्‍हि तो निजपति : त्याज्य नव्हे वो सति ॥ सांडुनि व्युत्पत्ति : सेव्य तो स्त्रियांसि ॥ ६ ॥ आणि काळाचे गति : जरेचि जालि व्याति ॥ तो वृद्ध तर्‍हि वो सति : त्याज्य नव्हे भर्तार ॥ ७ ॥ वृद्धातेंचि अनुसरोन : करावें त्यांचे पाळन ॥ तद्द्वारा कल्याण : साधावें आपुलें ॥ ८ ॥ किंवा विवेक-शुन्ये : मूर्ख जैसा पाषाण ॥ त्या जडाचेंहि सेवन : धर्माचें द्वार ॥९॥ किंवा रोगें पीडित : बळवीर्य रहित ॥ निजपोषाणीं आसक्त ( अशक्त ? ) : अप्रयोजक जाला ॥ १० ॥ तथापि तयाचे सेवन : विशेषें मोक्षसाधन ॥ आणि कोण्हि अधन : सांडवला धनें ॥ ११ ॥ काळें कर्माचिया गति : हरोनि गेली संपत्ति ॥ अदृष्टवशें विपत्ति : वरपडा जाला ॥ १२ ॥ तर्‍हि कुळस्त्रियेप्रति : त्याज्य नव्हे निजपति ॥ कल्याणातें इच्छिती : तिया सेवावा तोचि ॥ १३ ॥ अवो स्वधर्माचा ठाइं : पतिसेवा त्याज्य नाहिं ॥ योग्यायोग्यता काहिं : विचारुं नये ॥ १४ ॥ जोंवरि तो अपातकी : न बहिष्कारिला लोकीं ॥ निंदिला नाहिं शास्त्रादिकीं : पातित्यकर्मिं ॥ १५ ॥ तोंवरि तो निजपति : त्याज्य नव्हे स्त्रियांप्रति ॥ साधारण दुष्कृति : जर्‍हि तो जाला ॥ १६ ॥ पातकीही अ-सोन : भ्रष्ट नाहिं यातीपासुन ॥ तंवरि त्याचें सेवन : अवश्य जालें ॥ १७ ॥ सांडुनि भर्तारातें : अनुसरे आणिकातें ॥ तरि सर्वथा स्त्रियतें : उत्तम गति नाहिं ॥ १८ ॥ याचि अर्थातें धरुन : पुढें श्रीकृष्णाचें वचन ॥ आइकावें सावधान : निवादजे तें ॥ १९ ॥

**अस्वर्ग्यमयशस्यंच फल्गु कृच्छ्रं भयावहम् ॥**
**जुगुप्सितं च सर्वत्र औपपत्यं कुलस्त्रियाः ॥ २६ ॥**

सांडुनि पतिसेवेतें : जरि आचरे औपपत्यातें ॥ ह्मणिजे जार कर्मातें : कुलस्त्री होत्साति ॥ २० ॥ तें जें जारसुख : सर्वस्वार्थाचें विनाशक ॥ नव्हे तें शुभदायक : कुलस्त्रीयेतें ॥ २१ ॥ तें कैसें नाशक : तरि स्वर्गप्रा-प्तीचें ध्वंसक ॥ न साधुनि उत्तम लोक : अधःपात होये ॥ २२ ॥ असो

नासुनि उत्तम गति : पाववी नरकाप्रति ॥ आणि सर्वत्र अपकीर्ति : इये लोकीं ॥ २३ ॥ असो तें जारसुख : पुण्यकीर्तीचें नाशक ॥ ह्मणाल आतां तरि सुख : होईल येथें ॥ २४ ॥ तरि त्या सुखाभासिं काहिं : क्षणहि निर्वाह नाहिं ॥ तया सुखासि काइ : सुख ह्मणावें ॥ २५ ॥ त्या तुच्छ सुखासाठीं : पाविजे दुःखकोटि ॥ आरंभिं आणि सेवटिं : भयकारक ॥ २६ ॥ असो तें जारसुख : उभयलोकीं नाशक ॥ या लोकिं निंदिती लोक : आणि परलोकिं दुर्गति ॥ २७ ॥ ऐसें कुळस्त्रियतें : ह्मणोनि दूषिलें येथें ॥ पतित्याग तुमतें : उचितचि नाहिं ॥ २८ ॥ एवं साक्षात् रमारमण : व्यवहारातें लक्षुन ॥ निर्धाराव्या गोपींचें मन : बोलिले नावेक ॥ २९ ॥ आतां परमार्थं करुन : करिजेतें व्याख्यान ॥ हें भगवंताचें भजन : इहस्वर्गाविरोधी ॥ ३० ॥ तरि भगवंताचा ठाईं : स्वर्गाचा लेखा काइ ॥ अस्वर्ग्य ऐसें काहिं : यास्तव घडलें ॥ ३१ ॥ भगवंताचिये भक्ति : स्वर्गसुखातें उळंघिति ॥ गति पाविजे भागवती : जे इंद्रादिकांसि अघट ॥ ३२ ॥ आणि प्रपंचाचिया प्राप्ति : ब्रह्मासि अन्यथा ख्याति ॥ देहादि विशिष्टें कीर्ति : जाली जे काहिं ॥ ३३ ॥ आतां जें भजनसुख : तें या कीर्तिचें नाशक ॥ परि याहुनि आणिक : अत्यंत सुखास्पद ॥ ३४ ॥ असो तें जें सुख काहिं : विषयसुखा ऐसें नाहिं ॥ अत्यंतानंद हाहि : निर्देश त्यातें ॥ ३५ ॥ ह्मणोनि कुळाभिमानवती : योग्य नव्हे विपरीत गति ॥ भगवंतिं नाहिं प्रीति : गृहादि लोभें ॥ ३६ ॥ तियेसि ते अंतरलें : सहजाचि त्याज्य घडलें ॥ जरि कृष्णि जारत्व कल्पिलें : तरि वाखाणावें ऐसें ॥ ३७ ॥ येन्हवि आश्रमियांप्रति : उपदेशिली नीति ॥ आणि त्यांची निश्चयमति : परिक्षिली येणें ॥ ३८ ॥ असो हे भावार्थकथन : त्या गोपिकांतें श्रीकृष्ण ॥ ह्मणति अवो हे दूषण : पतित्यागें वोडवलें ॥ ३९ ॥ ह्मणाल हे उपदेशिली नीति : आह्मास तंव न घडति : तुझा पाइं जाली प्रीति : इतुकेंचि पुरे ॥ ४० ॥ तुझें न पाहातां वदन : जाउं पाहताति प्राण ॥ सदां तृषित नयन : अवलोकाव्या ॥ ४१ ॥ ऐसें जरि वो सती : असे तुमचा चित्ति ॥ तरि निश्चयें मजप्रति : माझा

बेधुचि पुरे ॥ ४२ ॥ या अर्थातें सुचोन : आणिक कृष्णाचें वचन ॥ आइका सावधान : वर्णिजेतें ॥ ४३ ॥

**श्रवणादर्शनाद्ध्यानान्मयि भावोनुकीर्तनात् ॥**
**न तथा सन्निकर्षेण प्रतियात ततो गृहान् ॥ २७ ॥**

माझा गुणश्रवणीं : त्रैलोक्ये तुच्छ मानुनि ॥ माझें स्वरुप मनिं : जैसें काहिं जडे ॥ ४४ ॥ तैसी माझी निकट संगति : उपजों नेदि मत्प्रीति ॥ माझी मानुनि निश्चितिं : इतरांतें स्मरवी ॥४५॥ आगि श्रवणे माझी कीर्ति : आठवे माझी मुर्ति ॥ माझ्या ध्याने पावति : निष्ठाजे कोण्हि ॥ ४६ ॥ त्या ध्यानाहुनि काहिं : सान्निध्यें लाभ नाहिं ॥ कृतार्थ मानुनि देहिं : उपजेल स्वार्थ ॥ ४७ ॥ हें जें विग्रहधारण : याचें न कळे महिमान ॥ अति परिचयें मनः सांडील प्रेमा ॥ ४८ ॥ असो माझें सन्निधान : साक्षात्काराचें साधन ॥ तें अधिकारें वांचुन : सेव्य नाहिं सर्वांसि ॥ ४९ ॥ पुरतें मन नाहिं मत्पर : तवं त्याज्य नव्हे निजाचार ॥ गृहादि व्यवहार : अवश्य करिजे ॥ ५० ॥ यालागि असोनि गृहिं : उचिताचार जो कांहिं ॥ सम्पादुनि माझा ठाइं : असावें तत्पर ॥ ५१ ॥ माझें गुणाचें श्रवण : मत्कथा नामकीर्तन ॥ माझें स्वरुपध्यान : करुनि असावें ॥ ५२ ॥ असो हे सुन्दर मुर्ति : सदा वसवावी चित्तिं ॥ सुखें असावें वो सती : निजाश्रमाचारें ॥ ५३ ॥ एवं क्रमप्रवाहिं : जैसें चित्त जडे माझ्या ठाइं ॥ तैसा मत्सान्निध्यें नाहिं : विशेष लाभ ॥ ५४ ॥ मजासिं जें व्यवधान : तें मायाविलसित भान ॥ तन्हि मत्सान्निध्याचें साधन : आणिक नाहिं ॥ ५५ ॥ हे जे अन्तरायप्राप्ति : निरसावी याचि रीति ॥ मिं निकट असतां धुण्डिति : अन्यत्र जन ॥ ५६ ॥ सत्य असतें व्यवधान : तरि सोपें मत्संनिधान ॥ हें अनिरूपित भान : मायाकल्पित ॥ ५७ ॥ ह्मणोनि येथें हेचि युक्ति : वर्णावी गुणकीर्ति ॥ ध्यानादिकिं चित्तवृत्ति : आणावी एकांतिं ॥ ५८ ॥ त्या एकांतवृत्तिभरें : मद्रूप एकाकारें ॥ भोगुनि निरंतरें : करावें शुद्धचित्त ॥ ५९ ॥ मग यावें मज गुरुप्रति : शोधूनि हृदयग्रंथि ॥ करूनि अविद्यानिवृत्ति : संग करावा मजासिं



॥ ६० ॥ ह्मणोनि कल्पून व्यवधान : मद्वेधिं असावें मन ॥ तेणें मत्सान्नि-धान : पावाल तुह्मि ॥ ६१ ॥ आतां बोलावें हें किति : माझी हे रमण मूर्ति ॥ येथेंचि असोनि चित्तवृत्ति : गृहाप्रति जावें ॥ ६२ ॥

॥ श्रीशुक उवाच ॥

**इति विप्रियमाकर्ण्य गोप्यो गोविंदभाषितम् ॥**
**विषण्णा भग्नसंकल्पाश्चितामापुर्दुरत्ययाम् ॥ २८ ॥**

आइक राया पूर्वोक्त : कृष्णाचें कलभाषित ॥ आइकोनि तें स्त्रीजात : विप्रिय ऐसें ॥ ६३ ॥ असो निर्धारावया चित्त : बोलिला तो यथोक्त ॥ तयातें तोचि अर्थ : भासला काठिण ॥ ६४ ॥ त्या गोविंदासक्तहृदया : गोपीं आइकोनि अप्रिया ॥ खिन्न होत्साता हताशया : परम चिंता पावल्या ऐशा ॥ ६५ ॥ ह्मणति आपुले मनिं : जे या विरहहुताशनिं ॥ दग्धा आह्मीं कामिनी : संकटें येथें आलों ॥ ६६ ॥ आह्मां मानिलें होतें : जें तरलों संकटातें ॥ प्रशस्तें कृष्णजीतें : देखिलें आजि ॥ ६७ ॥ सर्व विक्षेप परिहरून : देखिलें कृष्णवदन ॥ या वियोगाचें कारण : खुंटलें आतां ॥ ॥ ६८ ॥ येथूनि परावृत्ति : यासि कां सुचली युक्ति ॥ परतलिं नेणों मागुति : पूर्वकृते पापें ॥ ६९ ॥ एवं त्या कामिनी : आइकोनि कृष्णवाणी ॥ दचकोनि मानिलें मनिं : जे कोपला हा कृष्ण ॥ ७० ॥ असो मनिं जाला विषाद : जे कोपला कां गोविंद ॥ संकल्प नव्हेचि सिद्ध : उपेक्षिलों खरें ॥ ७१ ॥ ऐशा सविषादचित्ता : जाल्या भग्नमनोरथा ॥ पावलिया अति चिंता : जे तरवेना कांहिं ॥ ७२ ॥ असो त्या कृष्णकिंकरी : बुडाल्या चिंतासागरिं ॥ यावांचुनि कैवारी : आणिक कैंचा ॥ ७३ ॥ तो चिंता-ग्रस्त गोपीजन : कोणा लक्षणिं करुन ॥ तरि तेंहिं सावधान : अवधारिं राया ॥ ७४ ॥

**कृत्वा मुखान्यवशुचः श्वसनेन शुष्य-**
**द्बिंबाधराणि चरणेन भुवं लिखंत्यः ॥**

**अस्रैरुपात्तमषिभिः कुचकुंकुमानि**
**तस्थुर्भृजंत्य उरुदुःखभराः स्म तूष्णीम् ॥ २९ ॥**

तिया शोक चिंताग्रस्ता सती : मुखें करुनि खालौतिं ॥ पदांगुष्ठींकारिं क्षिति : लिहित होंत्साल्या ॥ ७५ ॥ चित्त ठेउनि कृष्णपाईं : पडल्या चिंता-डोहिं ॥ न बोलोनि कांहिं : राहिल्या तटस्थ ॥ ७६ ॥ तया मुखाचें लक्षण : तरि असोनि शोकापन्न ॥ तया शोकेंकरिं उत्पन्न : श्वासोश्वास जे ॥ ७७ ॥ तयां श्वासवेगबळे : बिम्बाधर शुष्क झाले ॥ असो श्वसनें सुकोन गेलें : लोहित वोष्ट ज्यांचे ॥ ७८ ॥ एवं श्वासाधरशोषितें : मुखें करुनि शोकयुक्तें ॥ चरणें-करिं धरणीतें : लिहित्या जाल्या ॥ ७९ ॥ आणि कज्जाळें सहित : नयन-द्वारा अश्रुपात ॥ ढळले ते वोघ प्रस्तुत : कुचांवरी आले ॥ ८० ॥ त्या अश्रुप्रवाहजळें : कुचकुंकुमातें क्षाळिलें ॥ जें होतें विलेपिलें : कुचाचा ठाईं ॥ ८१ ॥ कृष्णविरहाचळापासुनि : आलि जे प्रेममंदाकिनी ॥ ते हृदयदेशिं येउनि : प्रक्षाळिलिं अन्तस्थें ॥ ८२ ॥ जेवि अंतरंगेंहिं साधनें : साक्षात्कारिं अप्रयोजनें ॥ तेवि अश्रुपातिं विलेपनें : क्षाळिलिं त्यांचिं ॥ ८३ ॥ उद्देशोनि कृष्णसंगातें : हृदये केलि रंजितें ॥ देखोनि कृष्णजीतें : स्वयें निराळि जालि ॥ ८४ ॥ नाना तें पावउनि प्रांतिं : आपण राहिलिं परतिं ॥ श्रीकृष्णसंगा-प्रति : दिधला अवसर ॥ ८५ ॥ एवं सकज्जळें अश्रुपातें : शोधिलें कुचकुं-कुमातें ॥ मुखें करुनि अधःपंथें : शुष्कबिंबाधरें ॥ ८६ ॥ चरणेंकरिं धरणी : लिहित होंत्साल्या भामिनी ॥ मौनातें अवलंबुनि : राहिल्या स्तब्धा ॥ ८७ ॥ नातरि कृष्णकरो अंगिकार : या लागिं केला हा प्रकार ॥ मनोगतहि व्यापार : टाकिला तिहिं ॥ ८८ ॥ कृष्णसंगिं आसन्नकाळ : तेथें न सरे वाग्जाळ ॥ मन करावें निश्चळ : विसरावें सर्व ॥ ८९ ॥ ह्मणोनि तो गोपीजन : तूष्णीभा-वातें धरुन ॥ कृष्णसंगातें इच्छुन : उगाचि राहिला ॥ ९० ॥ असो त्याज्य जें होतें : तें त्यजुनि आलो येथें ॥ कृपा कीजे श्रीनाथें : भाग्यानुसार ॥ ९१ ॥ ह्मणोनि त्यक्तचरितें : राहिलीं तूष्णीभुतें ॥ तें गोपिकांचिं शतें : चिंताक्रांत राया ॥ ९२ ॥ ऐशा विरहें भ्रगल्या : त्यां नावेक निवांत राहिल्या ॥ गा



सावध जाल्या : आपलोचे ठाइं ॥ ९३ ॥ ह्मणती जऱ्हि कृष्ण हृदिस्थ : सर्वेही यासि विदित ॥ तथापि आपुलें वृत्त : निवेदावें यातें ॥ ९४ ॥ जाणोनि आमुची शुद्धता : उपेक्षीना हा सर्वथा ॥ परंतु दनिवत्सळता : स्मरवावी यातें ॥ ९५ ॥ अवो हा अभिमानशून्य : नाठवी कां दयाळुपण ॥ आमुतें या- वीण : कवण राखेल ॥ ९६ ॥ या दुःखार्णवीं तारितें : कोण असे यापरतें ॥ कांहिं एकें सुकृतें : आणिलों आह्मी येथें ॥ ९७ ॥ ऐसें जाणवावें यातें : आतां तुजवांचुनि आमुतें ॥ कोण्हिच नाहिं येथें : सर्व सांडुनि आलों ॥९८॥ जे तुजवीण गति नाहिं : हें निवेदों याचा पाईं ॥ आतां लाजोन काज काइ : होईल तें हो ॥ ९९ ॥ ऐसें विचारुनि स्वचित्तें : त्या पावल्या सावधेतेंतें ॥ तें यथाळक्षण तुतें : निवेदिजेतें राया ॥ ७०० ॥

**प्रेष्ठं प्रियेतरमिव प्रतिभाषमाणं**
**कृष्णं तदर्थविनिवर्तितसर्वकामा : ॥**
**नेत्रे विमृज्य रुदितोपहते स्म किंचि-**
**त्संरंभगद्गदगिरोऽब्रुवतानुरक्ताः ॥ ३० ॥**

आइक राजचूडामणी : उक्त लक्षणा त्या भामिनी ॥ उक्तार्थ धरुनि मनिं : बोलती कृष्णाप्रति ॥ १ ॥ असो त्या भाग्याच्या रामा : कृष्णार्थ निवर्तित- कामा ॥ सर्व सांडुनि आत्मा : आवडला कृष्ण ॥ २ ॥ नयनि अश्रुयुक्ता : होत्या ज्या विरहव्याप्ता ॥ कृष्णार्थ चिंताग्रस्ता : खिन्न होंत्सात्या ॥ ३ ॥ तिहिं विसर्जुनि रुदनातें : परिमार्जिलें नेत्रातें ॥ बाष्प दाटले होते : कंठाचा ठाइं ॥ ४ ॥ तयातें विसर्जुनि : त्या बोलिल्या गद्गदवाणिं ॥ असो त्या गद्गद- गिरा भामिनी : कृष्णासक्तचित्ता ॥ ५ ॥ त्या बोलिल्या ज्या कृणातें : तो कैसा भासला त्यांतें ॥ तरि कृष्णाहुनि परतें : प्रियवस्तु नाहिं ॥ ६ ॥ ह्मणो- नि तो परम प्रेष्ठ : सर्वा अवस्थांसि इष्ट ॥ ज्याचे स्मरणमात्रें कष्ट : नासति अनेक ॥ ७ ॥ परि त्या स्त्रियाहिं प्रस्तुत : भाविला जो विपरीत ॥ कांजे त्यातें कृष्णभाषित : कठिण मानलें ॥ ८ ॥ कां जे व्यवहार संरक्षुन : केलें धर्मनिरूपण ॥ तें जालें असह्यमान : अभिप्राय नेणोनि ॥ ९ ॥ त्या सकाम

चित्तें करून : न करितीच विवेचन ॥ भाविला तिहिं श्रीकृष्ण : निष्ठुर हा किं ॥ १० ॥ नावेक संतत होउन : दाविलें कोपाविष्करण ॥ कां जे भलते मिषें करुन : प्रसन्न करावा कृष्ण ॥ ११ ॥ कृष्णेंवीण त्यांसि काहिं : कोठेंहिं उरलें नाहिं ॥ आतां कोप तरि कोणे ठाईं : करावा तिहिं ॥ १२ ॥ या विषयवेथेचा हरण : कैंचा आणावा कोण ॥ त्रासोनि आलों शरण : तवं हाचि जाला विपरीत ॥ १३ ॥ त्रासोनि गृहादिसंगातें : शरण आलों यातें ॥ तों येणेंहिं तेंचि मागुतें : उपदेशिलें कां वो ॥ १४ ॥ ऐशा त्या गोपनारी : पडल्या चिंतासागरिं ॥ किंचित् क्रुद्धाचे परिं : बोलताति ऐसें ॥ १५ ॥

॥ गोप्य ऊचुः ॥

**मैवं विभोऽर्हति भवान्गदितुं नृशंसं**
**संत्यज्य सर्वविषयांस्तव पादमूलम् ॥**
**भक्ता भजस्व दुरवग्रह मा त्यजास्मा-**
**न्देवो यथादिपुरुषो भजते मुमुक्षून् ॥ ३१ ॥**

प्रभो आइकावें भगवंतें : हें जें बोलिलें पुर्वोक्तें ॥ ते योग्य नव्हे स्वामीतें : तुह्मांसि काये ह्मणावें ॥ १६ ॥ आह्मीं सांडुनि स्वविषयांतें : शरण आलों तुतें ॥ जे तव पादमुळ भक्तातें : नुपेक्षावें आतां ॥ १७ ॥ असो टाकुनि गृहादि सकळें : तुझे पादमूळ आश्रिले ॥ त्या तुवां उपदेशिलें : प्रतिकुळ आह्मासि ॥ १८ ॥ तरि ऐसें बोलावया काहिं : स्वामीसि तों योग्य नाहिं ॥ आमुचि हृदतें काई : नेन(ण)सि कृष्णा ॥ १९ ॥ या सर्वांचे हृद्गत : अवघें तुज असे विदित ॥ आह्मीं हें आजिपर्यंत : जाणितले होतें निश्चयें ॥ २० ॥ परि तें कृष्णा इये काळीं : सर्वज्ञता कां ये जालि ॥ कैसि आमुचि फळासि आलि : दुरादृष्टें नेणों ॥ २१ ॥ आह्मि सर्वथा अनन्यभक्त : तुज अधिकार नाहिं विदित ॥ हे कोणासि मात : सांगावि आतां ॥ २२ ॥ नाना परिव्राजकांप्रति : उपदेशावी संसारगति ॥ तों उपदेशु किं अनर्थि : पाडितो गुरु त्यांते ॥ २३ ॥ तेवि निजसेवकांप्रति : उपदेशिलि परावृत्ति ॥ हें नेणों तुझि कोण

युक्ति : रचिली कां येथें ॥ २४ ॥ परि विचारितां काहिं : उचित तों योजत नाहिं ॥ आतां शरणागता पाहिं : निष्ठुरता नसो ॥ २५ ॥ ना तुझें पादमुळ : आश्रिती जे योगशीळ : तों तुं येथें स्वलीळा केवळ : क्रीडसी स्वच्छंदें ॥ २६ ॥ त्या तव पादमूळभक्तां : आह्मासि हे अवस्था ॥ उचित नव्हे सर्वथा : ह्मणि टाकिसी आमुतें ॥ २७ ॥ ह्मणसी मज स्वाधीनासिहि : येव्हढा निरोधु काइ ॥ उचितानुचितें नाहिं : प्रयोजन मातें ॥ २८ ॥ कृष्णा देव जो ये जनिं : आदि पुरुष ऐसा कोण्हि ॥ या प्रपंचापासुनि : अत्यंत वेगळा ॥ २९ ॥ असो वेदशास्त्राचा ठाइं : प्रतिपाद्य वस्तु जे काहिं ॥ अणुमात्र नाहिं : उपाधिचा लेश ॥ ३० ॥ अनुसरोनि त्या वस्तुतें : भजती मुमुक्षुचिं शतें : तरि त्या देवें काय त्यांतें : उपेक्षिजे कृष्णा ॥ ३१ ॥ तेवि तुं असंगोदासीन : परि आह्मी तुज अधीन ॥ सर्वस्वातें सांडुन : शरण आलों तुतें ॥ ३२ ॥ तुजवांचुनि येथें : ऐसें कोण सांगतें ॥ सर्वस्व शरण आलों त्या आमुतें : हे शीक्षित न घडे ॥ ३३ ॥ स्वच्छंदासि तुज काहिं : कोठेंच निग्रह नाहिं ॥ परि शरण; आलों पाहिं : त्याज्य न हों कदां ॥ ३४ ॥ आम्हीं तव पादकिंकरी : कदापि उपेक्षा न करिं ॥ या दृष्टांतेकरिं : देव तो तुंचि आमुचा ॥ ३५ ॥ आह्मासि तुझा पाइं : अन्यथा प्रतीति नाहिं ॥ वेदांतवेद्य वस्तु जे काहिं : ते तुंचि कृष्णा ॥ ३६ ॥ हे मनोरमण मूर्ति : सर्वभक्तार्तिहर्ति ॥ देखतां दुरित पंक्ति : विरोनि जाती शीघ्र ॥ ३७ ॥ हें कमळाक्ष सांवळें : त्रिभंगी ठाण देखिलें ॥ आमुचें तरि काज जालें : येणेंचि आतां ॥ ३८ ॥ ऐशा त्या व्रजांगना : सर्वस्व कृष्णशरणा ॥ प्रसन्न होय यदुराणा : ऐसें बोललिल्या ॥ ३९ ॥ आतां पूर्वोक्तें करुन : कृष्णें केलें धर्मनिरुपण ॥ त्यांचे तिया विवेचन : करिताति ऐसें ॥ ४० ॥

**यत्पत्यपत्यसुहृदामनुवृत्तिरंग**
**स्त्रीणां स्वधर्म इति धर्मविदा त्वयोक्तम् ॥**
**अस्त्वेवमेतदुपदेशपदे त्वयीशे**
**प्रेष्ठो भवांस्तनुभृतां किल बंधुरात्मा ॥ ३२ ॥**

अंग ऐसें संबोधुन : कृष्णातें ह्मणें गोपीगण ॥ अगा हे अंग हे कृष्ण : नंदसुता सखया ॥ ४१ ॥ अवधारिं येक वचन : आह्मी ज्या सर्वसंगशून्य ॥ त्या जालों तुज अधीन : सांडुनि सर्व ॥ ४२ ॥ परि कृष्णा तुवां प्रस्तुत : बोलिलें जें पूर्वोक्त ॥ उपदेशिलें धर्मजात : आह्मासि विहित ॥ ४३ ॥ किं जो जियेचा पति : त्या पतीचिं जें अनुवर्ति ॥ आणि अपत्यें जें संतति : पुत्रकन्यादि ॥ ४४ ॥ तयाचें पाळन : आणि सुह्रदाचें सेवन ॥ हाचि धर्म आह्मां लागुन : सांगीतला ॥ ४५ ॥ तो उपदेश पाहिं : असो गा तुझा पाईं ॥ आह्मासि करणीय नाहिं : उरलें आतां ॥ ४६ ॥ तुज सर्वज्ञाप्रति : यावरि बोलावें किती ॥ आह्मी त्वच्छरण सती : त्यक्त सर्व कामा ॥ ४७ ॥ उगवोनि सर्वा गोंवीतें : प्रत्यक्ष पावलों तुतें ॥ आतां आमुतें : करणीय कैंचे ॥ ४८ ॥ अगा तुजवांचुनि कांहिं : अनुष्ठेयचि नाहिं ॥ आतां उपदेशिलें काई : धर्मविद् तुवां ॥ ४९ ॥ हें सहज बोलिलें : किं आमुचें चित्त पाहिलें ॥ हें तों नाहिं आलें : प्रत्ययासि कृष्णा ॥ ५० ॥ आतां हा क्रम जो काहिं : तो असो तुझेचि पाइं ॥ याविषयि काई : आह्मीच उपदेश्या ॥ ५१॥ अगा प्रसंगें करुन : तुवां जे केलें निरोपण ॥ तें त्या अध(न?)धिकारिं जाण : योग्याचि असे ॥५२॥ आमुचा कर्तव्यार्थ : तुज काय नाहिं विदित ॥ तुं सर्वात्मा समर्थ : लोकशास्ता गुरु ॥ ५३ ॥ तुं सर्व धर्माचें स्थान : या लागिं उचित हें निरूपण ॥ परि हें जें गमन : स्वगृहासि ॥ ५४ ॥ हेंचि विरुद्ध ऐसें : आमुतें भासत असे ॥ समुद्रापासुनि जैसें : गंगेसि फिरणें ॥ ५५ ॥ किंवा हें धर्मनिरूपण : तुजाचि अनुलक्षुन ॥ स्वधर्माचें अवसान : तुझाचि ठाईं ॥ ५६ ॥ एवं उपदेशाचें स्थान : नाहिं तुजवांचुन ॥ तुजचि विषय करुन : वेदशास्त्रांसि प्रवृत्ति ॥ ५७ ॥ पातिव्रत्यादि धर्मा : नाना व्रततपोयमा ॥ सर्व नियमासि सीमा : तुंचि एक सकळेश्वर किं ॥ ५८ ॥ ह्मणोनि त्या धर्मपंथें : आराधूनि तुंतें ॥ तेणे बळें आलों येथें : कोठें जाणे न घडे आतां ॥ ५९ ॥ अथवा भाग्यबळें : साक्षात् आराधिलें ॥ तुजहुनि काये उरलें : आराध्य आणिक ॥ ६० ॥ अनुक्रमाचेंनि पंथें : जें उपास्य असे ज्यातें ॥ तें अवः

घेंचि आतां येथें : सांपडलें आह्मा ॥ ६१ ॥ पावलिया अपांपति : तीर्थांतरें काय स्मरति ॥ तेवि सर्वात्मा तुजप्रति ॥ आलों आह्मी ॥ ६२ ॥ अगा जे जे उपास्य काहिं : तें असो तुझाचि पाइं ॥ लाधलों आह्मासि नाहिं : येथुनि जाणें ॥ ६३ ॥ तें जें पतिसुतादि भान : त्याचें तुंचि अधिष्ठान ॥ म्हणोनि पूज्य सुहृज्जन : तुंचि कृष्णा ॥ ६४ ॥ अगा सुर्याच्या राउळिं : काइ दीपाची दिवाळी ॥ तेवि तुज पाहुनि राहिलिं : कृत्यांतरें ॥ ६५ ॥ जरि येउनि येथें : तुज धर्म पुशिले असते ॥ तरि उचित होतें तुतें : उपदेशावया ॥ ६६ ॥ नापृष्ट : कस्यचित्‌ब्रूयात् : यासि हें असे संमत ॥ ह्मणजे कोणासि न पुसत : न करावा उपदेश ॥ ६७ ॥ आणि उपदेष्टे जे कोण्हि : ते तुझे प्राप्ती लागुनि ॥ उपदेशिती या जानें : त्वत्प्रापकां धर्मांतें ॥ ६८ ॥ कां जे या जनांत पाहिं : तुजवीण प्रिय नाहिं ॥ सर्वां अवस्थांचा ठाईं : प्रेमास्पद वस्तु तुं गा कृष्णा ॥ ६९ ॥ तनुधारी जे जन : त्यांचे बुद्धिसाक्षित्वें करुन ॥ शास्ता आत्मा जीवन : सर्व व्यवहारें तुंचि त्यांचे ॥ ७० ॥ ऐशा आह्मीं धर्मजिज्ञासित्या : तुं धर्मनिरुपणकर्ता ॥ हा प्रसंग काहिं नसतां : उपदेशिले स्वधर्म ॥ ७१ ॥ तरि या धर्माचें अवसान : साधिले हे श्रीचरण ॥ पाहोनि सुंदर वदन : आतां निवालों कृष्णा ॥ ७२ ॥ तयां गृहकर्मादिपंथे : अंतरें होतिं तप्तें ॥ तें या वदनशोभासरितें : अत्यंत शीतळ जालिं ॥ ७३ ॥ आतां तुवा उपदेशिलें जें काहिं : तें तुज गुरुपदाचा ठाईं ॥ गुरुदक्षिणार्थ तेंहिं : अर्पिले तुतें ॥ ७४ ॥ कर्तव्यार्थ आलियां हातिं : मग तेचि विक्षेपदांति ॥ ह्मणोनि नको मागुति : येथुनि गमन हें ॥ ७५ ॥ असो उपदेशिलें जें काहिं : त्यासि विषयोचि उरला नाहिं ॥ आतां कोणाचि काइ : करावी सेवा ॥ ७६ ॥ शोवितां रविकर : सापडते जरि मृगनीर ॥ तरि सुखें तेणें व्यवहार : संपादता कांहिं ॥ ७७ ॥ तेविं तुज देखोनि आमुतें : गृहादिक अर्थतें स्फुरतें ॥ तरि तेथें जाणें घडतें : आह्मांसि आतां ॥ ७८ ॥ तो उपदेश जयानिमित्त : तो तुं प्रत्यक्ष आद्य दैवत ॥ लाधलों आतां कृत्यजात : सरले सर्व ॥ ७९ ॥ नातरि पाशेनिया संगातें : जरि

अन्य विषय स्फुरते ॥ तरि उपास्य होतें : उपदेशित तुझें ॥ ८० ॥ पा-
होनि मनोहर मुर्ति : विषयांतरेच्छा होति ॥ तरि अवस्य आज्ञाप्रति : सेव्य
होते धर्म ॥ ८१ ॥ अगा गृहिं वसोन : करावें चर्वित चर्वण ॥ देखतांचि
हे कमळनयन : जरि नव्हे विश्रांति ॥ ८२ ॥ एवं उपदेशिलें जें कांहिं :
तें असो तुझाचि ठाई ॥ कृष्णा आह्मी तों तुझा पाई : कृतकृत्य असों ॥८३॥
ऐसें जाणवों येतें : जे आह्मीं पावलों येथें ॥ जरि बहुतां जान्मि बहुतें : अ-
र्जिलिं सुकृतें ॥ ८४ ॥ त्या बहुजन्माचा अंतिं : देखिली हे रमण मूर्ति ॥
आतां येथुनि परावृत्ति : न घडे कृष्णा ॥ ८५ ॥ ह्मणसी हे केलें निश्चित :
तें काय तुमचेंचि मत ॥ किंवा प्रमाणादि येथें : संमत असे ॥ ८६ ॥
कृष्णा ऐसें जरि ह्मणसी : तरि हें संमत असे सर्वांसि ॥ नावेक क्षमा क-
रिसि : तरि बोलों कांहिं ॥ ८७ ॥

**कुर्वंति हि त्वयि रतिं कुशलाः स्व आत्म-**
**न्नित्यप्रिये पतिसुतादिभिरार्तिदैः किम् ॥**
**तन्नः प्रसीद परमेश्वर मा स्म छिंद्या-**
**दाशां धृतां त्वयि चिरादरविंदनेत्र ॥ ३३ ॥**

आइकें प्रभो इये जनिं : कुशल जे असती कोण्हि ॥ ते सांडुनि चिंतवणी :
परमप्रिय जो तुं ॥ ८८ ॥ तया तुझा चरणिं : रति करिती अनपायिनि ॥
कां जे तुं आत्मा तुजहुनि : परमार्थ वस्तु नाहिं ॥ ८९ ॥ तुजहुनि जें
आन : तेंचि जागातें अज्ञान ॥ हें सर्व मिथ्या भान : नेणोनि तुतें ॥ ९० ॥
जेवि दोरीचा ठाई : प्रत्यया आणिला अहि ॥ तेवि जगदाभासही : विलास
तुझा ॥ ९१ ॥ ह्मणोनि सांडोनि सर्वस्वातें : तुं जो सर्वात्मा त्या तुतें ॥
भजीनले कृतसुकृतें : जाणते जे जन ॥ ९२ ॥ असो शोधिता देहमान :
अहंप्रत्ययाचे अवसान ॥ तुं आत्मा सनातन : नित्यप्रिय वस्तु ॥ ९३ ॥
ऐसें चोजवलें जयातें : तेचि ये जनिं जानते ॥ त्यागुनि सर्वस्वातें : रति
करिती तुझा ठाइं ॥ ९४ ॥ त्या नित्यप्रिय वस्तुतें : कोणे भाग्ये समर्थे ॥
कोण्हि येके निमित्तें : पात्रलों ज्या कृष्णा ॥ ९५ ॥ त्या आह्मासि प्रभो पाहिं :

गृहादिकिं काज काइ ॥ त्या संबंधें काळत्रईं : सुख नसे कदां ॥ ९६ ॥ अगा गृहिंच ज्यांसि प्रीति : त्यांसि तें साधनें श्रमदातिं ॥ जे उपदेशिलि होतिं : पूज्यसेवनें ॥ ९७ ॥ तयां साधनपंथें : त्रासले जे गृहादिकांतें ॥ कोण्हि येकें सुकृतें : पावले जे तुतें कृष्णा ॥ ९८ ॥ तयांसि मागुते पाहीं : या दुःख समुद्राचा ठाईं ॥ बळेंचि पाडने काईं : उचित असे ॥ ९९ ॥ असो ज्या गृहानळतप्ता : पावलों आह्मि श्रीकांता ॥ नुपेक्षावें आतां : कदां प्रभो ॥ ८०० ह्मणसी हें सुवदन : माझे जे सुंदर नयन ॥ ऐशा रुपिं भाळोन : कामासक्ता ज्या ॥ १ ॥ टाकुनि आश्रमधर्मातें : आल्याति वो येथें ॥ माझें संगें काय तुमतें : श्रेयकर होइल ॥ २ ॥ ऐसें ह्मणसी काहिं : तरि आह्मि सक्ता तुझा पाईं ॥ येथें संदेह नाहिं : तन्हि आइके ॥ ३ ॥ अगा या जगाचा नियंता : परमेश्वर मोक्षदाता ॥ ऐसि जे वृद्धवार्ता : आइकिली होती कृष्णा ॥ ४ ॥ मग देखोनि तुझा रुपातें : विश्रांति पावलिं चित्तें ॥ अनुभवोनि शोभेतें निवान्त जालों ॥ ५ ॥ ह्मणौनि इश्वर जो या जनिं : तो आणीक नसे तुजहुनि ॥ ऐसा आमुच्या मनिं : जाला विश्वासु ॥ ६ ॥ पाहातां या मुख शोभेतें : विरती कंदर्पशतें ॥ या प्राकृतपुरुषातें : तुच्छता मानिलीसे प्रभो ॥ ७ ॥ नातरि या मुखशोभेचा ठाइं : कामाचा लेखा काइ ॥ कर्तव्यार्थुचि काहिं : नुरे येथें ॥ ८ ॥ देखोनि सुंदर मूर्ति : कर्मि नव्हे प्रवृत्ति ॥ पावोनि परम विश्रांति : कृत्यकृत्यता होतसे ॥ ९ ॥ ह्मणोनि तुजपासुन : ईश्वर तो कोण आन ॥ आतां होईं कृष्णा प्रसन्न : अंगीकारिं आमुतें ॥ १० ॥ जरि तुं प्रसन्न स्वता : तरि श्रेयाची काय चिंता ॥ जन्हि आह्मि कामासक्ता : भाळलें तुज ॥ ११ ॥ ह्मणोनि गा परमेश्वरा : श्रीकृष्णा नंदकुमारा ॥ विटोनियां संसारा : शरण आलों तुज येथें ॥ १२ ॥ त्या आमच्या आशेतें : ह्मणिं भंगिसी गा येथें ॥ बहुंत दिवस कृष्णा तुतें : स्मरतों आह्मि ॥ १३ ॥ केंव्हा या मुखशोभेतें : प्राशिजे नेत्रपंथें ॥ सांडुनि सर्व विक्षेपातें : पाविजे अवकाश ॥ १४ ॥ ऐसी जे आशा काहिं : बहुं काळ तुझा पाइं ॥ धरिली ते आतां काइ : अन्यथा करिसी प्रभो ॥ १५ ॥ प्रसन्न होइं आमुतें : ह्मणि भंगिशी आशेतें ॥ श-

रण आलों गा तुतें : सर्वस्वें आह्मीं कृष्णा ॥ १६ ॥ नातरि या वेणुगीतें : जरि वेधिलें नसतें ॥ तरि मानितों आज्ञेतें : जातों तेथें अवश्य ॥ १७ ॥ ऐसें गोपी विचारुनि : उत्तर श्लोकें करुनि ॥ बोलती ते तुजलागुनि : निवेदितों राया ॥ १८ ॥

**चित्तं सुखेन भवतापहृतं गृहेषु**
**यन्निर्विशत्युत करावपि गृह्यकृत्ये ॥**
**पादौ पदं न चलतस्तव पादमूला-**
**द्यामः कथं व्रजमथो करवाम किं वा ॥ ३४ ॥**

प्रभो आमुचें चित्त : निरंतर अभिरत ॥ तुज सुंदरातें स्मरत : निजगृहकृत्याचा ठाइं ॥ १९ ॥ या व्यवहारपंथें : नावेक प्रवेशत होते ॥ तें तुवां गाउनि गीतें : मोहिलें अकस्मात कृष्णा ॥ २० ॥ असो गृहकृत्याचा ठाइं : प्रवर्तले जे काहिं ॥ आणि हे हस्तहि पाहिं : वर्तत होते गा तेथें ॥ २१ ॥ एवं तुझा पाइं असोनि चित्तें : गृहधर्मपंथें ॥ यथा कथंचित् स्वकृत्यें : संपादत होतिं ॥ २२ ॥ तवं प्रेरुनियां निजगीत : आह्मा समस्तांचें चित्त ॥ चोरिलें अकस्मात : सुंदरें तुवां ॥ २३ ॥ या तुच्छ सुखाचा ठाइं : सुखावधि तुं जो काहिं ॥ ज्यासि अन्यथा होणे नाहिं : काळत्रइं ॥ २४ ॥ ऐसा जो सुखमूर्ति : त्या तुवां आमुचि चित्तवृत्ति ॥ हरिली जे साधारण होति : गृहकृत्यिं ॥ २५ ॥ ना तरि जन्मांतर सुकृतें : आलिं भाग्यें फळातें ॥ तुवां रमेचेनि नाथें : स्मरिलें तेव्हां ॥ २६ ॥ किंवा हें कलगीत : निजविरहार्णविं पोत ॥ प्रेरुनियां आह्मासि येथें : आणिलें तुवां ॥ २७ ॥ ना तरि हे गीत नव्हे आतां : गृहसागरिं बुडतां ॥ तुवां हात देऊनि स्वता : आणिलें येथें ॥२८॥ जेवि मुमुक्षुचा मनिं : स्मरोनि वेदवाणी ॥ तत्काळ गृहसंगातें टाकुनि : गुरुप्रति येति ॥ २९ ॥ तेवि तुवां प्रेरुनि गीतें : हरिलिं आमुचि चित्तें ॥ आतां मागुती तेथें : प्रवेशावें कैसें ॥ ३० ॥ त्यांतेंचि अनुसरोन : हस्तहि जाले क्रियाशून्य ॥ जे स्वकर्मिं साधारण : वर्तत होते ॥ ३१ ॥ तें मागुतें गृहकर्म : संपादितां कैसें क्षम ॥ होइल गा गृहकाम : सांडिला असता

किं ॥ ३२ ॥ असो तुंवा कळावंते : आमुचे हस्ताक्रियशक्तीतें ॥ हरिलें आतां गृहकत्यें : संपादती कैसि ॥ ३३ ॥ ह्मणसी जर्‍हि मोहितचित्ता : जालियाति क्रियारहिता ॥ तर्‍हि तुह्मि वनिता : गृहिंच योग्या ॥ ३४ ॥ तुह्मी असावें स्वगृहिं : हा वनवास बरा नाहिं ॥ ऐसें कृष्णा जरि काहिं : ह्मणसि येथें ॥ ३५ ॥ तरि बहुजन्माचे अंतिं : आलों तव पादमूळाप्रति ॥ या पदक्रियेची समाप्ति : जाली येथें ॥ ३६ ॥ या पदाब्जापासुन : कैसें घडे पुनर्गमन ॥ मागें फिरावया काहिं चळन : न पावति हे पायें ॥ ३७ ॥ असो या पायांचि प्रवृत्ति : सर्वथा नव्हे गृहाप्रति ॥ हरिली तुवां गमनशक्ति : चालावें कोणें ॥ ३८ ॥ पाहोनि हें सुवदन : मन जालें गतिहीन ॥ खुंटलें यावरि जाण : राहिली सर्व क्रिया ॥ ३९ ॥ आतां आह्मी व्रजाप्रति : जावें कवणिये रीति ॥ किंवा जाउनि तेथें मागुति : करावें तर्‍हि काय कृष्णा ॥४०॥ असो आह्मी त्वन्मोहितमना : गृहकामिं अप्रयोजना ॥ येथुनि आतां गमना : योग्य न हों ॥ ४१ ॥ आह्मी विरहानळतप्ता : गृहकामिं अनासक्ता ॥ तव गीत मोहित चित्ता : आलों येथें ॥ ४२ ॥ देखोनि तुज सुंदरातें : समाधान जालें होतें ॥ तवं अकस्मात गृहकर्मातें : बोलिलें तुंवा ॥ ४३ ॥ वियोगाग्नि शांत होता : येणें प्रदीप्त जाला मागुता ॥ आतां तुजवीण हे व्यथा : निवारील कोण ॥ ४४ ॥ ऐसें धरुनि निजमनिं : श्रीकृष्णाप्रति भामिनी ॥ उत्तर ग्रंथें करुनि : बोलताति ऐसें राया ॥ ४५ ॥

**सिंचांग नस्त्वदधरामृतपूरकेण**
**हासावलोककलगीतजहृच्छयाग्निम् ॥**
**नो चेद्वयं विरहजाग्न्युपयुक्तदेहा**
**ध्यानेन याम पदयोः पदवीं सखे ते ॥ ३५ ॥**

हे अंगा अगा ये कृष्णा : सखया नंदनंदना ॥ आह्मी विरहतप्तांगना : अनन्यशरणा तुज ॥ ४६ ॥ प्रभो तुझें जें कलगीत : किंचित्हास्यमुखोक्त ॥ लीलावलोकनयुक्त : सेव्य जें योगियांतें ॥ ४७ ॥ त्या श्रवणें आमुतें : केलें विरहाग्नितप्तें ॥ नातरि श्रुतिमार्गें हृदयातें : स्पर्शिलें येउनि तेणें ॥ ४८ ॥

प्रदीप्त जो हृच्छयाग्नि : तेणें आणिलों तव कामिनी ॥ सर्वस्वातें सांडुनि : भा-ळलों गा तुतें ॥ ४९ ॥ त्या आमुचिं शरीरें : तप्तें जालिं कामाग्निभरें ॥ आतां पावलो किं गा तुं त्वरें : शमवि त्या तापातें ॥ ५० ॥ असो साहुनिया व्यथेतें : आचरतांहि गृहकृत्यें ॥ तवं या ललितगीतें : चेतविला कामाग्नि॥ ५१॥ न साहोनि वियोगतापातें : टाकोनि आलों येथें ॥ देखोनियां मुखशोभेतें : निवालों होतों काहिं ॥ ५२ ॥ तवं उपदेशप्रभंजनिं : मागुता हृच्छयाग्नि ॥ खवळोनि अंतःकरणिं : सर्वांग तापविले तेणें ॥ ५३ ॥ त्याहीं वरि गृहादि श्रवण । तो दुसरा हुताशन। एवं उभयाग्नि मिळोन । तापविलों आह्मीं ॥ ५४॥ आतां या तीव्र तापातें : निववि गा अधरामृतें॥ असो या अधरामृतें : आमुतें तृप्त करिं ॥५५॥ या विरहजा तापातें : शमउनि स्वदासितें ॥ आपुले पाइं सरतें : करावें आमुतें श्रीकृष्णा ॥५६॥ नातरि आह्मी तव किंकरी : ज्या विरहानळ का तरी ॥ तया अधरामृतपुरिं : राखें आमुतें ॥ ५७ ॥ असो हें तप्तें शरीरें : सिंचोनि अधरामृतनीरें ॥ निववावें परिकरें : सत्वर आमुतें कृष्णा ॥ ५८ ॥ आतां आमुचे प्रार्थनेसि : जरि चित्त न देसी ॥ आह्मा दीनातें उपेक्षिसी : कदाचित तुं ॥ ५९ ॥ तरि तव ध्यानयोगपंथें : सांडुनि तप्तां देहातें ॥ तुझे चरणपदवीतें : पाविजेल आह्मीं ॥ ६० ॥ असो हा विरहाग्नि : तेणें तप्तदेहा ज्या कामिनी ॥ आह्मी ध्यानमार्गें करुनि : योगी जैसे ॥ ६१ ॥ तव पदपदवी पवित्र : जे प्रतिपादित वेदशास्त्र ॥ तियेतें होउनि पात्र : ध्यानयोगें पाविजे ॥ ६२ ॥ जेविं मुमुक्षु जे कोणिह : सर्व संगातें सांडुनि ॥ प्रवर्तती वेदांतश्रवणी : आचार्याश्रयें ॥ ६३ ॥ मग वेदांततात्पर्यार्थ : नव्हे जरि बुद्धिगत ॥ त्यासि कृपा जरि न करी भगवंत : तेणे मार्गें त्यातें ॥ ६४ ॥ तरि तयां मुमुक्षुंसि पाहिं : पुर्वसंग तो उचित नाहिं ॥ ध्यानादिकिं तिहिं : साधावा योग ॥ ६५ ॥ ध्यानयोगाचेनि पंथें : शोधूनियां स्वचित्तें ॥ त्या शुद्धचित्तिं भगवंतें : प्रतिष्ठिजेल वेदार्थातें ॥ ६६ ॥ नातरि ध्यानयोगयुक्त : तेथें प्रकटोनियां भगवंत ॥ प्रेरितसे निजार्थ : शरणागता तया ॥ ६७ ॥ कृपावंतें भगवंतें : पावविजेल निजमंदरीतें ॥ नाशोनि अविद्येतें : तेयोंनि तापा

योगियांच्या ॥ ६८ ॥ नातरि ध्यान योगपंथे : वैकुंठभुवनिं त्यांतें ॥ पावउनि परमपदातें : स्वीकारिजेल स्वांगें ॥ ६९ ॥ तेवींचि अनुसरोनि ध्यानपंथा : पावों गा तुज परम कांता ॥ परि येथुनि सर्वथा : जाणें नाहिं ॥ ७० ॥ तुझा ध्यानिं गुंतलिं मनें : मग शरीरें हे अचेतनें ॥ संततें निवालिं कोणें : जाणावि कृष्णा ॥ ७१ ॥ मनें गुंतालिं तुझा पाई : मग शरीरें काज काई ॥ तु उपेक्षिसी तरि नाहिं : वांचणें आह्मां ॥ ७२ ॥ परि सोडुनियां पायांतें : प्रवर्तावें गृहपंथें ॥ हें सर्वथा कृष्णा आमुतें : न गमे तुजवांचुन ॥ ७३ ॥ ह्मणसी तुह्मी विरहतप्ता सती : जावें वो निजपतिं प्रति ॥ तेथें तापशांति : पावाल आतां ॥ ७४ ॥ तरि तुझे पायांपासुन : न घडे सर्वथा गमन ॥ असो तुजवांचुनि हें मन : न भजे आणिका ॥ ७५ ॥ या अर्थातें धरुनि मनिं : अग्रश्लोकें करुनि ॥ आईक राया कृष्णकामिनी : बोलती जें ॥ ७६ ॥

**यर्ह्यंबुजाक्ष तव पादतलं रमाया**
**दत्तक्षणं क्वचिदरण्यजनप्रियस्य ॥**
**अस्प्राक्ष्म तत्प्रभृति नान्यसमक्षमंग**
**स्थातुं त्वयाभिरमिता बत पारयामः ॥ ३६ ॥**

अगा ये अंगा कृष्णा : अवधारिं कमळनयना ॥ आमुचें वृत्त अवधारणा : योग(ग्य?)तुंचि ॥७७॥ हें जें तुझें चरणतळ : श्रांतांविश्रांति सबळ ॥ देखोनि जाते तळमळ : मुमुक्षु सांडिती ॥ ७८ ॥ या पादतळाचा ठाईं : देवांसही अवसर नाहिं ॥ स्वता रमादेवी तेहि : कदाचित् पावतसे ॥ ७९ ॥ त्या परमविश्रांतिस्थानिं : अवसरातें पावोनि ॥ सर्वत्र श्लाघ्य ये जनिं : मिरवे जे किं ॥ ८० ॥ असो जे चरणारविंद : सकळ सौख्यामोद ॥ जें रमादेवीसि आस्पद : कदाचित्प्रभो ॥ ८१ ॥ परि सर्वकाळ तेथें ॥ तेहि न पवे अवसरातें : एवं रमेसही योग्यतेतें : न सरे सर्वदा ॥ ८२ ॥ ऐशा पदसरोजातें : काहिं एके सुकृतें ॥ आम्हीं जन्मे सोसुनि अनंते : स्पर्शिलें जेव्हां ॥ ८३ ॥ कृष्णा तया काळापासुन : आह्मी त्वच्छरणा असोन ॥ तुझा दासी ह्मणोन : श्लाघ्य जालों ॥ ८४ ॥ असो आह्मी ज्या त्वच्चित्ता : तुझेनि आनंदभरिता ॥

तुझे वदन पाहातां : निवालों प्रभो ॥ ८५ ॥ तैं पासूनि कृष्णा : आह्मी जालों विगततृष्णा ॥ त्वद्वियोगअसहिष्णा : त्वदेकशरणा किं ॥ ८६ ॥ आणिका समक्ष राहणें : हें टाकिलें आमुचे मनें ॥ असो आणिकाचें ह्मणवणें : हेंहिं न सोसे ॥ ८७ ॥ या त्रैलोक्याचा ठाई : तुजवीण अर्थ नाहिं ॥ तुज परमार्थरूपासि काई : हा प्रपंच अवघा अध्यस्त ॥ ८८ ॥ हें सर्वेही आगमा पाईं : काहिंच निर्वाह नाहिं ॥ आतां कोणास काइ : भजावें कैसें परिं ॥ ८९ ॥ असो बोलावें किती काइ : रती जाली तुझा पाईं ॥ तैं पासुनि नाहिं : आह्मासि सेव्य आणिक ॥ ९० ॥ एवं आह्मी तुझा दासी : असेव्या आणिका पासिं ॥ योग्य न हों हें काय नेणसी : सर्वज्ञ किं तुं ॥९१॥ ह्मणसी माझे सेवेप्रति : लक्ष्मीहि नव्हे सरती ॥ तेथें तुह्मी गोपजाती : राणटा वनिता ॥ ९२ ॥ कोणेही येके रीती : असो भलत्या प्रकारें प्रीति ॥ परि मीं तुह्मा राणटांप्रति : वश होईन कैसा ॥ ९३ ॥ तुह्मीं अंगना मूढजाति : नेणा वो समान प्रतिपत्ति ॥ केवळ माझी प्रीति : फळेल कैसी ॥ ९४ ॥ ए[illegible] असावया येथें : योग्यता नाहिं वो तुमतें ॥ ऐसें जरि रमानाथें : ह्मणिजेल कांहिं ॥ ९५ ॥ तरि तुं अरंण्यजनसखा : तुज काय रमेचा लेखा ॥ तुझेनि पाडे वराका : रमा ते किति ॥ ९६ ॥ पाहाता या महिमाना : लक्ष्मी आणि आह्मी समाना ॥ तथापि स्वामी सुजाणां : तुं अकिंचनप्रिय ॥ ९७ ॥ जेथें उपाधीची निवृत्ति : तेथेंचि तुझी प्रीति ॥ अत्यंत आवडती : त्यक्ताभिमान जे कोण्हि ॥ ९८ ॥ असो जे येथें त्यक्तसंग : तेथें तुज अनुराग ॥ संपन्न जे दुर्भग : ते नावडती सहसा ॥ ९९ ॥ असो सांडुति सर्वासक्ति : तुजचि जे स्मरति ॥ त्यांची प्रीति फळवती : तुझे कृपेने होये ॥ ९०० ॥ एवं विजानें जे वसति : त्यांचीच तुजला प्रीति ॥ या कारणें तुला ह्मणती : जें अरण्यजनप्रिय ॥ १ ॥ तया तुझे श्रीचरण : जें रमेसही दुराराधन ॥ तें कोण्हियेके भाग्यें करुन : स्पर्शिले आह्मि ॥ २ ॥ असो तव पादतळ जे कांहिं : बिंबले आमुचा हृदयीं ॥ नातरि मन हें तुझा पाई : रंगलें जेव्हां ॥ ३ ॥ तैं पासुनि हें कृष्णा : आणिकांतें भजेना ॥

तुजवांचूनि ह्मणेना : जे आपुले हे आस कोण्हि ॥ ४ ॥ आणिकां समक्ष असावें : आणिकातें अवलोकावें ॥ ह्मणोनि हें न संभवे : येथुनि जाणें ॥ ५ ॥ बहु दिवस आशा केलि : ते जरि व्यर्थ जाली ॥ मग हें धिक् शरीरें ज्यालिं : निःकारणें जें ॥ ६ ॥ एवं बत शब्देंकरुन : खेदाचें केलें उपलक्षण ॥ जें कृष्णें कथिलें गमन : तें आठवलें सखेद ॥ ७ ॥ अथवा तयांसि जे काळीं : कृष्णपदिं प्रीति जाली ॥ तइं पासुनि धरिलिं : तें पदें हृदयिं ॥ ८ ॥ त्या काळातें स्मरोनि : बत येणें उत्साहयुक्त मनिं ॥ विस्मयातें पावोनि : राहिल्या निवांत ॥ ९ ॥ मागुता तो गोपीजन : स्मरोनियां श्रीकृष्णचरण ॥ वर्णितसे महीमान : त्या पदाचें राया ॥ १० ॥

**श्रीर्यत्पदांबुजरजश्चकमे तुलस्या**
**लब्ध्वापि वक्षसि पदं किल भृत्यजुष्टम् ॥**
**यस्याः स्ववीक्षणकृतेन्यसुरप्रयास-**
**स्तद्वद्वयं च तव पादरजः प्रपन्नाः ॥ ३७ ॥**

आमुचें मन तुझा पाइं : कृष्णा हें आश्चर्य काइ ॥ नवल वाटतसे काहिं : तें आइकावें येक ॥ ११ ॥ अनंता जार्न्मिकरुनि : अनेक तपें तपोनि ॥ ते पावली सिंधुनंदिनी : वक्षस्थळीं ठावो ॥ १२ ॥ असो अपारें सुकृतें : पावली तुझा वक्षस्थळातें ॥ नाना वक्षस्थळीं तीतें : ठेविलें तुवां ॥ १३ ॥ परि येवढे महत्वातें : पावोनहि न माने तितें ॥ तुझा पदांबुज रजातें : वांछिलें तियनें ॥ १४ ॥ लाधोनहि महिमानातें : अंगीकेलें चरणसेवेतें ॥ कां जे पदरज तीयेतें : मानले विशेषें ॥ १५ ॥ पाहातां व्यवहाररीति : ते असपत्न तेथें होती ॥ आणि चरणातें चुम्बिती : तुळसीची माळा ॥ १६ ॥ त्या तुळसी सहवर्तमान : ते करिती जाली पदसेवन ॥ सांडोनि महिमान : सोशिलें सापत्न्य ॥ १७ ॥ पाहा पदरजाचे आशा : केव्हडा केला धिवसा ॥ न गणोनि स्वयशा : तव पदरज सेविले ॥ १८ ॥ सोसुनि सापत्न्यभावातें : लाभली पदसेवेतें ॥ श्लाघ्य मानुनि आपनातें : मिरवली जे ॥ १९ ॥ किंवा माळामिषेंकरुनि : तुळसीही हृदयवासिनी ॥ परि जाली पाद(दा)व

लंबिनी : पदरजस्वार्थें ॥ २० ॥ हे देखोनि सिंधुसुता : करिती जाली व्यवस्था ॥ किंवा हाचि लाभ असता : तरि ते कां पद सेविती ॥ २१ ॥ तस्मात् या पदरजाचा ठाइं : विशेष लाभ असे काहिं ॥ तो आपणासि कां नाहिं : हें मानिलें उणें ॥ २२ ॥ या हेतुतें सिंधुनंदिनी : सापल्यातें अंगीकारुनि ॥ तव पदरजातें सेउनि : पावली श्लाघ्यता ॥ २३ ॥ ह्मणसी लक्ष्मी माझें कळत्र : तेंचि सेवेसि पात्र ॥ एतावता एथें विचित्र : काय जाहलें ॥ २४ ॥ ऐसें ह्मणसी आमुतें : तरि मागें जे शिष्ट होते ॥ ते भजोनि त्या पदपंथें : पावले तुज कृष्णा ॥ २५ ॥ स्वामी तुझे जे भृत्य : ते या पदरजातें सेवित ॥ पावले निर्विक्षिप्तचित्त : सुखरुपा तुला ॥ २६ ॥ ह्मणोनि हे पदःरजःकण : तव भृत्यसेवास्थान भृत्यजुष्ट या लागुन : विशेषण पदाचें ॥२७॥ यास्तव पाहोनि तव पदातें : आणिक नावडगा चित्तें ॥ आतां मागुती जरि येथें : ह्मणिजेल ऐसें ॥२८॥ किं रमा तों स्त्री जाती : येथें तियेचा लेखा तो किति : किंवा भृत्य जे मातें भजती : तें तों अकिंचन ॥२९॥ परि संपन्न जे लोक : त्यांसि तों नाहिं अशक्य ऐसें जरि यदुनायक : ह्मणतील कांहिं ॥ ३० ॥ तरि तुजहुनि जे अन्य : ब्रह्मादिकही सुरगण ॥ ते या रमेचें अवलोकन : अपेक्षिती सदा ॥ ३१ ॥ वांछुनि अवलोकलेश : ते बहु करिती प्रयास ॥ परि ते तयांवरि उदास : अनुमात्रहि न पाहे ॥ ३२ ॥ असो तिहिं जे प्रयास केले : उदंड तपें तपीनले ॥ परि अद्यापिहि पाहिलें : नाहिं अळुमाळ ॥ ३३ ॥ ऐसी जे सींधुनन्दिनी : त्या महत्वातें सांडुनि ॥ ते जाली चरणसंवाहिनी : तुझी दासी ऐसी ॥ ३४ ॥ तेथें आह्मा जाली गति : पाहा त्या वराका किति ॥ परि कोण जाणे उन्नति : कोण्या कर्माची हे ॥ ३५ ॥ ह्मणोनि श्रियेचे पोर : आह्मि ज्या व्रजवासिनी नारी ॥ जालों तुझा किंकरी : पावलों पदरजा ॥ ३६ ॥ तिणें इच्छुनियां सुखातें : सांडिलें महिमानातें ॥ तरि आह्मीं कां जावें तेथें : त्यजुनि हे पदरजें ॥ ३७ ॥ आह्मा तव पदरजप्रातां : गृहसंग नसो आतां ॥ सर्वथा नुपजो आस्था : आणिकांची ॥ ३८ ॥

तन्नः प्रसीद वृजिनार्दन तेंघ्रिमूलम्
प्राप्ता विसृज्य वसतीस्त्वदुपासनाशाः ॥
त्वत्सुन्दरस्मितनिरीक्षणतीव्रकाम-
तप्तात्मनां पुरुषभूषण देहि दास्यम् ॥ ३८ ॥

अगा हे वृजिनार्दना : श्रीकृष्णा क्लेशहरणा ॥ आम्ही त्वच्छरणा : त्या आणिकांतें न भजों ॥ ३९ ॥ यालागिं आलों जी येथें : पावलों तव पदातें ॥ त्या उपेक्ष्या नव्हों गा तुतें : निजदास्य देई आम्हां ॥४०॥ गृह-कृत्यें उर्वरितें : ठेउनि आलो असो न येथें ॥ ऐसें जरि कृष्णा तुतें : असेल गमलें ॥ ४१ ॥ तरि त्या तुच्छ गृहातें : त्यागुनि निश्चयें येथें : आलों आम्ही तव सान्निध्यातें : पद सेवावया ॥ ४२ ॥ त्वदुपासनमनोरथा : जालों ज्या तवांघ्रिप्राप्ता ॥ उपेक्ष्या न हों सर्वथा : दास्य देइं आपुलें ॥४३॥ कां जे हा स्थूळ उपाधि : यासि सेवा करावी अवधि॥ तुझा पाईं ठेउनि बुद्धि : असावें सुखें ॥४४॥ ऐशा धरुनि मनोरथा : आलों येथें आम्ही निश्चिता ॥ यवि-षई जरि आतां : म्हणसी ऐसें ॥४५॥ जे तुम्ही ज्या व्रचसुन्दरी : होत्याति आपुले घरिं ॥ यथासुखें गृहव्यापारिं : वर्ततिया सर्वा ॥ ४६ ॥ म्या आ-पुले मेळें गाइलें : तें सकळ लोकिं आइकिलें ॥ तें तुमतेंचि कां जालें : गृहत्यागहेतु ॥ ४७ ॥ तरि तुज सुवदनातें : यशोदानन्दानन्दनातें ॥ देखोनि तुजलागि जीवितें : पूर्वींच वोपिलिं ॥ ४८ ॥ जेव्हां तुझें मुख हांसतां : देखोनि जालों कामासक्ता ॥ गृहिं गुंतलोंहिं असतां : उद्विग्न ज्या ॥ ४९ ॥ तयां आम्हां त्वच्चित्तातें : त्वद्वियोगतीव्रतप्तातें ॥ त्या तुझे मधुरगीतें : आणिलों किं येथें ॥ ५० ॥ आम्ही जाणतिया जालों : जें श्रीकृष्णें आप्त केलों ॥ येथुनि आतां सुटलों : बोलाविलें तुवां ॥ ५१ ॥ जेविं गृहवासी जन : जरि सर्वत्र उदासीन ॥ भगवंति तत्पर मन : तत्प्रसादातें इच्छिती जे ॥ ५२ ॥ तथापि स्वाचारेंकरुन : तिहिं करावें प्रसन्न ॥ नाहिं तरि परिव्राजन : उचित नव्हे अपक्वातें ॥ ५३ ॥ स्वधर्में शोधित मन : सर्व क्रिया कृष्णार्पण ॥ करुनि ऐसा प्रसन्न : अधिकारी होंत्साता ॥ ५४ ॥ विधीतें अनुसरोन : करावें

गुरुवाक्येश्रवण ॥ मग मनन निदिध्यासन : या न्यायें साधिजे ॥ ५५ ॥ चुकोनि यथाविधीतें : चतुर्थाश्रमिं प्रवर्ते ॥ तो त्याचि निमित्तें विषयगर्ते : तत्काळ पडे ॥ ५६ ॥ तेवि आलोचुनि अधिकारातें : तुवां प्रेरिलिं जें गीतें ॥ तेणें जाणितलें जें आमुतें : आप्त केलें ॥ ५७ ॥ तुझें करुनि सन्निधान : असावें सर्वतापशून्य ॥ पाहोनि हें वदन : सेवावें तुज सदा ॥ ५८ ॥ ऐसें धरुनि चित्तिं : कृष्णा आम्ही आलों तुजप्रति ॥ सैंवट तुवां परावृत्ति : उपदेशिली हे ॥ ५९ ॥ तेणें जालों अतिसंतप्ता : ते कोण शमवील व्यथा ॥ उपेक्षुं नको आतां : दास्य देईं आपुलें ॥ ६० ॥ असो तुझे प्रसन्नतेतें : जाणोनि गा त्वच्चित्तें ॥ साधारणे गृहकृत्यें संपादित होतों ॥ ६१ ॥ तवं गीतश्रवण जालें : तेणें जाणवो आलें ॥ जें श्रीकृष्णें आमुतें स्मरलें : प्रसन्नमानसें ॥ ६२ ॥ त्या प्रसन्नतेचें आशा : येव्हढा केला धिंवसा ॥ पावलों पदरजोलेशा : धन्येतमा जालों ॥ ६३ ॥ परि मागुते गृहगमना : आइकोनि जालों विमना ॥ या लागिं पुरुषभूषणा : प्रसन्न होईं गा ॥ ६४ ॥ असो तुजवीण आणिकातें : भजणें नाहिं आमुतें ॥ कां जे या जगीं तुजपरतें : गोमटेंचि नाहिं ॥६५॥ अगा या लोकाचा ठाईं : तुज ऐसें कोण्हीच नाहिं ॥ हेंचि म्हणो काइ : परि ब्रह्मेशादि अमरहि ॥ ६६ ॥ त्यांची ही आइकिली कीर्ति : परि ते न माने आमुचा चित्तिं ॥ कां जे तेहि सकाम वांछिती : पदरजातें ॥ ६७ ॥ यास्तव पुरुषभूषण : सकळ शोभेचें सदन ॥ तुझिया शोभा शोभायमान : ब्रम्हेशादि विश्व ॥ ६८ ॥ तुझेनि पाडे पाहतां : आणिकाचि काय कथा ॥ पुरुषोत्तम हे प्रथा : तुजाचि कां घडली ॥ ६९ ॥ तस्मात् आपुलें म्हणतिलें : तरीच सार्थक योजिलें ॥ कदाचित् तुवां उपेक्षिलें : तरि जिणेंचि नाहिं ॥ ७० ॥ कां जें मन लोधलें तुझा पाईं : त्यासि आश्रय तुजवीण नाहिं ॥ यावरि कृष्णा काइ : सांगावें तुज ॥ ७१ ॥ अगा ब्रम्हादि स्थानें : तें गर्जती स्वामित्वपणें ॥ परि तें सर्वप्रकारें उणें : तुझें दास्याचि निकें ॥ ७२ ॥ ऐसें हेतुसहवर्तमान : मागुता तो गोपीजन ॥ बोलतुसे तेथें अवधान : निकें देइं राया ॥ ७३ ॥

वीक्ष्यालकावृतमुखं तव कुण्डलश्री-
गण्डस्थलाधरसुधं हसितावलोकम् ॥
दत्ताभयं च भुजदंडयुगं विलोक्य
वक्षः श्रियैकरमणं च भवाम दास्यः ॥ ३९ ॥

हें अलकावृतानन : म्हणिजे सकेशवदन ॥ जें केशप्रांतिंकरुन : तुझें आवरलें मुख : ॥ ७४ ॥ नाना अत्यंत आवरलें नसे : परि आवरलेंसें भासे ॥ तेणें बहु शोभा दिसे : निरुपम ॥७५॥ त्या मुखशोभेचा रीति : जें कार्णी कुण्डलें झळकति ॥ त्या कुण्डलांची दीप्ति : गण्डस्थाळि पडली ॥७६॥ तयां गण्डस्थाळिं युक्त : शोभलें जे बहुत ॥ आणि अधरि सुधा विराजत : त्या मुखाचा ठाई ॥ ७७ ॥ आणि तत्संबंधी जें हास्य : तद्युक्त हें विशेष्य ॥ आणि अवलोकरहस्य : अनुपम्य जेथें ॥ ७८ ॥ तो ही मुखाचा ठाईं : शोभतसे बहु कांहिं ॥ ते वर्णावी कोणें किती काई : जेथिची शोभा ॥७९॥ एवं उक्तशोभासंपन्न : तुझें हें सुंदर वदन ॥ सकळसौभाग्यसदन : जगदेकप्रिय जें ॥ ८० ॥ त्या मुखातें देखोनि : आम्हीं सकाम ज्या मनिं ॥ आतां न जावों गा येथुनि : होणार तें हो कां ॥ ८१ ॥ केवळ देखोनि मुखातें : नाहिं भाळलों गा तुतें ॥ हे भुजदंडि अभय-दानें : मानलें आह्मा ॥ ८२ ॥ देखोनि भुजदंडयुग्मातें : मानिलं ऐसें स्वचित्तें ॥ जें कदाचित् येणें आमुतें : स्पर्शिलें जरि ॥ ८३ ॥ तरि या भयापासुनि : तरों आह्मीं . कृष्णकामिनी ॥ असो विरहहुताशनिं : पडलों जरी कि ॥८४॥ तयां आमुतें आतां : श्रीकृष्ण अभयदाता ॥ पाविजेल कृतकृत्यता : स्पर्शमात्रें आह्मीं ॥ ८५ ॥ ह्मणोनि देखतां भुजयुगातें : अंगिकारिलें दास्यातें ॥ यावरि आणिकातें : अनुसरणें नाहिं ॥ ८६ ॥ नातरि सुमुख हें अनुपम : आणि अभयप्रद भुजयुग्म ॥ इतुकेनी पुर्णकाम : असों आह्मीं ॥ ८७ ॥ आणि देखोनि वक्षस्थळातें : विरालिं सकाम चित्तें ॥ आतां न संडो गां तुतें : दास्य करुनि असों ॥ ८८ ॥ ते वक्ष किंलक्षण : तरि जें रमेचें रमणैकस्थान ॥ जे ब्रम्हादिकां न गणुन : विनटली जेथें

॥ ८९ ॥ कां जे तुजहुनि इतरें : तें कामाचि उद्भवकरें ॥ यालागि सर्व कामसरे : ऐसे हेंचि स्थळ पैं ॥ ९० ॥ अनेकें तपें आचरली : मग या स्थळातें पावली ॥ अनेका कामातें तरली : त्रिनटोनि तुतें गा ॥ ९१ ॥ तया वक्षस्थळातें : रमारमणैकदेशातें ॥ देखोनि आम्ही आणि कांतें : अनुसरावें कां कृष्णा ॥ ९२ ॥ या भजनाचेनि पंथें : आह्मींहि पावों तेथें ॥ हा निश्चयें करुनि चित्तें : दासी जालों तुझा ॥ ९३ ऐसें पाहोनि वदन : एकांतासि आणावें मन ॥ भुजस्पर्शें करुन : निस्तरावा मनोरथ ॥ ९४ ॥ मग हें वक्षस्थान : पावावें सुखसदन ॥ साक्षात् कामोपशमन : येणें न्यायें साधावें हें गा ॥ ९५ ॥ एवं सुवदनादि युक्त : प्रत्यक्ष जो नन्दसुत ॥ त्या तुज देखोनि निश्चित : दासी जालों कृष्णा ॥ ९६ ॥ असो गृहपुत्रादि प्रवाहिं : स्वामित्व हें जें काहिं ॥ हें नलगे आतां देई : दासत्वाचि आवुठें ॥ ९७ ॥ ह्मणसी गृहांतें त्रिटोन : माझें करावें सन्निधान ॥ या हेतु मज शरण : आलियाति तुह्मी ॥ ९८ ॥ हे आगुळियाचि मति : तुह्मी त्रि रुनि निज गति ॥ मजसिं करावया प्रीति : राहिल्याति ॥ ९९ ॥ तथापि हें परगमन : निंदितील अवघे जन ॥ इये प्रवृत्तासि अप्रमाण : शास्त्रविरुद्ध हें ॥ १००० ॥ ऐसें हे ह्मणसी गा कांहिं : तरि आह्मासि प्रवृत्ति मान्य नाहिं ॥ आणि तत्संबंधी हि : शास्त्रे जें कां ॥ १ ॥ अवघेंचि तें असो आतां : कैंची हे लौकिकी कथा ॥ तुझे पाइ भजतां : विरुद्ध नाहिं सर्वत्रहि ॥ २ ॥ अगा सांडावया तुझे पाये : ऐसी स्त्री कोण पां आहे ॥ पूर्वपुण्य साह्य होये : तरिच पाविजेती ॥ ३ ॥ ऐसें धरुनियां मनिं : त्या कृष्णासक्ता कामिनी ॥ उत्तरश्लोकें करुनि : बोलती ते आइकावें ॥ ४ ॥

**का स्त्र्यंग ते कलपदायतवेणुगीत**
**संमोहितार्यचरितान्न चलेत्त्रिलोक्याम् ॥**
**त्रैलोक्यसौभगमिदं च निरीक्ष्य रूपं**
**यद्गोद्विजद्रुममृगाः पुलकान्यबिभ्रन् ॥ ४० ॥**

अंग ऐसे बोलोन : केलें कृष्णाचें संबोधन ॥ अगा ये कृष्णा म्हणोन : सन्मुखीकरण जें काहिं ॥ ५ ॥ कृष्णा तुझें जें वेणुगीत : मधुरपदामृतें

युक्त ॥ श्रवणमात्रें सर्वांगतृ(तृ)प्त : सकळातें जें करितें ॥६॥ असो हें वेणुवादन : पदोपदिं तेथुनि अमृतकण ॥ स्त्रवती तेणें श्रवण : सर्वांगें तृप्त होति ॥ ७ ॥ सांडुनि सर्व तापातें : तुझा ठाइं निक्षेपती चित्तें ॥ तुझ्या वांचुनि आणिकांतें : चिंतितीना गा ॥ ८ ॥ नाना या वेणुगीतामृतें : निर्दोषें होतां चित्तें ॥ वितृष्णें होत्साति शांतीतें : स्त्रीकरुनि असती ॥ ९ ॥ यावेणुगीतें मोहितमती : त्रैलोक्यांत कोण पां सती ॥ उक्तधर्मातें उल्लंघिती : नसेल कृष्णा ॥ १० ॥ त्या वृद्ध धर्मापासुन : कैसी न पावे चळण ॥ असो स्वधर्माचें उल्लंघन : कोण पां न करि ॥ ११ ॥ अगा जे गृहासक्तमति : त्यांतें जे बोलिले असती ॥ यथेष्टाचाराची निवृत्ति : सूचक धर्म ॥ १२ ॥ नातरि तुझापाईं नसोन : विषयतत्पर ज्यांचें मन ॥ सदां करुनि वणवण : भलतेंचि करि ॥ १३ ॥ त्या अविचाराचेनि पंथे : नेउनि पाडी मोहगर्ते ॥ अनेक जन्माचिं शतें : प्राणियातें शीणवी ॥ १४ ॥ त्या विषयासक्तांप्रति : अधर्म निवारणा श्रुति ॥ स्वधर्मातें उपदेशिती : हितकारक ज्या ॥ १५ ॥ मग उक्तधर्मेंकरुन : मन जाल्यां पापशून्य ॥ विषयाभिलाप सरोन : आठवसि तुं गा ॥ १६ ॥ तुझा गुणश्रवणस्मरणिं : सदां राहे विनटोनि ॥ न रुचे तुजवांचुनि : आणिक विषयजात ॥ १७ ॥ मग कैंसे तें भागुतें : सांडुनि सुखरुपा तुतें ॥ प्रवर्तोनि प्रवृत्तिपंथें : दुःखार्णविं पडले कां ॥ १८ ॥ ह्मणोनि कोण पां असे सती : जे न्मोवली या कलगीतिं ॥ आणि हे जे रमणमूर्ति : तुझी गा कृष्णा ॥ १९ ॥ असो जें अतिशोभासंपन्न : सर्व सौष्ठव्याचें सदन : रूप हें जें रमण : त्रैलोक्यसुन्दर तुझें ॥ २० ॥ जया रुपातें देखोन : प्रेमप्लुत गोधनगण ॥ पुलकांकित असोन : प्रेमाश्रूतें स्त्रवतसे सदां ॥ २१ ॥ असो देखोनि हे मुर्ति : खगमृग हे मुढजाति ॥ तेहि स्वेदप्लुत होति : विसरोनि निजस्वभावा ॥ २२ ॥ नाना हे तों जंगमजन : असोत हे तत्परायण ॥ परि द्रुम हे अचळण : सदां स्तब्धस्वभाव जे ॥ २३ ॥ तेही या देखोनि रूपातें : धरिती स्वेदकणातें ॥ असो प्रेमप्लुत होत्साते : त्वपरायण असति ॥ २४ ॥ मां

आह्मीं तों स्त्रियाजाति : प्रस्तुत या मनुष्यव्यक्ति ॥ दृष्टश्रुत हे सुमुर्ति : आणि वेणुगीतामृत ॥ २५ ॥ कृष्णा कोण असे ऐसी : जे वश नव्हे दृष्टश्रुतामृतासि ॥ नहोनि तुझी दासी : विषयविषानें सेवी ॥ २६ ॥ असो त्या उक्तधर्मापासुन : कोण न पावे चळन ॥ तुझे पाईं लीन जालें मन : तें जाईल कोठें कृष्णा ॥२७॥ अगा हे वृक्षपशुप्राणी : निजस्वभावातें सांडुनि ॥ राहिलें अनुष्ठुनि : भक्तिधर्मातें कैसें ॥ २८ ॥ मां आम्ही तों मनुष्यजाति : पावोनि हे संपत्ति ॥ तेथें प्राकृत धर्म आवडति : हें काय घडे ॥२९॥ एवं संसारातें त्रासोनि : तव गुणासक्त प्राणी ॥ श्रवणमननें करुनि : पावले जे अधिकार ॥३०॥ त्यांसि जे निजविहित : जऱ्हि जालें शास्त्रोक्त ॥ तथापि तेंचि प्रस्तुत : प्रतिकुळत्वें गमलें ॥ ३१ ॥ न होनि कर्मि सादर : नव्हती ते विधिकिंकर ॥ मां साक्षात् तुं शामसुंदर : आंतुडलासि किं ॥ ३२ ॥ आतां आम्हासि पाहिं : करणीय उरलें काये ॥ रति जाली तुझा पाइं : आनिक काहिं नावडे ॥३३॥ सांडुनि निजाचार : अगा आवडते विषयांतर ॥ तरि घडतें परद्वार : स्वपतित्यागें करुन ॥ ३४ ॥ तो त्याग विरुद्ध होता : प्रत्यवायातें उपजविता ॥ म्हणोनि आम्ही त्यक्तास्था : श[illegible] तुजला ॥ ३५ ॥ प्रभो तुजवीण पाहिं : त्या ग्राम्यधर्मि चाड नाहिं ॥ आणि तत्संबंधी जे काहिं : कर्तव्य स्वधर्म ॥ ३६ ॥ आम्ही न होनि तत्परा : तुजचि आराधुं श्रीधरा ॥ ऐसें त्या व्रज सुंदरा : स भिप्राय उक्ति ॥ ३७ ॥ बोलिलिया हृद्गत : तेंचि करावया निश्चित ॥ मागुती ते गोपीजात : वदतसे कृष्णेंसि ॥ ३८ ॥ आणि कृष्णा तुझा पाइं : प्राकृत बुद्धि नाहिं ॥ ऐसाही काहिं गोपिकाहिं : दाविला निश्चयो ॥ ३९ ॥

**व्यक्तं भवान्व्रजभयार्तिहरोभिजातो**
**देवो यथादिपुरुषः सुरलोकगोप्ता ॥**
**तन्नो निधेहि करपंकजमार्तबंधो**
**तप्तस्तनेषु च शिरःसु च किंकरीणाम् ॥ ४१ ॥**

व्यक्त ऐसें बोलोनी : दाविली निश्चयाची खुण ॥ जें तुं नव्हेसि प्राकृत जन : संदेह नाहिं कृष्णा ॥ ४० ॥ नंदकुमारत्वाकार : साक्षात् व्रजभयार्तिहर ॥

शामसुंदर मनोहर : प्रकटलासि जो येथें ॥ ४१ जेवि तो ब्रह्मेशाचा पति : पुराणें ज्याति गाति ॥ आदिपुरुष ऐसी ख्याति : सुरसाह्यें कर्ता जो ॥४२॥ मायेतें अधिष्ठुन : जो किंलीलावतरण ॥ प्रगटोनि अमरगण : रक्षित असे स्वपक्षपातें ॥ ४२ ॥ लपउनि निर्गुणता : स्वयें होय सुरगोप्ता॥ तेवि तुं व्रज भयार्तिहर्ता : अवतरलासि येथें ॥४४॥ घेउनि नंदसुतत्वाचि बुंथि : फेडावया स्वजनार्ति ॥ स्वता येथें श्रीपति : अवतरला असे ॥४५॥ हें जाणोन हिं तिहिं : विशेषें प्रकटिलें नाहिं ॥ स्वचनामात्र काहिं : दाविला संकेत ऐसा ॥ ४६ ॥ न करिती उच्छृंखळता : नोव्हत होउनि शंकिता ॥ जाणितलें जे हा सुरगोप्ता : आदि-पुरुष ॥ ४७ ॥ तरिहि व्यवहारपंथें : योजिलें दृष्टांतें ॥ तुं आदिपुरुष ऐसि कृष्णातें : जाणवणी केली ॥ ४८ ॥ कृष्णा तुं स्वजनार्तिहंता : सदां जो निधगोप्ता ॥ आह्मा दीना अनाथा : नुपेक्षिं कृपाळुवा ॥ ४९ ॥ असो असी हे कथा : प्रस्तुत व्रजजनार्तिहर्ता ॥ आमुची हरावया व्यथा : अवतरलासि तुं ॥ ५० ॥ अगा तुजवांचुनि येथें : शरण जावें कवणातें ॥ या लागि तुंवि आमुतें : अभये देईं श्रीकृष्णा ॥ ५१ ॥ या वेथेतें शमवितें : ऐसें कोण आहे गा एथें ॥ राखें आह्मा किंकरितें : नुपेक्षि सहसा तुं ॥५२॥ श्रीकृष्णा करुणासिंधु : अगा ये स्वजनार्तबंधु ॥ आह्मी शरणागता वधु : किंकरी तुझ्या ॥५३॥ आमुचा हृदयप्रदेशिं : हात ठेविं गा सुखराशि ॥ असो स्पर्शी या हृदयासि : निज करकमळें ॥ ५४ ॥ या वियोगदावानळिं : हारपतें जें जळिं ॥ तें निजकरस्पर्शजळिं : निमज्जवि आजि कृष्णा ॥५५॥ एणें आम्हीं संतप्तमना : त्वद्विरहपीडितमना ॥ आतां निवविं आर्तिहरणा : करस्पर्शें करिं ॥ ५६ ॥ हे आमुची विनती : आली जरि तुझा चित्तिं ॥ तरि करस्पर्शें विश्रांति : द्यावी आमुतें श्रीकृष्णा ॥ ५७ ॥ असो तुं आर्ति-हरण : हें जरि असे साच वचन ॥ तरि या दुःखार्णवापासुन : हात देउनि काढिं ॥ ५८ आतां तुं या व्रजाचा गोप्ता : जरि दीनाचा आर्तिहर्ता ॥ तरि आमुच माथा : निजकरांनें झांकिं गा ॥ ५९ ॥ असो आमुच्या शिरावरि : स्वहस्त ठेविसी जरि ॥ तरि आम्हासि अंतरिं : उपजेल धीर गा आतां ॥६०॥

अगा या मस्तकाचा ठाईं : हात ठेउनि धीर देईं ॥ अन्यथा आम्हासि कायि : वांचावया उपाय असे ॥ ६१ ॥ एवं यथोक्त निरूपण : रायाप्रति व्यास-नन्दन ॥ करुनि तेंचि उपसंहरण : कातिाति तें आइका ॥ ६२ ॥

॥ श्रीशुक उवाच ॥

**इति विक्लवितं तासाम् श्रुत्वा योगेश्वरेश्वरः**
**प्रहस्य सदयं गोपीरात्मारामोऽप्यरीरमत् ॥ ४२ ॥**

त्या ज्या पूर्वोक्ता रीति : गोपकांता कृष्णाप्रति ॥ येउनि नाना उपपत्ति : बोलिल्या ज्या कांहिं ॥ ६३ ॥ असो जया उक्तिकरुन : श्रीकृष्ण होय प्रसन्न ॥ तयाचें दयाळुपण : प्रकटे जेगें ॥ ६४ ॥ ऐसी दाउनि ग्लानि : बोलिल्या त्या व्रजभामिनी ॥ मग त्यांचया आइकोनि : विक्लवितां वाक्यातें ॥६५॥ तो गोपीजनआर्तिहर्ता : श्रीकृष्ण लक्ष्मीभर्ता ॥ नावेक हांसत होंतसाता : सदयते करुन ॥ ६६ ॥ साक्षात् आत्माराम : सर्वदा निरस्तकाम ॥ ज्याचा ठाइं हा द्वैतभ्रम : निःशेष असेना ॥ ६७ ॥ म्हणोनि जयाचा ठाइं : विशेष सुखाची वार्ता नाहिं ॥ ज्यासि आत्म्येवीण काहिं : प्रिय नसे दुजें ॥ ६८ ॥ तर्हि पावोनि सदयतेतें : निजलीलेचेनि पंथें ॥ गोपींची आर्ति शमार्थें : क्रीडता जाला ॥ ६९ ॥ म्हणाल त्या निष्क्रियाचा ठाइं : क्रियेसि अवसर नाहिं ॥ हे क्रीडा काइ : विरुद्ध नाहिं तयासि ॥ ७० ॥ असो आत्मा-रामहिं जाला : तर्हि येणें विकार आला ॥ निष्काम असोनि रतला : त्यांसि कैसा ॥ ७१ ॥ ऐसें शकिंजेल काहिं : तरि हें इश्वरिं विरुद्ध नाहिं ॥ तुम्हासि गमला कायि : प्राकृत कृष्ण हा ॥ ७२ ॥ प्रस्तुत नन्दकुमार : परि योगीश्वराचा इश्वर ॥ येथें जो काहिं प्रचार : योगमायाविलसित ॥ ७३ ॥ येथें साधारण जन : वर्तति मायानिबंधन ॥ तैसा नव्हे हा श्रीकृष्ण : जो योगीश्वरांचा ईश्वर ॥ ७४ ॥ कृष्णमायाविलासित : अवघें हें प्रपंचजात ॥ त्याहि माजि विशेषार्थ : सूचिला येथें जो काहिं ॥ ७५ ॥ हा षड्गुणैश्वर्य-सम्पन्न : स्वेच्छावतरण ॥ साक्षात् शरणार्तिहरण : सच्चिदानन्दविग्रह ॥७६॥ विशेष शक्ती करुन ; रंजविला तो गोपीजन ॥ स्वता तो क्रियाशून्य :

सविग्रह होतसाता ॥ ७७ ॥ असो शरीरेंकरिं पाहिं : क्रियापर जाला नाहिं : व्यापारुचि काहिं : सम्भवला नाहिं किं जेथें ॥ ७८ ॥ आतां जें काहिं क्रीडला : तो गोपिकातें अनुभव जाला ॥ ऐसी काहिं कळा : अधिष्ठिली कृष्णें ॥ ७९ ॥ ह्मणोनि जर्‍हिं हा आकार : तर्‍हिं योगेश्वरेश्वर ॥ सविग्रहि तर्‍हि विकार : उपजला नाहिं जेथें ॥ ८० ॥ निरस्तअविद्याबन्धन : जे कोण्हि योगीजन ॥ या विशेष शक्तीचें आपादन : त्याचा ठाईं नसे ॥ ८१ ॥ ह्मणोनि हा नन्दकुमार : योगेश्वरांचा ईश्वर ॥ न होनि क्रियापर : सम्पादिलें रासविहारातें ॥ ८२ ॥ एवं तो निरस्तकाम : स्वता जर्‍हि आत्माराम ॥ अधिष्ठुनि मायाधर्म : क्रीडता जाला ॥ ८३ ॥ नातरि तो निरस्तमायाधर्म : सकळसुखैकधाम ॥ तर्‍हि निजशरणाचा काम : हरणें उचित ॥ ८४ ॥ जेवि कोण्हि योगीजन : असंगोदासीन ॥ कार्यसहवर्तमान : मायानिरस्त जे सर्वदा ॥ ८५ ॥ त्यांसि साधनसम्पन्न : मुमुक्षु जे येती शरण ॥ त्यांचे करुणेस्तव आपण : तिहिंसि वर्तति ॥ ८६ ॥ अविद्येचे निवृत्ति : निवर्तली उपदेशप्रवृत्ति ॥ श्रवणादि उपपत्ति : बोधिल्या जर्‍हिं कांहिं ॥ ८७ ॥ तर्‍हि उपदेशादिकें करुन : तारावे मुमुक्षुजन ॥ हा त्यांचा सनातन : स्वभाव उरला ॥ ८८ तेणे स्वभावें करुन : मुमुक्षुसहवर्तमान ॥ शास्त्रादि आलोचन : करिती योगी जेवि ॥ ८९ ॥ तेवि आत्माराम कृष्ण : निजशरणातें लक्षुन ॥ अचिंत्य शक्ती करुन : क्रीडता जाला जो ॥ ९० ॥ आतां त्या क्रीडेचें लक्षण : उत्तरग्रंथें करुन ॥ रायाप्रति व्यासनन्दन : करिती तें आइका ॥ ९१ ॥

**ताभिः समेताभिरुदारचेष्टितः**
**प्रियेक्षणोत्फुल्लमुखीभिरच्युतः ॥**
**उदारहासद्विजकुंददीधिति**
**र्व्यरोचतैणांक इवोडुभिर्वृतः ॥ ४३ ॥**

जो पूर्वोक्त प्रकारा : वर्णिल्या व्रजसुंदरा ॥ अधिष्ठुनि नंदकुमारा : गृहादि त्यागें आलिया ॥ ९२ ॥ ज्या सर्वांही येकचित्ता : असल्या जाल्या समवेता ॥

तुल्यविषया समस्ता : कृष्णपरा ज्या ॥ ९३ ॥ अहो जंवरि विपर्यि विषय-बुद्धि : तंवरि भेदाची सिद्धि ॥ परंतु या विषयांची अवधि : आत्मा कृष्ण ॥ ९४ ॥ असो तिहिं परिवारला : अति शोभता जाला ॥ न तरि वृत्ति-निरोधें प्रगटला : वेदांतवेद्य श्रीकृष्ण ॥ ९५ ॥ जेवि प्रगटतां बोध-स्थिति : श्रवणादि सार्थें होति ॥ किंवा श्रवणादि संपति : बोधासि चढे ॥ ९६ ॥ तेवींचि जालें येथें : सार्थें करुनि गोपीशतें ॥ तिहिंसि आपण तेथें : बहु शोभला श्रीकृष्ण ॥९७॥ नाना त्या निजकळा कामिनी : विरोधातें सांडुनि : सर्वाहीं येकत्रादुनि : कृष्णाजवळि आल्या ॥९८॥ मग अनुग्रहुनि त्यांतें : तयांचेनि अनुमतें ॥ शोभत होंत्साता तेथें : रंजविल्या गोपिका ॥ ९९ ॥ तो श्रीकृष्ण किलक्षण : तरि अति उदाराचरण ॥ ज्या आचरणें स्वगुण : प्रकटिले अपूर्व ॥१००॥ एवं तो रमाभर्ता : तिहिंसि रमत होंत्साता ॥ आपुलिया उदारचेष्टिता : प्रकाशिता जाला ॥१॥ या गुणश्रवणा-चेनि पंथें : आकर्षोनि भक्तचित्तें ॥ नाशोनि तद्दुरितें : तारिजेते भक्त ॥ २ ॥ ह्मणोनि उदार चेष्टित : केला श्रीकृष्णाचा संकेत ॥ गुण ज्याचे अद्भुत : पापताप-हरितें ॥३॥ आणिकही विशेषण : अच्युत ऐसी जाली खुण ॥ काळत्रयिं महि-मान : भंगेना ज्याचें ॥ ४ ॥ अनुसरोनि विहारातें : कर्में करितांहि अत्य-द्भुतें ॥ अणुमात्र जयातें : स्पर्शेना कर्मलेश ॥ ५ ॥ आणि सम्भोगितां गोपीशतें : धरुनि तितुकिया स्वरूपातें ॥ सांते करूनि रेतस्रावितें : स्वता अच्यवितवीर्य जो ॥ ६ ॥ एवं कृष्ण उदारगुण : जो अप्रतिहतमहिमान ॥ अच्युत ऐसें विशेषण : यास्तव घडलें हें ॥ ७ ॥ असो काळत्रयिं अकर्ता : परि विश्वाचा कर्ता हर्ता ॥ न भंगोनि ऐक्यता : विलासमात्र हा ॥ ८ ॥ नातरि प्रस्तुत येथें : गोपिकांचेनि सांगातें ॥ क्रीडतां कंदर्पशतें : जिंकिले येणें अनायासें ॥ ९ ॥ ह्मणोनि श्रीकृष्ण अच्युत : दाविला ऐसा संकेत ॥ तो व्रजवासिनीसमवेत : अति शोभता जाला ॥ १० ॥ तिये क्रीडतिये वेळे : उदार हांस्य जें काहिं केलें ॥ तया हसितें शोभविलें : गोपीमंडळ अवघें ॥ ११ ॥ जे काहिं अपुर्व हांस्यरीति : तेणे प्रकाशली दंतपंक्ति ॥ एक-

वाटले ते दीप्ति : हांस्याचि आणि दंतांचि ॥ १२ ॥ ते दीप्ति कुंदासमान : जैसें शुभ्र सतेज नळिन ॥ तेवि विकासितास्मितानन : अत्यंत शोभला ॥ १३ ॥ श्रीकृष्णतेज बहळ : तेथें उपमा तितुकी विफळ ॥ परि येक-देशें सफळ : काहिं एक जाली ॥ १४ ॥ एवं क्रीडतां उदारस्थिति : सहास्य दंतादिप्ति ॥ विकसली ते कैंसि किति : वर्णावि शोभा ॥ १५ ॥ तो निजशोभाशोभित : त्या व्रजनारिसमवेत ॥ शोभला गोपीनाथ : कळावंत कृष्ण ॥१६॥ आतां व्रजनारी किंलक्षणा : तरि त्या उत्फुल्लवदना ॥ अवलोकितां यदुराणा : विकसितमुखा ॥१७॥ असो तो नंदानंदन : सकळ प्रियाचें अवसान ॥ निजाप्रियमनोरमण : पाहातियां विश्रांति ॥ १८ ॥ त्यातें तिहिं अवलोकुनि : नेत्रद्वारें करुनि ॥ प्राशुनि हृदयभुवनिं : बैसविला सुखाडें ॥ १९ ॥ तेणें वियोगतापातें : सांडुनि कृष्णें हृदिस्थें ॥ विसर्जुनि ग्लानितें : विकसितमुखा जाल्या ॥ २० ॥ नातरि निर्धारावया त्यांतें : गमन सूचिलें होतें ॥ पावोनि ग्लानीतें : विमनस्का होत्या ॥ २१ ॥ मग कृष्णें जें हास्य केलें : तेंचि अनुमोदन जालें ॥ तेणें तिहिं लक्षिलें : जे प्रसन्न जाला कृष्ण ॥ २२ तेणें दुर्मनस्कता गेली : वदनें विकासितें जालिं ॥ श्रीकृष्णें कृपा केली : हें जाणितले तिहिं ॥ २३ ॥ तेणे त्या विकसिताननाा-सर्वाहि गोपांगना ॥ तिहिंसि यदुराणा : शोभता जाला अतिशयें ॥ २४ ॥ जे पूर्वि उपदेशपरें : वाक्यें भासलीं कठोरें ॥ परि तेणें त्यांचिं अंतरें : शोधिलिं श्रीकृष्णें ॥ २५ ॥ जेवि कोण्हि मुमुक्षुजन : परिग्रहातें सांडुन ॥ आले त्यांतें सज्जन : सारवेत्ते आत्मानिष्ठ जे ॥ २६ ॥ ते त्यांची जाणावया मति : कर्मशास्त्रें प्रशंसिती ॥ उत्सुकतेतें शमविती : कर्म होय कां बोलिले काळिं ॥ २७ ॥ त्यांची मति निर्धारुन : तयांते असोनि प्रसंन्न ॥ तदभिप्रा-यातें अनुसरोन : सिद्धांतिं प्रवर्तति ॥ २८ ॥ तेवि सांडुनि उत्सुकता : गोपी जाल्या समचित्ता ॥ अधिष्ठिला विश्वभर्ता : नंदानंदन जो श्रीकृष्ण ॥ २९ ॥ जाणोनि त्यांची रिथर मति : तो नंदानंदन श्रीपति ॥ वश होउनि तयांप्रति : शोभताजाला तिहिंसि ॥ ३० ॥ जेवि तो नक्षत्रमणि : आपुले जोत्स्ने

करुनि ॥ सर्वा नक्षत्रातें शोभउनि : तिहिंसिं स्वयें शोभे ॥ ३१ ॥ असो नक्षत्रिं परिवृत : स्वता शोभे नक्षत्रनाथ ॥ तेविं गोपिकांसमवेत : गोपीपति शोभला ॥३२॥ नाना निजशोभे करुन : शोभउनि गोपीगण ॥ मग तिहिंसिं परिवारुन : आपणहि शोभला ॥३३॥ जेवि निज विलासें करुन : प्रकाशिलें प्रपंचभान ॥ त्याचि संबंधें साधन : शास्त्ररचना ॥३४॥ तया शास्त्रादिमिषें : शोभिजेतें स्वता शास्त्रें ॥ असो शास्त्रादिकिं जो असे : प्रतिपाद्य अर्थ ॥३५॥ तो शास्त्रप्रतिपाद्य अर्थ : मिरवे शास्त्रादिकिं समवेत ॥ तेवि तो गोपीनाथ : तिहिंसि मिरवला ॥ ३६ ॥ तिये शोभेचें लक्षण : विशेषणांतरिं करुन ॥ आइक राया सावधान : वर्णिजेतें तेंहिं ॥ ३७ ॥

> उपगीयमान उद्गायन्वनिताशतयूथपः ॥
> मालां बिभ्रद्वैजयंतीं व्यचरन्मंडयन्वनम् ॥ ४४ ॥
> नद्याः पुलिनमाविश्य गोपीभिर्हिमवालुकम् ॥
> रेमे तत्तरलानंदकुमुदामोदवायुना ॥ ४५ ॥

तो नंदानंदन श्रीकृष्ण : समस्तसदुपगीयमान ॥ ब्रह्मादि जे सुरगण : महन्महिमानवंत ॥ ३८ ॥ ते निजकल्याणातें इच्छुन : सदा ज्याचे वर्णिती गुण ॥ वाचा करिती पावन : गुणकथाप्रसंगें ॥ ३९ ॥ असो या जनाचा ठायिं : मुक्त मुमुक्षु आणि विषयी ॥ ऐसे जे असती तिहिं : उपगीयमानगुण जो ॥ ४० ॥ त्यामाजि मुक्त जे कोण्हि होती : ते वर्णुनि जयाची कीर्ति ॥ प्रारब्धातें क्षपिति : अलिप्त होत्साते ॥ ४१ ॥ ऐसें जरि न करिते : भगवंतातें न स्मरिते ॥ हा देहाभासु न करिते : भगवत्सेवोपयोगी ॥ ४२ ॥ तरि होउनि मुक्त मानी : पडती कर्मादि कर्मणि ॥ पूज्यमानादि अभिमानि : नाशिती कृताश्रमातें ॥४३॥ याकारणें यावद्देहावसान : त्यांसि हीं उपगीयमान ॥ असेनि वितृष्णपरायण : काळातें क्षपिती ॥ ४४ ॥ आणि जे मुमुक्षुजन : ज्यांसि संसारिं दोषदर्शन ॥ या भवार्णवापासुन : जे तरों इच्छिती ॥ ४५ ॥ त्यांसिही हाचि मुख्य उपाय : सदा भगवंतुचि सेव्य ॥ सर्व प्रकारें सेवनीय : भगवंतुचि सर्वस्वत्यागें ॥ ४६ ॥ आणि संसारी जे जन :





सदा विषयासक्तमन ॥ त्यांसिहि भगवत्गुणकथन : क्रमेंचि तारि ॥ ४६ ॥
अनुक्रमाचिये रीति : तेही दुर्गतापासुनि तरति ॥ एवं सर्वांसि गेय होति :
श्रीकृष्णाचे गुण ॥ ४८ ॥तो हा सर्वोपगीयमान : स्वताही कारितसे गायन :
नाना रसातें अधिष्ठुन : विचित्र स्वरभेदें ॥ ४९ ॥ आणि वनिताशतयूथ :
ह्मणिजे त्या मिळोनि समस्त ॥ श्रीकृष्णेसिं आवृत : वानिताचि मंडळी तया
॥५० ॥ अनेकशतें वनिताजन : तयातें संरक्षुन ॥ विचरता जाला म्हणोन :
वनिताशतयूथप कृष्ण ॥ ५१ ॥ असो तो गोपीशत गणपती : माळा
जे वैजयंती ॥ तितें गळां धरुनि स्वगति : वनातें शोभविता ॥ ५२ ॥
मग तो नदीपुलिनातें : प्रवेशोनि गोपीशतें ॥ सहित श्रीकृष्ण तेथें : रमता
जाला तो ॥५३॥ आतां यमुनेचें पुलिन : ह्मणसी किंलक्षण ॥ जया तीरातें
प्रवेशोन : रमला श्रीकृष्ण ॥ ५४ ॥ तरि जेथिचे वाळुकण : चंद्रकिरणी
स्पर्शोन ॥ अति सीतळ असोन : सुखकर जाले ॥ ५५ ॥ अथवा गोपीतें
लक्षुन : प्रसन्नामृतदृष्टी करुन ॥ त्या वाळुवंटिं सीतळ गुण : उपजविला
जो ॥५६॥ नातरि निजवियोगाग्नि : पीडल्या होत्साल्या कामिनी ॥ तत्सुखातें
विचारुनि : संपादिलें जें ऐसें ॥५७॥ ह्मणोनि हिमवाळुक जाण : यमुनातीराचें
विशेषण ॥ त्या वाळुवंटिं श्रीकृष्ण : गोपींसि रमला ॥ ५८ ॥ प्रकटउनि
नाना कळा : गोपिकांसि रमता जाला ॥ तो कंजनेत्र घनसावळा : त्या
यमुनातीरिं ॥ ५९ ॥ तया क्रीडेचें लक्षण : तरि तेथें जे कुमुदवन ॥ तें
कमळें विकसोन : प्रकटला जो सुगंध ॥ ६० ॥ तेणेंसिं युक्त समीर : जो
निजस्वभावें सदांचर ॥ नव्हे तीव्र ना अस्थिर : अति मंद जो ॥ ६१ ॥
एवं इत्यादि लक्षण : मंदसुगंध सतिळगुण ॥ जो नदीसंबंधी पवन : आनं-
दातें कर्ता ॥ ६२ ॥ त्या सुवायुतें अधिष्ठुन : गोपी सहवर्तमान ॥ रमता
जाला रमारमण : पवनसुखें तेथें ॥ ६३ ॥ येणे ऐसें सुचिलें काहिं : जें
स्वता कर्तव्य नाहिं ॥ आपणेंवीण काळत्रयिं : दुसरें नसे ॥ ६४ ॥ आतां
अनादि आभासें : आपुलेचि आवडिवशें ॥ हे जें विलासले असे : भज्य-
भजनरूप ॥ ६५ ॥ तऱ्हीं अचिंत्य शक्तीकरुन : असोनि उदासीन ॥

काहिं एक उपकरण : संपादूनि आपण ॥ ६६ ॥ न लोपोनि निजदृष्टि : भज्यभजन स्वचेष्टि ॥ वागवीत असे सृष्टि : स्थित्युद्भवलयेंनि ॥ ६७ ॥ तैसेंचि पत्रनादिलक्षग : मायेतें अविष्टुन ॥ रमता जाला रमारमण : गोपिका वृंदेसिं ॥ ६८ ॥ नातरि त्या गोपीसती : स्वतत्परा समस्ता श्रुती ॥ त्या नानारसें भजती : भगवंती सर्वा ॥ ६९ ॥ म्हणोनि युक्ती करुन : मतांतरातें खंडुन ॥ भजता जाला गोपीजन : भगवंतें अवश्य ॥ ७० ॥ तयातें अनुलक्षिती : भगवंताचे गुण गाती ॥ आपणहि निजकीर्ति : वर्णिता जाला तो ॥ ७१ ॥ कीं त्रा स्वता करी गायन :गोपीतें निजगुण ॥ शीक्षीत होतसाता पुलिन : नदीचें प्रवेशला ॥ ७२ ॥ नातरि तीराचि आकृति : आश्रिलि चतुर्थी भक्ती ॥ ज्या भक्तीनें आश्रिती : देवातें भक्त ॥ ७३ ॥ तिये भक्तीतें अविष्टुन : गोपीकां सहवर्तमान ॥ रमता जाला रमारमण : स्वच्छंदविहारी ॥ ७४ ॥ आतां त्या क्रीडेचें लक्षग : प्रकारांतरेंकरुन ॥ आइक राया सावधान : वर्णिजेतें जें काहिं ॥ ७५ ॥

> **बाहुप्रसारपरिरंभकरालकोरु-**
> **नीवीस्तनालभननर्मनखाग्रपातैः ॥**
> **क्ष्वेल्यावलोकहसितैर्व्रजसुंदरीणा-**
> **मुत्तंभयन्रतिपतिं रमयांचकार ॥ ४६ ॥**

पूर्वोक्ता ज्या सुंदरी : कृष्णशरणा व्रजनारी ॥ ज्या सर्व सांडुनि किंकरी : होउनि निकट आल्या ॥ ७६ ॥ तयातें रमारमण : प्रस्तुत जो नंदानंदन ॥ रमविता जाला तें सविशेषण : आइकावें संति ॥ ७७ ॥ त्या व्रजसुंदरींचें मन : विषयभूमीपासुन ॥ आवरुनि समाधान : आपुलिया रुपीं पावावें ॥ ७८ ॥ या अर्थातें उद्देशुन : केलें निजबाहुप्रसारण ॥ किंवा स्वबाहुकरुन : बाहुप्रसारण त्याचें ॥ ७९ ॥ आणि तो नित्य हृदयवासी : परि जाणोनि प्रसंगासि ॥ हृदय लाउनि उरेंसि : आलिंगन जें ॥ ८० ॥ नाना त्याचे तदासक्त मन : हृदये गेलें विरोन ॥ तेंचि महदालिंगन : त्यांसि कृष्णरुपि जालें ॥ ८१ ॥ आणि प्रेरावया धीर : हस्तें धरुनि त्यांचे कर ॥ केलें त्यां सर्वांचें अंतर :



आपणासवतें किं ॥८२॥ नातरि तें पाणिग्रहण : असंभावनानिवारण ॥ आह्मी कृष्णाच्या हें त्यालागुन : उपजविली निष्ठा ॥ ८३ ॥ एवं आलंभनसंज्ञ : केलें करें करस्पर्शन ॥ सर्वेचि अलक शब्दें करुन : केश जे त्यांचे ॥ ८४ ॥ तयां केशाचा ठाइं : धरिलें त्यांतें जैसें काहिं ॥ आणि उरुयुगलें पाहिं : जघनप्रदेश किं ॥ ८५ ॥ असो तो जो गुह्यप्रदेश : तेथेंहिं केला प्रवेश ॥ जेवि श्रवणारंभि उद्देश : फळाचा कीजे ॥ ८६ ॥असो सत्यानंदादि वाक्यें : वदोनि वेदांतवाचकें ॥ मुमुक्षुतें श्रवणादिकें : उपदेशिती गुरु ॥ ८७ ॥ तेविं जघनातें धरून : आरंभिलें संभोगलक्षण ॥ जाले जे निजशरण : त्यासि सुखार्थ ॥ ८८ ॥ आणि नीवीशब्दें करुन : वस्त्र जें केलें परिधान ॥ तत्प्रांत एकवटुन : मुद्राबंध जो ॥ ८९ ॥ त्यांतेंहिं सोडुन : गुह्ये केले निरावरण ॥ तोडिजे अविद्या साधरण : स्वरुपनिष्ठें जेविं ॥ ९० ॥ तेवि धरुनि जघनातें : सोडिलें वस्त्रग्रंथीतें ॥ स्वसंभोगिं त्यांतें : उत्कंठा जे होती ॥ ९१ ॥ उत्सुकतेचें निवारण : केलें वस्त्रगंथीतें सोडुन ॥ मग केलें अवलंबन : स्तनाचा ठाईं ॥ ९२ ॥ त्या कुचग्रहणें त्यांतें : सूचिलें अंत:प्रवेशातें ॥ जयानिमितें त्यातें : चिंतत होत्या ॥ ९३ ॥ तें ध्यान व्हावया सफळ : आजि हा प्राप्त काळ ॥ एवं मर्दूनि कुचयुगळ : दाविलें ऐसें ॥ ९४ ॥ निज कराब्जें करुन : जघनस्तनातें धरुन ॥ भोगारंभें तो गोपीजन : निजसुखार्ह केला ॥ ९५ ॥ आणि नर्मशब्दें करुन : केलें विनोदाचरण ॥ मधुर वचनें वदोन : निजप्रेमाप्लुत ठेला ॥ ९६ ॥ करादि इंद्रियें स्पर्शोन : दाविलें प्रसंन्न लक्षण ॥ त्याचेंचि साधन : दंतनखक्षतेंहिं केलें ॥ ९७ ॥ त्यांचिया मुखांस्तनातें : केलें जें दंतनखक्षतें ॥ तेणें तें कामिनीशतें : निजमुद्रांकित दाविलिं ॥ ९८ ॥ येणें जाणविलें त्यांसि : किं यावरि तुह्मी निजदासी ॥ आतां मजवीण तुह्मांसि : भोक्ता नाहिं ॥ ९९ ॥ जेवि कोण्हि भगवद्भक्त : शोभती चक्रशंखांकित ॥ तेवि दंतनखाग्रपात : नियतमुद्रा जाली ॥१२००॥ उराणि नर्मस्थानें सकळें : तेथेंहिं विनोदें स्पर्शिलें ॥ तेणेंहि त्यांसि जालें : कामोद्दीपन ॥ १ ॥ एवं बाहुप्रसारादि केलिं : तेणें स्वाधीनता सूचिलि ॥

आणि वचनें बोलिलिं : विनोदाकारें ॥ २ ॥ त्या विनोदार्थे गोपिकातें : निव-
विलें स्वभोगामृतें ॥ आणि वचनामृतें : अनुग्रहिलें कृष्णें ॥ ३ ॥ या विश्वा-
सासि साधन : शब्दचि असे प्रमाण ॥ कां जे वेदवाक्यें आश्वासन : मुमुक्षु
पावति ॥ ४ ॥येन्हवि कृष्णाप्रति : प्रत्यक्षादि प्रमाणें न सरति ॥ परि महा-
वाक्येंचि पावति : भगवंतिं भक्त ॥ ५ ॥ ह्मणोनि उपहास वचनें : वदोनि
गोपिंचिं मनें ॥ अपुला ठाईं श्रीकृष्णें : विश्वासिलिं पुर्ण ॥ ६ ॥ आणि
क्ष्वेलिशब्दें करुन : अङ्गक्रियाक्रीडन ॥ त्या गोपितें अनुसरोन : इतस्तता
वर्तने (णें) जें ॥ ७ ॥ असो नानारसकेली : जे गोपिंकासिं सम्पादिली ॥
सिंचोनि प्रेमाजाळें : खेळविल्या कृष्णें ॥ ८ ॥ आणि नेत्रकटाक्षपातें : अव-
लोकिलें जें त्यांतें ॥ तेणें भुलविलिं चित्तें : विसरल्या सर्वहि ॥ ९ ॥ पुर्व-
प्रवाहें साधारण : जातिवर्णआश्रमगुण ॥ तें न स्मरोनि निरंजन : कृष्णाचि
आवडला ॥ १० ॥ आणि यथेष्टक्रीडामेळें : ललित हास्य जें केलें ॥ तेणें
सर्व धवळलें : गोपिमण्डळ तें ॥ ११ ॥ नातरि त्या हास्यवेळें : लावण्या-
सिही शोभविलें ॥ आधिच सुनयन सावळें : मनोहर स्वरुप ॥ १२ ॥
त्याहीवरि केलें हास्यातें : तेणें मोहित सर्वचित्तें ॥ त्या गोपिकांचि शतें :
परमानन्दे श्रीकृष्णस्थें जालिं ॥ १३ ॥ नातरि कृष्णें हास्य केलें :
तेणें ऐसेंहिं जाणवलें ॥ जे निजमाया विलसलें : अवघेंहि विश्वजाळ॥ १४ ॥
त्यांमाजि हाहि विलास : केवढा वोडवला क्रीडारस ॥ अभेदिं जो
भेदाभास : या उद्रेकासि मूळ ॥ १५ ॥ माझा ठाइं अर्थशुन्य : असोनि
भासलें शोभन ॥ या निमित्तें रमारमण : हसितमुख जालें ॥ १६ ॥
नातरि नित्यप्राप्ति आपुली : ते अप्राप्तित्वें भासलि ॥ त्या शोभेसीचि आणिली:
विशेषें शोभा किं ॥ १७ ॥ ह्मणोनि हें हसित योजलें : तें गोपींसि योग्य
जालें ॥ विशेषें मन रंगलें : निजानन्दा कृष्णाचा ठायिं ॥ १८ ॥ एवं बाहु-
प्रसारादि युक्ति : रंजउनि व्रजसती ॥ तयाचा जो काहिं रतिपती : कंदर्प
जो मदन किं ॥१९॥ तयाचें उत्तंभन : ह्मणिजे कामोद्दीपन ॥ करि (त) होता
रममाण : कामजनक जो ॥२०॥ वश करुनि कंदर्पातें : त्यापासुनि गोपिकांतें ॥



सोडउनि विश्रांतीतें : पाववि‌लें श्रीकृष्णें ।। २१ ।। नातरि गोपीचा रतिपति : पाववया उपशांति ।। नावेक उत्तंभावाची रीती : दाविली सहज येथें ।।२२।। त्यासि पाववया पार : नावेक केला गोचर ।। शेखिं स्वसामर्थ्यें असार : केलें मदनातें ।।२३।। पाहातां वदनशोभा : लाजती कंदर्पसभा ।। स्वरूपें त्या निजत्र- लुभा : रमविल्या पैं ।। २४ ।। नातरि हें मिष करुन : मन्मथार्णवा पासुन ।। उतरउनि गोपीजन : निजवश केला ।। २५ ।। नातरि तो नव्हे रतिपती : केवळ भक्तप्रेमामूर्ति ।। प्रकटोनि त्या सति : कृपापात्र जाल्या ।।२६।। अथवा उथळोनि प्रेमा : कृष्णि मिळाल्या त्या रामा ।। भाग्यें सांडिली सीमा : गोपि- कांच्या ।। २७ ।। विचारितां योग्यता : त्या गृहमेधीनी समस्ता ।। स्वभावें कामरता : अंगना कामिनी ।। २८ ।। तो स्वता अमोघवीर्य : मैथुनकाळिं अश्रमधैर्य ।। न टळोनि ब्रह्मचर्य : रमविल्या गोपी ।। २९ ।। होउनि त्यां अधीन : वारंवार करी मैथुन ।। विलंबें पाववि सवन : त्यांसि बहुरुपें भिन्नभिन्न ।। ३० ।। त्या असोनि भोगतत्परा : जेव्हां इच्छिती यदुरवीरा ।। तेव्हांचि उठोनि त्वरा : प्रतिदिनिं मैथुन करि ।। ३१ ।। ऐसा त्यांसि वश होत्साता : रंजविल्या त्या वनिता ।। त्यांचे तो कर्म विचारितां :कामासक्ता सदां ।।३२।। याहीमाजि व्रजवासिनी : अनधीता कामचारिणि ।। जारभावें करुनि : आव- डला कृष्ण ।।३३।। इतुकिये आवडीसाठिं : श्रीकृष्णि पडली गांठि ।। आचरतां साधन कोटि : ब्रह्मादिकां जो अलभ्य ।। ३४ ।। त्या श्रीकृष्णें आत्मरता : गोपी त्याहुनि केल्या आप्ता ।। परि नवल जालें आतां : तेंहि आइका ।।३५।।

**एवं भगवतः कृष्णाल्लब्धमाना महात्मनः ॥**
**आत्मानं मेनिरे स्त्रीणां मानिन्योप्यधिकं भुवि ॥ ४७ ॥**

एवं याप्रकारें करुन : तो कृष्णासक्त गोपीगण ।। गृहसुतादि सांडुन : शरण आला जो।।३६।।तो श्रीकृष्ण (ष्णें) बहुं संभोगुन : केला जो सन्मान ।। तेणें आपणा लागुन : अतिधन्ये मानिलें ।। ३७ ।। कां जे आतां इये जनीं : स्त्रिया असती कोण्हि ।। त्यांमाजि कृष्णकामिनी : आम्हि अतिधन्या ।।३८।। अनो कोणीकडे हा स्त्रीगण : आह्मी अरण्यवासी जन ।। कोणीकडे श्रीकृष्ण

मंगळमूर्ति ॥ ३९ ॥ जयाची गुणसीमा : नेणोनि ठेला ब्रह्मा ॥ हा अलौकिककर्मा : वैकुंठपति ॥ ४० ॥ त्यासि मान्य जालों आता : हे असंभावित वार्ता ॥ आमुच्या भाग्याची कथा : वर्णील कवण ॥ ४१ ॥ हा असोनि कामपूर्ण : आमुतें यथेच्छा संभोगुन ॥ पाहा हो केव्हें सन्मानुन : निववि‌लें किति ॥ ४२ ॥ आमुचे प्राकृत पति : ते मुर्ख नेणती हे युक्ति ॥ आपणाचि मैथुनगति : स्खळती तत्काळ ॥ ४३ ॥ मग ते विकळस्थिति : मृतप्राय पसरति ॥ आह्मीं कामविव्हळ असतां सती : तप्तचित्ता सदां ॥४४॥ त्या आह्मी तप्तचित्ता : शरण आलों यासि आतां ॥ बहु काळ गेला स्मरतां : पावलों सकळा येथें ॥ ४५ ॥ मग अंगीकारुनि कृष्णनाथें : भोगरचनायुक्तिपंथे ॥ मैथुनेंकरिं आमुतें : रमविलें सदां ॥ ४६ ॥ पहा याचें शौर्य : स्वता अमोघवीर्य ॥ मैथुनसमरिं अति धैर्य : कामशत्रु पराभव करितां ॥ ४७ ॥ आमुसिं करितां मैथुन : स्वयें असोनि वीर्यसंपन्न ॥ विलंबें होतां स्खळण : सुख वाटे बहु ॥४८॥ जन्म शतार्जित पाप : स्मरोंनि जालों निःसंकल्प ॥ सांसारिक संताप : सरोनि गेला तत्काळ ॥ ४९ ॥ योगी जे कोण्हि होति : ते दुष्करें तपें आचरती ॥ तया योगियांसहि गति : दुःसाध्याचि असे ॥५०॥ ऐसें तो सुंदरीगण : आपणामाजि आपण ॥ पावोनि संभोगसन्मान : धन्यता पावला जगीं ॥५१॥ मानिती जें या जगिं विशेषें : आह्मा ऐसें कोण्हि नसे ॥ धन्यतमा सुरतसौरसें : कोण पां आहे ॥ ५२ ॥ येथें शब्द जो स्त्रीवाचक : तो सर्वजनसूचक ॥ एवं मानित्या सर्वाधिक : आपणातें गोपिका ॥५३॥ आतां जया कृष्णापासुन : गोपी पावलिया सन्मान ॥ तो कृष्ण किंविशेषण : तरि महात्मा हरि ॥५४॥ ह्मणिजे जो विमुक्तचित्त : सर्वचित्तस्वभावरहित ॥ असो हे क्षुद्र भाव वर्तत : जेथें नसताति ॥ ५५ ॥ असो हा मनोभावजन्य : संसार जो अर्थशून्य ॥ हें मायाकल्पितजघन्य : जेथें स्पर्शलेहि नसे ॥ ५६ ॥ तो श्रीकृष्णविगतचित्त : प्रपंचधर्मविरहित ॥ त्यापासुनि गोपीजात : नित्य रमतां पावले सन्मान ॥ ५७ ॥ ह्मणाल प्रपंचधर्मेंवीन(ण) : कृष्ण जो असंगोदासीन ॥ त्यापासुनि सन्मान : पावल्या कैस्या गोपी ॥ ५८ ॥ त्या गोपि-



कांसि रमतां : कैसी पां हे असे असंगता ॥ ऐसें जरि येथें आतां : ह्मणाल काहिं ॥ ५९ ॥ तरि तो अचिंत्यशाक्ति : षड्गुणैश्वर्यसम्पात्ति ॥ भगवंतशब्दें वर्णिति : वेद जयाचें महिमान सदां ॥ ६० ॥ तया भगवंताचा ठाईं : अशक्यता हे काइ ॥ याचा मायाविलास पाहि : ब्रम्हादिक नेणाति ॥ ६१ ॥ स्वता असोनि निर्गुण : गुणमयी मायेतें अधिष्ठुन ॥ हें गुणविसित(?) भान : केव्हडें भासत असे ॥ ६२ ॥ तया गुणकार्याचा काहिं : येणेंसि सम्बन्ध नाहिं ॥ यालागिं कृष्णांचा ठायिं : विषमता नसे ॥ ६३ ॥ येणें काहिं साध्यं सम्पात्ति : न साधिली जविन्मुक्ति ॥ हा सच्चिदानन्दमूर्ति : अकर्मनिबंधन ॥ ६४ ॥ इतर जे कोण्हि ज्ञानी : ते जविदशेतें भोगुनि ॥ गुरुशास्त्रोक्त-विधी करुनि : वैराग्यादि द्वारेंकरिं ॥ ६५ ॥ ते अविद्येपासुनि मुक्त : होति जन्मादिअतीत ॥ परि त्यांचा ठाईं हें अघटित : कृष्णा ऐसिं कृत्यें ॥ ६६ ॥ देह रक्षुनि कर्म जें अधीक : तें त्यांसि असे बाधक ॥ आणि हा गोपीकामपुरक ॥ तैसा नव्हे ॥ ६७ ॥ सर्वांतें येकला भोगितां : स्वयें जे किं अच्युतरेता ॥ त्या एकसरें होती वीर्यच्युता : अति मैथुनेंकरिं ॥६८॥ ऐसिं अचिंत्य कृत्यें कारितां : आयास नलगे भगवंता ॥ त्या कृष्णें गोपी मानिता : विस्मय काये येथें ॥ ६९ ॥ ह्मणसी त्या गोपवनिता : चातु-र्येलावण्यरहिता ॥ अयोग्या जारकर्मरता : मानिलिया कृष्णें ॥ ७० ॥ हें त्यांसि अतिश्लाघ्य जालें : नीचासि धन्यत्व गमलें ॥ जें आम्हासिं मानिलें : श्रीकृष्णें या जगिं ॥ ७१ ॥ ऐसें तिहिं जें मानिलें : तेणे नीचत्व प्रगटलें ॥ त्या विनोदातें नाहिं जाणितलें : मानाभिमानें ॥ ७२ ॥ ऐसें ह्मणसी राया कांहिं : तरि या व्यवहाराचा ठाइं ॥ असोनि आपुले गृहिं : गृहामेधी जे किं ॥ ७३ उचित वित्ताची पर्याप्ति : तेचि त्यांचि संपात्ति ॥ तितुकेनिच ते असति : अति श्लाघ्य लोक ॥ ७४ ॥ यास्तव त्या गोपगृहिणी : निजसंपत्तीकरुनि ॥ होत्या सदा बहु मानिनी : स्वजातिसंपूज्या ॥ ७५ ॥ असो भर्तारादिक त्यांतें : अतिशयें मानित होते ॥ आणि वनवासीही नित्तें : अलंकृत होते ॥ ७६ ॥ परंतु त्या कृष्णकामिनी : त्या बहु

मानातें सांडुनि ॥ कामार्ता कृष्णचरणिं : रंकप्राय सकळा ॥ ७७ ॥ स्वगृहिं संपत्तिवंता : होत्या जहिं साळंकृता ॥ तथापि तें सर्व वृथा : जाणितिलें तत्काळ ॥ ७८ ॥ सांडुनि सर्व संपत्तीतें : धिक्कारुनि सौंदर्यातें ॥ देखतांचि कृष्णातें : अतिदीना जाल्या ॥ ७८ ॥ मग स्वशरणकृपाघन : संभोगितां देखीोने प्रसन्न ॥ नाना युक्ति समाधान : सन्मान तोचि ॥ ८० ॥ विनटलों कृष्णपाइं : आतां या लोकत्रयिं ॥ आह्माऐसें कोण्हिच नाहिं : कृष्णमान्या आह्मी ॥ ८१ ॥ जेवि भणगासि मिळे सदन : किं राज्यातें पावे दीन ॥ तेवि कृष्ण होतां प्रसन्न : गोपींसि जालें ॥ ८२ ॥ असो या कृष्णसंगाचा ठाइं : दृष्टांतचि नसे काहिं ॥ सर्व काळग्रस्त ते काइं : उपमेसि योग्य ॥८३॥ पावोनि कृष्णसंगातें : मान्यता जाली गोपीतें ॥ तें न साहोनि कृष्णातें: विषमताचि पावलें ॥ ८४ ॥ स्वप्राप्तीसि अभिमान : तोचि येथें सदूषण ॥ हें जाणोनि श्रीकृष्ण : कारिता जाला तें आइका ॥ ८५ ॥

**तासां तत्सौभगमदं वीक्ष्यमानं च केशवः**
**प्रशमाय प्रसादाय तत्रैवांतरधीयत ॥ ४८ ॥**

त्या उक्तलक्षणा वनिता : कृष्णें केल्या आप्ता ॥ ज्या अतिशयें भाग्यवंता : शोभनशीळा ॥ ८६ ॥ कृष्णें यथेच्छ रमविलें : तेंचि त्यांसि भाग्य जालें ॥ नावेक घडोनि आलें : सदस्वानिं तें ॥ ८७ ॥ साधनचतुष्टयसम्पन्न : जेवि मुमुक्षुजन ॥ पावोनि गुरुसंन्निधान : श्रवणमननद्वारें जें ॥८८॥ असंभावनेचें निवृत्ति : जाली आत्मप्रतिपात्ति ॥ परि आभासें पूर्ववृत्ति : उपशमली नाहिं ॥ ८९ ॥ तेथें जाली जे ब्रम्हात्मप्राप्ति : तेचि अहंकारउन्नति ॥ मग अविद्यानिवृत्ति ॥ नव्होचि सर्वथा ॥ ९० ॥ तेंचि जालें मानास्पद : वोडवला ज्ञानमद ॥ निरसला होता भेद : तो प्रगटला फिरोन तेणें ॥ ९१ ॥ परि पूर्वाराधनेंकरुन : भगवंत जो केला प्रसन्न ॥ तो स्वभक्तांचें विघ्न : निवारीताचि असे ॥ ९२ ॥ तैसेंचि जालें येथें : संभोगाचे प्रीतिनिमित्तें ॥ त्या गोपी श्रीकृष्णातें : आवडलिया अत्यंत ॥ ९३ ॥ ह्मणौनि कृष्णापासुन : त्या पावलिया सन्मान ॥ संभोगिं वश जाणोन : मद जाला

गोपीतें ॥ ९४ ॥ श्रीकृष्णाचा महिमा : नेणोनि त्या असाध्यकर्मा ॥ आपण जालों तृप्तकामा : हें मानलें त्यांतें ॥ ९५ ॥ असो आह्मासि हा वश जाला : या बुद्धिनें दंभ आला ॥ कृष्ण नाहिं जाणातिला : पुरता तिहिं ॥ ९६ ॥ हा वश होउनि आमुतें : मान्ये करुनि वचनातें ॥ संभोगितां युक्तिपंथे : रमवितो सर्वदां ॥ ८७ परि या कृष्णाचा ठाईं : आह्मासि हा पाडु काइ ॥ हें नेणोनि तिहिं : मानिलें महत्वातें ॥ ९८ ॥ अहो श्रीकृष्ण सर्वांतस्थ : त्यासि नसे आप्त अनाप्त ॥ जैसे चित्रकारलिखित : यति आणि गृहस्थ ॥ ९९ ॥ परि त्या व्रजसुंदरी : नेणोनि सौभाग्यमानेंकरिं ॥ पडलिया मदसागरिं : अति गर्वसंभ्रमें ॥ १३०० ॥ मग त्या सौभगमानातें : पावोनि जाला मद त्यांतें ॥ हें जाणोनि गोपीनाथें : विचारिलें ऐसें ॥ १ ॥ असो शास्त्रें आणि वेदें : गाइलें केशव या पदें ॥ तारक येणें अनुवादें : ब्रह्मयांचें अभिधान ॥ २ ॥ आणि ईश शब्दें करुन : शंकर जो त्रिनयन ॥ हे वश ह्मणिजे अधीन : कृष्णाचिया दोघ ॥ ३ ॥ ह्मणोनि केशव हे ख्याति : तो नंदानंदन गोपी- पति : हा स्ववश ऐसें मानिती : गोपीका त्या ॥ ४ ॥ तो केशव नामें श्रीकृष्ण : त्यांचिया मदातें जाणोन ॥ गुप्त जाला आपण : तेथेंचि असतां किं ॥५॥ अंतस्थाचि दुरि गेला : ऐसें भासलें गोपिकांला ॥ जेविं मुक्त मानी अंत- रला : स्वबोधातें ॥ ६॥ नाना गुप्त ना प्रकट काहिं : कृष्णासि होणेंचि नाहिं : परि गर्व करिते ठाईं ॥ देखिजेचि ना ॥ ७ ॥ ह्मणाल सर्वहिं सांडुन : त्या आल्या शरण होउन ॥ तरि कृष्ण त्याचें विघ्न : नाशिना कां ॥ ८ ॥ ऐसें ह्मणाल आतां : तरि तो श्रीकृष्ण विघ्नहर्ता ॥ निजशरणातें सर्वथा : उपेक्षीना भक्तातें ॥ ९ ॥ प्रेमोत्सौक्यें करुन : जाला जरि अभिमान ॥ तथापि जे कृष्णपरायण : तेथें अभिमान न राहे ॥१०॥ मन असतां कृष्ण- पाईं : आह्मासि कर्तव्य नसे काहिं ॥ ऐसा जरि या देहिं : होईल अभिमान ॥ ११ ॥ तरि श्रीकृष्णिं जे शरण : ते सर्वदा कृष्णपरायण ॥ नव्हती विषयां अधीन : न पावती पतन ॥ १२ ॥ असो त्या व्रजवासिनी : नित्यसम्भोगें सुखावोनि ॥ निजधन्यता मानोनि : पावल्या गर्व ॥ १३ ॥ परि

श्रीकृष्ण गर्वहर्ता : सकाम आराधिला होता ॥ तथापि त्यांची अहंता : नाशातें पाववील ॥ १४ ॥ असो तो गोपीरमण : प्रस्तुत यशोदानन्दन ॥ करावया मदहरण : त्या गोपिकांचें ॥ १५ ॥ असतां विलोपशुन्य : त्यांचि चित्तें चोरुन ॥ पावला अन्तर्धान : प्रकटउनि माया ॥ १६ ॥ असो आकर्षोनि गोपीचित्तें : अधिष्ठुनि मायेते ॥ पावला अन्तर्धानातें : दिसेना कृष्ण ॥१७॥ अन्तर्धानाचें करुनि मिष : त्यांचा गर्व हारिला निःशेष ॥ आपुला प्रेमाचि विशेष : प्रेरिला त्यांतें ॥१८॥ एवं हे हरिगुणकीर्ति : अतिपवित्र कथा भागवती ॥ राया परीक्षिती प्रति : मुनि बादरायणी शुक ॥१९॥ कीर्तन करित कारितां : येथवरि आली कथा ॥ संपला हाचि आतां : एकोनत्रिंशतितमोध्याय : ॥२०॥ तेणें श्रीकृष्णें नंदसुतें : अनुसरोनि रासक्रीडेतें ॥ प्रवेशोनि वृंदावनातें : मुरलीवादन जें केलें ॥ २१ ॥ तया मधुरस्वरें करिं : मोहउनि त्या व्रजसुंदरि ॥ गृहाशा सांडउनि दुरिः निज सान्निध्या आणुनि ॥२२॥ वश होउनि तियांतें : नाशिलें वियोगज्या(जा)तापातें ॥ निजनयनकटाक्षपातें : हास्यादिकें उत्साह केला अत्यंत ॥ २३ ॥ पारि तया उत्साहवशें : झळंबिलें मानगर्वलेशें ॥ तत्परिहारार्थ र[illegible]ः रचुनि अंतर्धानाची हे युक्ति ॥२४॥ नावेक अप्रकट होउनि : निज वियोग भासउनी ॥ तन्निमित्तेंचि त्या भामिनी : निजव्यसनशीळा केल्या ॥२५॥ ऐसी शुकोक्त कथा जे काहिं : संपली इयेचि अध्याइं ॥ तेचिं यथामति मियांहिं : वर्णिली हे महाराष्ट्र ॥ २६ ॥ नातरि होंचि करुनि मिष : हारिलें वाचेचें कल्मष ॥ पवित्र केलें निजमानस : कृष्णगुणगंगाजळिं ॥ २७ ॥ यावरि त्या गोपवनिता : श्रीकृष्णदर्शनिं अति आर्ता ॥ देहगेहादि भावरहिता : त्या यमुनातीरिं बैसल्या ज्या ॥ २८ ॥ मग कृष्णगवेशणातें : विचारुनि सर्वाही येकचित्तें ॥ उठल्या जाल्या वनवनांत्तरातें : शोधावया गोपी ॥२९ ॥ ऐसी हे हरिकीर्ति : उत्तम कथा जे भागवति ॥ राया परीक्षितीप्रति : निवेदिजेल शुकें जें ॥ ३० ॥ ते म्याहि निजमतीकरुन : कृष्णगुणाचें कीर्तन ॥ नित्यानंदिं ठेउनि मन : वर्णिजेल ते आइका ॥ ३१ ॥ पारि नित्यानंदें समर्थें : कृपा करावीं मातें ॥ वर्णितां हरिगुणातें : असावें म्या निर्विघ्न ॥ ३२

वार्णितां भगवतत्कीर्ति : अवतरावी रसवृत्ती ॥ चित्त जडावें भगवंतिं : अंत-रायरहित जें ॥३३॥ वाचा न पावावी सिन (शीण) : मन असावें प्रेमसंपन्न ॥ न यावा अभिमान : नसावी महंती मजला ॥ ३४ ॥ आणि कटिस्थहस्ताकृतिः जे मनोहर मुर्ती ॥ विठ्ठलवेषवती : असावी मनि माझया सदा ॥ ३५ ॥ एवं गुरुपदिं प्रार्थुन ॥ करीतसें गुणवर्णन ॥ कृपा करूत सज्जन : निरसाविं सर्व विघ्नें ॥ ३६ ॥ कारितां हरिगुणवर्णन : असावें म्यां सदा कल्याण ॥ नित्यानंदिं मन : असो माझें ॥ १३३७ ॥ इतिश्रीभागवते महापुराणे दशमस्कंधे रासक्रीडावर्णनं नामैकोनत्रिंशातितमोध्यायः ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु

ॐ

श्रीमद्भागवतांतर्गत

# रासपंचाध्यायी.

## अध्याय २.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीमच्चिदानन्दाय नमः ॥ श्रीविठ्ठलादिगुरवे नमः ॥ आतां रासरंगविहारि : यशोदानन्दन हरि ॥ जो नित्य आनन्दकारी : शरणागतवत्सळ ॥ १ ॥ वानावी तयाची गुणकीर्ति : अखंड स्मरावें चित्तीं ॥ कटीतें धरुनि हास्तिं : भक्तिभीमातीरस्थ जो ॥ २ ॥ त्याचा गुणकीर्तनिं : प्रवर्तली माझी वाणी ॥ ते नित्यानन्दावसानिं : असोनि सर्वदा ॥ ३ ॥ करिजेल तद्गुणकीर्तन : ते अवधारुत सज्जन ॥ श्रीकृष्ण क्रीडापरायण : रासारंभिं असतां ॥ ४ ॥ गाउनियां मधुर गीत : स्वनिकट गोपीजात ॥ आणोनि त्यांसमवेत : क्रीडत होंत्साता ॥ ५ ॥ असो संभोगसमइं : त्यांचिया चित्तानुरुप जें काहिं ॥ वर्ततां अकस्मात् पाहिं : अहंकार जाला ॥ ६ ॥ अहो गोपिकांचा अन्तरिं : आली जे प्रेमलहरी ॥ प्रेमोद्रेकें सुन्दरी : आर्द्रता पावल्या ॥ ७ ॥ असो आप्त केलें रमानाथें : विसरलिया विरहातें ॥ त्या सुखें नावेक त्यांतें : गर्व आला ॥ ८ ॥ कृष्णप्रीतीचा निष्कर्ष : तो किंचित् जाला दुरास ॥ संगमात्रोंचे तो रस : आकारासि आला ॥ ९ ॥ रसचि होउनि आपण : चढला त्यांतें अभिमान ॥ परि कृष्णेंसिं संगाराधन : तें वृथा नव्हे ॥ १० ॥ अन्तरिं जाला अभिमान : तेथेंचि राहावें आपण ॥ या हेतु केलें अन्तर्धान : सर्वांतस्थें कृष्णें ॥ ११ ॥ तत्काळ त्या वनिता : असोनि गर्वरहिता ॥ स्मरत्या जाल्या नन्दसुता : दीनाचे परिं तेथें ॥ १२ ॥ ऐसें स्मरोनि गतकथेतें : पुढेंहिं जें वर्णिजेतें ॥ त्यांत या अध्यायिं रायातें : सांगिजेतें ऐसें ॥ १३ ॥ न देखोनि नन्दकुमारा : त्या गोपी विरहकातरा ॥ असोनि गवेषणपरा : उन्मत्ताचे परिं ॥ १४ ॥ असो देहभावातें विसरोन : इच्छोनि कृष्णगवेषण ॥ भ्रमती इतस्तता वन : गोपिका त्या ॥ १५ ॥ नाना पडोनि गर्वबुंथि ॥ तेथेंचि लोपली ते मूर्ति ॥ नेणती काहिंच त्या सती - तत्वार्थातें ॥ १६ ॥ तेणें अन्तरला श्रीकान्त : दैवें जाला जो प्राप्त ॥ परि संस्कारें मागुतें चित्त :

विषयावरि न येचि ॥ १७ ॥ ह्मणोनि त्या गोपनारी : कृष्णें धरुनि अंतरिं ॥ असोनि विरहकातरी : शोधीं प्रवर्तलिया ॥ १८ ॥ तेंचि कांहिं प्रस्तुत : या अध्याइं व्याससूत : त्या गोपिकांचे आचरित ॥ रायाप्रति निवेदिति ॥ १९ ॥

**श्री शुक उवाच.**

**अन्तर्हिते भगवति सहसैव व्रजांगनाः ॥**
**अतप्यंस्तमचक्षाणाः करिण्य इव यूथपम् ॥ १ ॥**

भागवत् शब्दें करुन ॥ षड्गुणैश्वर्यसंपन्न ॥ श्रीकृष्ण वैकुंठरमण ॥ वृंदावनविहारी ॥ २० ॥ तो पूर्वोक्ति लक्षणें करुन : पावला असतां अंतर्धान ॥ ह्मणिजे त्यांचिं चित्तें चोरुन ॥ गुप्त जाला अकस्मात् ॥ २१ ॥ म्हणौनि त्या व्रजांगना : शोधोनि सर्वाही वना ॥ होत्या जाल्या तप्तमना : न देखोनि कृष्णातें ॥ २२ ॥ असो अकस्मात् पाहिलें : तवं कृष्णातें न देखिलें ॥ किंचित् मन गर्वित जालें : तेणें भ्रमल्या होत्या ॥ २३ ॥ नाना त्यांसि भाव होता : जें जवळीचि आहे स्वभोक्ता ॥ पारि गर्वेंच गुप्त होतां : न विचारिलें तिहिं ॥ २४ ॥ परंतु गर्वाही माझारि : संस्कार होता अंतरिं ॥ त्या संस्कारास्तव सुंदरी : पाहात्या जालिया ॥ २५ ॥ तवं न देखोनि निजभर्ता : असत्या जाल्या संतप्ता ॥ भ्रमत होत्सात्या इतस्तता : धुंडित्या जाल्या ॥ २६ ॥ जेवि कोण्ही योगी जन : ज्ञानोद्रेकामाजि मग्न ॥ असोनि स्वरुपनिष्ठे पासुन : ऐलाड येति ॥ २७ ॥ पारि आपण पूर्ण ज्ञानी : हें वाहत होतें मनिं ॥ मग विचारावारि येउनि : पाहिलें जवं ॥२८॥ तवं दुन्हावली स्वनिष्ठा : म्हणती नाडलों कटाकटा ॥ व्यर्थ शास्त्रीय खटपटा : गेल्या वायां ॥ २९ ॥ मग शास्त्रसंस्कारबळें : आपणाचि सावध जाले ॥ निदिध्यासनिं प्रवर्तले : विक्षेपनाशार्थ ॥ ३० ॥ तेवि त्या गोपवनिता : कृष्णवियोगतप्तचित्ता ॥ गवेषण करित असतां : स्वभोक्तया कृष्णांचें ॥ ३१ ॥ जेवि कोण्हि त्या हस्तिनी : निजयतिसंगें असोनि ॥ विचरत असतां वनि : यथा सुखेंकारिं ॥३२॥ तवं अकस्मात दैवगती : चुकोनि जाय त्यांचा पति ॥ निजस्वामीतें धुंडिती : त्या गजिनी जैशा ॥ ३३ ॥ तेवि त्या व्रजवनिता : असोनि विरहतप्ता ॥ न देखोनि निजभर्त्ता : भ्रमत्या जालिया ॥ ३४ ॥ हस्ति-

नी उपमा येथें : सूचिलें अति विरहातें ॥ निजकांतें वीण त्यांतें : त्रैलोक्य शुन्य जालें ॥ ३५ ॥ स्वप्राणाहूनि अधिक : आवडला कृष्ण येक ॥ त्यावांचूनि आणिक : तृणप्राय मानिलें ॥ ३६ ॥ मग स्वस्थ करूनि मन : आरंभिलें कृष्णचिंतन ॥ त्या चिंतनाचें लक्षण : आइक राया ॥ ३७ ॥

**गत्यानुरागस्मितविभ्रमेक्षितै-**
**र्मनोरमालापविहारविभ्रमैः॥**
**आक्षिप्तचित्ताः प्रमदा रमापते-**
**स्तास्ता विचेष्टा जगृहुस्तदात्मिकाः ॥ २ ॥**

नंदानंदन श्रीकृष्ण : जगत्पति रमारमण ॥ जो वैकुंठीचें भूषण : विश्रांति-प्रापक ॥३८॥ तयाचि चालती गति : पदोपदिं विश्रांतिदाति ॥ नाना शोभा उमटति : चालते वेळे ॥३९॥ स्मरोनि त्या पदगतीतें : त्या प्रमदांचिं चित्तें ॥ क्षोभलिं जेवि देहतप्त तें : कृष्णस्थ जालिं ॥ ४० ॥ असो कृष्णविरहतप्ता : त्या होत्या प्रेमप्लुता ॥ तवं स्मरला अवचिता : पदप्रचार कृष्णाचा ॥४१॥ मग क्षोभलेंनि चित्तें : आठविलें अनुरागातें ॥ आणि त्या स्मितातें स्मरलें तिहिं ॥ ४२ ॥ असो अनुराग हे ख्याति : त्या गोपिकांप्रति : श्रीकृष्णें केलि जे प्रीति : प्रेमाचिया भुलि ॥ ४३ ॥ आणि स्मित शब्दें करुन : त्यां गोपीं तें उद्देशुन ॥ किंचित् हास्यवदन : असतां जाला जो ॥ ४४ ॥ स्मरोनि प्रीति हास्यातें : त्यांचिं जालिं क्षुभितें चितें ॥ तेणें विशेषें त्यांतें : आठवला श्रीकृष्ण ॥ ४५ ॥ आणि तो कमळलोचन : विलासविभ्रमें करुन ॥ करितां अवलोकन : त्या प्रमदांप्रति ॥ ४६ ॥ तें जें विलासें ईक्षणें : केलि जे रमारमणें ॥ तेणें गोपिकांचि मनें : स्मरत होंत्सातिं जें ॥ ४७ ॥ त्या कृष्णपर अंगना : जालिया विक्षिप्तमना ॥ सांडुनि देहभावना : विरहतप्ता ज्या ॥ ४८ ॥ तैसिंच मनासि रंजकें : कृष्णाचि मधुर वाक्यें ॥ कृष्णकामउद्बोधकें : अ (आ?)नेच्छारहित ॥ ४९ ॥ किंवा मनोहरें गीतें : आठवलि गोपिकांतें ॥ तणें चित्तें होउनि विक्षिप्तें ॥ उतावेिळें जालें ॥ ५० ॥ तैसेचि त्यांतें मनोहर : आठवले कृष्णविहार ॥ असोनि गोपी-

तत्पर : क्रीडा ज्या केल्या ॥ ५१ ॥ तयांतेंहिं कृष्णकांता : स्मरोनें जाल्या क्षुभिता ॥ आणिकही इतस्तता : केले जे विलास ॥ ५२ ॥ त्याही कृष्णाविलासातें : स्मरोनि प्रमदाशतें ॥ खिन्न होत्सातिं चित्तें : विकळें हिं जालिं ॥ ५३ ॥ एवं त्या कृष्णकामिनी : प्रमदा रतिविलासिनी ॥ गमनादिकें करुनि : खिन्न होंत्सात्या ॥ ५४ ॥ त्या कृष्णाच्या विलासें : खोंचिलिं त्यांचि मानसें ॥ मग विलाससौरसें : तन्मय जाल्या ॥ ५५ ॥ त्या स्मरल्या ज्या कर्मातें : त्याचि अनुकारातें ॥ आपणहिं त्या कृत्यातें : तैसेचि करिती ॥५६॥ असो गोपीत्व स्फुरत होतें : तें स्मरतां तद्विहारातें : कृष्णमय होउनि चित्तें ॥ ते विलास स्फुरले ॥ ५७ ॥ तें जें त्याचें विहरण : उत्तरश्लोकें करुन ॥ आइक राया सावधान : निवेदिजेतें तेंहिं ॥ ५८ ॥

> **गतिस्मितप्रेक्षणभाषणादिषु**
> **प्रियाः प्रियस्य प्रतिरूढमूर्तयः ॥**
> **असावहं त्वित्यबलास्तदात्मिका**
> **न्यवेदिषुः कृष्णविहारविभ्रमाः ॥ ३ ॥**

सर्वे प्रियां अवधिभूत : अतिप्रिय जो मूर्तिमंत ॥ तोचि हा यशोदासुत : गोपिंचे प्रिय किं ॥ ५९ ॥ त्या कृष्णाची चालती गति : आणि स्मितमुखाकृति ॥ प्रेक्षणशब्दख्याति : अवलोकन जें ॥ ६० ॥ अधिष्ठुनि विलासातें : पाहाणें कटाक्षपातें ॥ आणि भाषणें जे यथोक्तें : मधुरवचनें जें ॥ ६१ ॥ एवं विलास हें रमण : गतिभाषणादि गुण ॥ ज्या कृष्णगुणाचें कीर्तन : पुर्वश्लोकिं केलें ॥ ६२ ॥ स्मरोनि गत्यादिकांतें : कृष्णात्मिकें जालिं चित्तें ॥ यालागिं बोलिलें सातें : प्रतिरूढमूर्ति ॥ ६३ ॥ असो त्या गोपिकासती : अतिशयें पुण्यमूर्ती ॥ सविग्रहा भगवंतिं : जडलिया राया ॥ ६४ ॥ ह्मणोनि त्या सर्वाहि : त्या कृष्णचरिताचां ठाईं ॥ आविष्ट जालिया काहिं : न स्फुरे आन ॥ ६५ ॥ याचि लागि त्या रामा : कृष्णविहारविभ्रमा ॥ श्रीकृष्णा प्रियोत्तमा : अत्यंत ज्या प्रिया ॥ ६६ ॥ त्या अबळा समस्ता : श्रीकृष्णिं आविष्टचित्ता ॥ कृष्णविहाराविभ्रमिता : नेणती काहिं ॥ ६७ ॥

विसरोनि जीवाहंतेतें : कृष्ण अहं हें स्फुरलें त्यांतें ॥ असो कृष्ण ब्रह्म ऐशातें : पुराणें गाति ॥ ६८ ॥ हे प्राकृत अहंकृति : तें कृष्णिं केली समाप्ति ॥ त्यांसि जाली स्फुर्ति : जें अहं कृष्ण ऐसी ॥ ६९ ॥ जेवि माहांवाक्यें ब्रह्माहं स्मृति : योगी पावती तन्मय गति ॥ तेवि त्या कृष्णोहमिति : निवेदिति अबळा ॥ ७० ॥ कृष्णें व्यापिली चित्तवृत्ति : तेथें जाली अहंस्फुर्ति ॥ परस्परें ते आपुलालां प्रति : निवेदित्या जाल्या ॥ ७१ ॥ एवं त्या अबलांगना : कृष्णध्यानपरायणा ॥ कामाच्याही भावना : आराधित्या जाल्या कृष्णातें ॥ ७२ ॥ त्या आराधनसामर्थ्यें : पावालिया कृष्णातें ॥ जेवि तत्त्वं पदार्थैक्यत्वातें : पावताति योगी ॥ ७३ ॥ ते आपुलालि अनुभूति : परस्परें निवेदिति ॥ तेवि त्या कृष्णपरा सती : निवेदिती वृत्त ॥ ७४ ॥ अहं कृष्ण अहं कृष्ण : ऐसें करिती निवेदन ॥ कृष्णविहारातें स्मरोन : तदात्मिका जाल्या ॥७५॥ परि देहाश्रयनिमित्तें : स्मरोनि अनुभूतार्थातें ॥ आलें जें प्रेमभरितें : तें नावरे राया ॥ ७६ ॥ दृढ संस्कारें करुन : तें सुंदर रूप रमण ॥ कमळनयन सुवदन : आवडले पाहावयातें ॥७७॥ असो जर्‍हि कृष्णहृदिस्थ : सदां अनुभवप्राप्त ॥ तर्‍हि तत्साधनाचें द्वारभूत : मनोरमण मूर्ति हे ॥७८॥ तें रूप स्वजनरंजन : भक्तांचें विश्रांतिस्थान ॥ सर्व तापोपशमन : शरणागतसुखकर ॥ ७९ ॥ ऐशातें पाहों म्हणोन : उतावेळ गोपीगण ॥ तृषार्त त्यांचे जाले नयन : अठवोनि कृष्ण ॥ ८० ॥ मग त्या अबळा सुंदरा : कृष्णगुणवर्णनपरा ॥ असोनि विरहकातरा : शोधिती वन ॥ ८१ ॥ असो जे मुमुक्षुजन : एकांता आणावया मन ॥ आठवितां रूप सगुण : घनस्याममूर्ति ॥ ८२ ॥ तेणें मन येतां येकांता : लाहोनि तत्प्रसंनता ॥ साक्षात् श्रीभगवंता : पावती ते योगी ॥ ८३ ॥ तर्‍हि त्यांची चित्तवृत्ति : सगुणींच धरी प्रीति ॥ यावत् उपाधि निवृत्ति : सेविती तेंचि रूप ॥ ८४ ॥ ऐसें ते न करिते : तरि उपाधिरोषनिमित्तें ॥ देहिंच भान राहतें : अभिमान असतां कीं ॥ ८५ ॥ मग देहाभिमानमूळ : सुखें न क्रमता काळ ॥ तरि प्राप्त कैंचें पुष्कळ : जीवन्मुक्तिसुख ॥८६॥

तेवि त्या गोपसुंदरा : स्वता जाल्या कृष्णाकारा ॥ तर्‍हि असोनि तत्परा : चिंतितो( ती ? )कृष्णातें ॥ ८७ ॥ त्या भजनाचें लक्षण : उत्तर ग्रंथेंकरुन ॥ रायातें व्यासनंदन : सांगतिजे ऐसें ॥ ८८ ॥

**गायंत्य उच्चैरमुमेव संगता**
**विचिक्युरुन्मत्तकवद्वनाद्वनम् ।**
**पप्रच्छुराकाशवदंतरं बहि**
**र्भूतेषु संतं पुरुषं वनस्पतीन् ॥ ४ ॥**

राया त्या व्रजवनिता : सर्वाहि असोनि संगता ॥ श्रीकृष्णविरहाकाळिता : कृष्णातें पाहात असतां ॥ ८९ ॥ अति उच्चस्वरें करुनि : गात गात त्या कामिनी ॥ श्रीकृष्णगुणवर्णनि : प्रवर्तलिया तेथें ॥ ९० ॥ असो श्रीकृष्ण-गुणकीर्ति : वर्णित होंत्साल्या गाती ॥ वनामाजि शोधित सती : श्रीकृष्णातें ॥ ९१ ॥ एका वनतें अधिष्ठुन : विचारितां न भेटे कृष्ण ॥ दुसरे वन प्रवेशोन : पाहाती सर्वत्र ॥ ९२ ॥ सहज कृष्णाकलिता : नेणती देहादि व्यवस्था ॥ आतां तों तद्विरहें भ्रांता : उन्मत्ताचे परि ॥ ९३ ॥ आतां उन्मत्ता कोणेपरि : लक्षिल्या त्या सुंदरी ॥ त्यांचें एक नवल तरि : आइकावें राजया ॥ ९४ ॥ प्रवेशतां वना वना प्रति : तेथें भेटती वन्पति (वनस्पति) ॥ म्हणिजे मार्गिंचे तरुजाति : वृक्ष जे वनिं ॥ ९५ ॥ देखोनि त्या वनस्पतितें : जाउनि पुसती कृष्ण तेथें ॥ तो कृष्ण कोण हो येथें : पुसाल ऐसें ॥ ९६ ॥ म्हणाल आम्ही मूढ जन : नित्यानित्यविचारहीन ॥ श्रीकृष्ण कीं लक्षण : नेणों कैंचा ॥९७॥ हें जरि गमेल तुम्हासि : तरि कृष्ण कायें एकदेशी ॥ तो सर्वांतर्निवासि : गगनाचे परि ॥ ९८ ॥ आकाश जैसें पाहिं : सर्व भूतिं अंतर्बहि ॥ तेवि तो सनातन पुरुष काइ : नवा आला ॥ ९९ ॥ सर्वांतें तो निकट : परि तन्मायेचें हें संकट ॥ तेणेंसि नसों विकट : आमुची जीवनकळा ॥ १०० ॥ एवं पुरुष जो पुरातन : सर्वां भूतिं सम जीवन ॥ प्रस्तुत नंदानंदन : सर्वांतर्बहिःकृष्ण ॥ १ ॥ त्या सर्वात्मया कृष्णातें : उद्देशूनि पुसती त्यातें ॥ निजकांतवेधें गोपीतें : न स्फुरे वृक्षत्व ॥ २ ॥ अंतरिं वस्तु

जें कांहिं : तें स्फुरलें सर्वा ठाइं ॥ परि या विलासविग्रहिं : जडले किं चित्त ॥ ३ ॥ त्या कृष्णरत चित्तें : कंजनयन पुरुषातें ॥ उद्देशूनि पुसती वृक्षांतें : जें देखिला कृष्ण तुह्मी ॥ ४ ॥ किंवा तत्साक्षात्कार जाला : तेणें तो गर्व हरला ॥ परि कृष्णवेध उरला : ह्मणोनि पुसती ॥ ५ ॥ तवं ते जडत्व न बोलति : मग नेतिपंथें मागुति ॥ त्या शोधिती कृष्णमूर्ति : तद्वेषेंकरिं ॥६॥ परी त्या शोधनाचे मिशें : शोधिती निजमानसें ॥ उपाधीचेनि वशें : अंतरला कृष्ण ॥७॥ असो त्या कृष्णकामा सती : इतस्तता निजपति ॥ पावावया पुसती : व्यक्तिमात्रातें ॥८॥ तो भूतामाजि समान : परि मायाकृत हें भान ॥ यास्तव तो वनिताजन : पुसतसे सर्वांसि ॥ ९ ॥ त्यांचें पुसतें लक्षण : व्यक्तिविशेषें करुन आइक राया सावधान : निवेदिजेतें तेहिं ॥ १० ॥

**दृष्टो वः कश्चिदश्वत्थ प्लक्ष न्यग्रोध नो मन : ॥**
**नंदसूनुर्गतो हृत्वा प्रेमहासावलोकनै : ॥ ५ ॥**

पूर्वोक्ता ज्या व्रजकांता : त्या वनामाजि भ्रमतां ॥ भेटला त्यांतें अवचिता : अश्वत्थ जो पिंपळ ॥ ११ ॥ तया पिंपळातें म्हणती : अगा ये अश्वस्था (त्था) वनस्पती ॥ हरुनि गेला चित्तवृत्ति : नंदकुमार आमुची ॥१२॥ येणें मार्गें पाहिं : गेला तो देखिला काइ ॥ लागतों गा तुझे पाईं : सांगे कृष्णाची शुद्धि ॥ १३ ॥ म्हणसी जे चित्तवृत्ति : हरिली तेणें कोणे रीति ॥ तरि तो प्रेमळांचा पति : शरणागतवत्सळ ॥ १४ ॥ आपुलिया महिमानातें : नावेक ठेउनि परतें ॥ वश जाला आमुतें : आमुचिये कणवा ॥१५॥ क्रीडेतें अनुसरोन : सर्वदा रममान(ण) ॥ प्रेमहास्यावलोकन : जें काहिं केलें ॥१६॥ हरावया आमुचिं चित्तें : दाविलें प्रेमाधिक्यातें ॥ त्यावीण नावडे आमुतें : ऐसें केलें कृष्णें ॥ १७ ॥ असो तेथें चित्तवृत्ति : गुंतली ते न फिरे मागौति ॥ ऐसी काहिं तेणें प्रीति : वाढविली आमुसि ॥ १८ ॥ त्या प्रीतीचे सौरसें : दाविलें हास्या ऐसें ॥ तेणें प्रीतिहास्येंकरिं मानसें : हरिलिं आमुचिं ॥ १९ ॥ असो प्रीतीकरिं हास्यमान : तद्युक्त जें शोभासंपन्न ॥ देखोनि कृष्णवदन : मोहिलिं चित्तें ॥ २० ॥ आणि नयनकटाक्षेंतें : अवलोकितां

आमुतें ॥ तेथेंचि गुंतलीं चित्तें : मोहित होंत्सातिं ॥ २१ ॥ त्या प्रेमहासाव-लोकें : आसक्तचित्त अपकें ॥ प्राशावया रुपांमृत नेटकें : सादर जालों आह्मीं ॥ २२ ॥ तवं चित्तें तेथेंचि राहिलिं : ते मुर्ति तों हारपोनि गेली ॥ ऐसी गति आमुची केली : तया कृष्णें ॥ २३ ॥ एवं प्रेमादीकिं करुन : आमुचिं मनें हरुन ॥ तो काय नन्दानन्दन : गेला यिये वाटा ॥ २४ ॥ तया श्री-कृष्णजीतें : देखिलें काये तुवां येथें ॥ ऐसें त्या वृक्षराजातें : पुसोनि तिहिं ॥ २५ ॥ मग कोण्हि येक प्लक्ष : पलाशनामा वृक्ष ॥ त्या प्लक्षातें प्रत्यक्ष : पुसत्या जाल्या गोपी ॥ २६ ॥ किंवा प्लक्षपदें पिंपरीजाति : त्या जाउनि पिंपरीप्रति ॥ तियेतें पूर्वोक्ता रीति : पुशिला कृष्ण ॥ २७ ॥ आणि न्य-ग्रोध हें जाण : त्या वटवृक्षाची खुण ॥ वटातेंहिं गोपीजन : पूर्वोक्त प्रकारें तेथें ॥२८॥ उद्देशोनि श्रीकृष्णातें : ह्मणति अगा वटा येथें ॥ देखिलें काये कृष्णातें : जो आमुचा चित्तचोर ॥ २९ ॥ तो आजि तुवां काइं ॥ देखिला किंवा नाहिं ॥ ऐशा त्या पडोनि प्रेमडोहिं : पुसतीं सर्वत्र ॥ ३० ॥ एवं त्या व्रजवनिता : श्रीकृष्णदर्शनिं उत्कंठिता ॥ अदेहभान समस्ता : भ्रमतां वनिं ॥ ३१ ॥ त्या अश्वत्थादिकांतें : पुसोनि कृष्णशोधार्तें ॥ नानापदार्थ शोधन-पंथें : जाती पुढें ॥ ३२ ॥ किंवा अश्वत्थादिकातें : जोणानि केशवां ऐशातें॥ ह्मणोनि निजवृत्तांतातें : पुसिलें त्यांसि ॥ ३३ ॥ सज्जनांचें सन्निधान : तेंचि कृष्णप्राप्तिचें साधन ॥ हें जाणोनि गोपीजन : शरण आला त्यांतें ॥ ३४ ॥ आतां येणेंचि उक्तपंथें : तरों गर्वार्णवातें ॥ यालागि तें गोपि-कारातें : चालिलिं पुढें ॥ ३५ ॥ असो पुनः गोपीजन : उन्मत्तलक्षणेंचि करुन ॥ कृष्णप्राप्तिचें साधन : कारितुसे ऐसें ॥ ३६ ॥ तया वनामाझारि : देखोनि सर्वस्वें उपकारि ॥ त्यां वृक्षातें त्या सुंदरि : जाउनि पुसति ॥३७॥

**कच्चित्कुरबकाशोकनागपुन्नागचम्पकाः**
**रामानुजो मानिनीनांयातो दर्पहरास्मितः ॥ ६ ॥**

कुरवक ऐसा कोण्हि : कोरांटा जो इये जानि ॥ तो वृक्ष तिहिं भामिनिं : बहुपुष्पित देखिला ॥ ३८ ॥ आणि अशोक जो ख्यात : आरक्त पुष्पवंत ॥

आणि पुन्नाग एणें संज्ञित : नागचांपा वृक्ष ॥ ३९ ॥ तैसाचि चंपक विशेष: अति सुगंध पुष्पें ज्यास ॥ तो चांपाही सुमनस : वृक्ष तेथें होता ॥ ४० ॥ एवं कुरबकादि वृक्ष जाण : परार्थ ज्यांचें जीवन ॥ त्या औदार्यातें लक्षुन : गोपिका पुसती त्यांतें ॥ ४१ ॥ वेगळालें संबोधुनि : प्रार्थनायुक्त असोनि ॥ ह्मणति आतां ये वनिं : विश्रांतिकर तुह्मी ॥ ४२ ॥ तरि तो रामानुज श्रीकृष्ण : यशोदानंदानंदन ॥ आमुचिं चित्तें चोरुन : येणें मार्गें गेला काइ ॥ ४३ ॥ तो तुह्मी सभाग्यिं जनिं : देखिला काय स्वनयनिं ॥ ह्मणाल तो कोणां चिन्हिं : वोळखावा आह्मी ॥ ४४ ॥ किंवा तुमच्या चित्तवृत्ति : हरिल्या कोणे रीति ॥ तरी तो स्वता श्रीपति : आह्मी त्या किति ॥४५॥ पाहातां जगन्मोहनमूर्ति : आमुचा पाड तो किति ॥ मानिनी ज्या असती : रमेचिया समान ॥४६॥ असो रमा आदिकरुनि : ज्या किं बहु मानिनी ॥ ज्या गुणाढ्या या जनि : अति विख्याता सदां ॥४७॥ त्यांचिया दर्पातें : स्मितमात्रें हरिजेतें ॥ एवं मानिनीदर्पहारास्मितातें : देखिलें काइ तुह्मीं ॥४८॥ ऐसें प्रसंगें करुन : निवेदिलें कृष्णचिन्ह ॥ आणि चित्तापहरणाचें कारण : सूचिलें तिहिं ॥४९॥ आणि रामानुजत्वें जाण : सुचिला वैकुंठरमण ॥ केवळ लीळावतरण : भूमिचा ठाइं ॥ ५० ॥ आणि मानिनीदर्पहर : येणें सुचिला स्वविचार ॥ जें आमुचेहि अहंकार : नाशिले तेणे ॥ ५१ ॥ असो हें निजवृत्त : अनेक प्रष्टव्यार्थ ॥ जें पुनरपीं नंदसुत : स्वीकारील काई आह्मा ॥ ५२ ॥ एवं त्या वृक्षांप्रति : स्ववृत्त निवेदुनि त्या सती ॥ चालिल्या तवं पुडति : देखिली तुळसी ॥ ५३॥ त्या कृष्णप्रिय तुळसीतें : पुसती कृष्णगतीतें ॥ तेहि आतां राया तुतें : निवेदिजेल ॥ ५४ ॥

**कच्चित्तुलसि कल्याणि गोविंदचरणप्रिये ॥**
**सह त्वालिकुलैर्बिभ्रद्दृष्टस्तेतिप्रियोच्युतः ॥ ७ ॥**

अवो तुळसि कल्याणि : आमुचिं चित्तें चोरुनि ॥ कृष्ण गेला तो काय नयनिं : देखिला तुवां ॥ ५५ ॥ ह्मणसी मिं मूढजाति : सदा अरंण्यामाजि वसति ॥ मज पुसावयाची प्रसक्ति : घडेल कैसि ॥ ५६ ॥ ऐसें असेल

काहिं : तरि तुं सदा गोविंदपाइं ॥ लोळसी आणि त्यासि नाहिं : दुजें तुजहुनि प्रिये ॥ ५७ ॥ ह्मणोनि गोविंदचरणप्रिये : सांग वो तयाचि सोये ॥ शिणालें आमुचिं हृदयें : आठवितां कृष्णातें ॥५८॥ ह्मणसी कृष्णालागुनि : मिं कोण्हा चिन्हिं करुनी ॥ गोविंदप्रिया कैसेनि : जाणतिलें तुह्मीं ॥ ५९ ॥ तरि तो रमारमण : भ्रमरिसहवर्तमान ॥ तुझें करुनि भूषण : वाहातुसे सदा आंगिं ॥ ६० ॥ रमेतें करुनि परतें : आदरें वाहातो तुतें ॥ ह्मणोनि तुजहुनि त्यातें : विषय नाहिं आणिक ॥ ६१ ॥ याचि निमित्तें पाहिं : तुजहिं त्यावीण प्रिय नाहिं ॥ यालागिं पुसतसों तुज वाइ : कृष्णाचि सोये ॥ ६२ ॥ असो जो किं नंदसुत : तुज प्रिय जो अच्युत ॥ आमुसिं होता रमत : तो काये देखिला तुवां ॥ ६३ ॥ एवं पुसोनि तुळसीतें : शोधितां कृष्णजितें ॥ तत्र अ ( आ ) मोद अवचितें : आले सुपुष्पाचे ॥ ६४ ॥ तें करितां अव-घ्राण : आठवले श्रीचरण ॥ असो तो रासरंगरमण : आमुचा भोक्ता किं ॥ ६५ ॥ हे जे कांहिं पुष्पजाति : हे श्रीचरणसंपत्ति ॥ आतां पुसोनि पाहों यांप्रति : श्रीकृष्णशुद्धि ॥ ६६ ॥ असो या कुसुमांचा ठाइं : कृष्णस्पर्श आहे किं नाहिं ॥ किं आह्मा ऐस्या ( शा ) याहि : विरहार्ता असति ॥६७॥ अहो या मालत्यादि लता : अत्यंत गुणवंता ॥ तिहिं पात्रोनि नम्रता : शांत-रूपा दिसति ॥ ६८ ॥ तस्मात् या भाग्येवंता : सर्वथा कृष्णस्पर्शिता ॥ तरी यांचिपासिं कांता : न विचारूं कां ॥ ६९ ॥ ऐसें धरुनि मनें : त्या पुष्पलता लागुनि ॥ जाउनि व्रजभामिनीं : पुसताति ऐसें ॥ ७० ॥

**मालत्यदर्शि वः कच्चिन्मल्लिके जातियूथिके ॥**
**प्रीतिं वो जनयन्यातः करस्पर्शेन माधवः ॥ ८ ॥**

अवो ये मालती जाति : अवो मल्लिके पुष्पयाति ॥ यूथिके वो भाग्यवती : सादर असा इकडे ॥ ७१ ॥ तो मायाविलासधर्त्ता : आणि तियेचा नियंता ॥ माधव जो रमाभर्ता : तो आमुतें सांडुनि गेला ॥ ७२ ॥ अवो नकळत आमुतें : तो गेला चोरुनि चित्तें ॥ तो कृष्ण काये तुमते : येथें आडळला असे ॥ ७३ ॥ असो तो नन्दानन्दनजी : तुह्मी देखिला काय

आजि ॥ जो समुदायामाजि : क्रीडत होता आतां ॥ ७४ ॥ तो सूलोचन सावळा : काय याचि मार्गे गेला ॥ तो तुह्मी काय देखिला : निववविलें कीं तुमतें ॥ ७५ ॥ ह्मणाल आह्मि मुढजाति : तेणेंसि कैसि संगति ॥ ज्या कृष्णसंगे विश्रांति : पावावी येथें ॥ ७६ ॥ आणि तयाची गति : आह्मिं काइ जाणों मन्दमति ॥ ऐसें जरि काहिं सति : ह्मणाल वो तुह्मि ॥ ७७ ॥ तरि हे बाह्य विषमता : तेथें नाहिं सर्वथा ॥ श्रीकृष्ण सारभोक्ता : रसज्ञ जो सुजान(ण) किं ॥ ७८ ॥ आणि तुह्मी गुणाढ्यता : टाकूनि धरिलि नम्रता ॥ हें मानलें रमानाथा : तेणें तो सन्तुष्ट वो ॥ ७९ ॥ याचि लागि वो सति : पुसतसों तुह्माप्रति ॥ तुम्हासि काय तेणें सम्प्रति : स्पर्शिलें निज-करें ॥ ८० ॥ प्रीति करित होंत्साता : गेला तुह्मां देखतां ॥ असो तुम्ही आमुचा भर्ता : देखीला काइ जातां ॥ ८१ ॥ सम्बोधोनि सुमनवल्लीतें : ऐसें जालें पुशिजेतें ॥ मग देखिलें अवचितें : आम्रादिकांतें ॥ ८२ ॥ असो तें वृक्षजात : जाणोनि सर्वोपकारवन्त ॥ यांचा ठांई नन्दसुत : विचरला असेल ॥ ८३ ॥ जे कोण्हि पदार्थ जिति : देहादिकिं ज्यासि विरक्ति ॥ ते विशेषें आवडति : नन्दानन्दन कृष्णजीतें ॥ ८४ ॥ त्या भगवत्प्रीतिकरांतें : अनु-सरोनि गोपीशतें ॥ सम्बोधोनि त्या वृक्षांतें : कृष्णार्थ पुसती ऐसें ॥ ८५ ॥

**चूतप्रियालपनसासनकोविदार-**
**जंब्वर्कबिल्वबकुलाम्रकदम्बनीपाः ॥**
**येऽन्ये परार्थभवका यमुनोपकूलाः**
**शंसन्तु कृष्णपदवीं रहितात्मनां नः ॥ ९ ॥**

येथें चूत येणें संकेतें : संबोधिलें आम्रवृक्षातें ॥ आणि प्रियाळ संज्ञितें : चार वृक्ष जो ॥ ८६ ॥ आणि फणस जो ते वनिं : तोहि देखिला नयनिं ॥ त्या फनसातें भामिनीं : पुसों आदरिलें ॥ ८७ ॥ आणि आसन या संकेतें : खिरणीवृक्ष जो तेथें ॥ आणि कोविदार तरुतें : संबोधिलें तिहिं ॥ ८८ ॥ आणि जंबु जो यजनि : जांबूळ या अभिधानि ॥ बिल्व जो प्रसिद्ध वनि : अर्क जो विहाडा ॥ ८९ ॥ तयांतेंहि संबोधिलें : तैं बकुळातें देखिलें ॥

त्यातें तिहिं ह्मणतिलें : किं अगा ये बकुळा ॥ ९० ॥ आम्रशब्दें करुनि : आंबसोल ख्यात जनि ॥ त्यातेंहिं भामिनी : पुसत्या जालिया ॥ ९१ ॥ आणि नीप कदंब दोन्हि : कळंबभेद या जनिं ॥ त्यांतेंहिं त्या भामिनी : ह्मणती अगा कळंब हों ॥ ९२ ॥ एवं त्या गोपिकासती : तया वृक्षातें ह्मणति ॥ अगा ये वनतरुजाति : विनाति आइका तुह्मी ॥ ९३ ॥ आणिकही वृक्षि एथें : परार्थ धरिलें देहातें ॥ साहोनि सीतवातोष्णातें : सर्वोपकारि तुह्मी जे ॥ ९४ ॥ असो सर्वही शरीर : फळपत्रपुष्पादि संभार ॥ देउनि जनासि विश्रांतिकर : छायादि निमित्तें ॥ ९५ ॥ त्याहि वरि विशेषेंसिं : जें तुह्मी यमुनातीरवासी ॥ शैत्यगुणें देशस्थांसि : उपकारकर्ते ॥ ९६ ॥ आधिंच उपकारी जन : आणि केलें तीर्थसेवन ॥ त्याहीवरी सन्निधान : श्रीकृष्णजिचें ॥ ९७ ॥ ते तुह्मी धन्य जीवी जन : आइका येक वचन ॥ आह्मासि श्रीकृष्णेंविण : त्रैलोक्ये शून्य जालें ॥ ९८ ॥ असो ज्या आमुचिं चित्तें : हरिलीं तेणें नन्दसुतें ॥ त्या विगतचित्ता तुमतें : आलों हो शरण ॥ ९९ ॥ त्या निजशरणा आमुतें : सांगावें कृष्णगतीतें ॥ कोणे मार्गें कृष्णजीतें : पावोन आह्मीं ॥ २०० ॥ ज्या आह्मी विगतचित्ता : कृष्णविरहाकाळिता ॥ त्या आह्मासि व्यवस्था : कृष्णाचि सांगा ॥ १ ॥ असो आह्मी कृष्णाप्रति : पावोन कवने (णें) रिती ॥ तुह्मी ऐसि काहिं युक्ति : सिकवा आमुतें ॥ २ ॥ जेवि कोण्ही सज्जन : तीर्थादिकातें सेउन ॥ असती हरिपरायण : परमगतीतें जाणते ॥ ३ ॥ तया सज्जना जनातें : जे मुमुक्षु ते स्वहितातें ॥ पुसती निजगतीतें : शरण जाउनि अत्यंत ॥ ४ ॥ तेवि तो गोपिकागण : वृक्षादि जे भगवज्जन ॥ त्यांसि जाउनि शरण : कृष्णातें पुसतुसे ॥ ५ ॥ नातरि विरहाचे उन्नति : सर्वत्र जालि कृष्णस्फुर्ति ॥ तेणें शरण जाति : सर्वत्र तद्बुद्धि ॥ ६ ॥ असो कृष्णचित्ता भामिनी: उपाधीतें न गणूनि ॥ करिती त्या चिंतवणी : सर्वत्र कृष्णाचि ॥ ७ ॥ एवं करितां चिंतवणी : कृष्ण पदांकित मेदिनी ॥ अकस्मात देखोनि : स्तविती तीतें ॥ ८ ॥

किं ते कृतं क्षिति तपो बत केशवांघ्रि
स्पर्शोत्सवोत्पुलकितांगरुहैर्विभासि ॥

**अप्यंघ्रिसम्भव उरुक्रमविक्रमाद्वा**
**आहो वराहवपुषः परिरंभणेन ॥ १० ॥**

अवो ये महीतळीं : तुवां काय सुकृतें केलिं ॥ तपें कोण तपीनलिं : तेणें तुं शोभलोसि ऐसी ॥ ९ ॥ केशवशब्देंकरुन : पुरुष जो आदिनारायण ॥ ज्याचें नाम निर्वचन : केलें असे पूर्वि ॥ १० ॥ जो घनशाम शरीरी : प्रस्तुत नंदाचे घरिं ॥ निजभक्तांचा कैवारी : व्रजजनार्तिहर्त्ता ॥ ११ ॥ ॥ ११ ॥ त्याचिया चरणस्पर्शें : उत्सव जो जाला दिसे ॥ त्या महोत्सव विशेषें : अंकुरलें अंग ॥ १२ ॥ त्या तृष्टरोमांचित पंक्ति : तृणांकुर जे शोभती ॥ सोत्सव अंगि मिरवति : तेणें शोभलीसि ॥ १३ ॥एवं केशवांघ्रियुग : स्पर्शोनि जे पुलकितांग ॥ त्या अंगप्रभा सुभग ॥ शोभलीसि वो बहु ॥ १५ ॥ ऐशा उक्तलक्षणे क्षितीतें : देखोनि विरह जाला त्यांतें ॥ तो बत या संकेतें : प्रकट केला तिहिं ॥ १५ ॥ मागुती त्या क्षितीप्रति : विशेषें गोपी पुसती ॥ तुज येवढी संपत्ति : कैंपासूनि आली ॥ १६ ॥ हा अंघ्रिस्पर्श जो काहिं : तो आजिचा असे काइ ॥ एके देशीं कृष्णें पाईं : स्पर्शीलें जेव्हां ॥ १७ ॥ अथुवि विचें चोरुन : तो यशोदानंदनंदन गेला त्या प्रसंगें करुन : स्पर्शीलि परि ॥ १८ ॥ येवढी संपत्ति तुतें : आली काय था निमित्तें ॥ कित्रां वामनावतारिं तुतें : आक्रमिलें स्वपदें जें ॥१९॥ त्या उत्सावाचेनि गुणें : तुं शोभलीसि येणें मानें ॥ कित्रां वाराहरूपें तेणें : आदिपुरुषें जें तुज ॥२०॥ निजशरीरेंकरुन : दिधलें वो आलिंगन ॥ तया आलिंगनें जाण : शोभलीसि काय ऐसी ॥ २१ ॥ एवं पदांकितें भूमीतें : देखोनि ते गोपीशतें ॥ जाणति जालि जें येथें : सांपडला श्रीकृष्ण ॥ २२ ॥ जाणती कृष्णाची शुद्धि : पावों न आतां त्रिशुद्धि ॥ उचंबळला प्रेमाब्धि : तो सांवरेना ॥ २३ ॥ यास्तव त्रिप्रकारें करुन : केलें भुमिचें स्तवन ॥ नाना तारि यामिषें निदिध्यासन : केलें कृष्णाचें ॥ २४ ॥ जेवि गुरुशास्त्रें करुन : सकृत् जालें वस्तुज्ञान ॥ तें निदिध्यासनें विण : परोक्ष होतसे ॥ २५ ॥ तेवीच त्या व्रजसती : किंचित् प्राप्ता कृष्णाप्रति ॥ परि तेंचि जालें मागुति :

गर्वासि मूळ ॥ २६ ॥ निदिध्यासनें वांचुन : नेणती पुरतें महिमान ॥ याला-गि देखताचि कृष्ण : परोक्ष जाला ॥ २७ ॥ परि त्या सुखाचेनि चवी : त्या खोंचलिया जीवीं ॥ विचारिती कृष्णपदवी : निदिध्यासनें ॥ २८ ॥ तेंचि करितां चिंतन : भूमीचें केलें स्तवन ॥ तवं नेत्रशोभासंपन्न : देखिलिया हरि-णी ॥ २९ ॥ असो त्या नेत्रांचा ठाइं : हे शोभा जैसी काहिं ॥ ते अन्यत्र कोठें नाहिं : ह्मणोनि तर्क जाचा ॥३०॥ जें यांच्या नयनशोभेतें : विस्ता-रिलें नंदसुतें ॥ सार्थक केलिं जीवितें : आजि या हरिणींचिं ॥ ३१ ॥ नयनशोभा धरिली : ते आजि सार्थक जाली ॥ श्रीकृष्ण वनमाळी : निहा-ळिला इहिं ॥३२॥ ऐसें देखोनि तयांतें : विरह होउनि गोपी तेथें ॥ आइक राया हरिणीतें ॥ पुसताति ऐसें ॥ ३३ ॥

**अप्येणपत्न्युपगतः प्रिययेह गात्रै-**
**स्तन्वन्दृशां सखि सुनिर्वृतिमच्युतो वः ।**
**कांतांगसंगकुचकुंकुमरंजितायाः**
**कुंदस्रजः कुलपतेरिह वाति गंधः ॥ ११ ॥**

अगो ये मृगपत्नि : सुनयने सखिये हरिणी ॥ अवधारिं तुजलागुनि : पु-सिजेतें ऐसें ॥ ३४ ॥ तो यशोदानंदसुत : जगदात्मा जगन्नाथ ॥ साक्षात् जो अच्युत : सदा आनंदस्वरूप ॥ ३५ ॥ तो चोरुनि आमुचिं चित्तें : गेला काय येणें पंथें ॥ तुझिया सुनयनातें : सार्थ करुनि ॥ ३६ ॥ असो तो सुं-दरवदन : शामतनु रूपरमण ॥ आजानुबाहु सुभूषण : कंदर्पदर्पहर्ता जो ॥ ३७ ॥ अत्यंत शोभाशोभित : या नयनांसि तृप्त करित ॥ या मार्गें काये नंदसुत : गेला कि नाहिं ॥ ३८ ॥ हे जे तुझे सुनयन : देखतसों स्थिर विस्तीर्ण ॥ निमिषोन्मेषहीन : टवंकारले दिसति ॥ ३९ ॥ ह्मणसी नंदानंदन : तो काय येकाकी संगशून्य ॥ प्रायशा त्यासि विहरण : एकाकीच असे ॥४०॥ ऐसें ह्मणसी पाहिं : तरि तुझी युक्ति जे काहिं ॥ येणे ऐसें पडतसे ठाइं : जें सखीसवें गेला ॥ ४१ ॥ घेउनि येखादे सखीतें : गमन केलें नंदसुतें ॥ तरि त्या प्रियेचे सांगातें : गेला काइ ॥ ४२ ॥ आह्मासही गमतें काहिं :

त्यासि एकाकी जाणें नाहिं ॥ तरि तो प्रियेंसवें काइ : देखिला तुवां ॥ ४३ ॥ ह्मणसी या मार्गें करुन : गेला तो नंदानंदन ॥ हे कासयावरुन : तुह्मी पुसतसा मातें ॥ ४४ ॥ तरि सुखावले दृष्टीतें : देखोनि तर्कलें आमुतें ॥ हें तों पूर्विंचि तुतें : निरोपिलें आसि ॥ ४५ ॥ आणि अन्य चिन्हावरून : विश्वासलें आमुचें मन ॥ जे आतां या मार्गें गमन : श्रीकृष्णें केलें ॥ ४६ ॥ कां जें आह्मी व्रजकांता : सदा श्रीकृष्णि रता ॥ त्या आमसि सुखें विचरतां : क्रमिला जो काळ ॥ ४७ ॥ ते साक्षात् श्रीचरण : सकळ शोभेचें सदन ॥ अधिष्ठुनि आमुचें हृद्वन : विचरतेवेळे ॥ ४८ ॥ तें जें हृद्यें प्रशस्तें : जें कृष्णानुरागें रंजितें ॥ श्रीकृष्णसंगनिमित्तें : संस्कारिलिं जें आह्मी ॥ ४९ ॥ असो कुंकुम जें काहिं : तें मर्दिलें निजहृदइं ॥ जेथें अन्य चिंतन नाहिं : श्रीकृष्णेंविण ॥५०॥ एवं हृदय जें कुचयुग : कुंकुमरंजित कांतांग ॥ त्या अंगि कृष्णसंयोग : संभोगकाळिं होतां ॥ ५१ ॥ असो कांतांगसंगकाळिं : श्रीकृष्णाचा वक्षस्थळिं ॥ विलंबित समनावळी : विराजत होति ॥ ५२ ॥ ते कुंकुमरागयुक्त : जाली पीत सुलोहित ॥ आणि सौगंध्येंहिं ऊर्जित : विस्फारली जे ॥ ५३ ॥ असो ते सुगंधाढ्य माळा : होती कृष्णाचे गळां ॥ तिचेचा अति आगळा : येथुसे सुगंध ॥ ५४ ॥ यास्तव आह्मासि गमलें : जें कृष्णें आतां गमन केलें ॥ आणि नेत्राहि देखिलें : अति प्रसन्न ॥ ५५ ॥ एवं तो गोकुळपति : भक्तजनचक्रवर्ति ॥ त्याचिया गळांची रुळती : कुंदकुसुममाळा जे ॥ ५६ ॥ त्या माळेच्या गंधोत्कर्षें : आम्हासि गमलें जें ऐसें ॥ तुझ्या नेत्रासि रमेशें : दिधला अवसर ॥ ५७ ॥ या नेत्रांची प्रसन्नता : देखोनि गमलें चित्ता ॥ जें कृष्ण येथुनि आतां : गेला असेल निश्चयें ॥ ५८ ॥ ऐसे त्या व्रजवासिनी : कृष्ण सुभरोनि मनिं ॥ त्या हरिणीतें अविष्ठुनि : पुसत्या जालिया ॥ ५९ ॥ नातरि हरिणीचे आकृती : त्या गोपींची अंतर्वृत्ति ॥ वियोग विरहार्ति : रुपासि आली ते ॥६०॥ त्या वृत्तीतें अविष्ठुन : कृष्णाचें गवेषण ॥ करिताजाला गोपीजन : निजगर्वपरिहारार्थ ॥ ६१ ॥ जेवि काहि मुमुक्षुजन : विद्यावृत्तीतें अधिष्ठुन ॥ करुनि अविद्याहरण : पावती भगवंतिं ॥ ६२ ॥

तेवींचि तो गोपीजन : हरिणीतें अधिष्ठुन ॥ करिता जाला गवेषण ॥ तेवींचि पुढती तेणेंचि पंथें : विचारितां श्रीकृ- गर्वरहित श्रीकृष्णातें ॥ ६३ ॥ पुडती तेणेंचि पंथें : विचारितां श्रीकृ- ष्णातें ॥ तंव फळसम्पन्ना वृक्षांतें : देखातिया जालिया ॥६४॥ ते फळसम्पन्न होत्साते : अवलंबिलें नम्रतेतें ॥ देखोनि गमलें त्यातें : जें कृष्णदर्शन स्पर्शीत हे ॥ ६५ ॥ इहिं शाखानम्रीभूतें : कृष्णातें केलिं दंडवतें ॥ ऐसें मानलें तयातें : जें हे परमभाग्यवंत कीं ॥ ६६ ॥ म्हणती पाहा वृक्षिं इहिं : जडत्वातें गणिलें नाहिं ॥ कैसे लागले कृष्णपाईं : विगताभिमान हे ॥६७॥ तस्मात् ज्यासि कृष्णदर्शन : तेचि अभिमानहीन ॥ हे तरु जन्मे असोन : भाग्याचे जाणवे ॥ ६८ ॥ असो येथें प्रस्तुत : चोजवेल कीं नंदसुत ॥ शौरि पां यांचे आचरित : हे कोणे स्थितीनें असति ॥ ६९ ॥ ऐसें धरुनि चित्तिं : कृष्णाची विलासगति ॥ पुसत्या जाल्या वृक्षांप्रति : तें आइकें राया ॥ ७० ॥

> बाहुं प्रियांस उपधाय गृहीतपद्मो
> रामानुजस्तुलसिकालिकुलैर्मदांधैः ॥
> अन्वीयमान इह वस्तरवः प्रणामं
> किंवाभिनंदति चरन्प्रणयावलोकैः ॥ १२ ॥

अहो ये तरुवरजाति : देखोनि तुमची नम्रस्थिति ॥ आम्हीं कृष्णदर्शना- र्थि : विश्वासलों येथें ॥ ७१ ॥ करुनि तुमची सार्थकता : येणेंचि मार्गे आतां ॥ गेला काइ रमाभर्ता ॥ चित्तें चोरुनि आमुचिं ॥ ७२ ॥ असो तो रमारमण : प्रस्तुत यशोदानंदन ॥ जो कीं आश्रोनि वृंदावन : क्रीडत होत्साता ॥ ७३ ॥ गमन करितां येणें पंथें : तुम्ही सांडुनि उद्धतेतें ॥ वारण जाउनि त्यातें : नमस्कार जो केला ॥ ७४ ॥ त्या तुमच्या नमस्कारातें : तेणें पाहोनि संतोषातें ॥ आनंदविलें तुम्हातें : प्रणयाव- लोकें काई ॥ ७५ ॥ असो स्वीकरुनि नमनातें : संतोषोनि नंदसुतें ॥ अव- लोकिलें काइ तुम्हातें : प्रीति करुनि ॥ ७६ ॥ हांगाल तेणें रमाळीलें : या मार्गे गमन केलें ॥ हें कैसें जाणतां आलें : परोक्षे करि तुम्हातें कीं ॥ ७७ ॥

तरि सुगंधा तुळसीमाळा : वाथि ( हि ) त्या प्रीतीनें गळां ॥ त्या सुगंधि लोवळा : भ्रमरगण जो ॥७८॥ तें सौगंध्यरजभुक्त : भ्रमरकुळ जें उन्मत्त ॥ सांडोनि अन्यकृत जात : अंधप्राय आसक्त ॥ ७९ ॥ तेजें गंधासक्त षट्पद : मत्तविव्हळ मदांध ॥ त्या षट्पदि जो नंदानंद : अन्वीयमान सर्वदा ॥ ८० ॥ असो अनुलक्षूनि ज्यातें : भ्रमरकुळें मद निवे ॥ गोठि तेणें काय तुमतें : अवलोकिलें प्रीतीकरिं ॥ ८१ ॥ एव पुरःसरुनि कृष्णातें : प्रवर्तलि भ्रमरगीतें ॥ ते येउनि श्रवणपथें : तर्कविलें आझासि तेणें ॥ ८२ ॥ जें चोरुनि आमुचि चित्तें : प्रिति पावउनि तुमतें ॥ या मार्गें नंदसुतें : आतां गमन केलें ऐसें ॥ ८३ ॥ जन्हि तो अव्यक्तगाति : तन्हि मन भ्रमरपंक्ति ॥ स्वच्छंदानंदें गुण गाति : वर्णिती त्यातें प्रकट ॥ ८४ ॥ तोंचि होउनि आतां द्वार : त्याचे गवेषणीं अवसर ॥ पावोनि आलि तत्पर : तत् शोधार्नि जालों ॥ ८५ ॥ अहो ये पादपजाति : शरण आलों तुह्माप्रति ॥ तो श्रीकृष्ण सुखमूर्ति : भेटेल काइ आतां ॥ ८६ ॥ ह्मणाल तुह्मी गोपगृहिणी : असावें नीजभुवनीं ॥ त्या नंदनंदना शोधुनि : प्रयोजन काई ॥ ८७ ॥ ऐसें असेल मनोगत : तरि तो नव्हे नंदसुत ॥ साक्षात् वैकुंठनाथ : रामानुज या पदें॥८८॥ जो प्रसिद्ध असे पुराणिं : कृष्णत्वाची अवगणी ॥ बळिरामातें पुरःसरुनि : अवतरला येथें ॥ ८९ ॥ एवं रामानुजत्वें जाणोनि : कृष्ण सूचिला यदुमागि ॥ जो वसुदेवभुवनिं : सुरसाह्यार्थ प्रकटला ॥ ९० ॥ सांडुनि पदाभिमानातें : ब्रह्मादि भजती ज्यातें ॥ तो श्रीकृष्ण आमुतें : भाग्येंकरिं जोडला ॥ ९१ ॥ तेथें दुष्कर्म आड आलें : श्रीकृष्णें प्रस्थान केलें ॥ परि मन तेथें संस्कारलें : तेणें धुंडितों ॥९२॥ एवं मन हें कृष्णपाइं : तरि संसारिं चाड काई ॥ गति आणिक नाहिं : कृष्णेवीण आमुतें ॥ ९३ ॥ ह्मणाल तो नव्हे नंदसुत : साक्षात् वैकुंठनाथ ॥ तरि तो सर्वांतस्थ : सदा असावा निश्चळ ॥ ९४ ॥ आणि सांडुनि गृहशेतें : तुह्मी पावल्यात कृष्णातें ॥ तरि सांडुनि तो तुमतें : कैसा गेला कोठें ॥९५॥ ऐसें ह्मणाल येथें : तरि अविष्ठुनि कोण्ही येके सखीतें ॥ सर्वांतस्थाही त्यातें : प्रस्थान घडलें ॥ ९६ ॥ किंवा तियेच्या आकृति : आमुच्या गर्वाची मूर्ति ॥ तीच्या

स्कंधि तो श्रीपति : ठेउनि स्वबाहु ॥९७॥ चित्तें चोरुनि गेला : तो कृष्ण काये देखिला ॥ तुमच्या नमस्कारासि रिझला : सुखी केलें काइ ॥ ९८ ॥ येथें न गमों तुमतें : जें पराधीनता आली त्यातें ॥ तरि तो स्वक्रीडापंथें : प्रवर्ततां श्रीकृष्ण ॥ ९९ ॥ त्या क्रीडेसी उपकरण : प्रिया केली निर्माण ॥ ते नीजपतीतें अनुसरोन : वर्तु असे सदां ॥ २०० ॥ तीसि मोहावया कारण : हातिं केलें पद्मग्रहण ॥ दाविलें रूप रमण : सौष्ठव्य श्रियेचें ॥१॥ नातरी आमुचा गर्वपरिहारार्थ ॥ प्रियेचा स्कंधि हात : ठेउनि रमानाथ ॥ परोक्ष जाला ॥ २ ॥ परी आमुचा असोनि हिति : कमळ धारिलें स्वहस्तिं ॥ तेणें मिषें चित्तवृत्ति : निजस्या केला ॥ ३ ॥ तिरोधानाचा आसन्नकाळिं : तो कृष्ण कमळ माळी ॥ घेउनि ते करतळिं : प्रकटिली शोभा ॥ ४ ॥ अनुसरोनि त्या शोभे : आलें जें आनंदभरितें ॥ आनंदार्णवि चित्तें : भिजलीं अमुचिं ॥ ५ ॥ त्याचि संस्कारें करुन : आम्ही आदरिलें गवेशण ॥ एवं गृहीतपद्म श्रीकृष्ण : पुसत असो ॥ ६ ॥ ऐसें तिया भामिनी : त्या वृक्षांतें अधिष्ठुनि ॥ पुसती तों तेचि क्षणि : वृक्षाश्रिता लता होत्या ॥ ७ ॥ देखोनि जाल्या हर्षपरा : त्यामाजि येकि सुंदरा ॥ अनुसरोनि नंदकुमारा : गवेषित असे ॥८॥ असो त्या समुदायामाझारिं : कोण्हि येकि सुंदरी ॥ तो कंदर्पदर्पहारी : कमळनयण(न) कृष्ण ॥ ९ ॥ त्या कृष्णस्पर्शिता लता : देखोनि पुलकांकिता ॥ मानिनी जाली जे आतां : भेटैल कृष्ण ॥ १० ॥ म्हणोनि ते सखियांतें : संबोधोनि शोधी कृष्णातें ॥ आइक राया सुचित्तें ॥ वाणिजेतें तेंहिं ॥ ११ ॥

**पृच्छतेमा लता बाहूनप्याश्लिष्टा वनस्पतेः ॥**
**नूनं तत्करजस्पृष्टा बिभ्रत्युत्पुलकान्यहो ॥ १३ ॥**

त्या सख्यांतें येक सखी : म्हणे हें नवल देखिलें कि ॥ इया लता या लोकिं : भाग्याच्या कैशा ॥१२॥ या जातिविभागें लता : परी प्राप्तकृष्णस्पर्शिता ॥ आतां यतें आमुचा भर्ता : पुसावा वो अवस्य(श्य) ॥१३॥ असो मानातें करुनि परतें : शरण जावें यां लतांतें ॥ पुसवें वो कृष्णातें : या वाटे गेला काये ॥१४॥ म्हणाल चोरुनि चित्तें : गमन केलें नंदसुतें ॥ आम्हा अभाग्या गर्वि-

घ्यातें : सांडिलें कृष्णें ॥१५॥ तरि प्रणयावलोकलेशें : संस्कारिलीं जें मानसें ॥ त्या संस्कारविशेषें : कृष्णिंच प्रीति जाली ॥१६॥ तेणें तत्सं गी जे जन : त्यांसि जाउनि शरण ॥ तत्प्राप्तीचा पुसावा यत्न : निःसंशय असोनि ॥१७॥ ह्मणोनि कृष्णप्राप्तीची वाट : हे होय किं नव्हे नीट ॥ हें पुसा वो यांतें प्रकट : कृष्ण-स्पृष्टांतें ॥१८॥ ह्मणाल या भर्तारसंगति : निजाश्रमिं वसति ॥ यांसि कृष्णसंग-प्राप्ति : हें केसेंनि घडे ॥१९॥ आलिंगूनि स्वपतितें : संतुष्ट दिसती चित्तें ॥ आतां कृष्णसंगति वल्लितें : लक्षिलिं कोणे रीति ॥२०॥ ऐसें ह्मणाल वो सति : यांचे पति जे वनस्पति ॥ त्या वृक्षांचे हे दिसति : शाखालक्षण बाहु जे काहिं ॥ २१ ॥ त्या निजपति बाहुते : जरि हे आलिंगिलें दिसतें ॥ परि सुखोद्रेक जो यांते : संपादला किं प्रत्यक्ष ॥ २२ ॥असो हर्षाचिया उन्नति : पुलकांकिता दिसति ॥ आनंदबिंदु स्रवति : सर्वांगि जे यांचिया ॥ २३ ॥ या सुखासि हेतु वो सति : नव्हे भर्तारांची संगति ॥ त्या अति सुखाची जाति : सर्वथा हे नव्हे किं ॥ २४ ॥ पतिधर्म जो काहिं : या व्यवहाराचाचि ठाईं ॥ तो या ग्राम्य पतिधर्मिं काइ : सत्वोद्रेक इतुका असे ॥ २५ ॥ निजपतिचा संगति : येव्हढी कैंचि सुखप्राप्ति ॥ पाहा या भाग्याचा किती : कृष्णस्पर्शिता ॥ २६ ॥ करज संज्ञेकरिं : नखे जें अति साजिरिं ॥ त्या नखिं वल्लीसुंदरी : साक्षात् कृष्णें स्पर्शिल्या किं ॥ २७ ॥ असो पुष्पकृं-तनवेळे : नखस्पर्श जे यातें जाले ॥ तेणें सर्वांगिं यासि आले : आनंदस्वेदकण ॥ २८ ॥ यांच्या भाग्याची नवाई : आतां वर्णावी किती काइ ॥ कैसें पां धरिलें इहिं : कृष्णस्पर्शसुखस्वेद ॥ २९ ॥ ह्मणोनि जाउनि शरण : यांतिं करावें वृत्तशोधन ॥ ऐसें परस्परें गोपीजन : बोलता जाला ॥ ३० ॥ नातरि त्या गोपकांता : कृष्णिं प्राप्त आपादता ॥ तत्र कर्मगती गर्वव्याप्ता : उत्सुकतेकरिं जाल्या ॥ ३१ ॥ मग तो नंदानंदन कृष्ण : निजवेषें आभारोन ॥ त्या नि-जवत्सळासि तिरोधान : आदरिता जाला ॥ ३२ ॥ दाउनि निज वियोगातें : अवस्था होआवी त्यांतें ॥ विसरोनि देहादिकातें : आपणातें स्मरावें ॥ ३३ ॥ या हेतु करूनि युक्ति : घेउनि योगमायेची बुंथि ॥ प्रकट असतांचि त्यांप्रति :

गुरु जाला नाविक ॥ ३४ ॥ मग तें वनिताशतें : अधिष्ठुनि वृक्षादिकातें ॥ अतो मित्र करुनि भलतें : स्मरत्या जाल्या ॥ ३५ ॥ नातरि वेधलेनि चित्तें : व्यक्तिगात्रि कृष्णजीतें ॥ मानुनि जेथें तेथें : आटविती कृष्णातें ॥ ३६ ॥ आतां त्या स्मरणदार्ढ्यें करुन : सर्वांगिं सुभरला कृष्ण ॥ तार्तम्यापासुन : परतलें चित्त ॥ ३७ ॥ अधिष्ठुनि वृक्षादिकातें : कृष्णशोधासक्त होतें ॥ तें टाकुनि गोपीशतें : आपुलालाचि ठाईं ॥ ३८ ॥ रूपगुणें कर्मयुक्त : स्मरति जाहि नंदसुत ॥ श्रीकृष्ण प्रेमाप्लुतचित्त : विसरोनि इतर ॥ ३९ ॥ असो त्या गोपकांता : गुणकर्मतेंचि स्मरतां ॥ असत्या जाल्या उन्मत्ता : अनुकरल्या तैशा ॥ ४० ॥ नाना विषयांतें विसरोन : उन्मत्ताचे परि मन ॥ होउनि श्रीकृष्णस्मरण : गुणकर्मयुक्त हें ॥ ४१ ॥ होउनि त्यांसि स्वशरीरें : अनुगमलिं कृष्णाकारें ॥ त्या गुणकर्मांचा अनुकारें : वर्तल्या जाल्या ॥ ४२ ॥ तेंचि विस्तरें करुन : रायातें व्यासनंदन ॥ निरोपितातें तेथें अवधान : सज्जनाचें असावें ॥ ४३ ॥

**इत्युन्मत्तवचो गोप्यः कृष्णान्वेषणकातराः ॥**
**लीला भगवतस्तास्ता ह्यनुचक्रुस्तदात्मिकाः ॥ १४ ॥**

पूर्वोक्तिं त्या गोपकांता : श्रीकृष्णगवेषणरता ॥ असोनि विकळचित्ता : उन्मत्ताचिया परि ॥४४॥ असोनि कृष्णस्थें चित्तें : बोलिलिया वृक्षादिकातें ॥ म्हणोनि उन्मत्तवचना हें त्यांतें : विशेषण घडलें ॥ ४५ ॥ ज्या कहिं पूर्वानुभूता : कृष्णलीळा अत्यद्भुता ॥ अलौकिका ज्या प्रशस्ता : पापक्षयकरा ॥ ४६ ॥ त्या ज्या अपूर्वा लीला : असोनि विरहविव्हळा ॥ आपुलाला ठाईं सकळा : अनुकरित्या जाल्या ॥ ४७ ॥ असो त्या व्रजसुंदरी : उन्मत्ताचिया परि ॥ कृष्णक्रीडा स्वशरीरिं : दाविल्या जालिया ॥ ४८ ॥ गोपी येकि येकिं प्रति : त्या क्रीडांचे अनुकार कारिती ॥ चित्तिं सुभरोनि कृष्णमूर्ति : विरहकातरा ज्या ॥ ४९ ॥ तदात्मिका होत्सात्या : आपणहिं जाल्या क्रीडत्या ॥ आम्हीच कृष्ण ऐसें मानित्या : जाल्या गोपी ॥ ५० ॥ तेजें काहिं क्रीडन : उत्तरग्रंथें करुन ॥ आइक राया सावधान : वर्णिजेतें तें ॥ ५१ ॥

कस्याश्चित्पूतनायंत्याः कृष्णायंत्यपिबस्तनम् ॥
तोकायित्वा रुदंत्यन्या पदाहंच्छकटायतीम् ॥ १५ ॥

कोण्ही येकी विलासिनी : जाली पुतनावेषधारिणी ॥ आणि येक भामिनीः बाळकृष्ण जाली ॥ ५२ ॥ ते धरुनि कृष्णनटातें : पूतनारूपींचे स्तनातें ॥ प्राशितां नेणो तियेतें : कृष्णरूपा ग्राशील काइ ॥ ५३ ॥ आणिकि येकि सती : आपणा बाळत्वें कल्पिती ॥ आणि येकि जाली भाविती : शकटरूपें ॥ ५४ ॥ त्या शकटभाविनीतें : बाळरूपा पदघातें ॥ हाणोनि विपर्यासें तीतें : पाडिती जाली गोपी ॥ ५५ ॥ त्या गोपीनें बाळलीळे : किंचित् रुदन केलें ॥ रडतियेणें पाडिलें : शकटायती गोपिकेतें ॥ ५६ ॥

दैत्यायित्वा जहारान्यामेका कृष्णार्भभावनाम् ॥
रिंगयामास काप्यंघ्री कर्षती घोषनिःस्वनैः ॥ १६ ॥

कोण्ही येकि व्रजांगना : करुनि दैत्यकल्पना ॥ आणि येकि कृष्णभावना : बाळरुप जाली ॥ ५७ असो तृणावर्तें येउन : पूर्वि केलें कृष्णग्रहण ॥ तो तृणावर्त आपण : कल्पिती जाली ॥ ५८ ॥ आणि येकीचें मन : भाविलें जालें कृष्णपण ॥ अधिष्ठुनि नंदभुवन : बाळत्वें असतां ॥ ५९ ॥ त्या बाळायती गोपीतें : हरिलें दैत्यवेषें तेथें ॥ असो तृणावर्त्त हे जियेतें: भावना होति ॥ ६० ॥ ते बाळवेतें हारिती जाली : किंचित् गगनिं गति दाविली ॥ आणि येकि अनुकरली : रिंगमाण कृष्णरूपें ॥ ६१ ॥ असो पायांतें आकर्षुन : होती जाली रिंगमाण ॥ तेणें प्रसंगें करुन : नूपुरें जें पाइंचि ॥ ६२ ॥ तया नूपुरांचे ध्वनि : उपटलें जें काहिं गगनिं ॥ त्या ध्वनिगजरें करुनि : रंजविती व्रजस्थांतें ॥ ६३ ॥ असो विसरोनि गोपीत्वातें : अंगीकरुनि कृष्णत्वातें ॥ मि गोकुळामाजि रांगतें : हें चिंतिती जाली ॥ ६४ ॥

कृष्णरामायिते द्वे तु गोपायंत्यश्च काश्चन ॥
वत्सायतीं हंति चान्या तत्रैका तु बकायतीम् ॥ १७ ॥

कोण्ही येका दोघी जनी ( णी ) : कृष्णचित्ता व्रजवासिनी ॥ आपण रामकृष्ण हाणोनि : अनुकरल्या जाल्या ॥ ६५ ॥ कितियेका व्रजसती : जा-

ळिया गोपवेषवती ॥ आणि येकी कल्पिती : जें आपण गाइचिं वत्सें ॥६६॥ कोण्ही येकि गोपबाळि : वत्सासुरत्वें अनुकरली ॥ वत्सग्रहणासि आली : तवं देखिली कृष्णायतीनें ॥ ६७ ॥ त्या वत्सासुरभावितेते : मारिलें ऐसें मानिलें चित्तें ॥ तवं वाटलें एकीतें : जें मिं बकासुर आलिं ॥ ६८ ॥ त्या बकरूपेतें मारिलें : ऐसें कृष्णवेषीनें दाविलें ॥ एवं परस्परें आदरिलें : कृष्णाकार विहरण ॥ ६९ ॥

**आहूय दूरगा यद्वत्कृष्णस्तमनुवर्ततीम् :**
**वेणुं क्वणंतीं क्रीडंतीमन्याः शंसंति साध्विति ॥ १८ ॥**

तो नंदानंदन कृष्ण : अधिष्ठुनि वृंदावन ॥ करित असतां गोरक्षण : आपुलेनि लीलाछंदें ॥ ७० ॥ तवं ते गाइची पंक्ति : गेली असतां दूर प्रदेशाप्रति ॥ तरि स्वता तो श्रीपति : वैकुंठाधिप कृष्ण ॥ ७१ ॥ मधुरवेणुस्वरें करुन : त्या गाइंचें करी आवाहन ॥ तेवींच तो गोपीजन : स्मरोनि त्या कर्मातें ॥ ७२ ॥ कोण्ही येकि गोपबाळि : कृष्णकर्मातें अनुकरली ॥ स्वशरीरिं दाविती जाली : कृष्णत्वाचा आकार ॥ ७३ ॥ वेणुस्वरातें अनुकरोन : गाइंचें केलें आवाहन ॥ क्रीडती जाली आपण : कृष्णाचे परिं ॥ ७४ ॥ त्या क्रीडतिये गोपीतें : इतरें गोपिकांचिं शतें ॥ आइकोनि वेणुस्वराकारातें : प्रशंसिति जालिं ॥ ७५ ॥ जेवि गोपाळांचा गण : आइकोनि कृष्णवेणुवादन ॥ भला भला ऐसें म्हणोन : प्रशंसिती कृष्णातें ॥ ७६ ॥ तेवि कृष्णाकारवनीते : प्रशंसिती गोपीशतें ॥ कृष्णमय असोनि चित्तें : भला भला म्हणति ॥ ७७ ॥ आपण गोपांगना : हे बुडाली अवघी भावना ॥ अंतरिं सुभरला राणा : वैकुंठिचा श्रीकृष्ण ॥ ७८ ॥ यालागि कृष्णकृतितें स्मरोन : तदाकारें गोपीजन ॥ अनुकरोनि आपण : क्रीडतुसे राया॥ ७९ ॥

**कस्यांचित्स्वभुजं न्यस्य चलंत्याहापरानुन ।**
**कृष्णोहं पश्यत गतिं ललितामिति तन्मना : ॥ १९ ॥**

तेचि गोपवेल्हाळी : जे इतरांहिं प्रशंसिली ॥ श्रीकृष्णाकारें जे नटली : जीनें आचमदिलें गोधनें ॥ ८० ॥ तेचि येके गोपीस्कंधातें : वरुनि निजहस्तें ॥

कृष्णाचे परिं चळनातें : करित होत्साति ॥ ८१ ॥ इतरां गोपिकांप्रति : दाविति जाली निजगति ॥ ह्मणे पाहा वो समस्ती : मी कृष्ण जालिं कैसी ॥ ८२ ॥ मिं नंदानंदन वो सति : पाहा माझी चलनगति ॥ पदिं पदिं उघडती : मंगळाचिया खाणी ॥८३॥ नाना पाहा तुह्मी हे गति : हे जे कृष्णाची चालती रीति ॥ जे पुर्वीं देखिली होति : ते होये किं वो सखि ॥ ८४ ॥ ऐसी ते गोपवनिता : जे विरहमदोन्मत्ता ॥ पावोनि कृष्णमयता : विसरली आपणयांतें ॥८५॥ त्या विरहाची उन्नती : कृष्णकर्मातें आचरती ॥ तो अनुकार गोपिंप्रति : दावितसे ऐसा ॥ ८६ ॥

**मा भैष्ट वातवर्षाभ्यां तत्राणं विहितं मया ॥**
**इत्युक्त्वैकेन हस्तेन यतंत्युन्निदधेंबरम् ॥ ५० ॥**

इंद्रयागभंग निमित्तें : कोपोनि अदितीसुतें ॥ पीडिं आदरिलें गोकुळातें : वातवर्षेंकारिं ॥ ८७ ॥ तैं श्रीकृष्णें नंदसुतें : पर्वत उचलोनि एके हातें ॥ सपरिकरें गोकुळातें : रक्षिलें जें काहिं ॥ ८८ ॥ याही कर्मातें स्मरोनि : ते कृष्णायिता भामिनी ॥ आपण कृष्ण हें जियेचा मनिं : संचार जाला ॥८९॥ ते इतरां गोपींप्रति : म्हणे अवधारा वो समस्ती : या वायुवृष्टीची चित्तिं । न धरावी शंका ॥ ९० ॥ या भयापासाव रक्षण : म्यां विचारिलें जें संपुर्ण ॥ असो ये विषईं निवारण : तें करिन मिं प्रस्तुत ॥ ९१ ॥ ऐसें बोलोनि ते सती : गोवर्धनाचिया आकृति ॥ जाली येके हातें उचलिती : स्वपरिधाना वस्त्रानें ॥ ९२ ॥ असो सोडोनि वसन नेसतें : तें घडी करुनि येके हातें ॥ उचलुनि म्हणें म्या तुमतें : रक्षिलें आजि ॥ ९३ ॥ तंव आणीक एक सती : कृष्णकर्मातें जाली स्मरती ॥ काळ्यानामें सर्पपति : दंडिला जो श्रीकृष्णें ॥ ९४ ॥ तें स्मरोनि निज चित्तिं : तैसेंचि जाली आचरती ॥ आईक राया तुजप्रति : निरोपीजेतें ऐसें ॥ ९५ ॥

**आरुह्यैका पदाक्रम्य शिरस्याहापरां नृप ॥**
**दुष्टाहे गच्छ जातोहं खलानां ननु दंडधृक् ॥ २१ ॥**

कोण्ही येकि गोपगृहिणी : विरहाकुळा कामिनी ॥ श्रीकृष्णत्वें अनुकरोनि : अन्ये गोपीतें ॥ ९६ ॥ शिराचा ठाइं जाण : करुनि आरोहण ॥ पदेंकरिं

आक्रमुन : काळियासर्पवेषे गोपीतें ॥ ९७ ॥ कृष्णत्वाचें आवेषें : बोलती जाली ते ऐसें ॥ पूर्वि काशियातें रमेशें : बोलिले होतें कृष्णें ॥ ९८ ॥ म्हणे अगा दुष्टा अहि : येथुनि अतां त्वरा जाईं ॥ आजि या कालिंदीच्या डोहिं : क्षणहिं नसावें ॥ ९९ ॥ प्रस्तुत मिं नंदकुमर : परि खळांचा दंडधर ॥ अवतरलों येथुनि सत्वर : जाइं काळिया ॥ ४०० ॥ ते कृष्णाइता भामिनी : सर्पाइतेतें आक्रमोनि ॥ शिराचा ठाईं पीडोनि : बोलति जाली ऐसें ॥ १ ॥

**तत्रैकोवाच हे गोपा दावाग्निं पश्यतोल्बणम् ॥**
**चक्षूंष्याश्वपिदध्वं वो विधास्ये क्षेममंजसा ॥ २२ ॥**

तवं कोण्ही येकि सखी : जाली आणिका कर्मातें स्मरति ॥ पुर्वि दावाग्नीनें गोपपंक्ति : पीडली होति ॥ २ ॥ तया दाव नळातें प्राशुन : सोडविले निजशरण ॥ त्या कर्माचें अनुकरण : करुनि ते गोपिका ॥ ३ ॥ संबोधोनि गोपाळांतें : ह्मणे पाहा या अति उल्बणातें ॥ दावाग्नि हा तुमतें : पीडावया आला ॥ ४ ॥ तरि तुह्मीं समस्तं जनिं : मज कृष्णानिकट असोनि ॥ अति त्वरें करुनि : नेत्र झांका आपुलाले ॥ ५ ॥ या उल्बणनाशें तुमतें : देईन उत्तमा क्षेमातें ॥ सुखेंचिकरिं सर्वांतें : राखेन यापासुन ॥ ६ ॥ एवं एक जाली कृष्णाकृती : इतर जालिया गोपपंक्ति ॥ आचरती जाली ये रीति : दावाग्निआख्यानातें ॥ ७ ॥

**बद्धान्यया स्रजा काचित्तन्वी तत्र उलूखले ॥**
**भीता सुदृक्पिधायास्यं भेजे भीतिविडंबनम् ॥ २३ ॥**

पूर्वि जें श्रीकृष्णजीतें : यशोदेनें बांधलें होतें ॥ दधिभांडभंगनिमित्तें : दामबंधनें जैं ॥ ८ ॥ त्या दामबंधातें स्मरोनी : कोण्ही येकि कामिनी ॥ आपण यशोदा मानोनि : मंथाभंगकोपें ॥ ९ ॥ तीणें काढुनि सुमनमाळा : बांधली दुजी येकि वेल्हाळा ॥ उखळिं घनसांवळा : बांधला जैसा ॥ १० ॥ ते जे माळाबद्धा भामिनी : श्रीकृष्णत्वें अनुकरोनि ॥ सुंदरा सुलोचनि : भीताचे परि ॥ ११ ॥ मुखातें आच्छादुनि हस्तें : दाविती जाली भयाकारातें ॥ नानेक विडंबनातें : कृष्णासारिखें ॥ १२ ॥

**एवं कृष्णं पृच्छमाना वृंदावनलतास्तरून् ॥**
**व्यचक्षत वनोद्देशे पदानि परमात्मनः ॥ २४ ॥**

एवं उक्तप्रकारें करुन : कृष्ण पावतां अंतर्धान ॥ मग त्या गोपी गवेषण : कृष्णाचें करितां सर्वत्र ॥ १३ ॥ कृष्णस्थें असोनि चित्तें : विसरोनि देहभानातें ॥ कृष्णकर्में अत्यद्भुतें : तैशाचि अनुकरल्या गोपिका ॥ १४ ॥ मागुती ते हृदिस्थ मूर्ति : मनोनयनातें निववित ॥ तियेचा दर्शनिं तृषार्थिं : नयनसरोजे जालिं ॥ १५ ॥ म्हणोनि पुनः त्या सुंदरी : तया वृंदावना माझारि : पूर्वोक्ताचि परि ॥ तरुलतादिकां प्रति ॥ १६ ॥ कृष्णातें शोधित होत्सात्या : त्या वृंदावनामाजि भ्रमत्या ॥ त्यांतें जाल्या पुसत्या : जें कृष्णजी कोठें ॥ १७ ॥ चोरुनि आमुचिं चित्तें : गमन केलें नंदसुतें ॥ गेला जो येणें पंथें : तो देखिला काइ तुम्ही ॥ १८ ॥ ऐशा त्या व्रजनारी : तया वृंदावना माझारी ॥ फिरत होत्या तवं साजिरि : कृष्णपदें देखिलिं ॥ १९ ॥ त्या वृंदावनप्रदेशिं : देखत्या जाल्या कृष्णपदांसि ॥ जें दुर्लभें ब्रह्मादिकांसिं : योगीमान[illegible] ॥ २० ॥ त्या कृष्णाचें विशेषण काइ : प्रतिपाद्य जो वेदांचा ठाइं ॥ या प्रकृतीचा नाहिं : संबंध जेथें ॥ २१ ॥ ह्मणोनि परमात्मा ऐसें ज्यातें : उपनिषदिं गाइजेतें ॥ हा विश्वाभासु सर्व जेथें : असोनि नसे ॥२२॥ तोचि अधिष्ठुनि मायेतें : पावला नंदसुतत्वातें ॥ त्या परमात्मयाचि तेथें : देखिलिं पदें ॥२३॥ सुकुमारां पदांतें : त्या देखत्या जाल्या प्रशस्तें ॥ जें ध्यात होत्या स्वचित्तें : तें देखिलिं डोळां ॥२४॥ असो कृष्ण फिरतां वनिं : पदांकित केली अवनि ॥ त्या पाउलां भामिनी : देखत्या जालिया ॥२५॥ नातरि कृष्णध्यानाचें फळ : तत्प्राप्तीचा आसन्नकाळ ॥ त्या काळिं भूतळ : मुद्रांकित देखिलें ॥ २६ ॥ नाना पदमुद्रांतें नयनिं : देखिलें कुसुमस्थानिं ॥ तो ध्यानतरु तिये वनिं : फळपुष्पित जाला ॥ २७ ॥ किंवा क्रमुनि चिंताटवी : पावल्या कृष्णपदवी ॥ मुमुक्षु पावती जेविं : श्रवणाधिकारातें ॥ २८ ॥ तेविं त्या व्रजवासिनी : कृष्णातें गवेषितां वनिं ॥ त्या पदलक्षणें करुनि : तत्प्राप्तीची वाट ॥ २९ ॥ आतां कृष्णाचि तें पाउलें : हें कैसें



त्यांसि कळलें ॥ ज्या चिन्हेंकरिं तर्किलें : कृष्णपदाते ॥ ३० ॥ ये विषइं निरुपण : उत्तर श्लोकेंकरुन ॥ राया परीक्षिती लागुन : निवेदिजेतें श्री-शुकें ॥ ३१ ॥

**पदानि व्यक्तमेतानि नंदसूनोर्महात्मनः ॥**
**लक्ष्यंते हि ध्वजांभोजचक्रांकुशयवादिभिः ॥ २५ ॥**

त्या पाउलांतें देखोनि : ऐसें लक्षिलें गोपीजनिं ॥ म्हणती हें पदें भर्वसेनि : नंदसुता कृष्णजीचीं ॥३२॥ यासि हेतु म्हणाल काइ : तरि यां सुंदरा पदांचा ठाइं ॥ देखिलें राया तिहिं : रेखामय ध्वजादिकांतें ॥ ३३ ॥ तो रेखामय ध्वज : भक्तशत्रुजैताची पैज ॥ तैसेंचि रेखांकित पंकज : आणि चक्र अंकुश यव ॥ ३४ ॥ या चिन्हें त्यांसि लक्षिलें : जें हें नंदसुताचिं पाउलें ॥ त्यांतें देखोनि मन निवालें : त्या गोपिकांचें ॥ ३५ ॥ ह्मणाल त्या पदांचा ठाइं : यां चिन्हांसि हेतु काइ ॥ ऐसें सर्वत्र कां नाहिं : या साधारणिं जनिं ॥३६॥ तरि हा नंदात्मज कृष्ण : हें दाविलें विडंबन ॥ परि तो जीवधर्मविहीन : परमात्मा व्यापक किं ॥ ३७ ॥ त्या परमात्मयांचि पाउले : एसें प्रकट त्यांसि कळों आलें ॥ तें चिन्हें देखोनि गमलें : जें हें कृष्णाचिं पदें ॥ ३८ ॥ एवं असाधारणां चिन्हिं : हे कृष्णाचिं पदें म्हणोनि ॥ वोळखोनि भामिनी ॥ पावल्या आश्रयो ॥ ३९ ॥ जेवि उपपत्तीचेनि पंथें : असंभावनेतें परतें ॥ करोनि मुमुक्षुचिं चित्तें : निदिध्यासन करिति ॥४०॥ मग त्या अभ्यासप्रवृत्ति : साक्षात्कारातें पावति ॥ तेवी त्या गोपिका सती : गवेषणमिषें ॥ ४१ ॥ शोधितां कृष्णजीतें : तवं देखिलें पदमुद्रेतें ॥ मग विचारिती जें कृष्णातें : पाविजेल आतां ॥ ४२ ॥ जेथें साक्षात् कोण्ही न सरति : परि आभासद्वारें पावती ॥ ते क्षापद आकृति : कृष्णाभास जाला ॥ ४३ ॥ आतां याचि द्वारें करुन : पावोन आह्मी श्रीकृष्ण ॥ या हेतु तो गोपीगण : पुढें जाता ऐसें जालें ॥ ४४ ॥

**तैस्तैः पदैस्तत्पदवीमन्विच्छंत्योग्रतो बलाः ॥**
**वध्वाः पदैः सपृक्तानि विलोक्यार्ताः समब्रुवन् ॥ २६ ॥**

त्या त्या पाउलिं करुन : कृष्णप्राप्तितें अनुलक्षुन ॥ त्या मार्गातें अनु-सरोन : त्या समस्ता अबला ॥ ४२ ॥ स्मरोनि रूप सांवळें : तिहिं पुढें गमन केलें ॥ तों येक नवल देखिलें : आईक राया अत्यद्भुत ॥ ४६ ॥ सुक्ष्म करुनि अंतःकरण : निवाडें केलें अवलोकन ॥ तवं त्या पदामाजि आन : देखिलिं पदें विलक्षण ॥४७॥ जेवि उपनिषदाचा संभार : तेथें शास्त्राचा संचार ॥ त्या वाक्याचा निर्धार : करावया प्रवर्ते ॥४८॥ तेवि वधूशब्दें करुनि : कोण्ही येकी विलासिनी ॥ जे सर्वांची दृष्टि चोरुनि : कृष्णासवें होति ॥४९॥ तियेतें घेउनि कृष्ण : असोनि जाला अदर्शग(न) ॥ किंवा वृत्ती येकवाटुन : त्यां गोपिकांचिया ॥५०॥ ते वळली एकि मूर्ति : कृष्णा सांगातें जे होति ॥ नाना कोण्हीं अचिंत्यशक्ति : या क्रीडेचें निमित्त ॥ ५१ ॥ असो कृष्णाचि हेचि शक्ति ॥ त्या सवें जे कीं होती ॥ तर्णीचि आणिली व्यक्ति : उक्त जे वधु ॥५२॥ त्या स्त्रियच्या पादिं करुनी : मिश्रित कृष्णपदश्रेणी ॥ तीतें देखोनि भामिनी : त्या सर्वांहि ॥५३॥ कृष्णप्रेमाचेनि पडिभरें : बोलतीं त्या परस्परें ॥ आईक राया मनोहरें : गोपीचि वाक्यें ॥ ५४ ॥

**कस्याः पदानि चैतानि याताया नंदसूनुना ॥**
**अंसन्यस्तप्रकोष्ठायाः करेणोः करिणा यथा ॥ २७ ॥**

अवो हें नवल पाहिलें : या कृष्णपदामाजि सकळें ॥ कोणाचिं दिसती पाउलें : विलक्षणे स्त्रियेचिं जें किं ॥ ५५ ॥ चोरुनि आमुचिं चित्तें : कोण हे कृष्णा सांगातें ॥ गेली हें तीयेचि निश्चितें : पाउलें पाहावों ॥ ५६ ॥ असो जीचे स्कधीं प्रस्तुतः हात ठेउनि रमानाथ ॥ विचरत गेला निश्चित : तियेचिं हें पदें ॥ ५७ ॥ एवं प्रकोष्ठ शब्दें करुन : हस्त प्रदेशाची खुण ॥ त्या हातातें स्कंधिं ठेउन : तियेचा समागमें ॥ ५८ ॥ या वनिं जाला विचरता : आह्मासि गुप्त होत्साता ॥ तो नंदसुत जीचा रक्षिता : तियेचिं हें पदें निश्चि-त ॥ ५९ ॥ जेवि करितां वाक्यविवेचन : हें मायाकार्य जगद्भान ॥ ब्रह्मेंसि अति विलक्षण : सर्वप्रमाणांतरिं ॥ ६० ॥ तेवि पाहातां सूक्ष्मवृत्ति : हें कृष्णपदें नव्हति ॥ तत्संगें तद्रक्षिता जे सती : त्या कांतेचिं हें पदें ॥ ६१ ॥

त्या वधुतें सर्वें रक्षून : नंदसुतें केलें गमन ॥ कोणें दृष्टांतें करुन : तारि तेंहिं आइकावें ॥ ६२ ॥ करी पदाचें व्याख्यान : हस्ती ऐसें अभिधान ॥ त्या मत्त गजें रक्ष्यमाण : गजिनी जेवी ॥ ६३ ॥ तियेचा खांदिं शूंडेतें : ठेउनि तेणें विचरिजेतें ॥ तेवि येणें नंदसूतें : विचरतां वनामाजि ॥ ६४ ॥ कांतेच्या खांदीं स्वकर : ठेउनि करिजे तो विहार ॥ तेणें गुप्त केली जे सत्वर : त्या प्रियेचिं हें पदें ॥६२॥

**अनयाराधितो नूनं भगवान् हरिरीश्वरः ।**
**यन्नो विहाय गोविंदः प्रीतो यामनयद्रहः ॥ २८ ॥**

ह्मणोनि हे भाग्यवती : इया निश्चयेंसि श्रीपति ॥ आराधिला ज्यातें गातिः वेदशास्त्रें सदां ॥ ६६ ॥ अवो प्रस्तुत तो नंदसुत : परि साक्षात् भगवंत ॥ षड्गुणैश्वर्ययुक्त : जगदीश्वर जो ॥ ६७ ॥ ज्याचे स्मरणमात्रें करुनि नाशती दुरितश्रेणी ॥ जो सज्जनाचे अंतःकरणीं : वर्ततु असे ॥ ६८ ॥ तो यिया आराधिला : तेणें ईश्वर पावला ॥ साक्षात् हरी फळला : कृतार्थ जाली ॥ ६९ ॥ कांजें सांडुनि आमुतें : इयेते वो नंदसुतें ॥ पावोनि अति प्रीतितें : एकांति नेलें गुप्त कि ॥७०॥ जो गोविंद संज्ञे करुन : सर्वांचें एक जीवन ॥ वर्ततसे जयाचेन : चराचर जग अवघेंहिं ॥ ७१ ॥ असो चक्षुरादिकांचा नियेंता : बुद्धयादिकें जिया सत्ता ॥ वर्तती आणि समता : पावती जेथें ॥ ७२ ॥ एवं दुराराध्य सर्वांतेंः तोवश जाला वो यियतें ॥ सांडोनि आम्हा समस्तांतें : एकांतासि नेली ॥ ७३ अवो सर्व विक्षेपशून्यः यिया भोगिला श्रीकृष्ण ॥ नेणों कैसें आराधन : इला घडलें किति ॥ ७४ ॥ बहुंतक याचा भजनिं : भजती संख्या अक्षोहिणी ॥ त्यां माजि एकाधा कोण्हि : संग लाहे याचा ॥ ७५ ॥ हा जो कांहिं शास्त्रार्थ : तो प्रस्तुत जाला सार्थ ॥ आम्हा गोपिकांचें युथ : सांडोनि सकळ ॥ ७६ ॥ अखंडाकारचित्तें : अम्हि बहुं आराधिलें यांतें ॥ सेखिं येणें नंदसुतें : ते मानिलें नाहिं ॥ ७७ ॥ त्यांत कांहिं असेल चकि : ते आम्ही काय जाणो मुर्खी ॥ तो हृद्गतपारखीः चतुरांचा रावो ॥ ७८ ॥ याशागि सांडुनि आमुतें : चोरोनि सर्वांचिं चित्तें ॥

वश जाला ते येकीतें : परोपरिं श्रीकृष्ण ॥ ८० ॥ ह्मणाल ते व्रजकांता : कृष्णें जे नेली येकांता ॥ ते पावली कोण्या अर्था : ते विचारुं आह्मी ॥ ८१॥ अवो वनिं फिरते वेळे : तिसि काय फळ जालें ॥ काइ तियेनें जोडिलें : एकांत पावोनिया ॥ ८२ विचारित होंत्साल्या मनि : ऐसें परस्परें मिळोनि ॥ बोलताती भामिनी : तें आईक राया ॥ ८३ ॥

**धन्या अहो अमी आल्यो गोविंदांघ्य्रब्जरेणवः ।**
**यान्ब्रह्मेशो रमा देवी दधुर्मूर्ध्न्यघनुत्तये ॥ २९ ॥**

अवो सखियांहो ये वनिं : विचरतां चक्रपाणी ॥ तत्पदयुगळापासुनि : उधळती जे रजकण ॥८४॥ ते अत्यंत वो धन्यतम : पूज्यांसि पुज्य परम ॥ असो तो महिमा निःसीम : वर्णील कवण पां ॥८५॥ ह्मणाल येवढी महंती : जाणतिली कोणे युक्ति ॥ तरि ब्रह्मा जो प्रजापति : सकळलोकगुरु ॥ ८६ ॥ आणि इश शब्दें करुन : शीव जो पार्वतीरमण ॥ ऐसे जे ब्रह्मा ईशान : त्रैलोक्याधिप होंत्साते ॥ ८७ ॥ आणि सर्व सौभाग्य खाणी : रमादेवी सिंधुनंदिनी ॥ सर्व गुणिं जे शाहाणी : लोकेशमान्या ॥ ८८ ॥ ते येवढी सांडोनि थोरी : त्या पदरजातें वाहाती शिरीं ॥ ते कोणे हेतु म्हणाल जरि : तरि दुरितक्षयार्थ ॥८९॥ तें दुरित किंलक्षण : तरि जो महत्वाभिमान ॥ तोचि दुःखाचें कारण : विक्षेपकारी सर्वदां किं ॥ ९० ॥ ऐसें धरुनि ते पोटीं : ब्रह्मा कमळा धूर्जटी ॥ त्या पदरजःकणाची वृष्टी : सदैव वाहाती आपुलाले माथां ॥९१॥ ऐसें ज्यातें महिमान : ते कृष्णपदरजःकण ॥ त्यांतें पावली ते आपणः चोरुनि आमुतें ॥ ९२ ॥ त्या सवें विचरते वेळे : ते रेणु प्राप्त जाले ॥ सर्व सुखाचे सोहळे : पावली ते कृष्णसंगें ॥ ९३ ॥ आतां असो त्या सवतीची कथा : आह्मीहिं ते रेणु धरुं माथां ॥ श्रीकृष्ण वनिं विचरतां : उमटलीं जें पदें ॥९४॥ त्यां कृष्णपदरेणू करुन : आपणातें अभिषेचुन ॥ सकळ दुरितें सारुन : पावोन कृष्णातें ॥ ९५ ॥ अवो या युक्ती आपण : पाविजेल श्रीकृष्ण ॥ परि आणिक एक विघ्न : वोडवलें येथें ॥ ९६ ॥ ऐसें धरुनि चित्तिं : त्या व्रजवनिता मागुति ॥ परस्परें ऐसें जें वदति : तें अवधारिं राया ॥ ९७ ॥

तस्या अमूनि नः क्षोभं कुर्वंत्युच्चैः पदानि यत् ।
येकापहृत्य गोपीनां रहो भुंक्तेच्युताधरम् ॥ ३० ॥

ते कृष्णासवें विचरति : जे किं आमुची सवति ॥ जियेतें घेउनि येकांतिं : रमतसे श्रीकृष्ण ॥ ९८ ॥ तियेचिं किं पदें हे येथें : उमटलिं कृष्णपदमिश्रितें ॥ तें अत्यंत वो आमुतें : क्षोभातें कारिति ॥ ९९ ॥ असो कृष्णपदा माझारि : तियेचा पदाची हारी ॥ ते बहुं आमुचे अंतरिं : असह्य जाली ॥१००॥ यासि निमित्त ह्मणाल काइ : तरि आह्मी तो सर्वाहि ॥ अनुसरलों कृष्णपाइं : निःसंदेह येथें ॥ १ ॥ शेखिं सांडुनि वंचिलें आमुतें : त्या येकीसीचि नंदसुतें ॥ निजअधरांमृतासवातें : देउनि भोगिलें एकांतिं ॥ २ ॥ ह्मणोनि तियेचा पाउलिं : आमुचिं चित्तें क्षोभविलिं ॥ जिया एकांतिं भोगिली : कृष्णाधरसुधा ॥३॥ असो दुर्दैवनिमित्तें : आह्मासि सांडिलें नंदसुतें ॥ परि तियेनें हि येथें : साह्य केलें नावेक ॥४॥ अवो तो भगवंत : सदा भक्तांचा वेळायीत ॥ विचरावया निमित्त : भक्तसंगाचि तयासि ॥५॥ यालागि तिया वेल्हाळा : एकांतिं कृष्ण आराधिला ॥ तितुकेनिचि केला : चलितार्थ तेणें ॥६॥ ते न जाती जरि एकांता : तरि कां वो आम्हासि सांडिता ॥ पावतों अधरांमृता : सर्वाहि आह्मी ॥ ७ ॥ एवं आमुचें जीवन : तेचि येकांतिं आपण ॥ सर्वांसि विभाग नेंदुन : सेविती जाली येकली ॥ ८ ॥ नातरि ते पुण्यवती : आह्मासि निजसंग देति ॥ तेणे गोपी समस्ति : पावतों अधरसुखातें ॥ ९ ॥ पारि ते करुनि षटता : येकली जाउनि एकांता ॥ प्रसंन्न करुनि स्वकांता : अधरातें सेविलें ॥ १० ॥ ह्मणोनि तें पदें येथें : जें कृष्णपदेंसिं मिश्रितें ॥ त्यातें देखोनि आमुतें : क्षोभ होतो भारि ॥ ११ ॥ तोंचि होउनि आवरण : न घडे तद्रेणुवंदन ॥ अवो चित्तस्वास्थें करुन : साधने फळति ॥ १२ ॥ असो ते कैंचि सवति : केवळ दुरादृष्टाची मूर्ति ॥ घडोनि आह्मा ये रीति : दुःखकारी जाली ॥ १३ ॥ अवो जोंवरि चित्तिं आवरण : तंवरि प्राप्त नव्हे कृष्ण ॥ अति निकट असोन : दुर्ल्हावला बहुं ॥ १४ ॥ आतां विचारु एकि युक्ति : तें पदें असोतु परति ॥ त्यांकडे न पाहोन चित्तिं : कृष्णपदेंचि असोत ॥ १५ ॥ श्रीकृष्णातें स्मरो-

न : तत्पदराजिं ठेउं मन ॥ सर्वथा पापविहीन : आह्मी पावों कृष्णातें ॥ १६॥ जेवि योगी जे असति : ते विजातीयातें त्यजिति ॥ केवळ वस्तु चिंतिती : निदिध्यासनें ॥ १७ ॥ तेवि सांडु वधुपदातें : पाहों कृष्णपदांकातें ॥ ऐसें चिंतुनि गोपीशतें : चालिलि पुढें पुढें ॥ १८ ॥ तवं क्षोभाचें कारण : आणिक वोडवलें दारुण ॥ कारितां पदविवेचन : ऐसें जें कांहिं जाहालें ॥१९॥

**नलक्ष्यंते पदान्यत्र तस्या नूनं तृणांकुरैः ॥**

**खिद्यत्सुजातांघ्रितलामुन्निन्ये प्रेयसीं प्रियः ॥ ३१ ॥**

ते जे कृष्णासवें होति : जियचा पदांची व्यावृत्ति ॥ करुनि त्या गोपी सती : चिंतिती कृष्णपदातें ॥ २० ॥ तत्पादिं ठेउनि दृष्टीतें : चालिल्या विवेचनपंथें ॥ तवं त्या वधुपदातें : न देखती पुढें त्या ॥ २१ ॥ न देखोनि तें इतरें : बोलत्या जाल्या परस्परें ॥ ह्मणती पाहातें क्षोभकरें : न दिसति पदें तियेचिं ॥ २२ ॥ विचारा वो तुह्मी समस्ती : येथें पदें दिसत होतिं ॥ तें आतांचि कां वो सती : न लक्षती आमुतें ॥ २३ ॥ ह्मणाल यासि हेतु काइ : तरि ऐसें तर्कतसे काहिं ॥ जें तीचा सुकुमारां पाइं : हे तृणांकुर रुतले ॥ २४ ॥ त्या तृणस्पर्शें काठिण्ये : तें पदतळें जालि खिन्नें ॥ चालतां न ये तेणें गुणें : गति कुंठित जालि ॥२५॥ ऐसें जाणोनि नंदसुतें : निजप्रेमळाचेनि कांतें ॥ उचलोनि त्या प्रियेतें : निजखांदां बैसविलें ॥ २६ ॥ अवो या वेगळें कांहिं : आणिक तों तर्क नाहिं ॥ आह्मीं अभाग्याच्या बाइ : अंतरलों त्यातें ॥ २७ ॥ पाहा वो आह्मीं समस्ता : गोपिवत्त(?) श्रीकृष्णभक्ता ॥ त्यांमाजि येकीचि कांता : प्रिया जाली त्यातें ॥ २८ ॥ एवं पाहोनि पदांकातें : चिंतित होत्या कृष्णातें ॥ तवं ऐसें लक्षुनि वधूतें : विरह जाला ॥ २९ ॥ जेवि कोण्ही मुमुक्षुजन : शांता जनातें देखोन ॥ आपणातें मानिती हीन : जें धिग्जीवी आह्मीं ॥ ३० ॥ अद्यापि कां भगवंतें : नांगीकरिजे आमुतें ॥ हें चंचळ चित्तें शांतें : नव्हेति कां आमुचिं ॥ ३१ ॥ तेवि जालें गोपिकांतें : स्मरोनि कृष्णप्रियेतें ॥ त्या कामिनींचि चित्तें : विरहखिन्ने जालिं ॥ ३२ ॥ आठवित चरणयुगळ : चित्त जालें उतावेळ ॥

विशेष तळमळ : जालिया त्या अंघ्री ॥ ३३ ॥ मागुता तो गोपीजन : याचि अभिप्रायें करुन ॥ श्लोकत्रयें विवेचन : करितुसे राया ॥ ३४ ॥

**इमान्यधिकमग्नानि पदानि वहतो वधूम् ।**
**गोप्यः पश्यत कृष्णस्य भाराक्रांतस्य कामिनः ॥ ३२ ॥**

हे कृष्णाची पदरजश्रेणी : जे सर्व मंगळाचि खाणी ॥ सर्वतापोपशमनी : पापहर्ति जे ॥ ३५ ॥ असो इये भूमीचा ठाईं ; पदें उमटलिं जें काहिं ॥ त्यातें आह्मीं सर्वांहि : अवलोकित आलों ॥ ३६ ॥ जें आलिं येथपर्यंत : ते पुढें दिसती विपरीत ॥ पाहा नवल हें भूमी आंत : अधिकाचि बुडालिं ॥ ३७ ॥ असो इये भूतळिं : अधिके दिसती रुतलिं ॥ विचारितां वो ये काळिं : यासि येक हेतु असे ॥ ३८ ॥ तरि तो नंदसुत ; त्या वधूचा ठाईं आसक्त ॥ जाला हें नेमस्त : वडोनि आलें ॥ ३९ ॥ तत्पदिं जे अनुसरति : त्यांची त्यासि बहुं प्रीति ॥ यालागि त्याची ख्याति : कामी ऐसी जाली ॥ ४० ॥ अत्रो विशेषें यासि भजति : तेथें ऐसीचि याची गति ॥ सदां तो असोनि समस्थिति : वस्तुगत्या विषमता दावितो ॥ ४१ ॥ असो वाहातां त्या वधुतें : तेणें भाराक्रांत होंत्सातें ॥ बळें चालतां हें समस्तें : रुतलिं पदें दिसति ॥ ४२ ॥ असो तो नंदसुत : कामी जाला निश्चित ॥ त्या कामिनी समवेत : अत्यंत रमतो प्रीतीकरिं ॥ ४३ ॥ ह्मणाल हा तर्क तुमतें : कैसा जाला स्वचित्तें ॥ तरि या अनुमानासि येथें : कारणांतर आइका ॥ ४४ ॥

**अत्र प्रसूनावचयः प्रियार्थे प्रेयसा कृतः ।**
**प्रपदाक्रमणे एते पश्यतासकले पदे ॥ ३३ ॥**

पाहा येथें त्या गोपीकांतें : त्या प्रियेचा प्रीतिवंतें ॥ पुष्पावचय केला तुमतें : दिसतो किं हा ॥ ४५ ॥ असो तिये प्रिये कारणें : वेंचिलिं येथें प्रसूमनें ॥ ह्मणाल हें कोणें लक्षणें : अनुमान घडलें ॥ ४६ ॥ तरि पाहा या उंचा सुमनजाति : तेथें न पुरे हस्तगति ॥ ह्मणोनि तो गोपीपति : उंच जाला ॥ ४७ ॥ मग उंचावते वेळे : पार्ष्णी दोन्ही उचलिले ॥ तेणे कारिं दडपिलें : प्रपदाग्र अर्धपदातें ॥ ४८ ॥ असो टांचुवांतें उचलोनि : चवडे

दडपिले दोन्हि ॥ त्या निमित्तें येथें मेदिनी : अर्धपदांकिता जाली ॥ ४९ ॥ ह्मणोनि असकळें पदें : हें पाउलें अर्धार्धे ॥ उमटालिं नंदानंदें ; हें नवल कैसें केलें ॥ ५० ॥ नाना तें अपरिच्छिन्नें : परि वधुसंगें भासती न्युनें ॥ नेणो आमुचिंचि मनें : अपूर्णें जालिं ॥ ५१ ॥ एवं ते धीट सवति : भुलविला किं आमुचा पति ॥ सांगावा विशेष किति : अवधारा वो आणिकहि ॥ ५२ ॥

**केशप्रसाधनं त्वत्र कामिन्याः कामिना कृतम् ॥**
**तानि चूडयता कांतामुपविष्टमिह ध्रुवम् ॥ ३४ ॥**

अवो सती होंये ठाइं : नवल वितलें पाहा काइ ॥ जिये कामिनीचा ठाईं : कामीं होंत्साता श्रीकृष्ण ॥ ५३ ॥ तीचे केशप्रसाधन तेणें : केलें वो स्वहस्तें कृष्णें ॥ केशप्रसाधनवचनें : केंस सुमनें गुफिलें ॥ ५४ ॥ ते कोणें लक्षणें करुन : तरि आधिं केंस विंचरुन ॥ पुष्पें जें घेतालें वेंचुन : पुर्वोक्त प्रकारें करिं ॥ ५५ ॥ तियचा शिरिं पुष्पावाळि ; तेणें कैसी वो गुंफिली ॥ एवं ते रंजविली ; केशप्रसाधनें करुन ॥ ५६ ॥ ह्मणाल हें तुमतें : कैसें जाणवलें निरुतें ॥ तरि धरुनि त्या कामिनीतें : पुढें बैसविलें ऐसें ॥५७ ॥ अवो निजजानुचा अंतरिं : बैसविली तेणें सुन्दरी ॥ पाहा त्याचिया पदा भितरि : तियेचि पदें दिसती ॥ ५८ ॥ तीस घेउनि बैसला येथें : तुह्मी पाहा वो हें निश्चितें ॥ त्या दोघांचि पदें हें मिश्रितें : बैसतिं दिसती ॥ ५९ ॥ जेवि श्रवणमननें करुन : भेदातें मनिं नुरउन ॥ करिती निदिध्यासन : गुरुपादिष्टशास्त्रैकमतें ॥ ६० ॥ त्यांचि हें विशेषणें : ब्रह्मेसि वडती समानें ॥ तन्हि सुक्ष्म संकल्पाचेनि गुणें ; वेगळिंसिं निवडति ॥ ६१ ॥ तेवि सखियां वो येथें : तें उभयपदें निश्चितें ॥ दिसती पाहा हें तुमतें : मानवलें किं नाहिं ॥ ६२ ॥ एवं लक्षुनि तदाभिमान : कृष्णें केलें अंतर्धान ॥ तेणें गोपिकांचे मन : विशेषें आकर्षिलें ॥ ६३ ॥ आकर्षोनि त्यांचि चित्तें : प्रेरिलें गवेषणातें ॥ गवेषण करितां त्यांतें : स्फुरली यापि सति ॥ ६४ ॥ नाना स्फुरली जे सती : ते कृष्णाची अनादि शक्ति ॥ जे किं भक्तांची भक्ति :

अभक्तांसि माया ॥ ६५ ॥ काहिं होतां द्वयस्फुरण : तीचें होये आवरण ॥ आनि येथुनि परततां मन : ते भक्ति होउनि ठाके ॥ ६६ ॥ ह्मणोनि ते कृष्णशक्ति : तिया आकर्षिला हस्ति ॥ अंतरि ते कृष्णमूर्ति : सुभरोनि त्या गोपी ॥ ६७ ॥ त्या क्रीडेतें अनुकरोनि : क्रीडलिया तिये वानें ॥ सुभरोनि कृष्णमनें : अनुवादल्या परस्परें ॥ ६८ ॥ आतां जे काहिं भामिनी : एकांतिं अनुसरोनि ॥ जियेसिं रमला वानें : भाळोनि श्रीकृष्ण ॥६९॥ जिया प्रसंगें करुन : वर्णिले कामासक्तपण ॥ तरि तो कामपूर्ण : तयें आसक्ति कैंचि ॥ ७० ॥ लंपटाचिया रीति : कृष्णासिही स्त्रीआसक्ति ॥ ऐसी कदाचित् रायाचा चित्तिं : आशंका होइल ॥ ७१ ॥ ह्मणोनि शंकापरिहरण : श्रीशुकाचें अग्रें वचन ॥ तें यथामति व्याख्यान : करिजेल आईका ॥ ७२ ॥

**रेमे तया चात्मरत आत्मारामोप्यखंडितः**
**कामिनां दर्शयन्दैन्यं स्त्रीणां चैव दुरात्मताम् ॥ ३५ ॥**

ते जे पूर्वोक्त सती : जन्हि कृष्णतंत्र विचरत होति ॥ तन्हि तिचा ठाइं आसक्ति : दाविली कृष्णें ॥७३॥ असो तिये सहवर्तमान : रमता जाला जे काहिं श्रीकृष्ण ॥ स्कंधारोहण केशप्रसाधन : संभोगादिकिं जो ॥ ७४ ॥ तो आत्माराम अखंडित : जन्हि अस्खलितरेत ॥ प्रमेयप्रमाणातीत : सुखस्वरुप जो किं वस्तु ॥ ७५ ॥ हें जें सद्वितीय भान : ज्याचिया माया विलासमान ॥ हें ज्याचा ठाइं नसोन : आभासत असे ॥ ७६ ॥ त्यासि हें उक्ताचरित : परमार्थे अघटित ॥ तथापि कामी जे विषयासक्त : त्यांचें दैन्य दाखविता होत्साता ॥ ७७ ॥ जे किं कामलंपट जन : होती स्त्रियांचे अतिदीन ॥ वर्तती जे तयां अधीन : क्रीडामृग जैसे ॥ ७८ ॥ आणि स्त्रिया ज्या दुर्मती : दुर्गतीतें ज्या योग्य होती ॥ त्यांची ही स्थिति गति : दाखवीत होत्साता ॥७९॥ वास्तवें त्याचा ठाइं : ते स्त्रीव्यक्तीचि विशेषें नाहिं ॥ मा आसक्ति कैंचि काइ : सर्वसत्तास्वरुपातें ॥८०॥ नविक व्यक्तितें अधिष्ठुन : खवळुनि गोपींचें मन ॥ त्यांचें गर्वपरिहरण : आरंभिलें पुरतें ॥ ८१ ॥ एवं प्रसंगें करुन : रायाचें शंकापरिहरण ॥ करिता जाला व्यासनंदन : तें वर्णिलें त्या

यथामति ॥ ८२ ॥ मागुती कथान्वयातें : अनुसरोनि मुनिनाथें ॥ काइ जाले बोलिजेते : वर्णिजेल तेंहिं ॥ ८३ ॥

**इत्येवं दर्शयंत्यस्ताश्चेरुर्गोप्यो विचेतसः ।**
**यां गोपीमनयत्कृष्णो विहायान्याःस्त्रियो वने ॥३६ ॥**

एवं पूर्वोक्तें करुन : विरहाकळित गोपीजन ॥ करितां कृष्ण गवेषण : तदनकार दावीले ॥ ८४ ॥ आणि एकांतीं नेउन : त्या प्रियेसि अनुसरोन ॥ असोनि तिये अधीन : वर्तला कामियांचे परिं ॥ ८५ ॥ त्याही कृष्णविहारातें : दावित्या जाल्या येकियेकीतें ॥ पुष्पचर्यादि संभोगातें : परस्परें गोपिका ॥ ८६ ॥ गलिताचित्ता असोनी : फिरत्या जाल्या ते वनिं ॥ श्रीकृष्ण सुभरोनि मनि : उद्विग्न होतसात्या ॥ ८७ ॥ आतां सांडोनि समुदायातें : आधिष्ठुनि येकांतातें ॥ ज्या गोपीचे सांगातें : रमला कृष्ण उक्तलक्षणें ॥८८॥ तियची जे काहिं कथा : तेही अनुवादिजेल आतां ॥ त्या प्रसंगें दुर्भगता : प्रकटेल स्त्रियांचि ॥ ८९ ॥

**साच मेने तदात्मानं वरिष्ठं सर्व योषिताम् ।**
**हित्वा गोपी : कामयाना मामसौ भजते प्रिय : ॥ ३७ ॥**

ते विचरतां कृष्णासांगातें : मानिती जालि धन्यतेतें ॥ जें नाहिं आपणापरतें : स्त्रियांमाजि वरिष्ठ ॥ ९० ॥ भोगानुकुळा सुंदरा : नाहिं मजहुनि इतरा ॥ अतिशयें नंदकुमारा : प्रिया मि धन्य या जगिं ॥ ९१ ॥ कां जे सर्वाही गोपांगना : अत्यंत कामसदना ॥ सर्वस्वें कामासक्तामना : रमणीया कृष्णाचा ठाइं ॥ ९२ ॥ असो आह्मि या समस्ता : सर्वथा श्रीकृष्णासक्ता ॥ अति प्रेमे आकळिता : सरिशावि आलों ॥ ९३ ॥ तर्‍हीं सांडोनियां गोपीतें : निजविरहाकाळितांतें ॥ अनुसरला मज प्रियेतें : सर्वप्रिये जो कृष्ण ॥ ९४ ॥ तस्मात् होंवि जालें निश्चित : जें मि आढ्य सर्वसंमत ॥ चातुर्यसौंदर्यमंडित : मजसारखि नाहिं ॥ ९५ ॥ ऐसी त्यासवें विचरति : आपणातें धन्य मानिती ॥ बुडोनि गेली ते सती : अभिमानसागरिं ॥ ९६ ॥ असो ते अति दक्ष भामिनी : कृष्णासवें रमतां वनि ॥



चालत पुढें जाउनि : उभी राहिली उत्तरवानि ॥ ९७ ॥ नाना श्रीकृष्णें आप्त केली : तेणें महत्व पावली ॥ परि त्या गर्वें आकळिली : आणिली जातिस्वभावा ॥ ९८ ॥

**ततो गत्वा वनोद्देशं दृप्ता केशवमब्रवीत् ॥**
**न पारयेहं चलितुं नय मां यत्र ते मनः ॥ ३८ ॥**

मग गर्वमत्त होत्साती : कृष्णेंसि जाली बोलती ॥ पुराणें जयातें गाति : केशव इये आख्यें कारिं ॥ ९९ ॥ ह्मणे माझे पाय दुखति : पुढें चालतां नव्हे प्रवृत्ति ॥ मिं अति सुकुमारा सती : अस(श)क्त ये विषइं ॥ ६०० ॥ कृष्णा तुजसवें गमन : करावया नव्हे चळन ॥ जैसें जाणेल तुझें मनः तेथें घेउनि जाईं मज ॥ १ ॥ असो मानेल जैसे तुतें : तैसें घेउनि जाईं मातें ॥ परि चालावया मिं येथें : योग्ये नव्हें कदा आतां ॥ २ ॥ एवं हे जे बोलिली भामिनी : तेथें ऐसें आलें घडोनि ॥ जें कोण्ही येक ये जनि : कदाचितू काकतालिन्यायें ॥ ३ ॥ अनुसरोनि शास्त्रादिकिं : स्वरुपेंसि करि येक वंकि ॥ तेणे प्रसंगें या लोकिं : प्रतिष्ठा पावे ॥ ४ ॥ सदाभ्यासाचेनि योगे : भगवत्प्रसादप्रसंगे ॥ लाहोनि युक्तसौभाग्यें : आंथिला होय तो ॥ ५ ॥ तेणें तो अभ्यासी : तत्काळ पावे गर्वासि ॥ फळ पर्यंत पावणें जें त्यासि : तें राहिलें येणें सर्वेहि ॥ ६ ॥ अभिमान जालियां त्यातें : प्रवृत्तीचि नव्हे चित्तातें ॥ पावलियावरिहि थितें : दुन्हावलें सुख ॥ ७ ॥ योग्यतेचे सामर्थे : जाणतों स्वाधिकारातें ॥ परि पडोनि प्रतिष्ठागर्ते : न प्रवर्ते साधनिं ॥ ८ ॥ प्रतिष्ठेतें अनुसरोनि : बाहीर करि जोगावणी ॥ बोलं कपटां वचनि : जें भगवंत तारिता ॥ ९ ॥ प्रतिष्ठेहुनि न ढळे : आणि ईश्वरातें प्रार्थि बळे ॥ ह्मणे आह्मासि रमाळीळें : करावी कृपा ॥ १० ॥ तैसीच ते मुर्ख सति : गर्वेंकरीं हारावली मति ॥ जे प्रार्थिलें कृष्णाप्रति : मान इच्छुनियां ॥ ११ ॥ कृपाळुवें रमाकांतें : जाणोनि सत्वशुद्धितें ॥ एकदां उचलिलें होतें : तवं गर्वें सोंकली ते ॥ १२ ॥ तैसीचि पडकली तेथें : इछिती जालि मागुतें ॥ जें पूर्ववत् भगवंतें : उचलुंनि घ्यावें खांदां ॥ १३ ॥ ते स्वाधिकारें भ्रष्टली :

पूर्वस्थिति विसरली ॥ गर्वेंकरिं जे चेवली : कृष्ण नेवे तियेतें ॥ १४ ॥ नातरि हें असो येथें : युक्ति रचिली भगवंते ॥ जें मजलागि गोपीशतें विकळें फिरती जे ॥ १५ ॥ असो विरहार्ता त्या कामिनी : इतस्तती भ्रमती वनिं ॥ यांसि धीर विचारुनि : उपेक्षिली ते गोपी ॥ १६ ॥ त्या साभिप्राया उक्ती : गोपींतें बोलिला कृष्ण प्रिति ॥ तें अवधारिं सावधमति : परीक्षिता राया ॥ १७ ॥

**एवमुक्तः प्रियामाह स्कंधमारुह्यतामिति ।**
**ततश्चांतर्दधे कृष्णः सावधूरन्वतप्यत ॥ ३९ ॥**

उक्त प्रकारें करुन : आइकोनि वधूवचन ॥ तिया बोलिला होंतसाता कृष्णः तियतें बोलिला ऐसें ॥ १८ ॥ जें माझिया स्कंधाप्रति : तुवां बैसावें वो प्रियेसति ॥ एसें मंजुळ श्रीपति : बोलिला असतां ॥१९॥ आइकोनि कृष्ण-वचना : सरिसावली ते अंगना ॥ करावें जों आरोहणा : तवं अकस्मात ॥ २० ॥ ठकुनि तियतें कृष्ण : पावला तो अंतर्धान ॥ नाना प्रकटचि असोन : ते गर्वांध जाली ॥ २१ ॥ तो निकट असोनि श्रीपति : दूरि जाला तियेप्रति ॥ मग तद्वियोगें सती : खिन्न जाली ते ॥ २२ ॥ ते वधू श्रीकृष्णे वीण : सकळ देखोनि शून्य ॥ तप्त होंतसाती अति दीन : आक्रोशिती जाली ॥ २३ ॥

**हा नाथ रमण प्रेष्ठ कासि कासि महाभुज ॥**
**दास्यास्ते कृपणाया मे सखे दर्शय सन्निधिम् ॥ ४० ॥**

अगा ये स्वामी नाथा : श्रीकृष्णा नन्दसुता ॥ प्रियोत्तमा प्रेष्ठा कांता : रमणस्वरूपा श्रीहरी ॥ २४ ॥ सौंदर्याश्रिया सदना : महांभूजा मनोरमणा ॥ अगा ये क्लेशहरणा : कोठें पाहावें म्या तुज ॥ २५ ॥ मज कृपण दीनेसि : सांडोनि कां गा गेलासि ॥ खोंचिले माझिया प्राणासि : कोठें आहेसि तुं ॥ २६ ॥ सखया देइं दर्शन : सत्वर करिं सन्निधान ॥ अन्यथा गा माझे प्राण : वांचतीना कृष्णा आतां ॥ २७ ॥ एवं प्रसंगें करुन : स्त्रियांचें दावेलें दौर्जन्य ॥ आणि पतनासि कारण : साधकातें हा गर्व ॥ २८ ॥

परि प्रस्तुत गोपीगण : निजवियोगें तापोन ।। इकडे तिकडे वणवण : फिरत होता उद्विग्न ।। २९ ।। त्यासि निजप्राप्तीचें द्वार : हे वधू पाठविली समोर ।। नावेक करुनि धीर : शुद्धि दाविलि आपुलि ।। ३० ।। त्यांच्या गर्वाची निवृत्ति : जाणोनि केली हे युक्ति ।। आपणा जवळ होती : ते मेळविलि तयांतें ।। ३१ ।। नातरि कोण्ही येकि शक्ति : भक्तां तें भजविति ।। तेणें रुपें गोपी सती : ते पाठविली सांप्रति ।। ३२ ।। येणें लक्षणें करुन : ऐसें वडलें निरुपण ।। जें श्रीकृष्णा पासुन : अंतरली जे गोपी ।। ३३ ।। ते त्या समुदायाप्रति : प्रविष्ट जाली कोणे रीती ।। कैसी जाली संगति : परस्परें तीहिं हिं ।। ३४ ।।

**अन्विच्छंत्यो भगवतो मार्गं गोप्योविदूरतः ।।**
**ददृशुः प्रियविश्लेषमोहितां दुःखितां सतीम् ।। ४१ ।।**

त्या ज्या सर्वा गोपांगना : कृष्णचिंतापरायणा ।। भगवन्मार्गाचि विवेचना : करित ज्या होत्या गोपी ।। ३५ ।। तवं अकस्मात् त्या सतीतें : प्रियविश्लेषमोहितेतें ।। दुरुनि अति दुःखितें : देखिलें तिहिं त्या वनिं ।।३६।। असो कृष्णवियोगनिमित्तें : मोहगर्ते पतितेतें ।। तिय दुखिते सतीतें : समीप देखत्या जाल्या त्या गोपी ।। ३७ ।। ।।

**तया कथितमाकर्ण्य मानप्राप्तिं च माधवात् ।।**
**अवमानं च दौरात्म्याद्विस्मयं परमं ययुः ।। ४२ ।।**

मग जाउनि समीप : देखोनि खिन्नस्वरुप ।। पुशिलें तियेतें अनुरुप : वर्तमान गोपीहिं ।। ३८ ।। मग तिया केलें कथन : त्या वृत्तातें आइकोन ।। राया आइक तो गोपीगण : पावला अति विस्मयो ।। ३९ ।। तें कथित किंलक्षण : तरि कृष्णपासुनि मान ।। सर्वेचि अपमान : निजगुणेकरिं पावलीं ।। ४० ।। असो स्वदुर्बुद्धिमुळें : कृष्णें जें अवमानिलें ।। गुप्त होउनि सांडिलें : वनामाजि येकलें ।। ४१ ।। नाना वियोगानुतापें : प्रकटलि निजपापें ।। मानाभिमानविक्षेपें : दुन्हावला कृष्ण ।। ४२ ।। ऐसें अवघे वर्त्तमान : तिया केलें निवेदन ।। तें आइकोनि गोपीजन : निरभिमान जाला ।।४३।। नाना न

कळे कृष्णमाहिमा : ऐसें जाणोनि त्या रामा ।। विशेषें कार्ष्णि सकामा : वि-स्मित जाल्या ।। ४४ ।। किवां वधूचेनि मूळें : कृष्णें कवसाल केलें ।। तेणें गर्वातें स्मरविलें : गोपिका कारणें ।। ४५ ।। कां जे कोण्हि गर्व-ग्रस्तें : होती आरूढ पतितें ।। ऐसा अभिप्राय सर्वातें : दाविला या प्रसंगें येथें ।। ४६ ।। अभिमानाचे निवृत्ति : देवातें भक्त प्रिय होति ।। आणि भक्तियोगें वशवर्ति : देव होय भक्तातें ।। ४७ ।। दाविलें याही अर्थातें : सूचिलें स्वनिःकामतेतें ।। असो सती तें समुदायातें : मिळाली जे किं ।।४८।। आइकोनि तियेचि कथा : अववियाचि विस्मिता ।। विचरल्या इतस्तता : त्या निश्चळा जालिया ।। ४९ ।।

**ततो विशन्वनं चंद्रज्योत्स्ना यावद्विभाव्यते ।।**
**तमः प्रविष्ठमालक्ष्य ततो निववृतुर्हरेः ।। ४३ ।।**

यावरि तो गोपीजन : कृष्णगवेषणालागुन ।। चंद्र होता प्रकाशमान : तंवरि प्रवेशला हरिवनातें ।। ५० ।। असो त्या वनिं असोन : तें आइकोनि कथन ।। कार्ष्णि प्रवेशलें मन : ह्मणोनि एकत्र निश्चळ होत्या ।। ५१ ।। मग इच्छा जाली चित्तिं : जे पाहावी रमण मुर्ति ।। ह्मणोनि त्या गोपीसती : चालिलिया पुढें ।। ५२ ।। नातरि कृष्ण निवृत्तिकांता : ते जाल्हि आली हाता ।। कृष्ण भेटेल आतां : हा निश्चयो जाला ।। ५३ ।। तर्‍हि यावद्दर्शन : न संडावें कृष्णगवेशण ।। सरलें नाहिं प्रयोजन : मनाचें जंवरि हें ।। ५४ ।। असो मनप्रवेशद्वारा : भोगावें नंदकुमारा ।। इतुकियाही अंतरा : न साहती त्या ।। ५५ ।। त्या सखीद्वारें करुन : कृष्णें केलें आश्वासम ।। जें केलें कृष्णध्यान : तें फळासि आलें ।। ५६ ।। त्या प्रसादाचेनि बळें : या गवेषणा पुट जालें ।। चित्तें नसेनि विकळें : प्रवेशल्या वनातें ।।५७।। जेवि ते मुमुक्षु जन : करितां शास्त्रवि-वेचन ।। सूक्ष्मदशे येउनि मन : समाधान पावति ।। ५८ ।। त्या सुखाचेनि उत्कर्षें : मन शान्तिविशे प्रवेशे ।। तेवि गोपिचें मानसें : प्रवर्तलिं: कृष्ण-शोधिं ।। ५९ ।। त्या विचरल्या जें वन : तेथें काळामर्यादा जाण ।।

जंवरि चंद्र सजोत्स्न : गगनिं हि तो ॥ ६० ॥ असो चंद्राचिया जोत्स्ना : प्रकाश असतां अंगना ॥ त्या प्रवेशोनि वृंदावना : शोधितां कृष्णातें ॥ ६१ ॥ तवं तो ज्योत्स्ने सहित : चंद्र जाला अस्तंगत ॥ रजनी जाली तमोवृत : राहिला व्यवहार ॥ ६२ ॥ किंवा प्रत्यक्‌दशे येतां मन : चंद्रिं नसे अभिमान ॥ विरोनि प्रमाणगण : न चळे वाक्प्रवृत्ति ॥ ६३ ॥ असो त्या प्रत्यक्‌पंथें : चिंतित होत्या कृष्णातें ॥ त्या चिंतनप्रभावें त्यांतें : अपुर्व मार्ग सांपडाला ॥ ६४ ॥ प्रवृत्तिभूमीपासून : प्रत्यक्‌पंथा आलें मन ॥ चंद्र जाला अप्रयोजन : त्या एकांतशीळातें ॥ ६५ ॥ असो हे रहस्य कथा : प्रसंगुचि वदिजे आतां ॥ ज्योत्स्नेसिं चंद्रास्त होतां : प्रविष्ट जालें जें तम ॥ ६६॥ त्या अंधकारातें लक्षुन : कृष्णगवेषणा पासुन ॥ निवर्तला गोपीगण : एकनिष्ठ होंत्साता तो ॥ ६७ ॥ असो प्रत्यक्‌रुपा कृष्णातें : गवेषिलें प्रवृत्तिपंथें ॥ मग सांडुनि त्या मार्गातें : पावल्या निवृत्ति ॥ ६८ ॥ सांडोनि बाह्य साधनातें : त्या गोपी कृष्णस्थचित्तें ॥ अंतरंग उपायातें : आचरत्या जालिया ॥ ६९ ॥ अंतरोपायाचें लक्षण : उत्तर ग्रंथें करुन ॥ आईक राया सावधान : निवेदिजेल अवघें ॥ ७० ॥

**तन्मनस्कास्तदालापास्तद्विचेष्टास्तदात्मिकाः ॥**
**तद्गुणान्येव गायंत्यो नात्मागाराणि सस्मरु : ॥ ४४ ॥**

राया त्या गोपांगना : अवघिया कृष्णमना ॥ सांडुनि अन्य कल्पना : स्मरत्या कृष्णातें ॥ ७१ ॥ त्यांचिये वाचेचा ठाईं : कृष्णवीण वार्त्ता नाहिं ॥ आलापु जितुका कांहिं : तो तद्विषइक ज्यांचा ॥ ७२ ॥ व्यवहारेंहिं वर्ततां : कृष्णाचिचि करिती वार्ता ॥ आणि चेष्टाही समस्ता : कृष्णपराचि त्यांच्या ॥ ७३ ॥ कृष्णसंग अनुलक्षुन : तिहिं धरिले प्राण ॥ जीणें श्रीकृष्णा अधीन : सर्वथा गोपिकांचें ॥ ७४ ॥ ह्मणोनि त्या तदात्मिका : तदालाप तद्विचेष्टिका ॥ एवं गोपी तन्मनस्का : तद्गुणगायनपरा ज्या ॥ ७५ ॥ तयांचें पूर्विंपासुन : वृत्ताचें केलें कथन ॥ दाविला अधिकार संपुर्ण : सर्वस्वें निरंतर ऐसा ॥ ७६ ॥ एवं त्या पतत् लक्षणा : वाखाणिल्या गोपांगना ॥ सांडोनि बाह्य साधना:

शांता होत्सात्या ॥७७॥ कृष्णि ठेउनि मन : तद्गुणाचें वर्णन ॥ करुनि त्या कृष्णाचें आगमन : प्रतीक्षित्या जालिया ॥७८॥ असो यकाग्रें चित्तें : पुरःसरोनि प्रार्थनेतें ॥ श्रीकृष्णाचिया गुणातें : वाखाणिलें गोपींहिं ॥७९॥ देखोनि ते व्यवधान : देहावरि नयेचि मन ॥ गृहादिसंबंधी जन : न स्मरतीच गोपिकांतें ॥ ८० ॥ गृहादिकिं मन जातें : तरि कृष्ण उपेक्षिता त्यांतें ॥ ह्मणोनि भाग्याचिं गोपीशतें : पावलिं कृष्णि ॥ ८१ ॥ एवं प्रसंगें करुन : कृष्णप्राप्तीचें साधन ॥ देहादिकातें विसरोन : गुण वर्णावे श्रीकृष्णाचे ॥ ८२ ॥ सांडोनि मान सकळ : गुण वर्णावे प्रांजळ ॥ मग सर्वथा रमालीळ : कृपा करील तयातें ८३ आतां कृष्णमनास्कि तिहिं : गुण वर्णिले जे काहिं ॥ बैसोनि कोणे ठाइं : तेहि राया आइक ॥ ८४ ॥

**पुनः पुलिनमाविश्य कालिंद्याः कृष्णभावनाः**
**समवेता जगुः कृष्णं तदागमनकातराः ॥ ४५ ॥**

तें जें कालिंदीपुलिन : ज्याचें पुर्विं केलें वर्णन ॥ जेथें गोपींसहवर्तमान : क्रीडला कृष्णजि ॥ ८५ ॥ ज्याचा गर्वहरणार्थ : गुप्त जाला भगवंत ॥ जेथूनि तें गोपीजात : कृष्णशोधासि निघालें ॥ ८६ ॥ मागुति पुलिनाप्रति : फिरोनि आल्या त्या सती ॥ मग तेथें कृष्णगीतिं : त्या गात्या जाल्या ॥ ८७ ॥ भेटावया गोपदारा : कृष्णागमनकातरा ॥ पाहावया यदुवीरा : अगमनोत्सुका त्या ॥ ८८ ॥ कृष्णागमार्तिसागरिं : मग्न होत्सात्या सुंदरी ॥ सर्वाही यमुना तीरिं : गाती कृष्णजीतें ॥ ८९ ॥ नाना तद्वियोगजाळें : ते गुणकथा नाव केली ॥ नातरि तद्विरहानाळें : संजीविनी मात्रा ॥ ९० ॥ असो अविकार पाहोन : केलें प्रत्यग्विवेचन ॥ नाना उपपत्ती करुन : तिहिं विचारिलें कृष्णातें ॥ ९१ ॥ तेणे एकांता आली वृत्ति : कृष्णें पाठविली भाक्ति ॥ तियेसहित त्या सती : प्रत्यकूपंथा आल्या ॥९२॥ अधिष्ठुनि त्या मार्गातें : पावल्या पुर्व स्थळातें ॥ पूर्वी कृष्ण होता तेथें : भ्रष्टल्या जेथुनि ॥९३॥ त्याचि पुर्वस्थळातें : तिहिं अधिष्ठिजेतें जालें मागुतें ॥ गर्वजनित दुरितें : निस्तरोनि अवघिं ॥ ९४ ॥ तेथें अंतरंग उपायभूतें : आरं-

भिलिं छन्दगीतें ॥ गाइलें कृष्णजीतें : नानास्वररसकल्लोळीं ॥ ९५ ॥ ते जे गाइले कृष्णगुण : ते विशद उत्तराध्यायें करुन ॥ वर्णितील व्यासनन्दन : राया परीक्षितीप्रति ॥९६॥ इतुकी संपादिली कथा : जे त्या गोपी विरहतप्ता ॥ कृष्णातें शोधित होत्सात्या : यमुनातीरासि आल्या ॥ ९७ ॥ ते मुनिभाषित आइती : कृष्णकथा भागवती ॥ श्रीशुकें परीक्षितीप्रति : उपदेशिली जे ॥९८॥ तेचि शौनकादिकांतें : निवेदिली तेणें सूतें ॥ आतां तेचि उपदेशिली मातें : नित्यानंदें दयाळुवें ॥ ९९ ॥ निजमतीतें लक्षुन : म्या करिजेतें अनुवर्णन ॥ कां जें करुनि वाक्शोधन : निस्तरावीं पापें ॥ ७०० ॥ आणि नित्यानंदमयमूर्ति : श्रीकृष्णाची विलासस्थिति ॥ कटी कवळूनि हस्तिं : भीमातीरिं निवासिनी जे ॥१॥ जे सर्वतापोपशमनी : उवड मंगळाचि खाणि ॥ जे कैवल्यप्रदानी : निजभक्तातें सर्वदा ॥२॥ ह्मणोनि या प्रसंगें करुनि : अवगुणातें न मनुनि ॥ माझिया हृदयभुवनिं : सदा तिष्ठत असो ॥३॥ इतुकेनि मिं दुष्टमति : पावों शकेन विश्रांति ॥ जोडलिं जें जन्मशतिं : निस्तरेन तें कर्मे ॥४॥ अहो कोण्हियेके पुण्यबळें : भगवंतातें म्या स्मरिलें ॥ तेणें आतां जडविलें : गुणवर्णनिं चित्त ॥ ५ ॥ हें असो पाल्हाळ : म्यां अति मुखें हा काळ ॥ क्रमावा कैसा सुशीळ : कृपा करी कैसा भगवंत ॥ ६ ॥ ऐसें विचारूनि निजचित्तिं : या गुणवर्णनि मिं मंदमति ॥ प्रवर्तलों तेथें आतां संतिं : क्षमा करुनि अवधारावें ॥ ७ ॥ एवं नित्यानंदिं ठेउनि मन : वर्णिलें यावत् अध्यायावसान ॥ पुढें श्रीकृष्णजीचे गुण : गातील गोपिका ॥ ८ ॥ तेंहिं निजमतीतें अनुसरोन : कीजेल जें काहिं व्याख्यान ॥ तेणें प्रीति पावो रमारमण : कृपा करो मजवरि ॥ ९ ॥ इति श्रीभागवते महापुराणे दशमस्कंधे रासक्रीडावर्णनं नाम त्रिंशतितमोध्यायः ॥ ३० ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु

ॐ

श्रीमद्भागवतांतर्गत

# रासपंचाध्यायी.

---

## अध्याय ३.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीमन्नित्यानंदाय नमः ॥ श्रीमद्विठ्ठलाय नमः ॥ आतां स्मरोनि गुरुचरण : तो रासक्रीडापरायण ॥ श्रीकृष्ण यशोदानंदन : लीलाविग्रहधारी ॥ १ ॥ तयाचे गुण वर्णुन : करुं वाचेतें पावन ॥ चपळ हें माझें जें मन : तें चांचल्यातें सांडुनि ॥ २ ॥ असो नित्यांनंदिं निर्भर : सांडु विषय निःसार ॥ पावऊ मजकरविं पार : भवनदीचा ॥ ३ ॥ विठ्ठलवेषाची बुंथि : घेउनि श्रीकृष्णमूर्ति ॥ कटीतें धरुनि हास्तिं : भीमातीरस्थ जे किं ॥४॥ ते प्रसन्न असो मातें : सार्थ करु मनोनयनातें ॥ या प्रपंचोर्मींचे आवातें : ना प्लाव उमजला ॥५॥ हे विषयीक कदर्थना : मागुती न देउ मना ॥ इये गुणवर्णनिं नाना : न प्रेरु विघ्नें कदाहि ॥६॥ आंगा आणोनि महंति : न विध्वंसु रसवृत्ति ॥ निर्व्यलीक निजकीर्ति : वर्णउ मज करवीं ॥७॥ भगवद्भक्तांचा संग : सदां प्रेरुनियां अभंग ॥ निजचरणीं अनुराग : प्रेरु माझिया मनातें ॥ ८ ॥ आतां असो प्रार्थना बहुं : कृष्णजीचे गुण गाउं ॥ या रसें रसना राउं : सांडुनि वाग्जाळ सर्व ॥ ९ ॥ आइका कथा हे भागवती : पुरातन श्रीव्यासोक्ति ॥ जे श्रीशुकेंद्रें रायाप्रति : निवेदिली संक्षेपें ॥ १० ॥ जें मरणार्णविंचे प्लव : सौष्ठव्याचें सार सर्व ॥ जें मोक्षाचें किं गौरव : शांतीचें सदन जें किं ॥ ११ ॥ जें श्रीकृष्णजीजे गुण : करीत असतां वर्णन ॥ पावला अवसान : त्रिंशतितमोध्याय ॥ १२ ॥ रासक्रीडेचा प्रसंगीं : ठाण मांडुनि त्रिभंगि ॥ त्या अंतरंगा तन्वंगी : व्रजवासिनी गोपी सकळाहि ॥ १३ ॥ अवसर देउनि तियांतें : कृष्णें जालें क्रीडिजेतें ॥ तंव निजकौतुकार्थ तेथें : प्रेरुनि मानगर्वासि ॥१४॥ तया गर्वपरिहारार्थ : नावेक अर्पोनि गुप्त ॥ तें अंतर्धान गोपीजात : निज

गवेषणें प्रवर्तविलें ॥ १५ ॥ त्या गवेषणाचिया अनुवृत्ति : तया प्रत्यक् पंथा मागुति ॥ आणोनि त्या सती : यमुनातीरातें पावल्या ॥ १६ ॥ जेथुनि ते गोपीशतें : चुकलिं होतिं कृष्णजोतें ॥ त्या यमुना पुलिनातें : अधिष्ठिति जालिं मागुतिं ॥ १७ ॥ जेवि सांडुनि पूर्ववृत्ति : बुद्धियोगातें अधिष्ठिति ॥ योगी त्या योगें पावति : स्वरूपसाक्षात्कारातें ॥ १८ ॥ असो प्रत्यक्प्रवणपंथें : तोडोनि व्यवधानातें ॥ अधिष्ठुनि निर्विषयबुद्धीतें : स्वरूपातें वरिती ॥ १९ ॥ कां जें आत्मोपलब्धीचें स्थान : आणि प्रपंचाचेंहिं अधिकरण ॥ दोहिं लक्षणिं करुण (न) : वर्तते बुद्धि ॥ २० ॥ यालागि प्रत्यक्प्रवणपंथें : योगी अधिष्ठिती बुद्धीतें ॥ या योगें स्वस्थितीतें : पावती ते ॥ २१ ॥ तेवि कृष्णवियोगस्थान : आवि हें यमुनां पुलिन ॥ आणि कृष्णप्राप्ति साधन : योजलें हेंचि ॥ २२ ॥ तया पुलिनाप्रति : त्या गोपी येउनि मागुति ॥ श्रीकृष्णाचे गुण गाती : पुरःसरुनि प्रार्थनेतें ॥ २३ ॥ तें जे काहिं मुनिनाथें : सांगीतलें हें रायातें ॥ तेंचि निवेदिलें सूतें : शौनकांदि प्रति ॥ २४ ॥ तें जें काहिं निरूपण : नित्यानंदें ठेउनि मन ॥ निजमतीतें अनुसरोन : वाखाणिजेतें ॥ २५ ॥

**जयति तेऽधिकं जन्मना व्रजः**
**श्रयत इंदिरा शश्वदत्र हि ॥**
**दयित दृश्यातां दिक्षु तावका-**
**स्त्वयि धृतासवस्त्वां विचिन्वते ॥ १ ॥**

अहो कृष्णा प्रीतिसदना : अगा ये नंदानंदना ॥ आइक गा व्रजभूषणा : आह्मा दीनाची विनवणी ॥ २६ ॥ कृष्णा या नंदगृहाचा ठाइं : तुझें जन्म जें काहिं ॥ असो हा विलासविग्रह पाहिं : मंगळमय जो ॥ २७ ॥ या तुझेनि जन्में करुन : हें व्रज तव क्रीडास्थान ॥ पावलें बहुं महिमान : तिहिं लोकिं ॥२८॥ हे जे साधारण जन : सर्वही जाले मोदमान ॥ कां जें त्वत्पदातें आश्रून : लक्ष्मी राहिली ॥ २९ ॥ एवं तव पदाश्रित : लक्ष्मी राहिली शाश्वत ॥ येथें तिया सालंकृत : शोभविलें व्रज सर्वहि ॥ ३० ॥ ह्मणोनि सा-

धारण जन : येथें राहिले अनुसरोन ॥ मां तुज जे किं शरण : ते वर्णावे किति ॥ ३१ ॥ या वृंदावनाची वस्ति : इच्छिता जाला प्रजापति ॥ ह्मणे द्रुमलता तृणजाति : होउनि राहावें ॥ ३२ ॥ एवं तव जन्मनिमित्त : व्रज हें महिमानवंत ॥ अति उत्कर्षें प्रस्तुत : वर्तत असे या त्रिभुवनिं ॥ ३३ ॥ आह्मी ज्या व्रजवासिनी : तव किंकरी ह्मणोनि ॥ श्लाघ्य जालों त्रिभुवनिं : तें काय व्यर्थ जालें ॥ ३४ ॥ हे समस्त व्रजौकस : नांदती जे स्वसंतोष ॥ आमुतेंचि कां उदास : जालासि गा प्रभो आतां ॥ ३५ ॥ आह्मी तों निकट दासी : भ्रमतसों दिशोपदिशिं ॥ जिहिं आह्मी सायासिं : प्राण धरिले ॥ ३६ ॥ असो तुझा पाइं मन : ठेउनि धरिले प्राण ॥ त्या आह्मी करीतसों भ्रमण : दशदिशांचा ठाइं ॥ ३७ ॥ ह्मणसी यासि काय कारण : तरि करितों किं चिंतन ॥ जें केव्हां तुझें वदन : निहाळुं आह्मी आतां ॥ ३८ ॥ या आशाकळितचित्ता : भ्रमतसों गा इतस्तता ॥ नुपेक्षिं श्रीकृष्ण अतां : निजदर्शनातें प्रेरिं ॥३९॥ आमुचिं राखसी जीवितें : तरि दाविं आपणातें ॥ अन्यथा या प्राणातें : सांडुन गा निश्चयें ॥ ४० ॥ आपणातें प्रकट करिं : किंवा आमुतें शक्ति प्रेरिं ॥ जें हें आंध्य निवारिं : निहाळुं तुला ॥ ४१ ॥ प्रभो ऐसें जाणवतें : जें आड येउनि दुरितें ॥ निकटाचि असतां तुतें : अंतरलों श्रीकृष्णा ॥४२॥ देहिं जाला अहंमान : भ्रंशलें बुद्धीचें ज्ञान ॥ त्वदिस्थ जो सनातन : त्या तुला चुकलों गा ॥ ४३ ॥ आह्मी आवडलों तुतें : हें धन्यें मानिलें चित्तें ॥ येणें फिरविलें आमुतें : सांडिलें तुवा तत्काळ ॥ ४४ ॥ तऱ्हि तुजवांचूनि काहिं : स्मर्त्तव्य उरलें नाहिं ॥ येणे गुणें तुझा पाइं : प्रार्थनेसि योग्यता पावलों गा ॥ ४५ ॥ एवं निजगुणेंचि करुनि : भ्रंशलों आह्मि भामिनी ॥ कृपाकटाक्षें करुनि : सावध करिं आतां ॥ ४६ ॥ आह्मी तुजला देखावें : ऐसें शक्तीतें प्रेरावें ॥ किंवा निजगुणेंचि प्रकटावें : दर्शन देईं आमुतें गा ॥ ४७ ॥ ऐशा त्या कृष्णमना : कोण्ही येकी गोपांगना ॥ तिहिं प्रार्थिला यदुराणा : आतां आणिका कोण्हि ॥ ४८ ॥ ह्मणती कृष्णा जरि ह्मणसी : जें सुखें हिंडा दशदिशिं ॥ मजसिं आणि तुमसिं : संबंध तो काइ ॥ ४९ ॥

ऐसें ह्मणसी पाहिं : तरि तुझें हास्यमुख जें काहिं ॥ खोंचलें कां त्वदइं : नयनकटाक्षेपुपातें ॥ ९० ॥ आतां नुपेक्षुनि आमुतें : जरि न देसी दर्शनातें ॥ तरि आमुचा तुझे हातें : वधु जाला जाणें ॥ ९१ ॥ या अर्थातें धरुनि मनिं : प्रार्थना पुरःसरोनि ॥ अपरा गोपगृहिणी : त्या बोलताति ऐसें ॥ ९२ ॥

**शरदुदाशये साधुजातस-**
**त्सरसिजोदरश्रीमुषा दृशा ॥**
**सुरतनाथ ते शुल्कदासिका**
**वरद् निघ्नतो नेह किं वधः ॥ २ ॥**

अगा ये सुरतनाथा : श्रीकृष्णजी नंदसुता ॥ इष्टदातया सर्वथा : आमुचिया संभोगपते ॥ ९३ ॥ असो संभोगावसान : नाहीं कृष्णेंवीण आन ॥ या लागि केलें संबोधन : जें अगा ये सुरतनाथा ॥ ९४ ॥ तैसेंचि कृष्णेंवीण काहिं : प्रेमास्पद वस्तु नाहिं ॥ ह्मणोनि तियेचि ठाईं : वरदातृत्वही योजलें ॥ ९५ ॥ ह्मणौनि वरद हें जाण : सुखप्रदाची खुण ॥ या उभयपदें संबोधुन : बोलताति गोपी ऐसें ॥ ९६ ॥ प्रभो तवाधीना प्राणेंसिं : यालगि अमूल्या दासी ॥ आह्मीं तुज निश्चयेंसिं : मोलेंवीण विकिलों ॥ ९७ ॥ तुजचि अवधि करुन : ठेविले असती प्राण ॥ न देखतां तुझें वदन : वांचने (णे) नाहिं सर्वथा ॥ ९८ ॥ लक्षुनि गृहादिकांतें : वर्त्तणें नाहिं आमुतें ॥ आरंभापासूनि जीवितें : वोपिलिं गा तुझे पाइं ॥ ९९ ॥ नाना विषयांतरातें इच्छुन : केलें नाहिं तुझें भजन ॥ तुजवांचुनि आन : तें तृणप्राय मानिलें ॥६०॥ यालागि मोलें वांचुन : अंगीकारिलें दासीव(प?)ण ॥ त्या आमुतें नेत्रें करुन : मारिता कटाक्षशरप्रहारें ॥ ६१ ॥ तुझे हातें आमुचा पाहिं : वध काय घडला नाहिं ॥ तुवां खोचिलें जें काहिं : अवलोकनशरपातें ॥ ६२ ॥ अनन्यासक्ता कामिनी : तियेचा त्याग कारितां ये जनिं ॥ तो वध शस्त्रेंवांचुनि : पतीसि घडे तियेचा ॥ ६३ ॥ तस्मात् शस्त्रें वांचुन : आमुचा वध हा जाण ॥ तुवां न दाउनि वदन : केला असे प्रभो ॥ ६४ ॥ जेवि कोण्ही जे साधक : तत्व साक्षात्कारें अधिक ॥ ते मानगर्वें निःशंक : अंतरती सर्वस्वें गा तुतें

॥ ६५ ॥ निस्तरोनि संकटातें : तेवि पावलों गा तुतें ॥ तवं गर्व होतां आ मुतें : अप्रकट जासि तत्काळ ॥ ६६ ॥ तुं कृपाकटाक्षपातें : नावलोकितासि आमुतें ॥ तरि साधारण चित्तें : आह्मीहीं असतों ॥ ३७ ॥ नेणोनि तुझी व्यवस्था : गृहींच होती ममता ॥ न करुनि कांहिं वार्ता : पशुप्राये राहातों गा ॥ ६८ ॥ तस्मात् अवलोकोनि आमुतें : तोडोनिया मुर्खतेतें ॥ गृहापासुनि चित्तें : काढिलिं आमुचिं ॥ ६९ ॥ दाविली आपुली चवि : उघडिली सुकृत ठेवी ॥ शेखिं कार्पण्यें धरुनि जिविं : वंचिले आमुतें ॥७०॥ आतां तुजवीण जीणें : याहुनि मरण काय उणे ॥ खोंचिलें दृष्टिबाणें : ऐसें जालें गा कृष्णा ॥ ७१ ॥ जेवि भणंगासि अन्न : देउनि घेइजे हिरोन ॥ तरि वध काय त्याहून : आणिक त्याचा ॥ ७२ ॥ तेवि तुवां कटाक्षपातें : अवलोकिलें आमुतें ॥ तें आह्मासि शरशतें : वोडवलिं गा आतां ॥ ७३ ॥ ह्मणसी कोण्हासि कोण्हि : पाहाती जरि ये जनि ॥ ते काय तेणें वधस्थानिं : मानावें तरि ॥ ७४ ॥ ऐसें ह्मणसि जरि काहिं : तरि हें येथें योग्य नाहिं ॥ हे नेत्रशोभा काई : अन्यत्र वर्तत असे कृष्णा ॥ ७५ ॥ तुवां नेत्रशरपातें : खोचिलिं आमुचिं जीवितें ॥ सविशेषण त्या नेत्रातें : वर्णितें आईक तेंहिं ॥७६॥ तरि शरत्काळाचा ठाईं : उदकांश जो काहिं ॥ तया सरोवरिं जें पाहिं : विकसलिं सरोजें किं ॥ ७७ ॥ असो त्या सरोवरिं उत्पन्नः त्यांसि सरसिज केली खुण ॥ त्यांहुनि असाधारण : उत्फुल्ल कमळें ॥ ७८ ॥ त्यांमाजिही पद्मजाति : कोण्हि एक विशेषगति ॥ सर्व शोभाची संपत्ती : पाविली गा जेणें कीं ॥ ७९ ॥ त्याचाही अंतःप्रदेश : कोमळ शोभेची मुस ॥ सुकुमार आणि सुवेश : अति सौंदर्याढ्य जो ॥ ८० ॥ तेणें जाणितलें पाहिंः जें आपणासि मान नाहिं ॥ इये जडतेचा ठाईं : आपणासि बहुं अयोग्य ॥ ८१ ॥ ह्मणोनि प्रस्थान केलें : या नेत्रांसि शरण आलें ॥ कींवा तुझे नेत्रें हरिलें : तिये शोभेतें ॥ ८२ ॥ असो त्या ठाया पासुन : आणोनि स्वनेत्रिं ठेउन ॥ दिधला अति सन्मान सरोजसौंदर्यातें ॥८३॥ तया शोभेचि संपति : प्रकटिली नेत्रप्रांतिं ॥ ते नेत्रशोभा आह्माप्रति : प्रेरिली जे तुवां ॥ ८४ ॥ ते तव वियोगानंतर : भेदितें

आमुचें जिव्हार ॥ नाना तोंचि होउनि शर : खडतरे हृदयिं ॥ ८५ ॥ एवं शरच्छोभासंपन्नः सरोवरिं जालें उत्पन्न ॥ त्या कमळाचा जाण : उदरप्रदेश जो किं ॥ ८६ ॥ ते पद्मोदरश्री जेणें : चोरोनि आणिली नयनें ॥ त्या नयन-कटाक्षबाणें : विंधिलें किं आमुतें ॥ ८७ ॥ असो अमूल्यां दासीतें : विंधिले नेत्र शरपातें ॥ तो काये आमुचा तुतें : वध नाहिं घडला ॥ ८८ ॥हें चु-कवावया दूषण : दाविं गा निजवदन ॥ वांचविं आमुचें प्राण : उपेक्षुं नको कृष्णा आतां ॥ ८९ ॥ ऐसें जरि मनि होतें : तारि वेधिलिं कां हें चित्तें ॥ पडलों होतों मोहगर्ते : यथासंभव सुखें किं ॥९०॥ अवतरोनि गोकुळिं : चित्तें कां निजस्थें केलिं ॥ गृहादि आशा सांडविली : निजत्व दिधलें ॥ ९१ ॥ प्रवर्तता तव चिंतनिं : झडपिलें बहुता विघ्निं ॥ तितुकिं तुवां निर्दाळुनि : रक्षिलें आमुतें ॥ ९२ ॥ असो तुझा वेधु नसावा : त्वद्वियोग होआवा ॥ ह्मणोनि विघ्नाचा यावा : जाला असतां जो ॥ ९३ ॥ तो तुवां न लगतां क्षण : नाशिला किं विघ्नगण ॥ आतां जालासि कां कृपण : उपेक्षिसी कां ॥ ९४ ॥ ऐसें धरुनि चित्तिं : बोलती त्या व्रजसती ॥ तें विघ्नें नाशिलिं किति : किंलक्षणें कोणे परिं ॥ ९५ ॥

**विषजलाप्ययाद्व्यालराक्षसा-**
**द्वर्षमारुताद्वैद्युतानलात् ॥**
**वृषमयात्मजाद्विश्वतो भया-**
**दृषभ ते वयं रक्षिता मुहुः ॥ ३ ॥**

तिये यमुनेचा डोहिं : विषमया जळाचा ठाईं ॥ ते गोपाळ आणि गाइ : अनुवर्ति जे तुझे प्रभो ॥ ९६ ॥ तिहिं करुनि विषजळपान : पावतां मृत्यु-सदन ॥ त्यांतें उठउनि आपण : प्रवेशोनि त्या डोहामाझारि ॥ ९७ ॥ मथूनि यमुना ह्रदातें : मर्दुनि महां सर्पातें ॥ तें यमुनाजळसर तें : व्रजोपकारी केलें तुवां सर्वत्रहि ॥ ९८ ॥ एवं विषनाशापासुन : राखिले आमुचे प्राण ॥ त्या महां सर्पा पासुन : जय पावलासि तुं जो ॥ ९९ ॥ त्या तुज आह्मीं न देखिजेतें : तरि तत्काळ प्राण जाते ॥ किंवा व्रजसंगें आमुतें : विक्षेप होता

॥ १०० ॥ प्रारब्धप्रतिबंधन : तुझा वेधिं होइल विघ्न ॥ यालागि ते विनाशोन : रक्षिले प्राण आमुचे ॥ १ ॥ असो त्या विश(ष)नाशा पासुन : तुवां रक्षिले निजजन ॥ तरि आतां कां उदासीन : जालासि कृष्णा ॥ २ ॥ तैसाचि येक सर्पवेष : आला किं महाराक्षस ॥ जेणे गोपाळाचा ग्रास : वत्छा(त्सा) सहित केला ॥ ३ ॥ तुवां प्रवेशोनि तन्मुखातें : विदारुनि उल्बणातें ॥ त्यां सवत्सां गोपाळांतें : रक्षिलें गा प्रभो ॥ ४ ॥ तेथुनि तुवां न यइजेतें : तरि आमुचे प्राण जाते ॥ किंवा निजवत्सळांते : न काढिजेतें जरि ॥ ५ ॥ तर्‍हि तव भजनाचा ठाइं : विघ्न वोडवतें काहिं ॥ असो हें परि तुझा पाइं : शरण आह्मी सर्वहि गा ॥ ६ ॥ त्या तुवां त्या विघ्नापासुन : राखिले ते निजशरण ॥ आणि आह्मासि कां उदासीन : जालासि गा ॥ ७ ॥ आणि ते समइं त्यांतें : तुझें सान्निध्य होतें ॥ निहाळुनि मुखचंद्रातें : तृप्त होति तें चकोरें ॥ ८ ॥ तें विघ्न त्यांतें काहिं : आह्मा ऐसें बाधिलें नाहिं ॥ तरि आतां येव्हडा काइ : क्षोभलासि कृष्णा ॥ ९ ॥ तैसाचि तो सुरपति : पीडा-[illegible] गोकुळाप्रति ॥ अतिशिळाधारासंपाति : वर्षता जाला किं ॥ १० ॥ तेणेंचि प्रसंगेंकरिं : वातोर्मियाचि हारि ॥ वर्षोनियां गोकुळावरि : घातु मांडिला सकळांचा ॥ ११ ॥ आणि विद्युतानळपात : प्रेरिले सहस्रशत ॥ तैसेचि वज्रपातोत्पात : सोडिले व्रजनाशातें ॥ १२ ॥ मग तुवां एकेचि करिं : उचलेनि गोवर्धन गिरि ॥ उभारुनि व्रजावरि : रक्षिलें त्या पासुन ॥ १३ ॥ असो त्या विघ्ना पासुन : ते वेळे रक्षि स्वजन ॥ त्या प्रसंगे आंमुचे प्राण : राखिले गा तुवां ॥ १४ ॥ तुवां न करितां आप्ता : वृथा जातों विरहतप्ता ॥ अंतरतासि तुं थिता : जोडलासि जो कृष्णा ॥ १५ ॥ पुरता गा तुझा प्रेमा : न पावोनि आह्मि रामा ॥ अंतरतों अतृप्तकामा : सुखरूपा तुतें ॥१६॥ एवं तेणे प्रसंगे करुन : राखिले आमुचे प्राण ॥ आजि कां कृष्ण निर्वाण : मांडिले तुवां ॥१७॥ तैसाचि वृषासुर दैत्य : आमुचा करावया घात ॥ आला त्याचा निपात : क्षणार्धें केला तुवां ॥ १८ ॥ तयाहि प्रसंगवशें : रक्षिलों आह्मी व्रजौकसें ॥

तुवां वैकुंठाचे अधीशें : कृपाळुवे श्रीकृष्णे ।। १९ ।। आणि प्रलंबासुर दैत्य : मयासुराचा जो सुत ।। व्रजौकसाचा निपात : करावया आला दारुण ।।२०।। असो विचारुनि तो चित्तिं : तुज हरावें या दुर्मति ।। आला त्यातें तुवां येमाप्रति : पाठविलें तत्काळ ।।२१।। तेणें तुज हरिजेतें : तरि आमुचे प्राण जाते।। नाना प्रत्यक्ष प्राणा तुतें : नेइजेतें जरि गा तेणें ।। २२ ।। तरि आह्मी विरहतप्ता : तैशाचि जातों अतृप्ता ।। अंतरतो सुरतनाथा : तुतें गा श्रीकृष्णा सर्वस्वें ।। २३ ।। तस्मात् त्यातें निवटुन : राखिले आमुचे प्राण ।। श्रीकृष्णा कां उदासीन : जालासि ये वेळे ।।२४।। असो विघ्नशतां पासुन : रक्षिलों आह्मी स्वजन ।। ते एक एक निवडुन : किति बोलावें गा आतां ।। २५ ।। एवं वारंवार आमुतें : रक्षिलें तुवां कृपावंतें ।। नाशिलिं जें विघ्नशतें : तें गणावि कवणें ।।२।। प्रभो आतां तुजलागुन : कंठि धरुनियां प्राण ।। बहुं केलें कि भ्रमण : आह्मि दशदिशांप्रति ।।२७।। परि निज दरुशनामृतें : सिंचिसिना कां आमुतें ।। व्यर्थ कां गा हें जीवितें : अप्रयोजकें करिसी कां कृष्णा ।। २८ ।। बहुंता जन्माचा अंतिं : उपजली तुझा पाइं प्रीति ।। तियची जरि समाप्ति : तुझा ठाइं नव्हे प्रस्तुत ।। २९ ।। तरि ह्मणी गा कर्मगति : मागुती या संसारावर्तिं ।। पडोनि सोसणे पडती : दुःखाचिया शतकोटि ।। ३० ।। ह्मणोनि करिं कृपाळुपण : प्रकटोनि नीज दर्शन ।। दावि गा आतां वदन : वांचवि कीं आमुतें ।। ३१।। ह्मणसी या सुमुखातें : तुह्मी भाळोनिया मातें ।। सदा कामासक्तचित्तें : भजलियाति सकळाहि ।। ३२ ।। त्या तुह्मी मज पासुन : कैसें पावाल भवमोचन ।। मिं तो प्रत्यक्ष जो नंदन : यशोदेनंदाचा कृष्ण किं ।। ३३ ।। ऐसें असेल जरि काहिं : तरि आह्मी भजलों ज्या पाहिं ।। त्या आमुचा तुझे ठाइं : भाव जो किं कृष्णा ।। ३४ ।। तो केवळ प्राकृत जन : येथ यशोदेचा नंदन ।। तुं व्रजवासी ह्मणोन : भाव जाला नाहिं गा प्रभो ।। ३५ ग्राम्य काम धरुनि मनि : भजलों नाहीं तव चरणी ।। तुज दुःखहर्ता हे जाणोनि : भजिनलों किं ।। ३६ ।। ऐसें धरुनि स्वचित्तिं : त्या गोपांगना कृष्णाप्रति ।। विनविल्या जाल्या मागुती : तें अवधारिं राया ।। ३७ ।।

न खलु गोपिकानंदनो भवा-
नखिलदेहिनामंतरात्मदृक् ॥
विखनसार्थितो विश्वगुप्तये
सख उदेयिवान्सात्वतां कुले ॥ ४ ॥

अगा ये सखया श्रीकृष्णा : परमप्रीतीचिया सदना ॥ आह्मी ज्या व्रजां-गना : अनन्यदासि तुझिया ॥३८॥ तिया गा तुज पाळकातें : सर्व दुःखा-पहरणातें ॥ केवळ तुं प्राकृत या मतें : भजीनलों नाहिं सर्वथा ॥ ३९ ॥ हे यशोदा नामें करुनि : गोपिका जे व्रजवासिनी ॥ अगा हे जे तुझी जननी : तुं नंदन जियचा प्रभो ॥ ४० ॥ ऐसें प्रतीयमान जें काहिं : हें निश्चयेंसिं सत्य नाहिं ॥ अखिळपदें संपूर्णाहिं : चराचरात्मक जग जें ॥ ४१ ॥ हें अध्यस्त जगद्भान : तुझा ठांई दृश्यमान ॥ त्याचे बुद्धिसाक्षित्वें करुन : सकळांतरिं वर्तसी गा तुं ॥ ४२ ॥ असो हे देही जे जीव समस्त : यांचा अंतरात्मा द्रष्टा निश्चित ॥ परि या यशोदेचा सुत : नव्हसि गा कृष्णा ॥४३॥ ह्मणसी मी अंतःसाक्षित्वें करुन : सर्वां भूतिं जो वर्तमान ॥ तरि त्या माझें दर्शन : दृश्यत्वें कैसें ॥ ४४ ॥ बुद्धिसाक्षि वस्तु जे काहिं : जेथें इंद्रियांची गति नाहिं ॥ ते या नेत्रांसि काई : विषय होउं शकेल ॥ ४५ ॥ ऐसें मानेल गा तुतें : तरि या पीडत्या जगातें ॥ जाणोनि सत्यलोकनाथें : प्रार्थिलें तुज जगरक्षणार्थि ॥ ४६ ॥ असो पाळावया महीतळी : नंदानंदन वनमाळी ॥ तुं यादवांचे कुळिं : उदैलासि किं प्रभो ॥ ४७ ॥ ब्रह्मप्रार्थनेचेनि मूळें : तुवां हें विडंबन केलें ॥ पाळावया साधुसुरकुळें : नाशावया दैत्य ॥ ४८ ॥ तुं यदुकुळभूषण : वसुदेवाचा नंदन ॥ त्याहीमाजि विडंबन : यशोदानंदानंदन त्वाचें केलें ४९ ॥ एवं तु गोपिकानंदन : हे सर्वथा सत्य नव्हे जाण ॥ आह्मी प्राकृतत्वें शरण : आलों नाहिं गा तुज ॥ ५० ॥ आह्मी जर्‍हि कामासक्ता : परि तुं कामशांतिकर्ता ॥ संसारदुःखहर्ता : हें काय अन्यथा हो-ईल ॥ ५१ ॥ यासि प्रमाण ह्मणसी काइ : तरि भजले जे तव पाइं ॥ हा संसारार्णव तिहिं : उलंघिला अनेकिं ॥५२॥ ऐसें त्या धरुनि मनीं :

उत्तर चतुःश्लोकें करुनि ॥ श्रीकृष्णजीतें प्रार्थुनि : इच्छिताति जें काहिं ॥९३॥ असो शरण जाउनि कृष्णाप्रति : ईच्छित वरचतुष्टयातें प्रार्थिति ॥ तें राया तुजप्रति : निवेदितों ऐसें ॥ ९४ ॥

**विरचिताभयं वृष्णिधुर्य ते**
**चरणमीयुषां संसृतेर्भयात् ॥**
**करसरोरुहं कांत कामदं**
**शिरसि धेहि नः श्रीकरग्रहम् ॥ ५ ॥**

अगा ये श्रीकृष्णा : यादवजनकुळमंडना ॥ हें संसारभयहरणा : अभय देइं गा आमुतें ॥ ९५ ॥ हे तुझे करपद्म जे काहिं : ते आमुचा शिराचा ठाईं ॥ ठेविं गा आह्मासि तुं देइं : अभयवरदान पुरतें ॥ ९६ ॥ आह्मी शरण ज्या तुतें : त्या तरों न विरहदुःखातें ॥ तुं प्रकटोनि ऐसा आमुतें : वर देइं कृष्णा एकु ॥ ९७ ॥ असो आह्मी तव किंकरी : मागुत्या वियोगसागरिं ॥ न पडों एसा आमुचा शिरिं : हात ठेविं आपुला ॥९८॥ तो तुझा हस्त किंलक्षण : तरि या संसारभया पासुन ॥ अत्यंत भीत जे शरण : तव चरणा प्रति आले ॥ ९९ ॥ तयांचिया भवभयातें : निवारिलें गा जेणें हस्तें ॥ शिरिं कर ठेउनि त्यांते : अभय दिधलें तुवां किं ॥ ६० ॥ आणि श्री जे सिंधुनंदिनी : ते जया हस्तें करुनि ॥ तव अनुग्रहातें पावोनि : पावली तुतें गा ॥ ६१ ॥ असो जेणें हस्तें करुन : श्रीयेचें केले पाणिग्रहण ॥ तिया करुनि प्रसन्न : हृदयिं राहिली ॥ ६२ ॥ त्या निजकरसरोरुहातें : सर्वकामशमनातें ॥ कामाभयार्थप्रदातें : आमुचा शिरिं ठेविं ॥ ६३ ॥ अगा ये मनोहरा कांता : सुंदरा गा नंदसुता ॥ हे तव वियोगविरहव्यथा : शमविं आमुची ॥ ६४ ॥ आविं प्रभो ठेउनि हात शिरिं : या विरहव्यथेतें हारिं ॥ आणि द्वितीयावतारातें हि करिं : मागतों तुज आह्मी हें ॥ ६५ ॥

**व्रजजनार्तिहन्वीर योषितां**
**निजजनस्मयध्वंसनस्मित ॥**
**भज सखे भवत्किंकरीः स्म नो**
**जलरुहाननं चारु दर्शय ॥ ६ ॥**

प्रभो व्रजदुःखहरणा : आइकें सखया श्रीकृष्णा ॥ अगा वीरा आह्मीं अंगना : शरण आलों किं तुज ॥ ६६ ॥ कां जें तव हास्यातें देखोन : कोण्ही भक्त जे तुझे जन ॥ ते गर्वार्णवा पासुन : ताकाळ तरति ॥ ६७ ॥ ह्मणोनि तुज हा संकेत : हे निजजनस्मयध्वंसन स्मित ॥ तुज देखोनि गर्वरहित : तुझे दास होति ॥ ६८ ॥ एवं तो गोपिकागण : संबोधनचतुष्टयें करुन ॥ संबोधिता जाला तें कारण : विचारिजेतें ऐसें ॥ ६९ ॥ प्रथम व्रजजनानार्तिहरण : बोलिल्या त्या यालागुन ॥ जें कृष्णा आम्हीहिं स्वजन : व्रजवासिनी गोपिका ॥ ७० ॥ त्या आम्ही ज्या विरहतप्ता : तुजलागि भ्रमतों वृथा ॥ तरि तुं व्रजजनार्तिहर्त्ता : कैसा पां कृष्णा ॥ ७१ ॥ आतां वीरशब्दें करुनि : शूरामाजि तुं अग्रणी ॥ तरि दुःखग्रस्ता जाणोनि : न सोडविसी कां आम्हां ॥ ७२ ॥ असो वियोगग्रहग्रस्ता : आम्ही तव समस्ता ॥ तरि आमुतें वीरनाथा : सोडवनासि कां ॥७३॥ निजजनस्मयध्वंसनस्मित : हें घडलें या निमित्त ॥ जें आह्मी ज्या गर्वग्रस्त : त्यांतें सांडिलें तुवां ॥ ७४ ॥ तरि नाशावया गर्वातें : तुज काय सामर्थ्य नव्हतें ॥ परि कोण जाणें किंनिमित्तें : गेलासि तुं गा ॥ ७५ ॥ परंतु तव स्मरणें करुन : त्या गर्वार्णवा पासुन ॥ तरलों ऐसें जाणोन : तुं भजपदें अंगीकारिं सखया ॥ ७६ ॥ असो सखा येणें संकेतें : दाविलें अनन्य गतीतें ॥ कृष्णा तुजवीण आमुतें : रक्षणार नाहिं कोण्हि ॥ ७७ ॥ आह्मीं निश्चयें तव किंकरी : गती नाहिं गा दुसरी ॥ उपेक्षुं नको झडकरि : संभोगिं आमुतें सखया ॥ ७८ ॥ प्रवेशोनि आमुचा हृतिं : आमुचा तुं गा प्राणपती ॥ मैथुन करुन एकांतिं : निवविं आमुतें ॥ ७९ ॥ आतां प्रकटोनि श्रीपति : आमुसिं करि गा सुरतरति ॥ असो आमुतें संभोगरीति : भज सखया तुं ॥ ८० ॥ तें कैसें ह्मणसी भजन : तरि दाविं जळरुहानन ॥ म्हणिजे सुंदर वदन : कमळासारिखें जें ॥ ८१ ॥ देखोनि मुखशोभालेश : कमळ केलें उपमेस ॥ जयातें पाहोनि विध्वंस : कंदर्प पावे ॥ ८२ ॥ ऐशा निजवदनातें : दाविं आम्हां तव योषितातें ॥ देउनि भोगसुखातें : निवविं कृष्णा

॥ ८३ ॥ असो त्या वरचतुष्टयातें : तुजलागि प्रार्थिलें होतें ॥ त्याही माजि प्रथम तुतें : विनविती आम्हीं इतुकें गा ॥ ८४ ॥ जें आम्हां तव योषितांसि : तृषाक्रांता चकोरांसि ॥ तृप्त करावया मुखशशी : प्रकटिं गा तुं आधिं ॥८५॥ पाहोनि वदनशोभेतें : निवतीऊ संततें चित्तें ॥ मग उर्वरिता वरत्रयातें : भोगिजेल सावकाश आम्हिं ॥ ८६ ॥ म्हणोनि कृपाळुवें श्रीकांतें : अधिष्ठुनि स्वकरुणेतें ॥ दावावें मुखसरोजातें: आम्हा निजयोषितां प्रति ॥ ८७ ॥ जेवि संसारतप्तां प्रति : आधि शास्त्रें फळातें दाविति ॥ मग उपदेशुनि निवृति : स्वरूपनिष्ठा साधविति ॥ ८८ ॥ असो आधि श्रवणपंथें : दाविती स्वरूपलक्षणातें ॥ पावावया आत्मनिष्ठेतें : मग सांगती ध्यानयोग गुरु ॥ ८९ ॥ तेवि तव मुखशोभेतें : पाहोनि होति शांतें चित्तें ॥ मग शिरिं ठेउनि स्वहस्तें : अभयवरातें देइं गा ॥९०॥ असो पुर्वि पावोनि शांति : योग्य होउं न संगाप्रति ॥ मग यथाक्रमें अति प्रीति : तुं संभोगिं आमुतें ॥ ९१ ॥ एवं वरद्वयें करुन : श्लोकयुग्में केलें प्रार्थन ॥ आतां तृतीयातें गोपीजन : प्रार्थितुसे ऐसें ॥ ९२ ॥

**प्रणतदेहिनां पापकर्शनं**
**तृणचरानुगं श्रीनिकेतनम् ॥**
**फणिफणार्पितं ते पदांबुजं**
**कृणु कुचेषु नः कृंधि हृच्छयम् ॥ ७ ॥**

सर्व मंगळाचें मुळ : कृष्णा तुझें पदकमळ ॥ तें आमुचा हृदइं निश्चळ : नावेक ठेविं आतां ॥ ९३ ॥ तें ह्मणसी किंविशेषण : तरि जे किं देहधारि जन ॥ त्यांमाजि जे कोण्ही सज्जन : तुझे भजनासि अधिकारी ॥ ९४ ॥ सांडोनि सर्व विषयातें : तुझया पदसरोजातें ॥ श्रवणकीर्तनादि पंथें : शरण येती जे किं अनन्यभावें ॥ ९५ तयांचें दुरितकर्षण : ह्मणिजे पापसमुद्रा पासुन ॥ तरोनि ते तुझे भजन : सुखाडें पावति प्रभो ॥ ९६ ॥ एवं एतत् लक्षणिकासि : आपलिया पदसरोजासि ॥ आमुचिया स्तनहृदयेदोशीं : समर्पि गा कृष्णा ॥ ९७ ॥ आणिक तें किंविशेषण : तरि तृणचरानुग जाण ॥ जें

गोधना मागें करी गमन : ऐसें तुझें पदांबुज किं ॥ ९८ ॥ हें जें आपुलें पदकमळ : तें मर्दुनि कुचयुगळ ॥ समर्पि गा हृदइं अढळ : आमुचे कृपेस्तव ॥ ९९ ॥ आणि श्री जे सिंधुतनया : पावली पदाब्जनिलया ॥ तें पदपद्म या हृच्छया : नाशावया ठेवि स्तनिं ॥ २०० ॥ आणि जे यमुनें माझारि : ठेउनि सर्पफणावरि ॥ त्या महां सर्पाचे शिरिं : नृत्य जेणें केलें ॥ १ ॥ तया पदांबुजातें : विशेषणें वर्णावें किती येथें ॥ ते सिंधुजा जेणे स्वार्थें : वश जाली तुज ॥ २ ॥ मनिं धरुनि पादसंवाहन : तिया जोडिलें स्वनिकेतन ॥ पावली समाधान : त्यक्ताभिमान जे ॥ ३ ॥ ह्मणोनि पदाचें विशेषण : केलें श्रियचें निकेतन ॥ ते सांडोनि सर्व मान : राहिली गा जेथें ॥ ४ ॥ एवं एतन्महिमानवंत : तुझे पदांबुज जें प्रशस्त ॥ तें समर्पिं कृष्णा निश्चित : कुचांवरि गा ॥ ५ ॥ ऐसें तो गोपिकाजन : विशेषणच्यतुष्टयेंकरुन ॥ श्रीकृष्णजीचे चरण : इच्छिता निजहृदयिं ॥ ६ ॥ तें चतुर्विशेषणवशें : प्रार्थिलें त्याचा भाव ऐसा असे ॥ जें आमुचिं सपापें मानसें : असतील जरि ॥ ७ ॥ तरि पापाचें कर्षितें : प्रार्थिलें जें पदांबुज तुतें ॥ कृष्णा तें जरि कृपावंतें : स्तनहृदयीं आमुचा ॥ ८ ॥ तें करिजेल समर्पण : तरि या दुरितार्णवा पासुन ॥ तरोनि तुझें संनिधान : पावों गा सत्वर ॥ ९ ॥ म्हणसी तुम्ही मुढजाति : योग्य नव्हा मत्पदांबुजा प्रति ॥ ऐसें जरि श्रीपति : म्हणसी गा आतां ॥ १० ॥ तरि सुजाना ( णा ) श्रीकृष्णा : आम्ही काय पशूहुनि हीना ॥ सदा गाइ नेउनि राणा ( ना ) : त्यां मागें फिरसि ॥ ११ ॥ त्या मागें चालते वेळे : तव पदसंगाचे सोहळे ॥ भोगुनि तिहिं नाशिले : दुरिताचे पर्वत किं ॥ १२ ॥ म्हणोनि दुरितक्षयानिमित्तें : प्रार्थिलें तव पदातें ॥ जें दुरितें आतां आमुतें : प्रतिबंध जालिं ॥ १३ ॥ म्हणसी तुम्ही नव्हा जर्‍हि हीना : परि सक्रोधा अंगना ॥ जातीच्या साभिमाना : शरण जन्ही मातें ॥ १४ ॥ ऐसें जरि जगन्नाथें : कल्पिजेल काहिं येथें ॥ तरि आम्ही वनिताशतें : सर्पाहुन काय सक्रोधा ॥ १५ ॥ या यमुनाजळा माझारि : कालियाचे फणावरि ॥ नाचोनि

केलि बोहरी : त्या सर्पांचिया दर्पांचि ॥ १६ ॥ तें जरि गा श्रीचरण : लाधेल हें हृदयभुवन ॥ नातरि आमुचा दर्प कोण : किमात्मका आम्ही ॥ १७ ॥ म्हणोनि दर्पहरा पदातें : इच्छिताति आमुचिं चित्तें ॥ तया चरणि गा आमुतें : अवसरु देइं कृष्णा ॥ १८ ॥ म्हणसी पापातें कर्षिति : मुढत्वातें नाशिति ॥ महां दर्पातें हरिति : असोत माझि पदकमळें ॥ १९ ॥ पारि या पदांचा ठाइं : दृष्ट सुख तों नसे काहिं ॥ तरि ते रमादेवी काइ : व्यर्थचि भजिनलि येथें ॥२०॥ ते सकुमारासिरोमणि : सकळ सौष्ठव्याची खाणि॥ जियेचा अवलोकनि : इंद्रही सलालस ॥ २१ ॥ पारि त्या इंद्रादिकांसि काहिं : तो लेशहि लाभत नाहीं ॥ ऐसी जे रमादेवी ते काई : उगीच राहिली तेथें ॥२२॥ अगा ते सिंधुनंदिनी : स्वता तुझी पदसंवाहिनी ॥ केलें भजनालागुनि : तिया समाधि सदन ॥ २३ ॥ एवं जें पापहर्ते : तापाचे उपशमवित्तें ॥ तें पदांबुज गा कृष्णा तुतें : प्राथितों स्वकुचावरि ॥२४॥ त्या तव पदसरोजासि : या स्तनहृदयप्रदेशीं ॥ ठेउनि आमुचा नाशिं : हृच्छय जो मदन हा ॥ २५ ॥ असो या पदप्रभावें करुन : करिं कामाचें विच्छेदन ॥ आमुतें गा समाधान : आपुले पांई द्यावें ॥ २६ ॥ करावया कामनिवृत्ति : तव पदिं असे गा शक्ति ॥ हें जाणोनि आह्मी समस्ति : शरण आलों तुज ॥ २७ ॥ आतां कृपेतें अधिष्ठुन : या स्तनावरि चरण ॥ ठेउनि करिं गा विच्छेदन ॥ दर्पाचें आमुचिया ॥२८॥ असो कारणेंसि जो मदन : त्याचें करिं विच्छेदन आह्माप्रति उदासीन : नसावें तुवां कृष्णा ॥ २९ ॥ एवं येणें श्लोकें करुन : प्रार्थिलें पदांबुजप्रदान ॥ आतां पुढें गोपीजन : चौथा वर मागतो ॥ ३० ॥

**मधुरया गिरा वल्गुवाक्यया**
**बुधमनोज्ञया पुष्करेक्षण ॥**
**विधिकरीरिमा वीर मुह्यती-**
**रधरसीधुनाऽऽप्याययस्व नः ॥ ८ ॥**

अगा ये यशोदानंदनाः श्रीकृष्णा कमलनयना ॥ आणिक एकि प्रार्थना : अवधारिं आमुची ॥३१॥ ह्मणसी तुम्ही अंगना : सदा गृहवासिनी स्वाधीना ॥

मज पर पुरुषातें प्रार्थना : येवढी कां कारिता ॥ ३२ ॥ दृष्टोत्पत्त्या तों येथें कांहिं : मज तुमसिं संबंधु नाहिं ॥ वाउगीच तरि हे काई: इतुकी हे कदर्थना ॥ ३३ ॥ ऐसें जारि काहिं वीरा : म्हणसी गा नंदकुमारा ॥ तरि तुझी जे किं मधुर गिरा : बुधमनातें रंजविती ॥ ३४ ॥ असो सुंदरा वचनि प्रशस्त : बुध जे विवेकी विरक्त ॥ अति चतुर गंभीर युक्त : बोलें जाणती जे ॥३५॥ त्या सज्जनमनातें हर्ति : अतिशयें सुखातें कार्ति ॥ तया वाचे कारिं श्रीपति : : विधिकरी ज्या आम्ही ॥ ३६ ॥ मोहिलों असत होंतसाया : फिरविलों गा इतस्तता ॥ तारि तुवां कृष्णा आता : उपेक्षिले कां आमुतें ॥ ३७ ॥ असो मधुरा वाणी करुनि : तुवां मोहिलों आम्हि भामिनी ॥ सर्वस्वातें सांडुनि : विधिकरी जालों ॥ ३८ ॥ तियां तव दासितें आम्हासि : तुझा पाइं असा-वयासि ॥ आधिकारु निश्चयेंसिं : जाला गा आतां ॥३९॥ आम्ही जे धरिले प्राण : ते तुझाचि आश्रयें करुन ॥ आम्हासि तुजवांचुन : गति नाहिं कृष्णा ॥४०॥ न देखोनि तव वदना : वोडवलों गा गतप्राणा ॥ आतां आमुतें नंदा-नंदना : अधरांमृतें वांचविं ॥ ४१ ॥ असो आपुलें अधरांमृतें : जीवविं आम्हां किंकरींतें ॥ म्हणसी म्या सांडिलें तुमतें : तारि वांचल्याति कैशा ॥ ४२ ॥ मजवांचुनि नाहिं गति : हा निश्चयो जारि असे चित्तिं ॥ तरि आतां कोणे रीति : राहिल्याति तुह्मी ॥ ४३ ॥ प्रभो ऐसें जारि गा म्हणसी : तारि यथार्थ हें आम्हासि ॥ तुझा वियोगें निश्चयेंसि : वांचने ( णें ) चि न घडे ॥ ४४ ॥ परि आम्हीं वांचलों येथें : तुझिया गुणकथांमृतें ॥ जाणवोनि ऐशा अर्थातें : बोलताती त्या गोपी ॥ ४५ ॥

**तव कथामृतं तप्तजीवनं**
**कविभिरीडितं कल्मषापहम् ॥**
**श्रवणमंगलं श्रीमदाततं**
**भुवि गृणंति ते भूरिदा जनाः ॥ ९ ॥**

प्रभो तुझें कर्म अद्भूत : तेंचि जें तव कथांमृत ॥ त्या कथांमृतातें प्रस्तुत : वर्णिती जे या जनि ॥ ४६ ॥ असो जे सारभागी जन : तव गुणकथेचें

कीर्तन ॥ करिताति ते कृष्णा जाण : बहु दाते या लोकि ॥ ४७ ॥ ह्मणसी हें जें गुणकीर्त्तन : यासि अमृतत्विं काय कारण ॥ तारि जे कीं संतप्त जन : त्यातें जीवविते ॥ ४८ ॥ असो मरणाहुनि विशेष : या संसारिं महाक्लेश ॥ जे मेलियांहिं बहु त्रास : अनुजन्मीं होति ॥ ४९ ॥ जे मेलियातें जन्मविति : मागुती जन्मोनि मारिति ॥ एवं ते दुःख पांक्ति : कल्पावधि भोगिजे ॥५०॥ त्या दुःखभयें जे संतप्त : त्यां तप्तांचें हें जीवनभूत ॥ ऐसें जें तव गुणांमृत : तया गुणातें जे गाति ॥ ५१ ॥ ह्मणसी हें तों अदृष्टसुख : आतां ते कैसें सुखात्मक ॥ ऐसें ह्मणसी तरि आइक : ब्रह्मनिष्ठ जे ॥ ५२ ॥ तेही ब्रह्मज्ञानें करुन : जन्हि तुटलें जन्मकारण ॥ तिहिं गुणकीर्तन : करिजेताचि आहे ॥ ५३ ॥ असो जे गुरुशास्त्ररीति : पावले जन्हि आत्मस्थिति ॥ तेही तुझे गुण गाति : प्रेमळ होत्साते किं ॥ ५४ ॥ तस्मात् ब्रह्मज्ञानें करुन : तोडिलें दुःखाचे कारण ॥ तथापि प्रारब्धैक उत्पन्न : देहिं जो संताप ॥ ५५ ॥ त्या संतापाचें शमन : तें तव गुणाचें कीर्त्तन ॥ करुनि ते विवेकी जन : सदां आत्मसुखें असती ॥ ५६ ॥ असो तेही तवगुणकीर्त्ति : गाउनि पावती वि-श्रांति ॥ तेयें विक्षेपाची प्रवृत्ति : होउंचि नशके कदापि ॥ ५७ ॥ आतां होचिं असो परते : प्रारब्धहि न स्पर्शो त्यांतें ॥ परि विश्रांतिहि वरौते : अ-त्यंत सुख भोगिती ते ॥ ५८ ॥ तस्मात् तुझें गुणकीर्तन : अमृतत्वाचें सा-धन ॥ तथापि येणें योगीजन : परमानंदातें पावती गा प्रभो ॥ ५९ ॥ मां आह्मीं तो तुझिया आप्ता : परि दैवें वियोगप्राप्ता ॥ त्या आमुतें तव गुण गातां : वांचतां आश्चर्य काये ॥ ६० ॥ त्या तव गुणकथेतें : वर्णिती तोचि सर्वांचे प्राणदाते ॥ किंबहुना तिहिंचि आमुतें : वांचविलें प्रस्तुत ॥ ६१ ॥ ह्मणोनि इये जनि : योजले ते संत बहुंदानि ॥ जे तुझे गुणकीर्तनें करुनि : क्रमिताति काळ ॥ ६२ ॥ ह्मन(ण)सि माझे गुणकीर्त्तन : दृष्टादृष्ट सुख-कारण ॥ ह्मणिजे आतां सुख करुण (न) : परत्रही सुखातें देते ॥ ६३ ॥ परि पापनिवृत्ती वांचुन : न तुटे संसारबंधन ॥ नुपजोनि शुद्ध ज्ञान : नीर-सेल कैसि अविद्या आतां ॥ ६४ ॥ अविद्यानिवृत्ति वांचुन : नव्हेचि कामो

पशमन ॥ कामाचे निवृत्तीवीण : मोक्षप्राप्ति कैसी होय ॥६५॥ ऐसें जरि प्रभो ह्मणती : तरि आइकतां गुणकीर्त्ति ॥ अनेकां कल्मषांची पंक्ति : तत्काळ नाशते ॥ ६६ ॥ असो तवगुणकथारसें : नाश पावती किल्बिषें ॥ होउनि शुद्ध मानसें : ज्ञानाधिकार संपादे श्रवणें ॥६७॥ आणि गुणकथेचा ठाइं : साधनांतरें काज नाहिं ॥ श्रवणमात्रेंचि सर्वहि : पातकें नाशोनि जाति गा ॥६८॥ ह्मणोनि सांडोनि वाग्जाळ : गुणकथा जे श्रवणमंगळ ॥ तियेतें भावें करितां प्रांजळ : वर्णिती जे कोण्हि ॥ ६९ ॥ ते सन्त स्वता आपण : असोनि मंगळायतन ॥ करिति मंगळप्रदान : श्रवणार्थिया सकळातेंहीं ॥७०॥ श्रीमंत जे व्यासादिक : तिहिं वार्णिलें कथानक ॥ त्या गुणकथेतें अधिक : विस्तारिती तेचि संत्त ॥ ७१ ॥ यालागि ते कैवल्या दानी : बोलिजती बहुतां जनि ॥ तव गुणकथेतें वर्णोनि : निववितो सर्वांतें ॥ ७२ ॥ असो देवभोग्य जे अमृत : तें बहुतां संकटें प्राप्त ॥ आणि तुझे गुण कथित : श्रवणकीर्तनेंचिसुखप्रद ॥ ७३ ॥ आणि हे दुरितहरण : कैवल्यप्राप्तिचें कारण ॥ कींबहुना हे तुझे गा गुण : कैवल्यरुपाचि सकळांतें ॥ ७४ ॥ म्हणसी हे कैवल्यप्रदानी : ऐसें जाणिजे कैसेनि ॥ तरि मनातें उपशमउनि : शातीतें करिते जे ॥ ७५ ॥ असो हे तव कथामृत : बोलिले जें श्रीमत् सुशांत ॥ जैसें उन्मादक अमृत : तैसे हें नव्हे सर्वथा ॥ ७६ ॥ तव कथा-मृतलहरी : नव्हे गा उन्मादकारी ॥ या परमशांतीचिये सेजारिं : श्रवणमात्रें पहुडवि ॥ ७७ ॥ म्हणसी सारभागी जे जन : माझ्या गुणगणाचे गायन ॥ करुनियां ते शांत मन : निवांत होति ॥ ७८ ॥ ते कोण लक्षणे करुनि : योजले बहुतेक शांतदानी ॥ ऐसें म्हणसी तरि या जनिं : प्रकटचि ते गुण गाति ॥७९॥ अधिगतप्रेमरसवृत्ति : वर्णिती तुझी गुणकीर्ति ॥ असो विस्तारें गुण गाति : जेणें लोकोपकार वाढे ॥ ८० ॥ तें जें देवभोग अमृत : कथामृताहुनि प्राकृत ॥ अति तुच्छ तें आणि बहुत : दुःसाध्यही असे ॥८१॥ यागादिकातें अधिष्ठुन : स्वर्गवासी होते असोनि जन ॥ तरिहि त्यांसि तें पान : बिंदुमात्र लाभतें ॥ ८२ ॥ हें कदाचित् कोण्हि अखंडित : यथेच्छ

जइं होती संतृप्त ॥ तइं ते चिरंजीवित : अभंग अक्षय होती ॥ ८३ ॥ ऐसें तें स्वर्गामृत दुर्लभ : आणि हे तों सर्वांसि सुलभ ॥ उत्तम कनिष्ट स्वयंभ : समान सेविति ॥ ८४ ॥ आणि तवकथामृतपान : पावनाचेंहि पावन ॥ परम शांतीचें सदन : कैवल्याचें साधक जें ॥ ८५ ॥ या अमृतातें अपेक्षुन : करिती जे कथा श्रवण ॥ ते बहुं सुरवाडें करुन : निमज्जती आनंदडोहिं ॥ ८६ ॥ तयां प्रेमळांसि गा काहिं : या कथामृताचि वाणि नाहिं ॥ विनटले तुझा पाई : ते सौकर्यें वर्णिती ॥ ८७ ॥ व्यासवाल्मिकादि ये जानें : कवि जे थोर थोर कोण्हि ॥ तिहिं हें गाइलें ह्मणोनि : तेचि दाते येथें ॥ ८८ ॥ ते आपण पावोनि शांति : इतरांचि दुःखें नाशिती ॥ संतप्तातें निववीती : गुणवर्णनप्रसादें सदां ॥ ८९ ॥ ह्मणोनि ते सुखदाते : परमांमृताचे वर्षते ॥ असो प्रस्तुत तिहिं आमुतें : वांचविलें गा कृष्णा ॥ ९० ॥ किंवा उक्तलक्षणयुक्त : तुझे जे गुणकथामृत ॥ त्यातें कवि जे कोण्ही संत : वर्णिती गा ये लोकिं ॥ ९१ ॥ तेचि जाणावे बहुं दानि : जे जन्मांतरिं तपोनि ॥ अनंत सुकृतें अर्जुनि : अधिकारी जे होती ॥ ९२ ॥ असो वर्णावया तव कीर्त्ति : ते अधिकारातें पावती ॥ सुकृताची हे संपत्ति : भोगिती ते आपुली ॥ ९३ ॥ तयाचि प्रसंगें करुन : आमुचेहि वांचले प्राण ॥ आतां दावि आपुलें वदन : प्रगटोनि गा सत्वर ॥ ९४ ॥ नातरि गुणवर्णनेंकरिं : त येवढी पावती थोरि ॥ आह्मी तों तव किंकरी : देखों जरि गा तुतें ॥९५॥ तरि या भाग्याची नवाई : वर्णावी गा किति काइ ॥ यालागिं प्रपन्ना तुझे पाइं : दर्शन देइं श्रीकृष्णा ॥ ९६ ॥ ह्मणसी माझें कथामृत : येवढें महिमानवंत ॥ तरि तोंचि सादरचित्त : प्राशोनि असावें सर्वदा ॥ ९७ ॥ अपेक्षूनि दर्शनातें : व्यर्थ कां कदर्थिता आपणातें ॥ ऐसें जरि यदुनाथें : कल्पिजेल काहिं ॥ ९८ ॥ तरि आधिं विलासपंथें : क्षोभविलिं कां आमुचिं चित्तें ॥ ये विषइं गा कृष्णा तुतें : विनवितों ऐसें ॥ ९९ ॥

प्रहसितं प्रिय प्रेमवीक्षणं
विहरणं च ते ध्यानमंगलम् ॥

रहसि संविदो यो हृदि स्पृशः
कुहक नो मनः क्षोभयन्ति हि ॥ १० ॥

अगा ये प्रिया प्रीतिसदना : श्रीकृष्णा नन्दानन्दना ॥ सुंदरारविंदवदना : अवधारिं गा आमुची विनति ॥ ३०० ॥ प्रभो तुझे जें प्रहसित : हांस्य जें किं शुचिस्मित ॥ जेणें विश्व हें समस्त : धवळिलें अंति शुद्धतेकरिं ॥ १ ॥ असो जया स्फुरणें करुन : रचलें हें गा जगद्भान ॥ जेणें मिषें विग्रहधारण : तें जें तुझें विलासहास्य ॥ २ ॥ तैसेंचि तुझें प्रेमवीक्षण : जें कृपाकटाक्षावलोकण (न) ॥ असो जें केलें प्रेमप्रदान : नयनकटाक्षद्वारा ॥ ३ ॥ आणि तुझा जो किं विहार : जे चालता पदप्रचार ॥ विलासेंकरिं मनोहर : या वृंदावनाचा ठायिं ॥ ४ ॥ आणि तुझी जे मंगळमूर्ति : शोभा हे जे विलासवती ॥ जे किं सौष्ठव्याचि सम्पति : कैवल्याचि मुस ॥ ५ ॥ जे योगीजन हृत्कुहरिं : वसोनि सदां सुखकारी ॥ असो जे चित्तहारि मंगळमयीचि अवधि ॥ ६ ॥ त्या मुर्तिद्वारा तुझें ध्यान : जें मंगळांचे निकेतन ॥ मनोविश्रांतीचें हें स्थान : प्रेमाचें वर्धक ॥ ७ ॥ आणि एकांताचा ठाइं : संकेतनर्में जें जें काहिं ॥ असो एकांति तुवां जें काहिं : विनोदारंभ दाविले ॥ ८ ॥ प्रभो आह्मि ज्या गोपांगना : त्वद्विलासमोहितमना ॥ त्या आप्त केलों ऐशा सूचना : एकांति ज्या दाविल्या ॥ ९ ॥ नातरि जाणउनि संकेतातें : स्तनहृदयें केलिं नखमुद्रितें ॥ असो जिहिं हृदयातें : स्पर्शिलें आमुचिया ॥ १० ॥ असो विनोदाचें निमित्तें : धरिलें आमुचिया स्तनातें ॥ करोनि नखसंस्कारातें : मुद्रांकिता केलों ॥ ११ ॥ जेवि शरणागतां मुमुक्षूतें : गुरु असोनि प्रसन्नचित्तें ॥ पाहोनि कटाक्षपातें : अभयातें प्रेरिति ॥ १२ ॥ मग ते शास्त्रप्रक्रियेतें : दाउनि आपातता अर्थें ॥ बोधउनि महांवाक्यें त्यांते : उपदेशिती हृदयस्पर्शें ॥ १३ ॥ तेवि तुवां गा आमुतें : कृष्णा चतुराचेनि नाथें ॥ दाउनि हसितें क्षणातें : नखदंतसंस्कार केले ॥ १४ ॥ एवं ते हास्यावलोकें : आतां जालिं मनःक्षोभकें ॥ जें तुवां कपटनायकें : प्रेरिलीं गा आम्हासि ॥ १५ ॥ तेंचि आमुचिया मनातें : क्षोभविताति मा समस्तें ॥ कां

जें तुं ठकुनि आमुतें : गेलासि येथुनि ॥ १६ ॥ किंवा हें दोषनिबंधन : आम्हा दाविलें तिरोधान ॥ पावलों आरूढ पतन : अंतरोनि तुज आतां ॥ १७ ॥ स्मरोनि हास्यादिकांतें : क्षोभती गा आमुचि चित्तें ॥ यालागि तव कथेतें : गावोनि वांचलों नावेक ॥ १८ ॥ परि न देखोनि हे मूर्ति : आम्हि न पवों गा विश्रांति ॥ जेवि परोक्षवादें स्थिति : निष्टंक नव्हे स्वरुपीं ॥ १९ ॥ म्हणोनि अगा ये कुहका : कपटिया मनमोहका ॥ आह्मीं त्याज्य न हों दासिका : अंगी कारिं आतां ॥ २० ॥ लाउनि आपुली प्रीति : चोरिली आमुची चित्तवृत्ति ॥ नेणों गा कपटयुक्ति : भोळिया आम्ही ॥ २१ ॥ प्रीतिवेधें चोरिलिं चित्तें : हें कापट्य योजलें तुतें ॥ परि कोण जाणें तुझी येथें : अतर्क्यं लीला हे ॥ २२ ॥ आतां प्रकटिं आपणातें : राक्षिं गा आमुचि जीवितें ॥ सर्वथा आम्हा प्रपन्नातें : उपेक्षु नको ॥ २३ ॥ सांडुनि सर्वस्वातें : सर्वांही भजीनलों तुतें ॥ आतां जरि गा आमुतें : उपेक्षिसी तुं कृष्णा ॥ २४ ॥ ऐसें उचित तुला होये : हें तुंचि विचारुनि पाहे ॥ हा न्याय किंवा अन्याये : अपराध हा कोणाचा ॥ २५ ॥ वोळखोनि आमुचि चित्तें : तुवां कपट करावें होतें ॥ पाहे आरंभापासूनि गा तुतें : वश जालों कैशा पां ॥ २६ ॥ तुवां जे जे केलें गा जैसें : तें आम्हासही इष्ट तैसें ॥ हें आपुलें लाउनि पीसें : आतां वंचिलें कां कृष्णा ॥ २७ ॥ राया ऐसें तें गोपीजात : आपुलें सर्वहि हृद्गत ॥ प्रगटोनि ऐसें प्रस्तुत : बोलतुसें तें अवधारिं आतां ॥ २८ ॥

**चलसि यद्व्रजाच्चारयन्पशू-**
**न्नलिनसुंदरं नाथ ते पदम् ।**
**शिलतृणांकुरैः सीदतीति नः**
**कलिलतां मनः कांत गच्छति ॥ ११ ॥**

प्रभो जेव्हां तुं क्रीडापरायण : करितोसि पशुपालन ॥ या व्रजाहुनि गमन : वनाप्रति करिसी गा कृष्णा ॥ २९ ॥ तेव्हां आमुचिया चित्ता : होत असे बहु क्किळता ॥ असो तें गमन सर्वथा : क्षोभवीतसे या मनातें ॥ ३० ॥त्यासि निमित्त ह्मणसी काइ : तरि वनिं चारितां गाई ॥ त्यां मागें

फिरतां पाई : तेथें शिळें तृणांकुरें असती ॥ ३१ ॥ असो शिळे जें कुसळें तीक्ष्णें : अंकुरें जें तृणमूळें कठिणें ॥ आणि तुझीं पदें सुलक्षणें : त्यांतें तें रुतती झणि ॥ ३२ ॥ नाना जैसें कमळदळ : सुनीळ आणि सुकोमळ ॥ त्याहुनि तुझे पदतळ : सुकुमार आणि साजिरें ॥ ३३ ॥ त्या तुझिया पदातें झणि : ते कुसळें तृणमुळें दोन्हि ॥ श्रमविती हे चिंतवणी : आमुतें बहु लागे ॥ ३४ ॥ तिये चिंतवणी निमित्तें : आमुचि मनें विकळतेतें ॥ पावती तेणें आमुतें : व्यवहार न सुचे गा काहिं कृष्णा ॥ ३५ ॥ तुज व्रजापासुनि जातां : आमुची ऐसी अवस्था ॥ जन्हि मनिं होती गा आस्था : जें आतां येईल श्रीकृष्ण ॥ ३६ ॥ जेवि कोण्हि जे योगी जन : ते करितां निदिध्यासन ॥ नविक होतां देहभान: देहस्थितीचि पुरतें किं गा ॥३७॥ मग तितुकियाचि काळें : आत्मानुसंधान जें खंडलें ॥ तेणेंचि त्यांचि चित्तें विकळें : होती तत्काळ ॥ ३८ ॥ मां दुरादृष्टाचेनि निमित्तें : प्रपंचावरि आलें चित्तें ॥ स्वरूपस्थिति जरि त्यांतें : सांडोनि जाये ॥ ३९ ॥ मग त्या मुमुक्षुचें दैन्य : कोण करि गा निवारण ॥ तेवींचि आह्मी तुझे जन : वोडवलों आजि ॥ ४० ॥ तरि ते आरुढ पतित : ऐसे जाणावें निश्चित ॥ तरि तें विघ्ननिरासार्थ : प्रकटावें लागे तुज ॥ ४१ ॥ म्हणोनि आम्ही विनविलें : जें तुवां वनिं गमन केलें ॥ तेंचि आम्हा दुःसह जालें : मां आतां तो विशेष ॥४२॥ नाना पशुलक्षणें करुन : आमुचा इंद्रियगण ॥ त्यातें तुं अनुसरोन : प्रवृत्तिमार्गें जेव्हां वर्तसि ॥ ४३ ॥ तैं आमुचिं गा चित्तें : पावती किं कलिलतेतें ॥ मां आतां तरि तुवां आमुतें : सांडिलें किं गा कृष्णा विशेष ॥ ४४ ॥ असो हे भावार्थकथा : प्रसंगुचि चालउं आतां ॥ या श्लोकें त्या व्रजवनिता : बोलताति ऐसें जें ॥ ४५ ॥ पशुपाळ नाचे निमित्तें : व्रजापासुनि कृष्णा तुंतें ॥ गमन करितांहिं आमुतें : न साहावे वियोगु ॥ ४६ ॥ तुझा सकुमारा पाइं : झणिं श्रम होतील काहिं ॥ ऐसी आमुचा हृदइं : विकळता उपजतसे ॥ ४७ ॥ तस्मात् तेणें हिं निमित्तें : श्रमविलिं आमुचिं चित्तें ॥ आणि आतांहि तुवां येथें : कापट्य केलें कैसें ॥ ४८ ॥ हें तुज उचित जालें काई : तुं न जाणसी काय सर्वहि ॥ येथें कृष्णा तुं

जरि कांहिं : ह्मणसी गा एसें ॥ ४९ ॥ जें म्यां करितां पशुपाळन : व्रजा-पासुनि केलें गमन ॥ तऱ्हिं होतां दिनावसान : व्रजासि आलों ॥ ५० ॥ तो मिं असतांहिं कां तेथें : सुख नाहिं जालें तुमतें ॥ पाहोनियां मुखशो-भेतें : निवाल्या नाहिंत काई ॥ ५१ ॥ ऐसें जरि कांहिं येथें : भाविजेळ रमानाथें ॥ तरि तेणेंहि प्रसंगें चित्तें : क्षोभविलिं गा आमुचि ॥ ५२ ॥ धरुनि ऐसें निजमनिं : त्या उत्तरश्लोकें करुनि ॥ बोलत्याति व्रजवासिनी : तें अवधारिं राया ॥ ५३ ॥

**दिनपरिक्षये नीलकुंतलैर्वनरुहाननं बिभ्रदावृतम् ॥**
**घनरजस्वलं दर्शयन्मुहुर्मनसि नः स्मरं वीर यच्छसि ॥ १२ ॥**

त्या वनापासुनि दिनांति : तुज येतां गा वृ(व्र)जाप्रति ॥ तेव्हांहि हें मनें मागुति : क्षोभातेंचि पावंति ॥ ५४ ॥ ते ह्मणसी कोणे निमित्तें : तरि दाउनि मुखाब्जातें ॥ चेतविसी गा कंदर्पातें : मनाचा ठायिं आमुचिया ॥ ५५ ॥ तें तुझें जळरुहानन : आइक कृष्णा किंविशेषण ॥ जें कंदर्पाचें उत्पात्तिकारण : बहुं शोभलें जें ॥ ५६ ॥ तरि नीळ कुंतळाकृती : जें शाम-वर्ण केशपांक्ति ॥ असो मुखावरि जे रुळती : कुरळ केश ॥ ५७ ॥ त्या कुरळ केशिं आवरलें : आणि वनगोरजिं डवरलें ॥ असो बहुं गोरज बैसले : ज्या मुखावरि ॥ ५८ ॥ जैशा भ्रमरांचिया पांक्ति : पद्मपत्रातें आच्छादिति ॥ तैशा मुखावरि रुळति : केशाच्या हारी ॥ ५९ ॥ आणि पद्मपरागस्थानि : गोरजांचिया दाट श्रेणि ॥ एवं लक्षणद्वयें करुनि : वनरुहानन तें जें ॥ ६० ॥ ऐशा मुखपद्मातें आह्मांसि : प्रवर्तत खेव निशि ॥ दावित होत्साता समर्पिसी : कंदर्पशतें निजदर्शनें ॥ ६१ ॥ एवं निशामुखिं येउन : दावित होत्साता सुव-दन ॥ विरहवृद्धीतें प्रेरुन : आपुला लाविसी वेधु ॥ ६२ ॥ परि तो-डोनि व्यवधानातें : नेंदिसी गा संनिधानातें ॥ असो वारुनि प्रतिबंधातें : संभोग न करिसी ॥ ६३ ॥ तस्मात् तुला तेणेंहिं काळें : कपटचि घडोनि आलें ॥ नेणों तेथेंहिं हेतु जालें : आमुचें पुर्वसंचित ॥ ६४ ॥ असो आमु-चेनि चितें : गृहासक्तितें सांडिलें नव्हतें ॥ त्या प्रतिबंधनिमित्तें : दूर होतों

गा तुजसि ॥ ६५ ॥ आतां सांडोनि सर्वांशेतें : सार्वस्वें शरण आलों तुतें ॥ शेखिं शरणागतातें : सांडिलें गा कृष्णा ॥ ६६ ॥ हें कापव्य घडलें किं नाहिं : तुंचि विचारुनि पाहिं ॥ नातरि आमुचाचि काहिं : आड आला दोष ॥ ६७ ॥ तुझया अतर्क्य वृत्तातें : ब्रह्माहि नेणेचि पुरतें ॥ मां हे विवंचना आमुतें : योग्य होये काई ॥ ६८ ॥ आह्मी वैगुण्याच्या राशि : पारि तुझ्या अमुल्या दासी ॥ आतां किती गा पाहासि : गुणागुण आमुचे ॥ ६९ ॥ न विचारिं गा दोषातें : तुं पतितपावन हें तुतें ॥ रक्षणें असे तरि आमुतें : पावावें आतां ॥ ७० ॥ विचारुनि यया भावातें : कृष्णाप्रति गोपीशतें ॥ प्रार्थिताति तें राया तुतें : सांगतों आइक ॥ ७१ ॥

**प्रणत कामदं पद्मजार्चितं**
**धरणिमंडनं ध्येयमापदि ॥**
**चरणपंकजं शंतमं च ते**
**रमण नः स्तनेष्वर्पयाधिहन् ॥ १३ ॥**

अगा ये आधिहरणा : चिंतानाशना मनोरमणा ॥ श्रीकृष्णा आम्हि तव शरणा : उपेक्ष्या न हों गा ॥ ७२ ॥ क्षमा करुनि दोषांतें : प्रसन्न होइं गा आमुतें ॥ सपर्पि निजपदांबुजातें : कुचावारि आमुच्चिया ॥ ७३ ॥ कां जें सांडुनि गृहादि प्रीति : तुज जे शरण येति ॥ त्यांसि सर्वथा नाहिं गति : तुझा पदपद्मावीण अन्य ॥ ७४ ॥ ऐसें तुझें पदपंकज : अनन्यशरण जे गा तुज ॥ त्यांचें कामप्रद सहज : कामदेतें जें आधिचें हरितें ॥ ७५ ॥ असो या पदि होतां प्रीती : उपशम पावे मनोवृत्ति ॥ सर्वहि सुखाची संपत्ति : अनकुळ होत असे ॥ ७६ ॥ मग काम काहिं इच्छावें : हें सरोनि जाय स्वभावें ॥ साम्राज्याचिये राणिवे : रंकुहि अधिकारी होये ॥ ७७ ॥ या लागि या पदांबुजातें : प्रपन्नकामप्रदातें ॥ सकळ आधि हरणातें : कुचहृद-यांवरि समर्पि ॥ ७८ ॥ ह्मणसी या पदप्रभावातें : कोणें उपदेशिलें तुमतें ॥ हें जें बोलिलियाति येथें : प्रमाण काये असे ॥ ७९ ॥ तरि पद्मज शब्दें करून : बम्हा जो चतुरानन ॥ जो जगाचें जन्मस्थान : त्रैलोक्याचा गुरु

॥ ८० ॥ तेणें ब्रह्मेनि जें अर्चित : यालागि या पदाचा संकेत ॥ केला असे पद्मन्यार्चित : पुराणिं सर्वत्रहि ॥ ८१ ॥ असो जेणें पदकमळें : त्रिविक्रमावतार वेळे ॥ ब्रह्मकटाह भेदिलें : आक्रमुनि त्रैलोक्य ॥ ८२ ॥ तइं तेणें लोकनाथें : निजकल्याणाचेनि स्वार्थें ॥ पूजिलें ज्या तव पदातें : तें पद्मजार्चित पदतळ ॥ ८३ ॥ एवं जंन्हि तो लोकनाथ : असोनि महिमानवंत ॥ जाणोनि आपुला स्वार्थ : पूजिलें त्या पदासि ॥ ८४ ॥ आतां तुझा पायांचा ठाइं : प्रमाणाची अपेक्षा नाहीं ॥ तों सर्वलोकगुरु काइं : नेणता होता प्रभो ॥ ८५ ॥ हेंहिं असो गा परतें : पाहाणें नलगे प्रमाणातें ॥ प्रत्यक्ष पाहा या धरणीतें : शोभविलें ज्या चरणें ॥ ८६ ॥ तुझे पदपद्ममुद्रेकरिं : शोभली कैसी वसुंधरि ॥ असो सर्व शोभेचा शिरिं : शोभतसे हे पृथ्वी ॥ ८७ ॥ या पदमुद्रिते भूमीतें : देखोनि सांडिजे आधीतें ॥ विरालिं आमुचिं चित्तें : निवालों गा आतां ॥ ८८ ॥ ह्मणोनि तुझें श्रीचरण : इये धरणीचे भूषण ॥ कदाचित् आमुचे स्तन : व्यापुनि जरि राहे ॥ ८९ ॥ तरि सर्व आधीतें शमउन : पावत्रील गा समाधान ॥ यास्तव तें पद पावन : ठेविं गा कुचावरि ॥ ९० ॥ अगा धरणीचेनि सांगातें : परोक्षें तुझिया पदातें ॥ पाहोनि कृष्णा आमुतें : येवढें सुख ॥ ९१ ॥ मां या स्तनहृदयदेशिं : साक्षात् पद जरि ठेविसि ॥ तरि आमुचिया भाग्यासि : पारचि नाहिं ॥ ९२ ॥ अगा यावि कारणें पाहिं : हें पदपंकज जें काहिं ॥ तें अती आपत्तीचा ठाईं : सर्वांसि ध्येय कि ॥ ९३ ॥ प्रस्तुत आम्ही गोपकांता : तव विरहें गा पीडिता ॥ गवेषणपरा होंत्सात्या : करित असतां भ्रमणातें ॥ ९४ ॥ तुझें हें जें चरणचिन्ह : देखिलें धरणिमंडन ॥ अकस्मात् विरालें मन : विसरले सकळ आधि ॥ ९५ ॥ ह्मणोनि आपत्तीचे वेळे : सर्वांसही हें ध्येय जालें ॥ कृष्णा ऐसें जाणवों आलें : आमुतें अनुभवें आजि ॥ ९६ ॥ त्या तुझा पदपंकजातें : आपदि ध्यानास्पदातें ॥ सर्वतापोपशमनातें : प्रार्थित असों आम्हि गा तुज ॥ ९७ ॥ आणि या हेतु बक्षिजेतें : जें ध्यानमात्रें आपतिहर्तें ॥ सुखदुःखाहुनि परतें : सुखतम

ज किं ॥ ९८ ॥ अगा ये रमणमूर्ति : ते जे हे तुझी पदव्याक्ति ॥ भगवत्पातें निववीति : स्मरणमात्रें सुखतर जे गा ॥ ९९ ॥ ऐसिया पदपंकजातें : साक्षात् सुखतम रूपातें ॥ ठेउनि हृदईं आमुतें : निववीं गा कृपाळुवा ॥ ४०० ॥ आम्हि उपेक्ष्या न हों किंकरी : या कामव्यथेतें हरीं ॥ आणीक येक श्रीहरि : करावें प्रार्थितों जें तुज ॥ १ ॥

**सुरतवर्धनं शोकनाशनं स्वरितवेणुना सुष्ठु चुंबितम् ॥**
**इतररागविस्मारणं नृणां वितर वीर नस्तेधरामृतम् ॥ १४ ॥**

अगा ये अमोघवीर्या वीरा : श्रीकृष्णा नंदकुमारा ॥ आह्मी ज्या विरहकातरा : अनन्यशरणागता गा तुज ॥ २ ॥ आह्मीं ज्या गोपिका प्रस्तुत : सर्वाही काममृत्युग्रस्त ॥ तिया आमुतें अधरामृत : सिंचोनि वांचवीं गा ॥ ३ ॥ तें अमृत किंविशेषण : तरि जें सुरताचें वर्धन ॥ अगा प्रेमोत्पत्तीचें स्थान : तें तुझें अधरामृत किं ॥ ४ ॥ असो जयाचे लेशमात्रें : जळती गा कर्मैं चित्रें ॥ हेंचि तें तव प्रीतिपात्रें : होती गा विशेषें कृष्णा ॥ ५ ॥ जेवि आइकतां गुरुवाणी : मुमुक्षु निःसंदेह होउनि ॥ त्यांचिं चित्तें दृश्यापासुनि : मुरडोनि मार्गें ॥ ६ ॥ वेदप्रातिपाद्या अर्थातें : झोंबती मुमुक्षुंचि चित्तें ॥ श्रवणादिकिं विशेषें त्यांतें : प्रेमोद्रेक होये ॥ ७ ॥ तेवींचि या अधररसें : भिजलिं ज्यांचिं मानसें ॥ ते नित्य तुझेनि संतोषें : अत्यंत संपन्न होती गा ॥ ८ ॥ ह्मणोनि शोकविनाशक : हें विशेषण वडलें एक ॥ त्या रसरतासि तिन्हि लोक : अति तुच्छ होति ॥ ९ ॥ मग शोकोत्पत्तीचें कारण : राहेल कोटुनि आन ॥ म्हणोनि वडलें विशेषण : शोकनाशन ऐसें ॥ १० म्हणसी या रसाचा ठाईं : विशेषें गुण असे काई ॥ साधारण जानिं काय नाहीं : अधररसप्राप्ति ॥ ११ ॥ ऐसें जरि गा काहिं येथें : भाविजेल किं रमानाथें ॥ तरि प्रभो त्या अधररसातें : ऐसी गोडी असे काई ॥ १२ ॥ त्या प्राकृतें अधररसें : विशेषें होय कामपिसें ॥ आणि या अमृतलेशें : कामशांति पाविजे तत्काळ ॥ १३ ॥ म्हणसी प्राकृता रसेंसिं : विलक्षणता येथें कैसी ॥ तरि कृष्णा तुं सुखराशि : परमप्रेमास्पद जो किं ॥ १४ ॥ तया तुझें अध-

रामृत : तुझा वेणु जो सुस्वरित ।। तें तया वेणुनें चुंबित : जें बरवें प्रकारें वाजवितां ।। १५ ।। असो तो वेणूवेषधारी : कोण्ही महंत सदाचारी ।। तेणें वसोनि तुझ्या अधरिं : चुंबिलें उत्तम रिति ।। १६ ।। तया तवाधरामृतातें : वेणुनादें सुरसितातें ।। देउनि आमुचि जीवितें : रक्षाविंगा वीरा कृष्णा ।। १७ ।। येथें वीर हें संबोधुन : दाविलें कामोद्दीपन ।। अगा हें कापव्य सांडुन : सत्वर आमुतें संभोग देई ।। १८ ।। जेवि गुरुवचनेंसिं युक्त : मुमुक्षुनें सत्शास्त्रार्थ ।। अभ्यासेंकरिं पुरुषार्थ : साधिजे अनुक्रमें ।। १९ ।। तेवि तुझा तो वेणुध्वनि : आमुते होउनि गुरुस्थानि ।। या अधरामृताचि खाणि : उघडिली तेणें ।। २० ।। तया वेणुनिनादलुब्धा : पात्र जाला अधरस्वादा ।। आतां श्रीकृष्णानंदानंदा : नुपेक्षिं आमुतें ।। २१ ।। तुजहि हेंचि उचित : आह्मी ज्या तव शरणागत ।। यासि देइं गा अधरांमृत : वेणुस्वरें सुवासित जें ।। २२ ।। ह्मणसी हें प्रतीयमान : प्रत्यक्ष जें प्रपंचभान ।। गृहपतिसुतादि जन : देहधर्मासि उपयोगि ।। २३ ।। ऐसें असतां या अंमृतिं : कैसी राहेल चित्तवृत्ति ।। न फावे तुह्मासि पुरति : हे अमृताची गोडि ।। २४ ।। कृष्णा ऐसें जरि ह्मणसि : तरि जे लोधले या सुखासि ।। तिहिं तपोनि पुण्यदेशिं : बहुं पुण्य केलें ।। २५ त्या सुकृतबळें करुन : होउनि अधिकारसंपन्न ।। यांतही कोण्ही येक जन : कदाचित् पावती ।।२६ ।। मग तयांचिये दृष्टि : कैंचि पतिसुतादि शृ( सृ )ष्टि ।। भोक्ता भोग्य भोगादि त्रिपुटि : तेथें कदापि नुरे गा ।। २७ ।। असो तुझा वेधें करुन : या पदप्राप्ति जडे मन ।। मग केवढेंहिं प्रतिबंधन : विरोनि जाय त्यांचें ।। २८ ।। या प्रतिबंधाचिये निवृत्ति : या अधरसुखाचि प्राप्ति ।। जाली तरि हे त्रिजगति : अर्थता कैंचि गा ।। २९ ।। हे पतिसुतादि भान : कैसें उरेल तुजहुनि आन ।। शोधितां गा रविकिरण : मृगांभ जैसें कीं ।।३०।। तुजहूनि नसे गा आन : तरि विक्षेप कैचा कोण ।। आणिक जें तुजवीण : तेथें प्रीतीचि नुरे ।। ३१ ।। म्हणोनि हें अधरसुख : अन्य रागाचें विस्मारक ।। विशेष जे सार्वभौमादिक : तेहि येथें विरति ।। ३२ ।। एवं ज्या

अमृताचे प्राप्ति : आणिके ठाईं नव्हे प्रीति ॥ इतर रागाचि विस्मृति : तत्काळ होये गा ॥ ३३ ॥ तें इतररागविस्मारण : देइं अधरांमृतपान ॥ जया पानें-कारिं सज्जन : पुर्णकाम होती गा ॥ ३४ ॥ असो हे अधरामृतप्राप्ति : जयांसि होये गा पुरति ॥ ते तुझा ठाइं रमति : अन्यकाम विसरोनि ॥ ३५ ॥ तें जे कृष्णा उक्तलक्षण : तुझें अधरामृतपान ॥ देउनि आमुचा हा मदन : शमविं गा लवकरि ॥ ३६ ॥ आतां असो हे बहु कथा : तुंचि विचारिं गा पुरता ॥ काइ तुझा ठाईं हे आस्था : आमुची आहे कि नाहिं ॥ ३७ ॥ असो तुवां सर्वांतस्थें : नेणिजेति काय ह्रदतें ॥ तुझिया योगवियोगें आमुतें : सुखदुःख जें काहिं होति ॥ ३८ ॥ ऐसें दाउनि त्या सती : विनविताति कृष्णाप्रति ॥ तें आइक गा परीक्षिति : गोपिकांचिं वचनें प्रस्तुत ॥ ३९ ॥

**अटति यद्भवानन्हि काननं**
**त्रुटिर्युगायते त्वामपश्यताम् :**
**कुटिलकुंतलं श्रीमुखं च ते**
**जड उदीक्षतां पक्ष्मकृद्दशाम् ॥ १५ ॥**

अगा तुं दिवसाचा ठाईं : पुरःसरुनि वत्सें गाइ ॥ विचरसी उघडे पाईं : अधिष्ठुनि वनातें ॥ ४० ॥ तेव्हां न देखोनि गा तुतें : आह्मीं अवधि गोपीशतें ॥ तयां आम्हा क्षणार्धेचि होतें : युगासमान कृष्णा ॥ ४१ ॥ असो तुं विचरतां वन : न देखतां तुझें वदन ॥ तृ (त्रु) टि होय युगासमान : दुःखार्णविं पडतसों ॥ ४२ ॥ मग वनाहुनि दिनांतिं : येती वेळे गृहाप्रति ॥ देखोनि तें वदनाकृति : कुटिळकुंतळयुक्त जे ॥ ४३ ॥ तें वदन अव-लोकितां : नेत्रनिमिष आड येतां ॥ जडपदें मुर्ख विधाता : जेणें हे निमि-षोन्मेष केले ॥ ४४ ॥ असो या नेत्राचा ठाइं : हें पांति लवती जें काहिं ॥ तेणें हें निकें केलें नाहीं : अति मंदमतिलेंकरिं ॥ ४५ ॥ ज्या अनेक जन्मसुकृतिं : आह्मी देखिली हे कृष्णमूर्ति ॥ त्या सुकृतातें हा प्रजापति : जाने(णे)चिना कैसा ॥ ४६ ॥ असो भाग्ये हे कृष्णदर्शग (न) : नेणेचि

कां चतुरानन ॥ हे सपक्ष कां नयन : आमुचें केलें तेणें ॥ ४७ ॥ अवलोकितां हे कृष्णमूर्ति : हें नेत्रपातिं आड येति ॥ कटाकटा तो प्रजापति : चुकला कां इतुकेंचि ॥ ४८ ॥ जेवि पर्जन्यधारापंक्ति : आकाशा पासाव सुटति ॥ तयासि पावतां भूमीप्रति : अखंडाकारा जैशा ॥४९॥ अशो येणे न्यायें करुन : निरंतर हें कृष्णवदन ॥ पाहावें तव आड येउन : नेत्रपांति निरोधीती अकस्मात ॥५०॥ आहा वो तो नेत्र करितां : भ्रांत कां जाहाला विधाता ॥ हे मेषोन्मेष न योजिता : तरि काये उणेपण येतें ॥ ५१ ॥ एवं पाहातां तुझे मुख : होतुसे जो किं सुखोद्रेक ॥ आम्हासि ये प्रसंगिं हा मुर्ख : ऐसा जाणवला ब्रम्हा ॥ ५२ ॥ जेवि प्रतिबंधातें सारुन : जे स्वरूपीं पावति संस्थान ॥ त्यासि जें दैवनिबंधन : तें देहरक्षणार्थ ॥ ५३ ॥ तेहिं त्यासि असह्यमान : कां जे स्वरूपिं जडलें मन ॥ तेवि तुझे ठायिं नयन : खुंतले त्यासि हाचि निरोधु ॥ ५४ ॥ तस्मात् आम्हि तव शरणा : या वियोगातें असह्यमाना ॥ यालागि उतावेळमना : देखावया गा तुज ॥ ५५ ॥ एवं आमुतें अंगिकारिं : सर्वथा उपेक्षा न करिं ॥ आधि हा न्याय विचारिं : मग मानेल तें करावें गा ॥ ५६ ॥ हा अभिप्राय विचारुनि : कृष्णाप्रति त्या कामिनी ॥ उत्तरश्लोकें करुनि : बोलताति ऐसें गा राया ॥ ५७ ॥

पतिसुतान्वयभ्रातृबांधवा-
नतिविलंघ्य तेंत्यच्युतागताः ॥
गतिविदस्तवोद्गीतमोहिताः
कितव योषितः कस्त्यजेन्निशि ॥ १६ ॥

कृष्णा आमुचे जे पति : सुत जे पुत्रादि संतति ॥ आणि अन्वयों इया त्याति : वंश जो किं आमुचा ॥ ५८ ॥ आणि भ्रातृपदें करुन : बंधु जे सहोदर जन ॥ आणि बांधव ऐसि खुण : सुहृत्संबंधी जनासि ॥ ५९ ॥ इत्यादिका समस्तातें उल्लंघोनि आम्ही आलों येथें ॥ जयाचेनि संगे जन्म-शतें : उगंडुचि नव्हे गा ॥ ६० ॥ परि कोण्हि यका सुकृतें : सांडुनि त्या

प्रतिबंधातें ॥ आलो तव सान्निध्यातें : अच्युता श्रीकृष्णा ॥६१॥ जडती गा जे तुझ्या पाईं : त्यासि सर्वथा च्यवन नाहिं ॥ ऐसे जाणोनियां सकळाहि : आह्मी आलों येथें ॥ ६२ ॥ ह्मणसी स्वगृहीं असतां : सुखें निजाश्रमीं वर्ततां ॥ तुह्मी त्यागुनि वो स्वार्था : आल्यानि कां येथें ॥ ६३ ॥ ऐसें ह्मणसी गा आमुतें : तरि मोहिलें या उद्गीतें ॥ असो तुवां उच्चस्वरें वेणुतें : वाजविले जें ॥ ६४ ॥ तया उच्चस्वरें तव गीतें : मोहिलें तेणें या आमुतें ॥ यालागि टाकुनि येथें : येणें घडलें किं ॥ ६५ ॥ सांडुनि गा देहमाना : स्वगृहिं अनासक्तमना ॥ नावेक होतों स्मृतिहीना : त्या गृहादिसंगें ॥ ६६ ॥ तुझा पाईं होतें गा मन : परि प्रारब्धैकप्रतिबंधन ॥ तया गृहकार्यिं गुंतोन : होतों ज्या आह्मी सर्वा ॥ ६७ ॥ तवं कोन्हि एकें भाग्यें समर्थें : तुवां गाइलिं वेणुगीतें ॥ तेणें आमुचिं चित्तें : उठवुनि तेथुनि, गा ॥ ६८ ॥ कोण्ही येक दैववशता : प्रतिबंध जाला होता ॥ परि तुझा गीतें मोहिता : आह्मी आलों तुजनिकट ॥६९॥ आम्ही सावधा तुझे पाईं : तो मोहो मानावां काइ ॥ परि गृहासाक्ति विषईं : तो मोहचि होये अहंममतात्मक ॥ ७० ॥ जेवि भुजंगदंशितातें : कटुत्वाचि गोड भासतें ॥ मग विष उतरोनि त्यातें : कडु गोड हे व्यवस्था जाणवे ॥ ७१ ॥ तेवि आह्मी गृहीं आसक्ता : नावेक होतों मोहसर्पग्रस्ता ॥ तवं तुवां हा अवचिता : प्रेरिला वेणुगीतमंत्र ॥ ७२ ॥ तेणें जालें विषोत्तारण : जाणवलें हें मिथ्या भान ॥ ते पतिसुतादि स्वजन : वोवडवलें विकळलें सर्व ॥ ७३ तेणें मिथ्या प्रतीतिबळें : तुजसिं व्यवधान जालें ॥ तें या वेणुगीतें तोडिलें । आणिलें गा तुजनिकट ॥ ७४ ॥ जेवि तत्त्वमस्यादि वचन : तोडुनि अविद्याबंधन ॥ जीवेश्वरभेदाविहीन : ब्रह्मत्व-प्रतिपादन करीतसे ॥ ७५ ॥ तेवींचि गा कृष्णा अच्युता : आह्मी तवो-द्गीतमोहिता ॥ गृहादिप्रतिबंधनिरस्ता : आलों तुज निकट ॥ ७६ ॥ ह्मणसी माझिया गीतातें : सर्व जन जाले आइकते ॥ त्यांत तुमचिंच कां चित्तें : क्षोभातें पावतिं जालिं ॥ ७७ ॥ ऐसें ह्मणसि गा आतां: तरि तुं सर्वांतर्गतिवेत्ता ॥ आह्मी काय तुझिया भक्ता : किंवा अन्य जना ऐशा ॥७८॥

असो तु सर्वांतरद्रष्टा : जाणसी किं आमुची निष्ठा ॥ आणि या वियोगकष्टा : जाणसि ना काइ ॥ ७९ ॥ त्या गतिवेत्तयाचे गीतें : मोहिलिं आमुचिं चित्तें ॥ स्मरोनि गा सुंदरा तुतें : स्वगृहवासिनी ज्या होतों ॥ ८० ॥ तितुकि पाही संबंधातें : सांडिलें अविद्याबंधातें ॥ ते गृहधर्माचि आमुतें : भासले अधर्मरुप ॥ ८१ ॥ अगा विषयासक्ति मूळ : स्वधर्म बोलिले सकळ ॥ जरि विषयिं मन विकळ : तरि तें निरर्थक ॥ ८२ ॥ संत्यक्तपरिग्रहचित्त : तुझ्या ठाइं जालें निवांत ॥ तरि तेंचि गा धर्मजात : अविक्षेपकरी होंत असे ॥ ८३ ॥ ह्मणोनि अनुसरोनि तुतें : किंचित् गृहादिकिं चित्त होतें ॥ तें प्रस्तुत तुझेनि गीतें : हरिलें आमुचें मन ॥ ८४ ॥ एवं गतिविदा तुझे गीतें : मोहिलें होंत्सातें आमुतें ॥ टाकोनि आलों गा तुतें : येवढे निशचिा ठाईं ॥ ८५ ॥ त्यां आमुतें तुवां सांडिलें : हें काई तुज उचित झालें ॥ ऐसें तों नाहिं गा देखिलें : कोठेंहिं अन्यत्र कृष्णा ॥ ८६ ॥ केव्हढें आश्चर्य घडलें : काय आमुसिं षठत्व केलें ॥ निजशरणासि ठकिलें : कैसें कपटिया तुवां येथें ॥ ८७ ॥ कृष्णा ऐसी रिति जे काहिं : ते नाहिंचि आणिके ठाईं ॥ येवढें रात्रीचा ठाईं : स्त्रियतें कोण पां त्यजिल ॥ ८८ ॥ ऐसियां आमुतें त्यजावें : हें कोण्हासही न संभवे ॥ येवढा धीरु न धरवे : कामिनीतें सांडितां गा ॥ ८९ ॥ रात्रि आलियां योषितांतें : कोण पां त्यजिल गा येथें ॥ हें तुजवीण आणिकातें : कदापि न टके या त्रिलोकिं ॥ ९० ॥ तुवां षठत्व संपादिलें : हें उचित नाहिं योजलें ॥ आम्हासि निजगीतें मोहिलें : आणावया स्वनिकट ॥ ९१ ॥ शेवट चोरुनि हें चित्तें : अधिष्ठुनि अप्रकटतेतें ॥ आपणालागि गा आमुतें : भ्रमविलें तुवां कृष्णा ॥ ९२ ॥ देउनि निजसांन्निध्यातें : संपादिलें व्यवधानातें ॥ हे निजवेधाचि पुरते : किंवा निकर केला काइ ॥ ९३ ॥ कृष्णा हे जे गा तुझी युक्ति : काइ जाणो आह्मी प्राकृती ॥ त्यजिलें ह्मणों तरि चित्तिं : अधिकाचि प्रेमा होतो ॥ ९४ ॥ या देहस्थितीहि पुरतें : मन नव्हे तुज परतें ॥ आम्ही न देखोंचि आणिकातें : तुज वांचूनि गा श्रीकृष्णा ॥ ९५ ॥ ऐसियां आम्हासि सांडिलें : हें विरुद्ध दिसोनि आलें ॥

पारे कोण जाणे हा न कळे : अभिप्राय तुझा आम्हा ॥ ९६ ॥ किंवा आमुचि चाड नाहिं : ऐसेंहिं जाणवतें काहिं ॥ कां जे या निशेचा ठाईं : आम्हि योषिता निकट आलों ॥ ९७ ॥ त्यां आमुतें तुवां त्यागिलें : हें तुज काये योग्य झालें ॥ आणि आपुले ठाइं गोविलें : निजप्रेमें सर्वांतें ॥ ९८ ॥ ऐसा कोण असे या जगिं : जें निकट येतांचि तन्वंगी ॥ पुरतें भोगितां त्यागी : तुजवीण कृष्णा ॥ ९९ ॥ एवं निर्धारु नयेचि हाता : यालागि षठ होसी पुरता ॥ त्यागुनि आमुतें गा रता : गोविलें निजप्रेमें ॥१००॥ येथें निशा पदें करुन : सूचिलें ध्यानकाळलक्षण ॥ कां जे योगी करुनि ध्यान : प्रसंन्नता पावति ॥ १ ॥ जाणोनि त्या अधिकारातें : योजुनि आत्मनिष्ठेतें ॥ निदिध्यासनि गोपिकांतें : केला अवसरु ॥ २ ॥ व्यवधानाचेनि मिषें : आपुला ठाईं तन्मानसें ॥ लाउोन तयातें विशेषें : उत्सुकता प्रेरिली ॥ ३ ॥ उत्सुक होंत्सात्या सुंदरी : प्रार्थना वचनोत्तरिं ॥ श्रीकृष्णातें स्मरोनि अंतरिं : स्तवित्या जालिया ॥ ४ ॥ असो कृष्णकृपेचिं उत्पादकें : बोलिल्या करुणासुचकें ॥ ज्या वचनें यदुनायकें : अत्यंत संतोषावें ॥५॥ आतां एका दों उत्तरि : तो नंदानंदन कृष्ण हारि ॥ अल्पेंचि काळें अंगिकारि : शरणां आपणातें ॥ ६ ॥ ऐसें तो गोपिका जन : आतां श्लोकद्वयें करुन ॥ श्रीकृष्णि असोनि मन : बोलतुसें तें आईका ॥ ७ ॥

**रहसि संविदं हृच्छयोदयं**
**प्रहसिताननं प्रेमवीक्षणम् :**
**बृहदुरः श्रियो वीक्ष्य धाम ते**
**मुहुरतिस्पृहा मुह्यते मन : ॥ १७ ॥**

तुवां ऐकांतिं गा आमुतें : संकेतनर्म दाविलें होतें ॥ असो संभोग सूचना निमित्तें : विनोद जे केले ॥ ८ ॥ विनोदसमुच्चय लक्षुन : येथें बोलिलें एक वचन ॥ एवं त्या विनोदातें स्मरोन : तव दर्शनेच्छा होते ॥ ९ ॥ ते विनोद किंलक्षणः तरि ज्यांचे स्मरणें पंचबाण ॥ उपजउनि हें मन : त्वदाकार करिती शीघ्र ॥१०॥ जेवि श्रवणमननात्मका वृत्ति : असंभावनेतें परति ॥ मग

स्वरुपानंदावाप्ति : अकस्मात् होय ॥ ११ ॥ परि अनभ्यासाचिया निमित्तें : विपरीत भावना तेथें ॥ होउनि उपजवी संतापातें : मुमुक्षुचा मनिं ॥ १२ ॥ मग ते गा आर्त्त होंत्साते : स्मरती निजात्मसुखातें ॥ त्यांचि अधीरें होती चित्तें : जें केव्हा ते वस्तु पाविजेल ॥ १३ ॥ पुनः ते दृढाभ्यासरीति : निदिध्यासनिं प्रवर्तति ॥ तेवि त्या गोपिकांची गति : येणे प्रसंगें योजली॥ १४॥ त्या वेणुनादें आकर्षुन : पावल्या कृष्णसंनिधान ॥ ते प्रसंगिं विनोदाचरण : कृष्णें केलें जें काहिं ॥ १५ ॥ तेणें सुखावोनि गोपीगण : गर्व पावला हें जाणोन ॥ कृष्णें तत्काळ तिरोधान : केलें अचिंत्य लिलेकरिं ॥ १६ ॥ तेणें तिया व्रजसुन्दरी : पडोनियां आर्तिसागरिं ॥ निदिध्यासनाचिया परिं : आरंभिलें विवेचन तेथें ॥ १७ ॥ त्या संकेतनर्मातें स्मरतां : जालिया विरहतप्ता ॥ तोचि अनुवाद करितां : तेथें विशेषण योजलें ऐसें ॥ १८ ॥ असो जें संकेतनर्मसंज्ञ : तें संविदाचें पदलक्षण ॥ आणि हृच्छयोदय ह्मणोन : कामोत्पादक ऐसें ॥ १९ ॥ तैसेंचि प्रहसितानन : ह्मणिजे तुझें हें हास्यवदन ॥ त्या विनोदहास्यातें स्मरोन : तुझी सकाम इच्छा होते ॥ २० ॥ तेवींचि प्रेमवीक्षण : जें तुझें कृपावलोकन ॥ पाहिलें जें दये करुन : तुवां निजशरणागता आमुतें ॥ २१ ॥ कृष्णा तें आमुचें चित्त : तुझा ठाइं अति प्रेमासक्त ॥ असोनि सदा नितांत : गृहादिकातें विसरलें ॥ २२ ॥ त्या तव प्रेमवीक्षणातें : स्मरोनि सकाम इच्छा होतें ॥ तुझिये दर्शननिमित्तें : तळमळितो आम्ही गा ॥ २३ ॥ आणि तुझा उरःप्रदेश : वक्षस्थळ जें गा सुवेष ॥ जेथें रमादेवीचा निवास : सुखास्पद जें तियेतें ॥ २४ ॥ त्या विशाळ वक्षस्थळातें : रमादेवीच्या सदनातें ॥ आह्मिहिं अनुभविलें ज्यातें : त्यातें स्मरत होंत्सात्या ॥ २५ ॥ आम्ही तव दर्शनासक्ता : तेणें भ्रमलों गा इतस्तता ॥ प्रस्तुत कामोद्भवपीडिताः इच्छितों गा तुजला ॥ २६ ॥ एवं विनोदादि स्मरोन : होउनि गा कामोद्दीपन ॥ इच्छा होते तुजलागुन : त्वदाकार चित्तें कृष्णा ॥ २७ ॥ अगा तुझी स्पृहा जे जाली : तिया आमुचि मनें मोहिलिं ॥ तारतम्यातें विसरलिं : न स्मरती आणिक ॥ २८ ॥ एवं

येणें श्लोकें करुण ( न ) : इतुका अर्थ उत्पन्न ॥ कृष्णकामासक्त गोपीजन : बोलिला ऐसें राया ॥ २९ ॥ कृष्णा पूर्व सुकृतें करुन : लाधलें तझें सन्निधान ॥ देखोनि सुंदर वदन : निवाळिं सर्वांचिं मनें ॥ ३० ॥ दाउनि विनोदसंकेत : उत्कंठाही प्रेरिली बहुत ॥ आणि नयनकटाक्षपात : समर्पिला जो काहिं ॥ ३१ ॥ आणि वक्षस्थाळिं विशाळता : अनुभविली आपातता ॥ आह्मी कामासक्तचित्ता : भजलों तुज ॥ ३२ ॥ किंचित् स्वस्थ जालिं चित्तें : तवं सांडिलें तुवां आमुतें ॥ जेवि सांडिजे मुक्त मानियातें : स्वरूपानुभवें ॥३३॥ तेवींचि आमुतें योजले : गर्वें तुज दुऱ्हाविलें॥परि निजगुणिं संस्कीरलें : निजशरणागता आमुतें ॥३४॥ त्या गुणकथनें करुन : आठवलें तुझें विहरण ॥ जें विनोदहास्यवदन : प्रेमवीक्षण वक्षस्थळादि ॥३५॥ तें कैसें विनोदादि क्रीडन : तरि हृच्छय जो मदन ॥ त्याचे करी जें किं उद्दीपन : तोचि जाणावा हृद्रोग हा ॥ ३६ ॥ त्या कामहृद्रोगें पीडिता : आम्हि तुज शरणागता ॥ त्या आमुचा हृद्रोगहर्ता : तुजवीण कैचा आणिक ॥ ३७ ॥ नाना सर्वत्र साधारण : सर्वथा तुं रोगहरण ॥ तथापि आम्ही व्रजजन : अनन्यशरण गा तुज ॥ ३८ ॥ तुजवांचुनि कृष्णा पाहिं : आम्हासि गत्यंतर नाहिं ॥ आमुचा हा रोग जो काहिं : तो तव वियोगजन्य ॥ ३९ ॥ तस्मात् कामरोगवेदना : ते आणिकेंकरिं शमेना ॥ हे व्रजनार्तिहरणा : आइकें गा येकि मातु आमुचि ॥ ४० ॥

**व्रजवनौकसां व्यक्तिरंग ते**
**वृजिनहन्त्र्यलं विश्वमंगलम् ॥**
**त्यज मनाक्चनस्त्वत्स्पृहात्मनां**
**स्वजनहृद्रुजां यन्निषूदनम्** ॥ १८ ॥

येथें अंगपदें करुन : कृष्णाचें केलें विशेषण ॥ हे अंग ऐसें संबोधुन : त्या बोलताति कृष्णाप्रति ॥ ४१ ॥ हे सखया आइकें विनंति : आइकें गा तात्पर्योक्ति ॥ तुझि हे जे काहिं व्यक्ति : ते मंगळमयी अवघी ॥४२॥ हे व्यक्ति किंविशेषण : तरि हें व्रजवनौकस जन ॥ ह्मणिजे हें जें वृंदावन :

येथें वाडे करुन राहिले जे ॥४३॥ अगा ते वृंदावनवासी : त्याचिया ज्या संकटराशि ॥ नाशूनि स्वसान्निध्य त्यांसि : सौकर्यें दिधलें ॥ ४४ ॥ ह्मणोनि तुझी गा हे व्यक्ति : व्रजौकसवृजिनहार्ति ॥ असो तुं जो विलासमुर्ति : त्या तुज जे शरण ॥ ४५ ॥ त्यांतें दुःखार्णवा पासुन : सोडविसी गा सकारण ॥ ह्मणोनि घडले विशेषण : पुर्वोक्तेचि येथें ॥ ४६ ॥ असो देखोनि रमणमूर्ति : तुझा ठाइं जाली ज्यांची प्रीति ॥ तेणें तयांची चित्तवृत्ति : विरक्तीतें पावे या प्रपंचा पासुन ॥ ४७ ॥ ऐसें जें वीतराग मन : तें पावोनि तुझें सन्निधान ॥ मग सकारण हें वृजिन : नाशोनि जाये तत्काळ गा ॥ ४८ ॥ ह्मणोनि तुझी हे जे व्यक्ति : ते निजजनदुःखहर्ति ॥ आतां हे व्रजस्थ तरति : दुःखार्णवातें जियेकरिं ॥ ४९ ॥ येथें हेतु ह्मणसी काई : तरि हे विश्वमंगळमयी ॥ जें सौष्ठव्य विश्वाचा ठाईं : तें अवघें उत्तमत्व येथेंचि असे ॥ ५० ॥ न पाहातां हे तुझी मुर्ति : सुखाभास अन्येत्र स्फुर्ति ॥ धनदारादिकें भासती : सुखाचि कारणें ते समइं ॥ ५१ ॥ परि तें दुःखाचें कारण : येथें सुख काहीं नसे जाण ॥ आणि पाहातां हे रुप रमण : ब्रह्मसदनहि नावडे गा ॥ ५२ ॥ ह्मणौनि हें मंगळमुर्ति : विजनजनाचि क्लेशहार्त्ति ॥ असो विरक्तांचि संपत्ति : सच्चिदानन्द स्वरूप सकळ ॥ ५३ ॥ तरि अगा ये नन्दानन्दना : आह्मी ज्या सर्वा गोपांगना ॥ सर्वस्वें किं तुज शरणा : त्या काय व्रजवासिनी नहों ॥ ५४ ॥ अगा आमुचा काय चित्तिं : गृहादिकांची असे आसक्ति ॥ तरि कृष्णा कां आह्माप्रति : येवढा निकरु ॥ ५५ ॥ ह्मणौनि व्रजवनौकसार्तिहरणा : आम्हींहिं गा व्रजांगना ॥ त्वद्वियोगपीडितमना : तव सान्निध्यातें वांछितों ॥ ५६ ॥ हे जे वांछा आमुचे मनीं : तेचि वोडवली रोगस्थानीं ॥ तरि तुं चिकित्सक होउनि : उपाय करिं गा सत्वर ॥ ५७ ॥ प्रकटउनि आपणातें : काहिं या रोगहरणातें ॥ कृष्णा जाणसी तें आमुतें ; देइं गा औषध आतां ॥ ५८ ॥ प्रभो आम्ही व्रजवासिनि : आइत्याचि अधिकारिणी ॥ तुझी करितां चिंतवणी : बहु काळ गेले येथें ॥ ५९ ॥ आतां या रोगशमनाप्रति : तुज आयास न पडति ॥

तुं तरि सर्वज्ञाचा पति : आह्मी काय सांगावें ॥ ६० ॥ आणि गोप्या या रहस्यातें : काइ प्रकट सांगों तुतें ॥ कामरोग नाशावयातें : तुंचि गा परमौषधें किं ॥ ६१ ॥ तथापि जरि पुससी : तरि जे सांडुनि प्रपंचासि ॥ तुझे अनन्य दासदासि : एकांतभक्त जे कोन्हि (ण्हि) ॥ ६२ ॥ त्याचे हृद्रोगातें हरुन : जेणें सुखि केले ते स्वजन ॥ तें निष्कामता रसायन : आमुतेंहिं देई गा कृष्णा ॥ ६३ ॥ तुं शरणागतवत्सळ : हें काइ आतांचि केवळ ॥ नेणो राखिले किती वेळ : या हृद्रोगार्णवा पासुनि गा तुवां ॥ ६४ ॥ एवं सांडुनि कृपणतेतें : आमुचा रोगनाशा पुरतें ॥ आतां प्रकटोनि तुं येथें : कळेल तैसें वांचवि आमुतें ॥ ६५ ॥ या रोगशांतीचें कारण : जाणता नाहिं तुजवीण ॥ यालागीं सर्वस्वे शरण : आलों गा आह्मि तुजला ॥ ६६ ॥ ऐसें तो गोपिकाजन : करितां कृष्णगुणवर्णन ॥ अंतरिं ते मुर्ति सुभरोन : प्रेमसमुद्रिं बुडाला ॥ ६७ ॥ ते वोसंडुनि प्रेमपूर्ति : अश्रुधारा विशेषें श्र (स्र) वति ॥ चित्तें आळिंगुनि कृष्णमूर्ति : आरंभिलें रुदन ॥ ६८ ॥ नाना रुदन प्रसंगें करुन : प्रेमाश्रुकरिं वोसंडुन ॥ करित्या जाल्या जळश्ना (स्ना) न : हृदा (दि) स्था कृष्णातें ॥६९॥ तें रुदनयुक्तें वचनें : जे किं प्रेमोद्रेकाचिं कारणें ॥ आइकें राया सावध मनें : वर्णिताति तें ॥ ७० ॥

**यत्तो सुजातचरणांबुरुहं स्तनेषु**
**भीताः शनैः प्रिय दधीमहि कर्कशेषु ॥**
**तेनाटवीमटसि तद्व्यथते न किंस्वि-**
**त्कूर्पादिभिर्भ्रमति धीर्भवदायुषां नः ॥ १९ ॥**

अगा ये यशोदानंदना : प्रियोत्तमा प्रीतिसदना ॥ आह्मी ज्या तव शरणा : व्रजवासिनी नारी ॥ ७१ ॥ कृष्णा तियां आमुची मति : अतिशयें असे भ्रमति ॥ ते कोणें गुणें ऐसें ह्मणति : जरि काहिं स्वामि ॥ ७२ ॥ तरि हे चरणांबुज पाहिं : ऐसें सुकुमार वस्तु नाहिं ॥ या लागि सुजात हें काहिं : ह्मणतिलें तव पदातें ॥ ७३ ॥ ऐसें जे सुकुमार पाहिं : तें आपुले कुचांचा ठाईं ॥ आह्मी मर्दितां बहु काहिं : शंकिना जाले काळिये ॥ ७४ ॥

ह्मणोनि न लागतां आदळु : कुचें मर्दितसों हळुहळु ॥ ढका लागोनि अळुमाळु : ते दुखवेल ह्मणि ॥ ७५ ॥ विचारितां पदाचें माने : आमुचिं पद्युगें कठिणें ॥ यालागि भीतसों गा मने । स्तनावारि ठेवितां यातें ॥ ७६॥ तया पद्मांबुजें करुनि : अ(आ)क्रमितां वनमेदिनी ॥ असो वनातें प्रवेशोनि : फीरतां इतस्तता ॥ ७७ ॥ अगा त्या अटविच्या ठाइं : क्षुद्रपाणादि जे कांहिं ॥ तिहिं स्पर्शोनि तुझे पाईं : व्यथेतें करिजेल ह्मणि ॥ ७८ ॥ असो तुज चालतां वाटे : खडे कुसळें आणि कांटे ॥ हे रुतती पाइं ह्मणि नेटे : ऐसी चिंता होत असे ॥ ७९ ॥ एवं अंतरोनि त्वत्पदातें : हे बुद्धी पडे मोहगर्ते ॥ केव्हा ते चरण मागुते : आह्मि देखिजेति डोळां ॥ ८० ॥ ऐशा वियोगातिसागारि : पडतसों तव कींकारि ॥ आमुतें वांचावया उरि : नसे गा तुजवांचुन ॥ ८१ ॥ असो तुं सर्वज्ञ श्रीपति : आमुचा आयुष्याची मुर्ति ॥ हे चरण धरुनि चित्तिं : वर्ततसों येथें ॥ ८२ ॥ त्या तुझिया सकुमारा पदातें : हृदइं वाहातां आमुतें ॥ शंकां होते जें ह्मणि त्यातें : कठिणता स्पर्शेल ॥८३॥ असो हें सुक्ष्म पद पाहिं : जन्हि गा ध्यानास्पद नाहिं ॥ तन्हि वाहातों हृदइं : शंकिता होंत्सात्या ॥ ८४ ॥ कां जे तरावया संसृति : आणिक नाहिं येथें गति ॥ यालागि ते चरण चित्तिं : धरुनि वर्ततसों ॥ ८५ ॥ हृदइं धरितां पदातें : योग्यता नाहिं आमुतें ॥ तरि कुचस्पर्शुचि त्यातें : करावा गा श्रीकृष्णा ॥ ८६ ॥ नाना धरितां तें हृदइं : मग हृदयत्व कैंचें काइं ॥ यालागिं भिउनि होंचि काहिं : विचरित होतों ॥ ८७ ॥ तवं तिरोधाना ऐसें : तुवां दाविलें वनप्रवेशें ॥ तरि तें आह्मासि आतां कैसें : साहविल कृष्णा ॥ ८८ ॥ आतां कापन्य करुनि परतें : दर्शन देउनि आमुतें ॥ असोंदे गा निजपदातें : या कुचयुक्त हृदइं ॥ ८९ ॥ अन्यथा वांचणेंचि नाहिं : कृष्णा ऐसेंहि जाण पाहिं ॥ तुजवांचुनि अन्य काइं : जीवनोपाय आमुतें ॥ ९० ॥ ऐसें सर्वा व्रजसुन्दरी : बैसोनि त्या यमुना तीरिं ॥ पडतां विरहसागरिं : स्मरत्या जालिया कृष्णातें ॥ ९१ ॥ आपुलालि सर्व हृद्गतें : वेगळालें तें गोपिशतें ॥ निवेदुनि

श्रीकृष्णजीतें : स्तवितीं जालि अवधि ॥ ९२ ॥ नाना त्या प्रियविरहार्णवि : कृष्णगुणकीर्तनप्लवि ॥ बैसोनि त्या मुक्तजीवी : तरलिया गोपी ॥ ९३ ॥ ऐसी हे कथा भागवती : शुकें वर्णिली रायाप्रति ॥ शौनकादिकां हेचि कीर्ति : सांगितली सूतें ॥ ९४ ॥ तेचि मातें गुरुकृपे जाणवली : मग मति पाहोनि आपुली ॥ म्याहिं आतां वर्णिलि : गुरुप्रसादें ॥ ९५ ॥ त्या आज्ञेतें वंदुनि माथां : वर्णिली हे गुणकथा ॥ नाना मज मृत्युग्रस्ता : अमृतलहरी हे ॥ ९६ ॥ असो विषयानळें तप्त मन : येथें पावोनि निमज्जन ॥ या कथामृतातें प्राशुन : निवाले बहु ॥ ९७ ॥ नाना येथें प्रसंगें करुन : श्रीकृष्णाचें रुप रमण ॥ आठवले समचरण : हृत्पीठिं जें उभे ॥ ९८ ॥ असो तें रूप मनोहर : त्यातें पाहोनि जे तत्पर ॥ तत्कथाप्लवारूढ नर : भवासिंधूतें तरति ॥ ९९ ॥ ऐसी जे स्वेच्छाविलासिनी : जे भीमातीरनिवासिनी ॥ कृष्णमूर्ति मनोल्हासिनी : ते स्मरली मातें ॥ ६०० ॥ प्रस्तुत मिं येणेचि पंथें : तरेन दुरितार्णवातें ॥ हें विषयाशा व्याघ्री मातें : उपद्रवीना कदापि आतां ॥१॥ ऐसें मिं विचारुनि मनिं : प्रवर्तलों या गुणवर्णनि ॥ जैसिया त्या गोपकामिनी : तरलिया दुरितें ॥२॥ हेंचि मिं हिं जाणोनि काहिं : शरण आलों कृष्णपाईं ॥ कां जे कृष्णजननीसि नाहीं : ताने थोर निवडुं ॥३॥ या स्वार्थातें धरुनि चित्तिं : आदरिली कृष्णकीर्ति ॥ तेथें पावला हा समाप्ति : एकत्रिंशतितम ॥ ४ ॥ यावरि हे गोपीगीतें : आइकोनि कृष्णें नंदसूतें ॥ सारोनि व्यवधानातें : प्रकटोनि तत्काळ ॥ ५ ॥ त्या गोपीचें सांत्वन : करिजेल तें अनुवादन ॥ राया परिक्षिति लागुन : करिजेल श्रीशुकेंद्रें ॥ ६ ॥ तेंहिं गुरुदयालाहोन : म्याहिं यथामति वर्णन ॥ करुनि निःपाप होउन : शोधिजेल स्ववाणी ॥ ७ ॥ आतां अनुवादिजेल काहिं : तें असो गुरुपाईं ॥ आणि त्या वर्णनाचा ठाईं : न्यूनाधिक जें ॥ ८ ॥ तें क्षमा करुत सज्जन : असोनि चित्तें सावधान ॥ नित्यानंदें शिवकल्याण : करावें निर्विघ्न ॥ ९ ॥ इतिश्रीमद्भागवते महापुराणे दशमस्कंधे पूर्वार्धे कृष्णगोपी रासक्रीडावर्णनं नाम एकत्रिंशतितमोध्याय : ३१ ॥

**श्रीकृष्णार्पणमस्तु.**

ॐ

श्रीमद्भागवतांतर्गत

# रासपंचाध्यायी.

## अध्याय ४.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ आतां रासक्रीडापरायण : तो नन्दानन्दन श्रीकृष्ण ॥ गोपिकामानसमोहन : वृंदावनविहारी ॥ १ ॥ स्मरोनियां त्या हरीतें : तयाचें गुण वर्णु मागुते ॥ मग तेणें निजवाग्देवतेते : विगतकल्मष करुं ॥ २ ॥ असो दुरितें क्षयातें धरुनि चित्तिं : आरंभिली हे गुणकीर्ति ॥ भगवत्कथा हे भागवतिं : तापोपशमानि ॥ ३ ॥ तेथें नित्यानन्ददये करुनि : प्रवर्तली माझी वाणी ॥ तेणें नित्यानन्द मनिं ॥ तिष्ठतुसे सर्वदा ॥ ४ ॥ जो विठ्ठलवेशातें धरुनी : कटीतें करिं कवळुनि ॥ इटेवरि समचरणि : उभा असे भीमातीरिं ॥ ५ ॥ तेणें माझिया माणसातें : करावें आपणा सवतें ॥ हे प्रपंचाची स्फुर्ति मातें : अणुमात्रही न व्हावी ॥ ६ ॥ माझें अनिवार हें मन : न व्हावें विषया अधीन ॥ कोणेहि मिषें अभिमान : न संचरो कदा ॥ ७ ॥ ऐसा स्वार्थ धरुनि चित्तिं : न विचारितां स्वव्युत्पात्ति ॥ आदरिली हे गुणकीर्ति : रामकृष्णजीचि ॥ ८ ॥ तेथें कथानुसंधान : त्या गोपिकाहि कृष्णगुण ॥ पूर्वोक्तें वर्णिले येउन : यमुनातीराप्रति ॥ ९ ॥ यावरि तो रमेचा भर्त्ता : जाणोनि तियांची अवस्था ॥ प्रकट होउनियां स्वता : सांत्विता जाला त्यांतें ॥ १० ॥ ऐसें जे काहिं निरुपण : ये अध्यायि बादरायण ॥ रचिता जाला तें अनुवादन : रायाप्रति शुकें केलें ॥ ११ ॥ तोचि सूतें शोनकादिकातें : कथिलें तें म्यां वर्णिले येथें ॥ स्मरोनि नित्यानन्द गुरुतें : वक्ष्यमाण जें ऐसें ॥ १२ ॥

॥ श्री शुक उवाच ॥

**इति गोप्यः प्रगायन्त्यः प्रलपन्त्यश्च चित्रधा ॥**
**रुरुदुः सुस्वरं राजन्कृष्णदर्शनलालसाः ॥ १ ॥**

उक्त प्रकारें करुन : यमुनातीरिं असोन ॥ कृष्णाचे गुणगायन : करितां विचित्र प्रकारें ॥ १३ ॥ स्वभावें त्या विलासयुक्ता : गात होत्या त्या गोपकांता ॥ ह्मणती हा रमाभर्त्ता : प्रकटेना कां आझुनि ॥ १४ ॥ ऐसें विलपोनि रुदन : करित्या जाल्या त्यांचें विशेषण ॥ वडलें ऐसें जाण : कृष्णदर्शनलालसा हें ॥ १५ ॥ आतां येइल श्रीकृष्ण : ह्मणोनि कंठिं धरिले प्राण ॥ मग निकरु केला जाणोन : ना रडत्या जाल्या ॥ १६ ॥ नाना वर्णितां विचित्र गुण : अंतरीं भरला कृष्ण ॥ तेणें प्रेमाश्रु वोसंडोन : रुदन केलें तिहिं ॥ १७ ॥ अगा रायातें कैसें रुदन : तरि सुस्वर हें लक्षण ॥ जें उच्चस्वरें गोपीगण : बोलोनि रडता जाला ॥ १८ ॥ किंवा तिहिं रुदनमिषें : कृष्ण स्मरला आक्रोशें ॥ अनंता जन्माचिं किल्बिसें : अंतरायरुप जें ॥ १९ ॥ त्या दुरितातें निरसुन : श्रीकृष्णाचें कृपाळुपण ॥ खवळुनि प्रेमे करुन : प्रसन्न केला तो प्रिये ॥ २० ॥ मग तो संतुष्ट होतसाता : देवी लक्ष्मियचा भर्त्ता ॥ श्रीकृष्ण जाला प्रकटता : तियां गोपिकां प्रति ॥ २१ ॥ हें उत्तरश्लोकें करुन : राया प्रति व्यासनंदन ॥ बोलिले तें सव्याख्यान : वर्णिजेतें आइका ॥ २२ ॥

**तासामाविरभूच्छौरिः स्मयमानमुखांबुजः ।**
**पीतांबरधरः स्रग्वी साक्षान्मन्मथमन्मथः ॥ २ ॥**

जाणोनि निजविरहार्ता : क्रंदमाना गोपकांता ॥ तयां प्रति रमाभर्त्ता : प्रकटला तो कृष्ण ॥ २३ ॥ असो शौरी नामें करुन : यादवकुळमंडन ॥ शूरसेनान्वयभूषण : लीलाविग्रहधारी श्रीकृष्ण ॥ २४ शौरी येणें ऐसें वडलें : जें गोवळत्व निवारिलें ॥ साक्षात् वैकंठिचें सावळें : अवतरलें हें ब्रह्म ॥ २५ ॥ पुराणे जयातें गाति : उपनिषदें प्रतिपादिति ॥ असो वासुदेवत्वें ख्याति : वेदोक्त जया कृष्णाचि ॥ २६ ॥ तो त्यां निजशरणां प्रति : तया गर्वाचिया

निवृत्ति ॥ आइक राया परीक्षिति : प्रकटता जाला ॥ २७ ॥ तो कृष्ण कैसा सहज : तरि स्मयमानमुखांबुज ॥ ज्याचें सहास्य मुखपंकज : प्रसन्नवदन विग्रह ॥ २८ ॥ नातरि निकटवर्तियातें : गर्वें व्यवधान जालें होतें ॥ तेणें गमलें जें येथें : अकस्मात् प्रकटला कृष्ण ॥ २९ ॥ ज्या गर्वें केलें आवरण : त्यातें प्रकाशिलें आपण ॥ स्वता जो आवरणशुन्य : प्रकटचि असतांहिं ॥ ३० ॥ आपुलेनिचि प्रकाशें : भासविलें विलोपा ऐसें ॥ तया मिथ्याप्रतीति मिषें : प्रकट असोनिहिं स्वयें ॥ ३१ ॥ अप्रकट ऐसें भासलें : यालागि कृष्णें हांस्य केलें ॥ त्या हास्ययुक्त मिरवलें : मुखांबुज कृष्णाचें ॥ ३२ ॥ आणि आपुलिया प्रभा : आणोनि पीतांबरासि शोभा ॥ तो पीतांबरधर उभा : राहिला प्रत्यक्ष ॥ ३३ ॥ नाना पीतांबराचे कांति : त्या गोपिकांची चित्तवृत्ति ॥ आपुला ठाइंचि पुरति : अकर्षुनि घ्यावी ॥ ३४ ॥ ह्मणौनि पीतांबरधर : रूप दाउनि मनोहर ॥ भेदुनि गोपिकांचें अंतर : गोचर जाला तयांसि ॥३५॥ नातरी पीतांबराकृति : कासे काशिली निजभाक्ति ॥ जियेतें आश्रुनि भगवंतिं : भजति भक्त ॥३६॥ ऐसा तो नंदकुमार : हास्यमुख पीतांबरधर ॥ प्रकट जाला मनोहर : वृंदावनि त्या गोपिकांसि ॥ ३७ ॥ आणि वनपुष्पांचियां माळा : जेणे वातलिया गळां ॥ निजरथा करुनि त्या बाळा : आपुले वेधें ॥ ३८ ॥ नातरि ते वनसुमने : गोपिकांचि शुद्ध मने ॥ त्यातें स्वीकारुनि तेणें कृष्णें : ते वाइलि कंठप्रदेशीं ॥ ३९ ॥ एवं पीतांबरवेष्टित : वनपुष्पमाळामंडित । हास्यमुख जो मन्मथ : मन्मथासहि मथिता ॥ ४० ॥ तेथें जो कृष्ण प्रकटला : तो हास्यासि प्रत्ययो जाला ॥ वांचुनि सर्वदा संचला : निकटवर्त्ती ॥ ४१ ॥ त्यांचियांचि गर्वानिमित्तें : तिरोधान गमलें होतें ॥ तया गर्वनिवृत्ती त्यांतें : प्रकटताही गमली ॥ ४२ ॥ ह्मणोनि असत होंत्साता : गमली त्यांतें प्रकटता ॥ आतां असो भावार्थकथा : प्रसंगुचि वर्णु ॥ ४३ ॥ आपुले विरहनिमित्तें : शिणलिं तें गोपीशतें ॥ निजप्रियें वाचुनि त्यातें : नाळवती देहादिकें ॥ ४४ ॥ जाणोनि ऐसियेनिष्ठेतें : तेणें

मदनाचेहि मन्मथें ॥ प्रत्यक्ष केलें आपणातें : विरहशमनार्थ ॥ ४५ ॥ असो तो मन्मथमोहन : विरहशमाचें कारण ॥ श्रीकृष्णाहुनि जें आन : तें विरह-कारक सर्वेहि ॥ ४६ ॥ कामशमातें जे इच्छिति : ते कृष्णातें शरण येति ॥ हें नेणो लोक शीणति : कामसंकटिं येथें ॥ ४७ ॥ यालागि त्या गोप-कांता : सांडुनि अन्यत्र आस्था ॥ त्या मन्मथाचिया मन्मथा : शरण आलिया ॥ ४८ ॥ असो वर्णुनि कृष्णकीर्ति : जालो प्रतिबंधनिवृत्ति ॥ मग प्रकटला श्रीपति : तेथें तत्काळ तयांसि ॥ ४९ ॥

**तं विलोक्यागतं प्रेष्ठं प्रीत्युत्फुल्लदृशोबलाः ॥**
**उत्तस्थुर्युगपत्सर्वास्तन्वः प्राणमिवागतम् ॥ ३ ॥**

तया मदनमोहनातें : नंदकुमारा श्रीकृष्णातें ॥ सकळ प्रेमास्पदा प्रेष्ठातें : देखोनि त्या अबला गोपी ॥ ५० ॥ कृष्ण गात होत्साल्या : वाळुवंटि बैसल्या होत्या ॥ समकाळेंचि जाल्या उठत्या : विकासितनयना ॥ ५१ ॥ त्यांचि तृषार्तें नयनचकोरें : स्पार्शिलिं कृष्णमुखचंद्रें ॥ होउनि अमृतनिर्भरें : सुटलिं दोंदें अतिसुखे ॥ ५२ ॥ असो ते तपोर्जित नयन : अन्य विषयां पासुन ॥ परतोनि ते देखिलें वदन : प्रियोत्तमा श्रीकृष्णाचें ॥ ५३ ॥ ह्मणोनि ते शोभाथिले : अतिभाग्याचे गमो आले ॥ कृष्णदर्शनामृते धाले : नावलोकिती आणिकातें ॥५४॥ जेवि सांडुनि दृशा(श्या) भुमितें : पावोनि गुरुप्रसादातें ॥ दृढाभासाचेनि पंथें : संभवली जे कांहिं बुद्धी ॥ ५५ ॥ त्या बुद्धीतें गुरुशास्त्रता : योजली अत्यंत सुक्ष्मता ॥ तथापि तिजहुनि उदारता : अन्येत्र असेना ॥ ५६ ॥ प्राकृताहुनि परतालि : ब्रह्मोपलब्धीसि पात्र जाली ॥ अति उदार मिरवली : योगियांसि योग्य ॥ ५७ ॥ तेवि देखोनि कृष्णवदना : होत्साल्या उत्फुल्लनयना ॥ साविला वैकुंठराणा : तिहिं नयन शोभेकरिं ॥ ५८ ॥ एवं विकासितनेत्रवृंदा : कृष्णचित्ता वृ (व्र) जप्रमदा ॥ त्या देखोनियां नंदानंदा : एकसरेंचि उठल्या ॥ ५९ ॥ नाना कृष्णि रमलें मन : तें उठलें दृश्या पासुन ॥ आणि जेथें विषयाचिंतन : तें उठोनहिं पातित ॥ ६० ॥ जे कोण्हीं इतस्तता वर्त्तति : प्राकृत सुखार्थ श्रमति ॥ ते

अध:पाता योग्य होति : कृष्णि न भजतां ॥ ६१ ॥ ह्मणोनि सुभगनयना : त्या देखोनि कृष्णवदना एकत्र बैसल्या अंगना : तैशाचि उठल्या ॥ ६२ ॥ कां जें सर्वांचेंहि जीवन : सर्वत्र साम्यत्वें श्रीकृष्ण ॥ यालागि तिहिं उस्था (त्था)न : एक वेळेंचि केलें ॥ ६३ ॥ नातरि कृष्णिं जे भजति : ते जाणावे समवृत्ति ॥ आणि विषइक ज्यांची प्रवृत्ति : ते नाना वृत्तिभेद ॥ ६४ ॥ तेवि ते गोपांगनाशतें : अवघिहिं येकोचि मतें ॥ देखोनियां श्रीकृष्णजीतें : उठतिं जालितत्काळ ॥ ६५ ॥ जेवि प्राणाचें आगमन : होतांचि देहेंद्रियगण ॥ एकसरोंचि उठोन : सावध होय वेवहारकृत्यि ॥ ६६ ॥ तेवि साक्षात् देखोनि मुर्ति : त्या युगपत्सर्वाही सति ॥ उठलिया त्या समचित्तिं : विकासितनयना ज्या ॥ ६७ ॥ मग तिहिं कृष्णजीतें : कैसे जालें भजिजेतें ॥ वश जाला कृष्ण त्यातें : कैसा तें आइक राया ॥ ६८ ॥

**काचित्करांबुजं शौरेर्जगृहेंजलिना मुदा :**
**काचिदधार तद्बाहुमंसे चंदनभूषितम् ॥ ४ ॥**

कोण्ही येकि व्रजकामिनी : जो शौरी नामे करुनि ॥ श्रीकृष्णजी पदमणी : शूरवंशावतरण ॥ ६९ ॥ तयाच्या करपंकजातें : धारिती जाली निजहस्तें ॥ असो अंजळि जोडोनि त्यातें : करांबुजीं धारिलें ॥ ७० ॥ नाना देखोनि कृष्णवदना : सांडुनि क्षुद्र भावना ॥ असोनि हर्षसंपन्ना : कृष्ण मानिला आत्मा ॥ ७१ ॥ किंवा हर्षनिभर जाली : तारतम्यातें विसरलीं ॥ ते आळुंकेपणें जडलीं : अतिसत्वर श्रीकृष्णि ॥ ७२ ॥ जेवी तृषापीडितावारि : जाली अमृताचि लहारि ॥ मग अमृताचि भिड न धारि : तो सेवांचि लागे त्यातें ॥ ७३ ॥ तेवि त्या विरहपीडितेतें : देखोनि कृष्णचंद्रातें ॥ आलें प्रेमार्णव भरितें : तेणे न धरवे धीरु तियेतें ॥ ७४ ॥ ह्मणोनि तिया दोहिं हाति : धरिला करांबुजिं श्रीपति ॥ कां जें ह्मणि हा मागुति : सांडील आमुतें ॥ ७५ ॥ नातारि मनबुद्धि दोन्हि : निक्षेपिलिं तिया श्रीकृष्णि ॥ व्यवधानातें तोडोनि : वि नटली तेथें ॥ ७६ ॥ तैसीचि कोण्ही येकि कामिनी : श्रीकृष्णातें निहाळुनि ॥ निज- हस्तद्वयें करुनि : स्कंधाचा ठाई ॥ ७७ ॥ श्रीकृष्णाचया बाहुतें : धरिती जाली प्रेमार्द्रचित्तें ॥ नाना विरहर्णवि नौकेतें : जोडिलें तिया ॥ ७८ ॥ स्कंध

मर्यादा करुन : आक्रमिला तिया श्रीकृष्ण ॥ जेवि कोण्हि योगीजन : सोहंपद पावे ७९ ॥ सोंहंभावाचें अनुष्ठान : साक्षात्काराचें साधन ॥ तेवि हे स्कंधावलंबन : अधरामृतप्रापक ॥ ८० ॥ आतां अधरांमृताची प्राप्ती : सुलभ जालि ययावरौति ॥ ऐसें चित्तिं : मानिले तिया ॥८१ ॥ एवं स्कंधातें अवलंबुन : केलें श्रीकृष्णबाहुचें ग्रहण ॥ तो बाहु किंलक्षण : तरि चंदनें विलित ॥ ८२ ॥ किंवा तो जो काहिं चंदन : त्या गोपीचें प्रेमळ मन ॥ तो प्रेमाचि उपतिष्ठोन : सुपरिमळित जाला ॥ ८३ ॥ नाना स्वता ते प्रेममूर्तिं : तेथें गोपीची योजली प्रीति ॥ तेणें हरोनि चित्तवृत्ति निजस्थ केली ते ॥ ८४ ॥

**काचिदंजलिना ग्रण्हात्तन्वी तांबूलचर्वितम् ॥**
**एका तदंघ्रिकमलं संतप्ता स्तनयोरधात् ॥ ५ ॥**

कोण्ही येकि तन्वीलक्षणा : सूक्ष्मदेहा सुकुमारांगना ॥ नंदानंदना श्रीकृष्णा : भजीनली ऐसी ॥ ८५ ॥ तेणे उदारें रमालीळें : तांबुळातें जे चाविलें ॥ तया चवितातें देखिलें : त्याजितां तियेनें ॥ ८६ ॥ मग ते त्यजितिये वेळे : अंजळिपुट वोडविले ॥ तिया अंजुळी करिं स्वीकारीलें : तांबूळचर्वितातें ॥ ८७ ॥ एवं त्या तांबूळाचे मिषें : तें तृप्त जालीं अधररसें ॥ जेवि योगियाचें मानसें : वाक्यार्थामृतें ॥८८॥ नाना तेणे नित्यतृप्तें नंदसुतें : त्या गोपीचेनि निमित्तें ॥ तांबूळातें चर्विलें होतें : तें दिधलें तीतें ॥८९॥ नाना तो ब्रह्मानंदमूर्ति : तया स्वानंदातें पुडति ॥ अनुवादोनियां ते सती : निववीली नावेक ॥९०॥ जेवि सज्जन स्वानंदमूर्ति : ते आपुलि स्वरुपस्थिति ॥ अनुवादोनि उदारमति : आपुलेचि ठाइं ॥ ९१ ॥ मग तेजें त्याचें गदित : तेणे तृप्त होती तद्भक ॥ तयाचा ठाइं अनुरक्त : जे कोण्हिही असति ॥ ९२ ॥ तेवि त्या चर्विता तांबूळातें : सांडिले रमानाथें ॥ तेणे ते गोपीमनोरथातें : पावती जाली ॥ ९३ ॥ आणिक येकि गोपांगना : कृष्णविरहाकुळमना ॥ देखोनि नंदानंदना : अतिउत्साहातें पावली ॥ ९४ ॥ त्या महोत्सवें करुनि : पाहेनि कृष्णचरणीं ॥ त्या पदसरोजातें धरुनि : हृदइं ठेविती जाहली ते

॥ ९५ ॥ नाना त्या पदरजप्रभावातें : सिंचोनि तद्विरहजां तापातें ॥ स्पर्शोनि कुचयुगातें : शांत जाली ते ॥ ९६ ॥ किंवा कृष्णसेवानुशीळ : मनोबुद्धि कुचमंडळ ॥ तेथें धरुनि पदकुड्मळ : सांडिला तो तापु ॥ ९७ ॥

**एका भ्रुकुटिमाबद्ध्य प्रेमसंरंभविव्हला ॥**
**घ्नंतीवैक्षत्कटाक्षेपैः संदष्टदशनच्छदा ॥ ६ ॥**

आणि कोण्हि येकि वेल्हाळा : प्रेमसंरंभविव्हळा ॥ ह्मणिजे देखोनि घनसावळा : नंदानंदन श्रीकृष्ण ॥ ९८ ॥ आली जे प्रेमलहरी : तिया कोपाची दाविली परि ॥ त्या प्रणयेकोपें ते सुंदरी : अत्यंत विव्हळ जाहली ॥ ९९ ॥ असो वृत्ति विकळ जाली : तारतम्यातें विसराली ॥ तेणें क्रिया घडोनि आली : कोपा सारिखि तेथें ॥ १०० ॥ ते कोपाविष्टता जे काहिं : उमगली भ्रुकुटीचा ठाईं ॥ असो कुटिळा करुनि भवइ : अवलोकिती जाली ॥ १ ॥ व्यंकटा करुनि भ्रकुटी : कृष्णावरि ते गोरटी ॥ प्रेमकटाक्ष शरवृष्टि : वर्षती जाली ते समयिं ॥ २ ॥ स्मरोनि कृष्णविरहातें : नेणों त्या कटाक्षशरपातें ॥ विंधिती जाली कृष्णातें : तन्मना होत्साती गोपी ॥ ३ ॥ एवं कटाक्षाक्षेपलक्षण : प्रेमकटाक्षें अवलोकन ॥ त्या कटाक्षेक्षणशरिं कृष्ण : ताडिला नेणों ॥ ४ ॥ नातरि वियोगनिमित्तें : ते पडली होती शोकगर्त्ते ॥ यालागि कोपविषयो तीतें : कृष्णचि जाला ॥ ५ ॥ असो मिथ्याभिमानडोहिं : पडोनि क्लेश जाले जे काहिं ॥ तेणेंचि संबंधें पाहिं : शीणु जो किं जाला ॥ ६ ॥ तो परमार्थवस्तु वीण : निवारील आणिक कोण ॥ यालागि कोपावसान : कृष्णिच घडलें ॥ ७ ॥ ह्मणोनि जे कोण्ही ये जनि : या श्रीकृष्णातें चुकोणि(नि) ॥ वृथा पडोनियां भ्रमणिं : शीणती इतस्तता ॥ ८ ॥ त्यांतें कोपावयासि पाहिं : कृष्णें वांचुनि ठाव नाहिं ॥ किंवा भजावयासि काहिं : आश्रो नसे दुजा ॥ ९ ॥ यास्तव ते गोपी सुंदरा : जे श्रीकृष्णविरहातुरा ॥ मनोहरा नंदकुमारा : देखतांचि तत्काळ ॥ १० ॥ प्रेमाची पडोनि भुलि : किंचित् कोपाची परि दाविलि ॥ श्रीकृष्णावरि प्रेरिलि : दृष्टि शरपातें ॥ ११ ॥ ते कोपाची रीति जे काहिं : दाविली अधराचा ठाईं ॥

त्या अधरोष्ठातें पाहिं : दशनेंकरिं दंशिलें ॥ १२ ॥ नातरि स्वर्गं निमित्तें : श्रीकृष्णें सांडिलें होतें ॥ ह्मणोनि तिया आपणातें : पीडिजेते जाहलें ॥ १३॥ असो तया प्रियोत्तमातें : देखोनि धीरु नव्हे चित्तें ॥ प्रणय पुरःसर कोपातें : दाविलें तियेनें ॥ १४ ॥

**अपरानिमिषदृग्भ्यां जुषाणा तन्मुखांबुजम् ॥**
**आपीतमपि नातृप्यत्सन्तस्तच्चरणं यथा ॥ ७ ॥**

आणिक येकि ललना : भाग्याची मृगलोचना ॥ देखोनि नन्दानन्दना : श्रीकृष्णजीतें ॥ १५ ॥ अनिमिष करुनि दृष्टीतें : प्राशिती जाली कृष्ण-मुखातें ॥ असो तृषार्त नेत्र होते : ते निववीले ये रीति ॥१६॥ नाना कृष्णमु-खचन्द्रातें : नेत्रचकोरें तृषापीडितें ॥ प्राशिति जालिं तन्हि तृतें : नव्हतीचि तियेचिं ॥ १७ ॥ एवं देखोनि कृष्णवदन : निमिषोन्मेषातें सांडुन ॥ तिये गोपीचे नयन : तटस्थ होते जाले ॥ १८ ॥ ते नेत्र कृष्णवदनातें : कोण्ही येके भाग्यें उर्जितें ॥ प्राशिते जालें तन्हि तयांतें : नव्हेचि पर्याप्ति ॥ १९ ॥ नाना ते नयनभृंग : कृष्णमुखांबुजपराग ॥ सेविते जाले तन्हि वीतराग : ते न होतीच तेथुनि ॥ २० ॥ जेवि योगी जे कोण्ही होति : करुनि साधन-संपत्ति ॥ स्वरूपानन्दातें सेविती : व्यवधानरहित्यें ॥ २१ ॥ तन्हि भोगितां आनन्दावाप्ति : न पवती अळंप्रतीति ॥ यावद्देहपात त्यांची प्रीति : विशेषें वाढे ॥२२॥ तेथुनि काढुनि मन : न करिती विषयां अधीन ॥ विषयानन्दें करुन : ते न क्रमिती काळ ॥ २३ ॥ असो देहस्थिती पुरती : पावावया उपरति ॥ स्वरूपा पासुनि परति : चित्तवृत्ति न ढळे त्यांची ॥ २४ ॥ अतृप्ताचे परिं आसक्ति : विशेषें भजोनि भगवंति ॥ ते प्रेमोद्रेकेंचि क्रमिती : दैवक्षयावधि ॥ २५ ॥ तेवींचि तेही गोपकांता : कृष्णाचेचि मुख पाहातां ॥ पुनरपि न तुटे आस्था : अतृप्ताचे परिं ॥ २६ ॥ नाना ज्या कृष्णमुख-पंकजातें : ते गोपीनेत्रभृंगव्रतें ॥ सेविती जाली तन्हि तियेतें : तृप्ति नव्हे कदापि ॥ २७ ॥ येथें दृष्टांत ह्मणसी काई : तरि या कृष्णाचा ठाई ॥ सांडुनि सर्वस्वातेंहिं : भजती जे महासन्त ॥ २८ ॥ ते तृप्त जाले होंतसाते : न

पत्रती जेवि तृप्तीतें ॥ आदरें सेविती ते मागुते : अतृप्त असोनि सदां ॥२९॥ तेवींचि तेंही व्रजसती : सेवितां श्रीमुखसम्पत्ति ॥ तेथुनि न पवेचि निवृत्ति : अतृप्त होंत्सातीं गोपी ॥ ३० ॥ आणि त्या मुखातें सेवितां : कोण्ही येकि गोपकांता ॥ काय वर्तली तेंहिं आतां : अवधारिं गा राया ॥ ३१ ॥

**तं काचिन्नेत्ररंध्रेण हृदि कृत्य निमील्य च ॥**
**पुलकांग्युपगुह्यास्ते योगीवानन्दनिर्भरा ॥ ८ ॥**

त्या परमप्रिया कृष्णातें : सुंदर वदनारविंदातें ॥ सांडुनि सकळ भावातें : दुसरी कोण्ही व्रजवनिता ॥३२॥ ते नयनद्वारें करून : हृदयासनिं बैसउन ॥ लाउनियां दोन्हि नयन : व्यवहारशून्य बैसली ते ॥३३॥ असो प्रेमप्लुता निजमनि : श्रीकृष्णातें आलिंगुनि ॥ आनंदसमुद्रिं बुडोनि : असती जाली निवांत ॥३४॥ ते आनंदार्णविं बुडाली : ऐसी तुह्मी कोणां चिन्हि लक्षिली ॥ तरि सर्वांगिं ते लियाली : स्वेदकणमाळा ॥ ३५ ॥ जेवि कृष्णध्यानतत्पर : कोण्ही येक जे योगीश्वर ॥ विसरोनि सर्व व्यापार : कृष्णनिष्ठ जे जाले ॥ ३६ ॥ ते सांडुनिया बाह्यवृत्ति : अंतरिं सुखावले राहति ॥ त्यांची जे अंतरसंपत्ति : ते सर्वांगिं प्रकटे ॥ ३७ ॥ ते पुलकांकितशरीर : तिष्ठती आनंदनिर्भर ॥ तेवि अंतरिं नंदकुमार : आळिंगुनि ते गोपी ॥ ३८ ॥ स्वेदकणिकांचिया माळा : लेउनियां ते वेल्हाळा ॥ शोभली तिया घनसावळा : साधिला कृष्ण ॥ ३९ ॥ नातरि वृत्तिद्वाराजन्य : शास्त्रीय परोक्ष ज्ञान ॥ जालें तें योगी अभ्यासुन : अपरोक्ष करिति ॥ ४० ॥ तेविचि ते व्रजसती : न्याहाळुनियां कृष्णमुर्ति ॥ साक्षात्कारें जाली मिळती : कृष्णस्वरूपिं ४१ ॥

**सर्वास्ताः केशवालोकपरमोत्सवनिर्वृताः ॥**
**जहुर्विरहजंतापं प्राज्ञं प्राप्य यथा जनाः ॥ ९ ॥**

ऐसें वेगळाले सांगो किति : सकळ ही त्या व्रजसती ॥ देखोनि ते श्रीकृष्णमुर्ति : व्यवधाने वांचुनि तेथें ॥ ४२ ॥ श्रीकृष्णावलोकनपरा : होउनि आनंदनिर्भरा ॥ न स्मरोनिया व्यवहारा : सुखार्णवीं पडलिया ॥ ४३ ॥ असो कृपाकटाक्षपातें : अवलोकुनि नंदसुतें ॥ हरुनि तयांचिं चित्तें : निजा-

नंदात्मकें केलिया ॥ ४४ ॥ नातरि तद्दर्शनपरा : विसर्जुजि अन्य व्यापारा ॥ त्या परमानंदनिर्भरा : जालिया अत्राविया गोपी ॥ ४५ ॥ कृष्णविरहज्या ( जा ) तापातें : सांडिलें तिहिं परमार्थें ॥ असो नेंद (न दे) खोनि तयांतें : आधि जो अन्तरिं होता ॥ ४६ ॥ तो कृष्णावलोकनें करुन : सांडिला तिहिं निपटुन ॥ जेवि हे साधारण जन : प्राज्ञ जे निद्राअवस्था ॥ ४७ ॥ तेथें विश्वतैजस संबंधि : ह्मणिजे जागृति स्वप्न आधि ॥ तो सांडुनि निद्रानंदिं : राहाती ते निवांत ॥ ४८ ॥ नातरि साधनसंपन्न : जे कोण्ही संत योगी जन ॥ सदा ब्रह्मानंदिं निमग्न : अविद्येतें तरती जे ॥ ४९ ॥ अविद्यात्मकें अति दुःखें : नाशोनि जाती विपाकें ॥ जें कर्मप्रभवें अनेकें : नाशती पापें निशेष ज्यांचिं ॥ ५० ॥ त्या सुखाचें उदाहरण : प्राज्ञ हें दृष्टांतें करुन ॥ रायाप्रति व्यासनन्दन : अनुवादले नावेक स्वभाविक ॥ ५१ ॥ येन्हविं त्या गोपिका सती : सदां श्रीकृष्णाचिया प्राप्ति ॥ पावलिया परम तृप्ति : अपुनरावृत्तिरूप ॥ ५२ ॥ तेथें प्राज्ञप्राप्तिदृष्टांत : दाविला उपलक्षणार्थ ॥ तें कृष्णरुपिं गोपीजात : पावले निःसंशय ॥ ५४ ॥ किंवा प्राज्ञ शब्दें करुन : ईश्वर जो सनातन ॥ त्यातें पावोनि मुमुक्षु जन : संसारदुखें तरति ॥ ५४ ॥ अथवा प्राज्ञपदें करुन : कोण्ही येक विद्वज्जन ॥ तयाचेनि संगें आधिशुन्य : मुमुक्षु जेवि होति ॥ ५५ ॥ तेवींचि त्या व्रजवनिता : पाहोनि कमळकांता ॥ असत्या जालिया समस्ता : आधिशुन्या गोपी ॥५६॥ नातरि त्या कृष्णप्राप्ता : परि असाधना अनधींता ॥ येथें दृष्टांत पाहतां : अधिकारपरत्वें जाण ॥५७॥ कां जें कृतसाधनपंथें : हे मुमुक्षु पावती जेथें ॥ त्या गोपिका सर्वा ही तेथें : पावलिया कृष्णप्रभावेंकरिं राया ॥ ५८ ॥ आतां तिहिं समस्ति सहित : शोभला नन्दसुत ॥ तें अवधारिं गा सदृष्टांत : निवेदिजेतें राया तुजला ॥ ५९ ॥

**ताभिर्विधूतशोकाभिर्भगवानच्युतो वृतः ॥**
**व्यरोचताधिकं तात पुरुषः शक्तिभिर्यथा ॥ १० ॥**

मग त्या पूर्वोक्ता गोपिका : समस्ता हि विगतशोका ॥ भेटुनि त्या यदुनायका ; परमानंदसागरमग्ना ज्या ॥ ६० ॥ तिहिं गोपिकिं समवेत ; तो

साक्षात् श्रीभगवंत ॥ जो सर्वथा विकाररहित : अच्युतानंद परमात्मा जो ॥ ६१ ॥ असो जो सदा आत्माराम : सर्वत्र अवाप्तपुर्णकाम ॥ जो परात्पर-परम : प्रेमास्पद वस्तुव्यापक ॥ ६२ ॥ तो अधिष्ठुनि विलासातें : तियां गोपिकांचि पूर्वाचितें ॥ सांडुनि गृहादि कामातें : स्वतत्पर जें होतिं ॥ ६३ ॥ तें आकर्षुनियां पुरतिं : करुनि आपणा सवतिं ॥ व्यवधानाचिया निवृत्ति : तें स्वनिष्ठें केलिं ॥ ६४ ॥ तो तिहिं सहवर्तमान : अत्यंत जाला विराजमान ॥ जे पुरुष विशेष शून्य : शक्तिंसिं सहित ॥ ६५ ॥ असो पुरुषशब्दें करुन : परमात्मा जो संगशून्य ॥ तो जेवि स्वता विराजमान : ज्ञानादि शक्तिंसि ॥ ६६ ॥ ते जे काहिं शक्त्यावृतता : घडली येथें आभासता ॥ तऱ्हीं त्याची एकरसता : भंगली नाहिं ॥ ६७ ॥ तेवि येणे प्रसंगें करुन : शोभला तिहिंसिं श्रीकृष्ण ॥ असो त्यांतें शोभउन : दाविला विलासु ॥ ६८ ॥ नातरि सर्वाही सत्ववृत्ति : त्या मिळोनियां एकांतिं ॥ सेविल्या जाल्या निजपति : व्यवधानराहित्यें ॥ ६९ ॥ नाना तो कूटस्थानंदघन : हे शोभा तारि साधारण ॥ तथापि शस्त्रादिकिं करुन : शोभेतें प्रकटी ॥ ७० ॥ तैसा त्यां गोपिंसमवेत : अधिक शोभला श्रीकांत ॥ जो अच्युत भगवंत : षट्गुणऐश्वर्यसंपन्न ॥ ७१ ॥ पुरुष दृष्टांतें करुन : त्यां गोपिं सहवर्त्तमान ॥ रमतां हिं अच्युत कृष्ण : निर्विकार वर्णिला ॥ ७२ ॥ त्यांसिं अनुसरला श्रीकृष्ण : हें तियांसिचि जालें भान ॥ अचिंत्यशक्तिकरुन : दाविला विलासु ॥ ७३ ॥ ऐसे प्रसंगें रायाते : जाणविलें मुनिनाथें ॥ आतां कृष्णें काये जालें कारिजेतें : तें निवेदिजेल ॥ ७४ ॥

**ताः समादाय कालिंद्या निर्विश्य पुलिनं विभुः ॥**
**विकसत्कुन्दमन्दारसुरभ्यनिलषट्पदम् ॥ ११ ॥**
**शरच्चद्रांशुसन्दोहध्वस्तदोषातमः शिवम् ॥**
**कृष्णाया हस्ततरलाचितकोमलवालुकम् ॥ १२ ॥**

तो गोपिकीं परिवारित : शोभला बहु नंदसुत ॥ तेणें सर्वही गोपीजात : घेउनि समागमें श्रीकृष्णें ॥ ७५ ॥ तें जें कालिंदीचें पुलिन : तेथें सर्वही

गोपीगण ॥ मिळोनियां गुणगायन : करित होतसाता कृष्णाचें ॥ ७६ ॥ तया यमुनापुलिनातें : गोपीं समवेत गोपीकांतें ॥ तेणें श्रीकृष्णे नंदसुतें : प्रवेशोनि स्वछंदें ॥ ७७ ॥ विशेषें शोभिजेतें जालें : हें पुर्वान्वयेंचि योजलें ॥ जें पूर्वश्लोकें बोलिलें : तुजप्रति म्यां राया ॥ ७८ ॥ तोंचि येथें पावलें संबंध : जें घेउनि सर्व स्त्रीवृंद ॥ तो नंदानंदन मुकुंद : प्रवेशोनि पुलिनातें ॥ ७९ ॥ विशेषें जाला शोभता : तो गोपिकांतें उत्सवदाता ॥ नाना शोभविल्या त्या कांता : निजशोभेकरिं ॥ ८० ॥ येन्हविं नित्यानंदाचा ठाईं : न्युनाधिक्य कैंचें काइ ॥ परि हे शोभा जे काहिं : तो तयां गोपिचा प्रेमा ८१ ॥ ह्मणोनि विभु शब्देंकरुन : जाणविलि येथें खुण ॥ असाधारणशोभासंपन्न : विशेषाचा नियंता जो ॥ ८२ ॥ असो आनंद स्वतःसिद्ध : तो गोपींसि आनंदास्पद ॥ अधिष्ठुनि गोपिकावृंद : अधिक शोभता जाला तो ॥ ८३ ॥ जेविं मुमुक्षुचिया मनिं : सद्गुरुचे कृपेकरुनि ॥ शास्त्रादिकेहिं आलोचुनि : उपजला जो काहिं बोधु ॥८४॥ तो तयाचा चित्ताचा ठाइं : विशेषें विराजला पाहिं ॥ वास्तवें विचारितां काइ : नवा बोध जाला तेथें ॥ ८५ ॥ तेवि गोपिकांचिया प्रीति : विशेषें विराजली ते मूर्त्ति ॥ तें वर्णावें आतां किति : उपमा नसे जयातें ॥ ८६ ॥ किंवा गोपिंचें शुद्ध मन : तेंचि कालिंदीचें पुलिन ॥ तेथें गोपीसहवर्त्तमान : शोभला तो विभु ॥ ८७ ॥ त्यांचिं जन्में सार्थकें जालिं : बहुं पुण्यें फळासि आलिं ॥ हे रमणमूर्ति ठसावलि : अन्तर्बाह्य त्यांतें ॥ ८८ ॥ आतां हें यमुनापुलिन : ह्मणसी तें किंविशेषण ॥ तरि तेथें विद्यमान : विकसितें कुमुदें असति ॥ ८९ ॥ तयां कमळाचिया पंक्ति : ज्या विकासिता विराजति ॥ आणि मन्दारहि असति : विकासले अत्यन्त ॥ ९० ॥ जेथें त्या सौगन्ध्यें स्पर्शित : सुगन्ध शीत मन्द वात ॥ तेणे आले बहु नादित : भ्रमरांचे समुदाये ॥ ९१ ॥ एवं ते यमुनापुलिन : उत्तमगुणि बहुं सम्पन्न ॥ जेवि शोभे विशेषें मन : श्रीकृष्णभक्तांचें ॥ ९२ ॥ आणिक पुलिनाचा ठाइं : उत्तम गुण ह्मणसी काई ॥ तरि शरत्काळिं चन्द्रहि : ज्योत्स्नावन्त ॥ ९३ ॥ त्या शरच्चन्द्राचे शुद्ध कर : जे रात्रीचा ठाइं तमो-

हर ॥ असो रात्रिगत तिमिर : तें चन्द्रप्रभेकरिं निरस्त ॥ ९४ ॥ असो शरत्कालरजनि : ते चन्द्रप्रकाशें करुनि ॥ तिये यमुनेचे पुलिनि : उपतिष्ठली विशेषें ॥ ९५ ॥ एवं त्या यमुनापुलिनिं : श्रीकृष्ण प्रभावें करुनि ॥ सर्व कल्याणाची खाणी : उघडली ते राया ॥ ९६ ॥ ह्मणसी उपचारें करुन : प्रकटले तेथें हे गुण ॥ परि जातीचें तें पुलिन : कठिण-स्वभाव सर्वदा ॥ ९७ ॥ तें स्वता निजगुणेंकरिं : पाहावें तव क्षोभकारि ॥ क्षुद्र पाषाणाचिया हरि : पायांतें पीडाकारक किं ॥ ९८ ॥ ऐसी काहिं करिसी चिंता : तरि ते कृष्णा कृष्णसरिता ॥ कृष्ण येईल येथें आतां : हें जाणवलें तियेतें ॥ ९९ ॥ मग तरंग जे बहुत : तेचि तियेचे अनेक हस्त ॥ त्या स्वहस्तिकरिं प्रशस्त : कोमल जे काहिं वाळु ॥ २०० ॥ तिये वाळुवेतें रचुन : मृदु केलें निज पुलिन ॥ कां जे श्रीप्रभुचे चरण : विचरोतु येथें यथेष्ट ॥ १ ॥ एवं ते कृष्णा यमुना सती : अतिशयेसिं भाग्यवती ॥ श्रीप्रभु आपुले चारितिं : संतोषावा मजवरि ॥ २ ॥ ऐसें तिया मनि धरुन : कोमळे वाळुवेतें रचुन ॥ मृदु केलें निजपुलिन : कृष्णविहारा लागी ॥ ३ ॥ एवं त्या यमुनापुलिनिं : तियां वनितांतें घेउनि ॥ श्रीकृष्ण सुरासुरमणि : तो शोभता जाला बहुं ॥ ४ ॥ नाना त्या कामिनीचा मनिं : उत्तमा गुणाची श्रेणि ॥ ते अवघे गुण त्या पुलिनिं : उपतिष्ठले राया ॥ ५ ॥ त्या मृदुवाळुका पुलिनातें : प्रवेशोनि रमानाथें ॥ घेउनि सर्वे त्या गोपीतें : विराजितें जालें ॥ ६ ॥ असो त्या यमुनापुलिनिं : पूर्वीचि त्या व्रजवासिनी ॥ कृष्णागमनातें इच्छुनि : गुण गाति होत्या ॥ ७ ॥ मग अधिष्ठुनि त्या प्रीतीतें : सांडुनि तिरोधानातें ॥ कृपाळुवें कमळाकांतें : प्रकटिजेतें जालें ॥ ८ ॥ तेथें गोपिकाप्रेमप्लुत : विशेषें तिहिंसिं रमानाथ ॥ शोभला ह्मणोनि येथें : पुनः प्रवेश बोलिला ॥ ९ ॥ नाना कृष्णिं जें व्यवधान : तेंचि योजलें तिरोधान ॥ आणि कृष्णिं जें समाधान : तेचि प्रकटता येथें ॥ १० ॥ मग त्याचि प्रेमळा मनिं : ते मुर्ति मनोहारिणी ॥ विंबली तोचि त्या पुलिनिं : दाविला प्रवेशु काहिं ॥ ११ ॥ आतां कृष्ण-

गवेषणचित्ता : पूर्वी होत्या गोपकांता ॥ तेव्हां नभिं चन्द्र होता : तवरि भ्रमलिया वनीं ॥ १२ ॥ मग तो सरश्मि उडुपति : जात असतां अस्ताप्रति ॥ तें गोपीप्रत्यगावृत्ति : मागुत्या पुलिनि आल्या ॥ १३ ॥ त्या यमुनातीरिं बैसोन : केलें कृष्णगुणगायन ॥ त्या गुणकथेतें आइकोन : प्रकटला कृष्ण तेथें ॥ १४ ॥ ऐसी कथा वर्णिली पाहिं : या पुर्वप्रसंगाचा ठाइं ॥ पूर्वापर हे विचारितां काहिं : येथें सुचला विरोधु ॥ ॥ १५ ॥ जें कारितां तीराचें वर्णन : चन्द्र बोलिला सज्योत्स्न ॥ तें शोभतें जालें पुलिन : चन्द्रकिरणिं सप्रकाश ॥ १६ ॥ असो ते शरचन्द्रकर : तिहिं स्पर्शितां ध्वस्तांधकार ॥ होउनि तें शोभलें तीर : चन्द्रप्रभा प्रकाशित ॥ १७ ॥ तरि तेचि असोनि निशि : चन्द्र गेला जो अस्तासि ॥ मागुता तो चन्द्र आकाशी : उदैला हा कैंचा ॥ १८ ॥ ऐसा विरोध हा जो काहिं : तो श्रीकृष्णिं सर्वथा नाहिं ॥ ज्याचेनि ठेविले ठाईं : वर्ततसे हें जग ॥ १९ ॥ आणि तो असंगोदासीन : हेंहिं असे येथें प्रमाण ॥ ज्याचे आज्ञेतें पाळुन : विचारतो हा चन्द्र ॥ २० ॥ कां जें पुर्वी हा चन्द्र जाण : अकाळें उदैला सम्पुर्ण ॥ तैशाचि आतां अप्रमाण : कृष्णसत्तेनें आला ॥ २१ ॥ एवं न क्रमतां ते निशि : अस्तातें पावला तेजोराशी ॥ तो कृष्णप्रभावें स्वज्योत्स्नेसि : उदैला मागुता ॥ २२ ॥ तेणें धवळलें पुलिन : तेथें गोपीसहवर्तमान ॥ तो यशोदानन्दानन्दन : विशेषें शोभता जाहला ॥ २३ ॥

**तद्दर्शनाल्हादविधूतहृद्रुजो**
**मनोरथांतं श्रुतयो यथा ययुः ॥**
**स्वैरुत्तरीयैः कुचकुंकुमांकितै-**
**रचीक्लृपन्नासनमात्मबन्धवे ॥ १३ ॥**

मग तेथें त्या गोपकांता : कृष्णदर्शनाल्हादयुक्ता ॥ त्यांचे मनिं हृद्रोग होता : कृष्णविरहात्मक जो ॥ २४ ॥ नाना जाला जो अभिमान : तेणें अंतरला श्रीकृष्ण ॥ मग तो वाढला दारुण : हृद्रोग त्यांतें ॥ २५ ॥ नातरि गर्वव्यालें चित्तें : तरिहि न विसरोनि कृष्णातें ॥ कृष्णानंदेविण गोपीतें : न

क्रमला काळु ॥ २६ ॥ येणेंचि कारणें करुन : हृद्रोग जाला वर्धमान ॥ तो आतां पावला अस्तमान : तद्दर्शनानंदें ॥ २७ ॥ जेवि पात्रतां स्वरुपता : मुमुक्षुची निवारे व्यथा ॥ तेवि त्या गोपकांता : विधूतहृद्रुज्या जाल्या ॥२८॥ असो देखोनि कृष्णजीतें : निर्धूतपापें जालिं चित्तें ॥ कृष्णप्राप्ति प्रतिबंधातें : निस्तरलिया गोपी ॥ २९ ॥ तिये कृष्णप्राप्ती लागुनी : अनेका क्लेशातें सोसुनि ॥ मनोरथाचिया श्रेणी : विचारिल्या होत्या ॥ ३० ॥ त्या मनोरथ प्रांतातें : पावलिं तें गोपीतें ॥ असो देखोनि कृष्णजीतें : पुर्णमनोरथा जाल्या ॥३१॥ सांडुनि गृहादि आशेतें : कृष्णपरेंचि होतिं चित्तें ॥ तें पावोनि कृष्णजीतें : अति शांतें जालिं ॥ ३२ ॥ या व्यवधानाचे निमित्तें : विरहव्यग्रें होतिं चित्तें ॥ यालागि कृष्णि पुरता त्यातें : अवसर नव्हता ॥ ३३ ॥ जेवि सांडुनि गृहादिकातें : अवलंबुनि मोक्षेच्छेतें ॥ सदां मुमुक्षुचि चित्तें : स्वरुपचिंतनिं असति ॥ ३४ ॥ मग पावोनि साक्षात्कारातें : निस्तरति मनोरथातें ॥ तैसेंचि आतां गोपिकातें : घडलें राया ॥ ३५ ॥ नातरि कृष्णप्राप्ति लागुन : असावें मनोरथशुन्य ॥ कांजें चिंतेचें अधिकरण : कृष्णमय जालें ॥ ३६ ॥ कृष्णाचिया सुखप्राप्ति : मनोरथाची समाप्ति ॥ पावलिया त्या गोपिकासती : भाग्यवंता रामा ॥ ३७ ॥ जेवि अधिकारातें लक्षुन : ईश्वरातें श्रुतिगण ॥ व्यवधान अंगीकारुन : भेदप्रतिपादक जाला ॥ ३८ ॥ तेव्हां त्या ईश्वरपरा श्रुति : अपुर्णकामा ऐशा भासती ॥ आणि जेव्हां जे कोण्ही पावती : मोक्षाधिकारातें ॥ ३९ ॥ तेव्हां मोक्षसंपादका श्रुति : कर्मप्रवृत्तीतें निस्तरति ॥ प्रवृत्तित्यागें समाप्ति : पावती ईश्वरिं ॥ ४० ॥ त्यांसि बोलावयासि कांहिं : विषयोंचि उरला नाहिं ॥ निरंतर आनंदडोहिं : पावलिया समाप्ति ॥ ४१ ॥ तेवि पाहोनि कृष्णवदन : गोपी असोनि मनोरथशून्य ॥ सकळकामसंपुर्ण : असत्या जालिया ॥ ४२ ॥ आतां जेवि कोण्हीं योगीजन : जऱ्हीं पावले समाधान ॥ तऱ्हि जंवरि आभासमान उपाधिलेश असे ॥ ४३ ॥ तंवरि प्रेमळेनि चित्तें : न संडिति हरिभक्तीतें ॥ परमप्रेमामृतसंप्लुते : भगवंतिं चि वर्तती ॥ ४४ ॥ भगवंताचि गुणकथा :

विशद तत्क्रमसद्वार्ता ॥ येणें करुनि उपाधिप्रांता : पावती योगी ॥ ४५ ॥ तेवि त्या गोपवनिता : जन्हि जाल्या प्राप्तमनोरथा ॥ तन्हि कृष्णेंसि तद्वार्ता : बोलाविया कांहिं ॥ ४६ ॥ ऐसें विचारुनियां मनिं : त्या प्रेमळा व्रजभामिनी ॥ उत्तरीयां वस्त्रिं करुनि : श्रीकृष्णजी लागि ॥ ४७ ॥ तिया प्रेमळा गोपांगना : रचित्या जालिया आसना ॥ उत्तरीया त्या किंविशेषणा : तरि कुचकुंकुमयुक्ता ॥ ४८ ॥ विचारुनि कृष्णभोगातें : स्वकुचहृदयें प्रशस्तें ॥ तेथें कुंकुमें कोलिं लिप्तें : कृष्णक्रीडायोग्यें ॥ ४९ ॥ त्या कुंकुमरांजितें वसनें : तेंचि कल्पिलिं आसनें ॥ नातरि तिहिं प्रेमळें मनें : आंथुरिलिं प्रियप्रीत्यर्थ ॥ ५० ॥

**तत्रोपविष्टो भगवान्स ईश्वरो**
**योगेश्वरांतर्हृदि कल्पितासनः ॥**
**चकास गोपीपरिषद्गतोर्चित-**
**त्रैलोक्यलक्ष्म्येकपदं वपुर्दधत् ॥ १४ ॥**

ते जें आसनें प्रशस्ते : जें कृष्णानुरागरंजितें ॥ तो नंदानंदन कृष्ण तेथें : बैसता जाला ॥५१॥ तो कृष्ण किंविशेषण : तरि जो जगाचें अधिष्ठान ॥ हें विश्व जेनें (णें) भासमान : सर्वांचा ईश्वर ॥ ५२ ॥ ह्मणसि कृष्ण सर्वाधिष्ठान : जरि सर्वत्र विद्यमान ॥ तरि व्यर्थ कां हे जन : संसारिं सिनति ( शिणति ) ॥ ५३ ॥ ऐसें ह्मणसि येथें : तरि भगवान् या निमित्तें ॥ षड्गुण ऐश्वर्य जयातें : अनुसरोनियां असे ॥ ५४ ॥ ह्मणोनि हा भगवान् स्वता : सर्वाधिष्ठाननियंता ॥ ईश्वरत्वें हाचि रक्षिता : अनादि अनंत कृष्ण ॥ ५५ ॥ तथापि सांडुनि सर्व रति : या कृष्णातेंचि भजति ॥ त्या योगेश्वरांतर्हृदयवर्ति : राहाणें तयासि ॥ ५६ ॥ त्यांचे अंतरिं आसन : करुनि तेथें तिष्ठमान ॥ एवं तो सर्वत्र विद्यमान : तन्हि भक्तांसिचि प्राप्त ॥ ५७ ॥ कोण्ही इतर जे प्राणी : त्याचेचि सत्ते करुनि ॥ वर्तती तन्हि तो त्यां पासुनि : अतिशयें दुरि असे ॥ ५८ ॥ यास्तव योगिहृद्भुवन : तेंचि करुनि आसन ॥ राहाता तेंचि आतां कृष्ण : गोपीउपवस्त्रासनिं

॥ ५९ ॥ बैसोनि जाला शोभता : पाहा त्या केशा भाग्यवन्ता ॥ आणि योगीसाधनपंथा : अनुसरोनियां ॥ ६० ॥ तिहिं बहु क्लेशीकरिं : सेविजेतो हृद्दीवरिं ॥ तया कृष्णातें त्या सुन्दरी : भोगित्या जालिया प्रत्यक्ष किं ॥६१॥ तत्कृत आसनिं स्वस्थ : बैसोनि तत्सभांतर्गत ॥ असो तिहिसि आवृत : तो पुजिला होंत्साता ॥ ६२ ॥ अतिशयें जाला शोभता : तें वर्णावें किती आतां ॥ नन्दानन्दन लोकभर्ता : रमारमण श्रीकृष्णाजि ॥ ६३ ॥ नाना कृष्णे तेणें काळें : बहुं शोभिजेतें जालें ॥ अत्यंत सौंदर्य दाविलें : जें त्रैलोक्य दर्शनास्पद किं ॥ ६४ ॥ ऐसि त्रैलोक्यामाझारि : दर्शनीय वस्तु नसे दुसरि ॥ हा सुखाभास जेणेकरि : लक्षनि (णि ) ज्या कृष्णातें ॥६५॥ तो स्वता सुखैकमुर्त्ति : अधिष्ठुनि गोपिकापंक्ति ॥ योगीजन मानसवर्त्ति : अतिशयें शोभला तेथें ॥ ६६ ॥ नाना वनभ्रमणमिषें : तिहिं शोषिलि स्वमानसें ॥ तेणें सन्तोशोनि रमाधीशें : शोभिजेतें जालें ॥ ६७ ॥ किंवां तेंचि ध्यान फळलें : अपरोक्ष सुख जोडलें ॥ शामसुन्दर रुप देखिलें : प्रत्यक्ष ब्रह्म कृष्णाख्य ॥ ६८ ॥

**सभाजयित्वा तमनंगदीपनं**
**सहासलीलेक्षणविभ्रमभ्रुवा ॥**
**संस्पर्शनेनांककृतांघ्रिहस्तयो :**
**संस्तुत्य ईषत्कुपिता बभाषिरे ॥ १९ ॥**

मग तया आसनस्थातें : सन्मानुनि स्तोत्रें प्रशस्तें ॥ स्तवुनि तें गोपीकाहातें : बोलति जालि ॥ ६९ ॥ तो कृष्ण किंविशेषण : तरी अनंगाचा उद्दीपन ॥ अनंगसंकेतें करुन : काम जो कंदर्प ॥ ७० ॥ होउनि कंदर्पोद्दीपन : जयाच्या ठाइं हें मन ॥ निजस्वभावातें सांडुन : विशेषें आसक्त होये ॥ ७१ ॥ किंवा हें पाहतां वदन : विषयकामातें विसरोन ॥ विशेषें थेरावे मदन : संभोगावया कृष्णातें ॥ ७२ ॥ असो देखतां रमणरुप : नाशोनि प्राकृत कंदर्प ॥ प्रेमा उथळला अमुप : कृष्णविषइं तत्काळ ॥ ७३ ॥ ह्मणोनि तेंचि कामोद्दीपन : जेणें साविजे श्रीकृष्ण ॥ आणि प्रपंचासक्त मन :

तो क्षुद्र काम बोलिजे ॥ ७४ ॥ एवं देखोनि कृष्णवदन : विशेषें जे कामवर्धन ॥ तेंचि कृष्णप्राप्तिचें साधन : साधकांलागी ॥ ७५ ॥ त्या कामदीपना कृष्णातें : सन्मानुनि तें गोपिशतें ॥ स्तोत्रें समर्पुनि बहुतें : आदरिलें बोलों ॥ ७६ ॥ तें कोणे लक्षणें करुन : तरि वस्त्रासनि असोन ॥ त्या श्रीकृष्णाचे चरण : मांडियावरि ठेविले ॥ ७७ ॥ त्या चरणाचें संवाहन : केलें स्वहस्तें कवळुन ॥ आणि तत्करांतें धरुन : ठेउनि अंकावरि ॥ ७८ ॥ त्या करांचें हि संमर्दन : करित होत्साता गोपीजन ॥ करिता जाला संभाषण : श्रीकृष्णजिसिं ॥ ७९ ॥ नाना त्या करांघ्रिस्पर्शें : शोधुनियां निजमानसें ॥ तत्प्राप्ति अनुवादमिषें : आरंभिलें बोलों ॥ ८० ॥ तया भाषणाचि पद्धति : जन्हि अंतरिं प्रीति होति ॥ तथापि कोपाचि रीति : दाविली नावेक तिहिं ॥ ८१ ॥ आतां कोपयुक्ता भामिनी : त्या कोणे लक्षणें करुनि ॥ ऐशी जरि तुमचा मनि : होइल आशंका ॥ ८२ ॥ तरि पाहोनि कृष्णवदना : हास्यमुखा होत्या अंगना ॥ आणि हांसत अवलोकणा ( ना ) : करित होत्सात्या ॥ ८३ ॥ निज भृकुटीचा ठाई : वक्रता दाविलि जे कांहिं ॥ त्या भृकुटीभंगें सर्वाहि : किंचित् कोपयुक्ता ॥ ८४ ॥ नाना अल्पसा हास्यलेश : तद्युक्त भृकुटीविलास ॥ त्या भृकुटिभंगें रमेश : अवलोकिला तिहिं ॥ ८५ ॥ ह्मणोनि त्या गोपकांता : लक्षिलिया कोपयुक्ता ॥ नाना याचि विलासें स्वभर्त्ता : पूजिला तिहिं ॥ ८६ ॥ नातरि येणें नंदसुतें : निजविरहाचे निमित्ये ॥ शीणविलें तें तियांतें : हर्षामाजि स्मरलें ॥ ८७ ॥ तो विरहकोप जो काहिं : उमटला भृकुटीचा ठाई ॥ तो तद्वारेंचि कृष्ण पाईं : समर्पिला अवघा ॥ ८८ ॥ किंवा विरहलेश होता : तो आणिला भृकुटिपंथा ॥ तेणें निजविरहवेथा : सुचिली नावेक ॥ ८९ ॥ नातरि तया एकांतिं : विसर्जिलि विरहवृत्ति ॥ जेवि आत्मसाक्षात्कारिं संति : विद्यावृत्तितें सांडिजे ॥ ९० ॥ अथवा तिया कामिनी : कृष्णातें स्वमानसासनिं ॥ बैसउनि केली कडसणी : निजानिष्ठेचि ॥ ९१ ॥ असो त्या उपवस्त्राचे व्यक्ति : एकवाटुनि सर्वावृत्ति ॥ संपादिली पूजासंपत्ति : आसनरूपा ॥९२॥

तया आसनस्था कृष्णातें : पूजोनि निजप्रेमपंथें ॥ तत्प्राप्तीचे वीवरणातें : पुसत्या जाल्या ॥ ९३ ॥

गोप्य ऊचुः

**भजतोनुभजंत्येक एक एतद्विपर्ययम् ॥**
**नोभयांश्च भजंत्येक एतन्नो ब्रूहि साधु भोः ॥ १६ ॥**

कृष्णा या लोकाचा ठाइं : भजनमार्ग ऐसा काहिं ॥ देखत असों त्यामाजि पाहिं : प्रकार ऐसे ॥ ९४ ॥ कोण्ही कोणातें भजतां : तेहि त्यातें भजे माघौता ॥ एवं हा परस्परता : भजनप्रकार ॥ ९५ ॥ असो कितिएक जन : कारिती परस्परें भजन ॥ आपणातें भजे त्यावीण : इतरातें न भजति ॥ ९६ ॥ आणि कितियेकाची स्थिति : न भजत्यातेंहि भजाति ॥ न भजतांहिं तत्प्रीति : अंतरिं वाहाति ॥ ९७ ॥ असो नापेक्षुनि अन्योपकार : आपण भजती साचार ॥ ऐसा हा दुसरा प्रकार : भजनप्रवृत्तीचा ॥ ९८ ॥ आणीक कितियेक जन : उभयताही उदासीन ॥ कोण्हातोंहिं ते आपण : कदापि न भजति ॥ ९९ ॥ सुखे कोण्ही आपणातें : भजो किंवा सांडु परतें ॥ परि सर्वथा ते कोण्हातें : न भजती आपण ॥ २०० ॥ असो भजत्या न भजत्यातें : असोनि समानचित्तें ॥ कोण्हातेंचि न भजति ते : कोणेहिं समइं ॥ १ ॥ एवं पक्षत्रया माझारि : निकें काये असे मुरारी ॥ तें सांगे गा तव कींकरी : आह्मी आइकों इच्छीतों ॥ २ ॥ ऐसें त्या कामिनी सती : कृष्ण वश व्हावा हें चित्तिं ॥ विचारुनि श्रीकृष्णाप्रति : बोलत्या जाल्या ॥३॥ नाना त्यजुनि विधिक्रमातें : त्या पावल्या श्रीकृष्णातें ॥ आतां तत्प्राप्ति प्रत्ययातें : शोधुनि पाहावें ॥ ४ ॥ ऐसें विचारुनि चित्तें : त्या पुसत्या जाल्या कृष्णाप्रति ॥ तत्प्रश्नानुसार श्रीपति : बोलताति तिहिंसि ॥ ५ ॥

श्रीभगवानुवाच.

**मिथो भजंति ये सख्यः स्वार्थैकांतोद्यमाहि ते ।**
**न तत्र सौहृदं धर्मः स्वार्थार्थं तद्धि नान्यथा ॥ १७ ॥**

आइका सखिया हो य जानिं : परस्परें भजति जे कोण्ही ॥ ते आपणा वांचुनि : न भजती कोण्हातें ॥ ६ ॥ असो विचारुनि स्वार्थातें : भजती ते भजत्यातें ॥ आणि ते भजतेही त्यांतें : स्वार्थेंचि भजति ॥ ७ ॥ ऐसें परस्परें भजते : ते कोण्हि न भजती कोण्हातें ॥ लक्षुनि देहस्वार्थातें : एक-एकातें भजति ॥ ८ ॥ असो बाह्याकारें करुन : भासलें परस्परें भजन ॥ परिस्वार्थोद्यम दोवेजन(ण) : येथें अन्यथा नाहिं ॥९॥ यालागि त्या भजन-विषइं : सौजन्य सर्वथा नाहिं ॥ सौह्रदेंवीण काहिं : सुखहि नुपजे परस्परें ॥ १९ ॥ आणि स्वार्थाचेनि प्रभावें : तेथें धर्महि न सम्भवे ॥ परोपकारही स्वभावें : न घडे अणुमात्र ॥ ११ ॥ जेवि गोमहिष्यादिकांतें : जन सेविती निजस्वार्थें ॥ तेवि ते विषयसुखातें : इच्छुनि भजति ॥ १२ ॥ एवं परस्परें जे भजति : ते सदां जाणावे स्वार्थार्थी ॥ ये विषयिं संशय चित्तिं : झणिं असो तुमतें ॥ १३ ॥ असो येणें श्लोकें करुन : इतुकी दाविली खुण ॥ जें परस्परें हे भजन : तें सुखसाधक नव्हे ॥ १४ ॥ कोण्ही परमार्थ सुखातें : न पावती वो येणे पथें ॥ या सुखासि प्रस्तुत येथें : देहाचि अवसान ॥१५॥ परोपकारधर्में करुन : घडावें आत्मसाधन ॥ तें चुकोनि हें जें भजन : देहादिकिंच घडलें ॥ १६ ॥ एवं परस्परें भजन : तें परोपकारिं नसोन ॥ वृथा स्वार्थभ्रमें हे जन : आत्महितासि सदां वंचति ॥ १७ ॥ येणें लक्षणें करुन : बोलिले हें रमारमण ॥ आतां धर्मांतरातें वदोन : पुरुषार्थद्वय सूचिति ॥ १८ ॥

**भजंत्यभजतो ये वै करुणा : पितरो यथा ॥**
**धर्मो निरपवादोत्र सौहृदं च सुमध्यमा : ॥ १८ ॥**

अत्रो ये सुमध्यमा : सुंदर मध्यप्रदेशा रामा ॥ आइका भजनांतरमहिमा : पुशिला जो तुह्मी ॥ १९ ॥ न भजे जो आपणा प्रति : तयातें हिं जे भजति ॥ तयाहि भजनाची रीति : प्रकारद्वयें जाणावि ॥ २० ॥ त्यामाजि जे कृपाळुजन : सदां परार्थपरायण ॥ प्रत्युपकरातें नापेक्षुन : न भजत्यातें भजति ॥ २१ ॥ आणि स्नेहाकळितचित्तें : निजप्रजातें पाळितें ॥



ते जे त्यां प्रजांचे पिते : तयां प्रजां पासुनि ॥ २२ ॥ उपकारातें नापेक्षिति : अत्यादरें त्यांतें भजति ॥ अत्यंत स्नेहें पाळिति : स्वप्रजातें सर्व प्रकारें ॥२३॥ एवं परार्थ नापेक्षुन : द्विविधा दाविलें भजने ॥ आतां या पासुनि उत्पन्न : दोनि प्रकार होति ॥ २४ ॥ जे कोण्हीं कृपाळु होंत्साते : निःकाम भजति परातें ॥ त्या भजना पासुनि त्यातें : परम धर्म प्राप्त होये ॥ २५ ॥ पर-हित धर्माचा ठाइं : देहादि लोभ जाला नाही ॥ या लागीच तेथुनि पाहिं : अविनाशी निफजे धर्म ॥ २६ ॥ असो मोक्षार्थाचें साधन : ऐसा धर्म होये निष्पन्न ॥ तेणें ते कृपाळु जन : तत्काळ मुक्तता पावति ॥ २७ ॥ आणि जे प्रजावत्सळ : सदां प्रजापाळनशीळ ॥ प्रजांचिया हितीं चंचळ : चित्त जयांचें सर्वदा ॥ २८ ॥ तयांचाचि ठाइं निसीम : संपादतुसे सुहृद्धर्म ॥ आपुले प्रजांचे सर्व काम : सर्व प्रकारें पुरविति ॥ २९ ॥ असो तें सौहृद्य सम्पादलें : तेंचि त्यांसि बन्धन जालें ॥ जन्ममरणाचें घडलें : मागुतें साधन ॥ ३० ॥ एवं प्रकारद्वयें पाहिं : नापेक्षुन हिं भजती जें काहिं ॥ परि बुद्धिभेदें दोघे हि : विषम फळातें ।चि पावति ॥ ३१ ॥ ह्मणोनि त्यक्त विषयपंथ : अपेक्षुनि ते परमार्थ ॥ अहंममतादिर-हित : परम पुरुषार्थातें वरिति ॥ ३२ ॥ भूतदयादि कर्में करुनि : तया कर्म-फळा पासुनि ॥ ते सुटोनिया इये जनि : आत्मसाक्षात्कारातें पावति ॥ ३३ ॥ आणि जे स्वकुटुंबभक्त : असोनि देहाभिमायुक्त ॥ केवळ दिसाति सुप्रवृत्त : विरक्ता सारिखे ते ॥ ३४ ॥ निजपत्नि आणि सुतादिक : बंधु आदि देहसं-बंधी लोक ॥ त्यातें भजती ते नावेक : सांडुनि स्वार्थ ॥ ३५ ॥ परि हेंजें याचें भजन : तें देहातराचे चि साधन ॥ जर्न्हि प्रस्तुत ते उदासीन : आपुले देहिं दिसति ॥ ३६ ॥ त्या पुत्रादि द्वारें करुन : स्वदेहि च घडलें भजन ॥ तेथें तो ममताभिमान : ते देहाभिन्नुचि अर्थता ॥ ३७ ॥ अवो या प्रवृत्तिमार्गें प्रांतिं : नव्हे देहाभिमाननिवृति ॥ त्या देहाभिमानें पुढति : देहधारणा चि पडेल ॥ ३८ ॥ एवं यणेलक्षणें करुन : तियां गोपिकांसि श्रीकृष्ण ॥ बोलो-नि सुचिली ऐसी खुण : देहाभिमानाचि ॥ ३९ ॥ जें सांडुनि गृहादि प्रवृत्ति

तुह्मी आळियाति मजप्रति ॥ परि स्वदेहिं सूक्ष्मवृत्ति : जरि आसक्ति असेल ॥४०॥ तरि सर्व प्रकारें करुन : न घडे मजासिं सन्निधान ॥ ऐसें जाणउनि सावधान : गोपिकातें केलें नावेक ॥ ४१ ॥ एवं श्लोकद्वयें चि करुन : प्रश्नद्वयातें परिहरुन ॥ विरक्त आणि विषयी जन : दोवेहि दाविले ऐसे ॥ ४२ ॥ आतां जे कोण्ही आत्माराम : सर्वथा निःसंग त्यक्तकाम ॥ पावले जे परम धाम : साक्षात् आत्मस्वरुप ॥४३॥ आणि या लोकिं कितियेक जन : विषयासक्तांहुनि हीन ॥ जे अत्यन्त दुष्टमन : आणि गुरुद्रोही जे कोण्ही ॥ ४४ ॥ एवं पुरुषत्रयाचें लक्षण : तृतीयें प्रश्नोत्तरें करुन ॥ तियां गोपिकांप्रति श्रीकृष्ण : बोलताति ऐसें ॥ ४५ ॥

**भजतोपि न वै केचिद्भजन्त्यभजतः कुतः ॥**
**आत्मारामा ह्याप्तकामा अकृतज्ञा गुरुद्रुहः ॥ १९ ॥**

अवो प्रस्तुत इये जनि : ऐसेही वर्तती जन कोण्ही ॥ जें सर्वस्वेंसिहिं देउनि : आपणयातें भजते ॥ ४६ ॥ ते तयांचया उपकारातें : स्मरतीच ना सर्वथा चित्तें ॥ करिती ना स्वता त्यांतें : प्रत्युपकार काहिं ॥ ४७ ॥ मां न भजते आपणा प्रति : तयांतें काये ते भजति ॥ ऐसेही कितियेक वो सति : वर्तती य लोकिं ॥ ४८ ॥ ते जे दोवातेंहिं न भजते : त्यांत येक मोक्षसुखभोक्ते ॥ आणि दुःखातें पावते : येर दोवे ॥ ४९ ॥ ते मोक्षसुखभोक्ते कवण : तरि जे आत्मबोधसंपन्न ॥ असो जे असंगोदासीन : आत्माराम ॥ ५० ॥ करुनि अविद्येची निवृत्ति : सांडुनि विषयप्रवृत्ति ॥ आत्मस्वरुपिंच रमति : अवाप्तकाम जे ॥ ५१ ॥ तयां स्वरुपरमणां प्रति : उरली नाहिं त्रिजगती ॥ कर्तव्यार्थ काहिंच चित्तिं : राहिला नाहिं ज्यांचे ॥ ५२ ॥ ह्मणोनि ते कर्तव्यशून्य : सर्वत्र असंगोदासीन ॥ देहाभिनिवेशविहीन : कोणातेंहिं न भजति ॥ ५३ ॥ किंवा आत्मारामलक्षण ॥ जे कोण्ही समाधिसंपन्न ॥ त्यांसि भजता नसे मान्य : मां इतरते किती येथें ॥ ५४ ॥ आणिक कोण्ही येक ज्ञानि : ते तारतम्यें वर्तती जानें ॥ ताऱ्हिं पुर्णकाम असोनि : उदासीन सर्वत्र ॥ ५५ ॥ तेही भजत्यांतें न भजति : मां न भजते कैचे

स्मरति ॥ एवं दोघेंही वर्तती : एके प्रकारें इये जानिं ॥ ५६ ॥ आणि कोण्ही येक मुढमति : विषयोन्माद चढोनि चित्तिं ॥ परोपकारातें विसरति : अकृतज्ञ जे ॥ ५७ ॥ ते कृतोपकारातें न गणिति : मां अन्येत्र कैंचे भजति ॥ ते निर्दय होंत्साते चित्ति : परदुःखें हारीति काई ॥ ५८ ॥ ऐसे ते संमोहितमन : सर्वथा जे अतिकृपण ॥ अन्तरि लोभि दिसती उदासीन : विरक्तांचे परिं ॥ ५९ ॥ जैसे आत्माराम विचराति : तैसे ते कोठें न भजति ॥ उपकारातें वीसरति : कोण्हि केलें जे काहिं ॥ ६० ॥ असो विषयमोहितमन : तारतम्यातें विसरोन ॥ वर्तती जैसे उदासीन : योगी निस्पृहाचे परि ॥ ६१ ॥ आणि एक ते पापीजन : रजोगुणि आसक्तमन ॥ तारतम्यातें हिं जाणोन : गुरुद्रोही होति ॥ ६२ ॥ असो जो अन्नादिकिं पाळिता : संकटकाळिं रक्षिता ॥ तोही त्यांचा शास्त्रता : गुरुचि बोलिजे ॥ ६३ ॥ तदुपकारातें स्मरोन : न भजे ऐसा जो कृतघ्न ॥ तो इतरांचें काइ पाळण : करील चांडाळ जो ॥ ६४ ॥ भजतयांतें न भजते : इतरांतें हिं उपक्षिते ॥ ऐसे चतुर्विध गोपींतें : ते उदासीन निवेदिले श्रीकृष्णें ॥ ६५ ॥ याचें तात्पर्य हें चि दिसतें : जें निस्तरले जे अविद्येते ॥ परमानन्दमग्नचित्तें : ते उदासीन सर्वत्रहि ॥ ६६ ॥ आणि कोण्हीं अविद्या आवृत : सदा विषयासक्तचित्त ॥ त्यांचे सर्वही आचारित : देहिंच घडतसे ॥ ६७ ॥ त्यांची वर्तती ऐसी रीति : आणि उपकारी दिसों येति ॥ पारि अंतारि महा षठवृत्ति : परोपद्रवकारी ॥ ६८ ॥ आणिक कोण्ही मूढजन : आचरतांहिं कठिण ॥ सदा शिश्नोदरपरायण : दुःखरुप ते सर्वत्र ॥ ६९ ॥ आपुला ठाइं आसक्त मन : न स्मरे कोण्हाचें भजन ॥ गुरुद्रोहि आणि कृतघ्न : वर्तती येणें न्यायें ॥७०॥ ऐसें कृष्णोक्त आईकोन : तो अवघाहि गोपीजन ॥ हास्याचा अनुकार दाउन : अतिगुढाभिप्रायें ॥ ७१ ॥ परस्परें दाविती संकेत : हा कृतघ्न होये नेमस्त ॥ आह्मीं सांडुनियां हिं समस्त : अनुसरलों यातें ॥ ७२ ॥ असो आह्मी आपुलिं जीवितें : अर्पिलिं सर्वस्वेंहिं यातें ॥ जान्हि नावेक गृहगतें : शरीरें मात्र होतिं ॥ ७३ ॥ मग यातेंचि अनुलक्षुन : नाना संकटें न गणुन ॥ आजि सार-

काश हें बदन : पाहावया निकट आलों ॥ ७४ ॥ शेवट येणें ते न मानुन : आमुचिं चित्तेंहिं चोरुन ॥ घेउनि गेला तो हा कृष्ण : दयाळु किं कृतघ्न आतां ॥ ७५ ॥ किंवा हा कृपाळुवांचा राणा : ऐसें हिं जाणोनि गोपांगना ॥ हांसोनि विनोदपरायणा : खुणाविति परस्परें ॥७६॥ येणें शेवटील हे युक्ति : दाविली ज किं आम्हाप्रति ॥ ते घडोनि आली वो सति : याचाचि ठाइं प्रस्तुत ॥ ७७ ॥ ऐसें खुणाउनि त्या अंगना : परस्परें जाल्या हांस्यवदना ॥ मग जाणोनि त्या खुणा : बोलतुसे कृष्ण ॥ ७८ ॥ नाना जाणोनि तद्-भिप्रायरीति : तो सुजाण चक्रवर्ति ॥ दावितुसे निजस्थिति : पूर्वोक्ताहुनि विपरीत ॥ ७९ ॥ बोलिले प्रकार जे काहिं : त्यांत एकही आपुला ठाइं ॥ विचारितां कोठेंचिं नाहिं : हें धरुनि निजचित्तिं ॥ ८० ॥ यावत अध्यायस-माप्ति : हेंचि दावितुसे तयां प्रति ॥ आइक राजा चक्रवर्ति : वर्णिजेतें जें काहिं ॥ ८१ ॥

**नाहं तु सख्यो भजतोपि जंतून्-**
**भजाम्यमीषामनुवृत्तिवृत्तये ॥**
**यथाधनो लब्धधने विनष्टे**
**तच्चिंतयान्यन्निभृतो न वेद ॥ २० ॥**

सखियां हो ऐसें ह्मणोनः तियां गोपिकांतें संबोधुन ॥ श्रीकृष्णजीचें वचन : गोपिकांप्रति ऐसें ॥८२॥ ह्मणे अवो तुमचें प्रश्नोत्तर : म्या बोलिले भजनप्रकार ॥ त्या मद्वाक्याचें नेणोनि सार : तुह्मासि गमले ऐसें ॥८३॥ जें गुरुद्रुह शब्दें करुन : अकृतज्ञ पदेंहिं कृतघ्न ॥ ऐसा अत्यंत शठ कठिण : परोपकार नेणता ॥८४॥ ऐसें आचरण जें काहिं : तुह्मी नेमिलें माझा ठाइं ॥ तरि त्यांत एकही वो नाहिं : मजमाजि प्रकार ॥ ८५ ॥ असो त्या प्रश्नोतरांत काहिं : येकही नसे वो माझा ठाइं ॥ तुह्मी मानिले जे काहीं : मज अकर्तयातें ॥ ८६ ॥ ह्मणाल ऐसा तुं किमात्मक : तरिं मीं परमकारुक (?) ॥ जो सकळहितकारक : सुहृत्तम मीं सर्वांचा ॥ ८७ ॥ परि मातें जे कोण्ही भजति : तयां भजतयां जीवां प्रति ॥ भजत नाहिं ऐसें चित्तिं : उमटलें तुमचिया ॥ ८८ ॥ तरि

हे जें माझें आचरित : तें सदा भक्तोपकारार्थ ॥ निरंतर त्याचें चल चित्त : माझा ठाइं असावें ॥ ८९ ॥ असो या विषयाश(स)क्तिहुन : त्यांचें चित्तवृत्तीचें निवर्तनें ॥ होंउनि सदा अनुगमन : मजप्रति व्हावें ॥ ९० ॥ यास्तव बात्यदर्शे करुन : दाउनि नावेक तिरोधान ॥ आपुलां स्वरूपिं तीव्र ध्यान : लावितों भक्तांचें ॥ ९१ ॥ कां जें सकृद्दर्शनें करुन : पुरतें न कळे महिमान ॥ तेणें मज पासुनि मन : विरक्तीतें पावतसे ॥ ९२ ॥ मग देहविषय मागुति : स्मरोनि पावे ध्यानच्युति ॥ ह्मणोनि तिरोधानयुक्ति : दावितों वियोगु ॥ ९३ ॥ तेणे मद( द्रु )पीं अनुवृत्ति : प्रवर्त्तावी वो दीनुराति ॥ एवं या हेतु मिं तयां प्रति : दावितुसें परोक्षता ॥ ९४ ॥ किंवा मिं तरि स्वभावें करुन : भज्य भजनभेदविहीन ॥ पारि हें जें आचरण : तें भक्तकरुणे लागि ॥ ९५ ॥ असो मद्विलासांतःपाति : भासली हे त्रिजगति ॥ त्या माजि प्रायशा भजति : विषयांतें चि हे जन ॥ ९६ ॥ येथें भाग्याचे विरळा जन : विषयिं असोनि उदासीन ॥ मजाचि येउनि शरण : माझे जे अंकित ॥ ९७ ॥ ते अति उत्सुक होंत्सातें : पावती जर्‍हि मत्सांन्निध्याते ॥ तथापि अल्पाभ्यासे त्यांतें : वियोगु भासे ॥ ९८ ॥ विपरीतभावनामुळ : बुद्धि होउनियां विकळ ॥ माझा स्वरुपिं मन चंचळ : न थारे कदापि ॥ ९९ ॥ असो त्या अल्पाभ्यासियांसि : जार्‍हिं परिचयो स्थुळेंसिं ॥ तथापि मत्सांन्निध्यासि : स्थुळचि फळे ॥ ४०० ॥ ह्मणोनि या रुपेंकरुन : दाउनि निजतिरोधान ॥ त्यांचे वृत्तीचे अनुवर्तन : आत्मनिष्ठ करितुसें ॥ १ नाना या स्थुळाही पासुन : अंतरासि आणुनि मन ॥ आपुला रुपिं तिव्र ध्यान : लावितों त्यांचें ॥ २ ॥ जेवि कोण्ही अधम पुरुष : पावला धनविशेष ॥ मग होउनि धनविनाश : त्या धनातें चि चिंति ॥ ३ ॥ तो धनचिंताक्रांताचित्त : न स्मरे काहिं विषयजात ॥ त्या धनचिंतेकरीं समस्त : विसरोनि जाये ॥ ४ ॥ असो दैवयोगें करुन : धनिक जाला जो अधन ॥ तो धनचिंतापरायण : विषयांतर नेणे कदापि ॥ ५ ॥ तेवि मद्भक्तांची अनुवृत्ति : माझा रुपिं असो पुरति ॥ म्हणोनि निकट संगति : मिं परोक्ष होतों त्यांतें ॥ ६ ॥ जेवि मिं देहिंचि अ-

सोनी : देहादिकांतें हे प्राणि ।। प्राकृत मति करुनि : प्रायशा भजताति ।।७।। तेचि मतिनिवारणार्थ : परोक्षत्वें तत्त्वं पदार्थ ।। दाउनि परम पुरुषार्थ : साधविजे तो वेदें ।। ८ ।। सोहमास्मि इया चिंता : जाउनि देहिंची अहंता ।। पावती स्वतःसिद्ध सत्ता : ठायिंचाचि ठाइं ।। ९ ।। येणेंचि युक्ती करुन म्या हें दाविजेतें तिरोधान ।। लाउनि आपुलें चिंतन : आत्माकारता देइजेते ।। १० ।। या अर्थातें मनिं धरुन : प्रश्नोत्तर मिषें करुन ।। त्या गोपिकांप्रति श्रीकृष्ण : बोलिले पुर्वोक्त ।। ११ ।। आतां तोचि अर्थ मागुता : आकळे ऐसा या चित्ता ।। बोलतुसे रमाभर्ता : त्या कामिनीप्रति ।।१२।।

**एवं मदर्थोज्झितलोकवेद-**
**स्वानां हि वो मय्यनुवृत्तयेबलाः ।।**
**मया परोक्षं भजता तिरोहितं**
**मा सूयितुं मार्हथ तत्प्रियं प्रियाः ।। २१ ।।**

अवो ये अवधारा अबळा : मत्प्रिया ज्या तुह्मी प्रेमळा ।। जिहिं हा मदर्थ सांडिला : लौकिक व्यवहार ।। १३ ।। असो लक्षुनि मज एकातें : तुह्मी सांडिलें लौकिकातें ।। हे लोक काय आमुतें : ह्मणती हें न विचारिलें ।।१४।। या लोकाचा ठाइं कोठेहिं : परधर्माचि वार्त्ता नाहिं ।। हा दृष्टार्थुचि सर्वत्रहि : लक्षिताति मुर्ख ।। १५ ।। मिं जो सच्चिदानंदमूर्ति : त्या माझा ठायिं प्राकृत मति ।। आणि मज जे कोण्ही भजति : त्यांसि बहिष्कारिती ।। १६ ।। विषयारागिं जे कुशळ : त्यांचें मानिती उत्तम शीळ ।। आणि मद्भक्तातें हे बरळ : ह्मणती स्वार्थभ्रष्ट ।। १७ ।। आतां तुह्मी उदाराभिमानी : याचि लोकिं असोनि ।। त्या लौकिकातें न गणुनि : भजल्याति मातें ।। १८ ।। हे आमुतें युक्त मानिति : किंवा अयुक्तत्वें वाळिती ।। ऐसें कांहिंच तुमचे चित्तिं : उपजले नाहिं किं ।। १९ ।। अवो लौकीक तो हा किति : वेदासही न भिवोनि चित्तिं ।। त्या वेदोक्तातें न मानुनि सति : आल्याति येथें ।। २० ।। लक्षुनि विषयाश (स) क्तीत : गृहमेधियांतें वेदोक्ते ।। जें यथेष्टाचार संकोचार्थें : बोलिलें असति ।। २१ ।। त्या गृहादिकांची चाड काइ : ह्म-

णोनि काहिं मानिलें नाहिं ॥ निजयोग्यायोग्य काहिं : न विचारिले हें ॥ २२ ॥ अपेक्षुनि मज एकातें : तुच्छ केलें देहादिकातें ॥ तद्योगें उचितानुचितें : सांडिलिं अवघिं ॥ २३ ॥ करुनि वेदोक्त उल्लंघन : जरि होतें अन्येत्र सेवन ॥ तरि अवश्य येतें दुषण : वेदोक्तत्यागें ॥ २४ ॥ जेवि समाधिस्थ जो जाला : तो सर्व क्रिया विसरला ॥ तेथे हे प्रत्यवायज्वाळा : न स्पर्शे कदापि ॥ २५ ॥ अवो हें कर्तृत्व जरि स्मरे : तरि तेथें कर्तव्यही उरे ॥ मग विहितत्यागें संचरे : प्रत्यवाय तत्काळ ॥ २६ ॥ ह्मणौनि तुह्मी ऐसा काहिं : हा लौकिक मानिला नाहिं ॥ विचारुनि ठेविले ठाईं : हें रहस्य वेदाचें ॥ २७ ॥ कां जें उक्तक्रमें करुन : करावें उचितानुष्ठान ॥ शेवट सर्वस्वातें त्यागुन : शरण यावें मजला ॥ २८ ॥ नाना सांडुनि व्यवहारातें : सर्वस्वें अनुसरावें मातें ॥ हें वेदरहस्य वो पुरतें : तुह्मासीचि कळलेसें ॥ २९ ॥ असो हेंचि बोलावें काइ : प्रस्तुत जें या लोकाचा ठाईं ॥ तुह्मी विचारिले नाहिं : किं निंदिती हे लोक ॥ ३० ॥ कां जें तुह्मां मज निमित्त : वेदही सांडिला प्रस्तुत ॥ आणि लोक स्वजाति समस्त : स्वकुळ सोडिरे ॥ ३१ ॥ त्या स्वजनाचाहि ठाइं : परस्परे स्नेह काहिं ॥ तो तुह्मी त्यागुनि सर्वहि : भजलियाति वो मातें ॥ ३२ ॥ असो होउनि मत्काम : सांडिले पतिसेवादि धर्म ॥ आणि पितृपुत्रादि सुहृत्तम : टाकिले मदर्थ ॥ ३३ ॥ एवं मत्कामा समस्ता : टाकुनि लोकवेदव्यवस्था ॥ त्या तुमचा मिं जो जाणता : वृत्तांत हा सर्वहि ॥ ३४ ॥ तो मिं अंतर्धानाचेनि मिषें : तुह्मापासुनि दुरदेशें ॥ होतों तणें तुह्मासि ऐसें : मानिलें विपरित ॥ ३५ ॥ कां जें या प्रेमातें न मनुन : तुह्मासि गेलों वो सांडुन ॥ या अभिप्राये मिं कृतघ्न : भासलों कीं ॥ ३६ ॥ तरि रचुनि म्यां हे युक्ति : अपरोक्षे होतों तुह्मा प्रति ॥ अवो मि नित्य निकटवर्ति : त्यासि जाणें कैंचें ॥ ३७ ॥ नाना म्या तुमतें सांडिजेतें : तरि मदाकारेंचि चित्तें ॥ असोनि कां तुह्मि मातें : अनवरतें स्मरत्या ॥ ३८ ॥ किंवा आड वाळुनि मायेते : तेणेंचि पक्षें सांडिजेतें ॥ तथापि तुमचिं कां चित्तें : आकळितिं मातें ॥ ३९ ॥ तस्मात् विनो-

दाचिया रीति : कल्पुनि अन्तर्धानयुक्ति ।। गुप्त असोनि मुह्माप्रति : निकट चिं होतों ।। ४० ।। ह्मणाल हे कां केलि युक्ति : तरि तुमची हे प्राकृत मति ।। नसोनि मदृ(द्दु)पिं अनुवृत्ति : असावी ब्रम्हत्वें ।। ४१ ।। या लागि असोनि सन्निधान : संपादिलें अंतर्धान ।। तुमचा निकट असोन : आलाप आइकिले ।।४२।। असो अंतर्धानप्रसंगि : अपरोक्षत्वेचि तुम्हा लागि ।। मिं भजीनलों वो तन्वंगि : निश्चित जाणा ।। ४३ ।। नाना साधुनि तपसं पत्तिं : मजासिं जे ऐक्ये पावति ।। त्यांचा ठाइं येचि रीति : भजतुसें मिं सर्वदा ।।४४।। जाणोनि शास्त्ररहस्यातें : तोडोनियां भेदाभासातें ।। मजासिं ऐक्य पुरतें संपादिलें जन्हि निरन्तर ।। ४५ ।। ते निर्मुक्तअविद्यामळ : ऐक्येभावें अति प्रेमळ ।। नाशिलें भज्यभजनमुळ : तन्हि ते विशेषें भजति ।। ४६ ।। ऐसी माझी हे जे युक्ति : अवो माया ही नव्हे पुरति ।। कोण्ही योकि अकृत्रिम भक्ति : अखंडत्वें ते असे ।। ४७ ।। कां जे ऐसे तें न वर्तते : तरि गर्वसमुद्रिं बुडते ।। ह्मणोनि यावद्देहांत त्यांतें : मिंचि ऐक्यभक्ति देतों ।। ४८ ।। यालागिं मज प्रियातें : अंतर्धान पावतयातें ।। असूया जे इर्ष्यापंथें : ह्मणि प्रिया हों योग्यता पावाल ।। ४९ ।। असो मातें तिरस्कारुन : ह्मणं खिन्न असो हें मन ।। प्रिया हो नव्हे मि कृतघ्न : सर्वाचा प्रिय सर्वात्मा ।। ५० ।। नातरि मातें जे भजति : त्यांसि पावावया हे भक्ति ।। फावे नातन्हिं मि त्यां प्रति : बळात्कारें योजितों ।। ५१ ।। असो हे साधारण कथा : प्रस्तुत तुह्मि गोपकांता ।। सर्व सांडुनि मज कांता : अनुसरालियाति ज्या ।। ५२ ।। सांडुनि पतिसुतादिकांतें : सदा चित्तिं वाहिलें मातें ।। असो वोपिलिं स्वजीवितें : भजलागि तुह्मी ।। ५३ ।। तें म्या सर्वेहि जाणिजेतें : तुह्मी भाविजे ह्मनि(णि) विपरितें ।। ऐसें अत्यन्त गोपिकांतें : आश्वासिलें कृष्णें ।। ५४ ।। त्या गोपिकांचे आचरणें : आभारोनि अन्तःकरणें ।। परिहारपुर्वक तेणें : बहु कांहिं समाधान केलें ।। ५५ ।। मागुती तियांचें भजन : स्तवित होत्साता श्रीकृष्ण ।। बोलिला तें सावधान : आईक राजया ।। ५६ ।।

**न पारयेहं निरवद्यसंयुजां**
**स्वसाधुकृत्यं विबुधायुषापि वः ॥**
**या माभजन्दुर्जरगेहशृंखलाः**
**संवृश्चय तद्वः प्रतियातु साधुना ॥ २२ ॥**

अवो हें साधु आचरण : जें माझें एकांतिक भजन ॥ जीवितें मज लागुन : वोपिलिं तुह्मि ॥ ५७ ॥ त्याचिया उत्तीर्णतेचा पार : मिं जो किं स्वता ईश्वर ॥ तथापि न पावे निर्धार : कोणेहीं समईं ॥ ५८ ॥ तिया तुह्मि किंलक्षणा : तरि शुद्ध संयोगा अंगना ॥ ह्मणिजे सांडुनि क्षुद्र वासना : मज निकट आल्याति ॥ ५९ ॥ किंवां तुमचेनि योगें करुन : मि जो किं नित्यानंदघन ॥ त्या मजही नित्य समाधान : जालें वो प्रस्तुत ॥ ६० ॥ कां जें मिं जो नित्यसंतृप्त : त्या माझा ठाईं जे अनुरक्त ॥ ते अतिशयें माझे भक्त : आवडति मातें ॥ ६१ ॥ अवो स्वाभाविक हे रीति : मज आपुलेचि ठाईं प्रीति ॥ तेणेंचिकरिं जाली प्रतीति : अभेदिं भेदाचि ॥ ६२ ॥ एवं हा जो भेदाभास : माझाचि युक्तीविलास ॥ त्यामाजि कोण्हि माझे दास : कोण्ही विषयासक्त ॥ ६३ ॥ विषयांतें जे भजीनले : ते तद्रुपताचि पावले ॥ आणि मजकडे परतले : तेचि माझे दास ॥६४॥ यालागि आपुलिया प्रीति : माझेचि मज आवडति ॥ तेविंचि तुमचीहि संगति : सुखास्पद जाली ॥ ६५ ॥ या कारणे येथें वो सति : निरवद्यसंयुजा हे ख्याति ॥ तुमची तुच्छ विषइं प्रीति : नसे कदापि ॥ ६६ ॥ या तुह्मी भजतिया मातें : या दुर्जर गृहशृंखळेतें ॥ तुह्मीं तोडिलें जें कोण्हातें : छेद्य नव्हे सर्वदा ॥ ६७ ॥ नाना या गृहशृंखळेतें : भेदुति भजल्याति मातें ॥ हे नाशावया कवणातें : योग्य नव्हे कदां ॥ ६८ ॥ असो हे गृहादि असाक्ति ? नीच नवी बंधदाति ॥ जे कल्पांत येती जाति : परि हालवेना अणुमात्र ॥ ६९ ॥ जे माझा भजनें वाचुनि : कोणाहीं उपायासि न मानी ॥ वनवासियातेंहिं वनि : गोउनि पाडि ॥ ७० ॥ जे विरक्तीचें नि अहंकोडें : विरक्तपादींहि शृंखळा पडे ॥ मां गृहमेधी तों बापुडें : निस्तरेल काई ॥ ७१ ॥ ह्मणोनि तुम्ही

वो प्रेमळा : अति भाग्याचिया अबळा ॥ ते दुर्जर गृहशृंखळा : तोडुनि आलियाति ॥ ७२ ॥ हे तोडावया बंधसंगति : तुह्मी निकी विचारिली युक्ति ॥ गृहिंच असतां चित्तवृत्ति : समर्पीली मातें ॥ ७३ ॥ माझा स्मरना (णा) चा अभ्यास : जरि नित्य न करी पुरुष ॥ तरि हे गेहशृंखळा दुर्द्धष : छेदवेल कवणा ॥७४॥ या लागि भाग्याच्या वो अबळा : मत्स्मरणरता सकळा ॥ हे दुर्जरगृहशृंखळा : तोडुनि आल्याति येथें ॥ ७५ ॥ एवं तुमचा साधु आचार : तेणे जाला मज आभार ॥ मीं सर्वदा निर्वीकार : पारि संतोशलों बहुं ॥७६॥ असों मज नित्य प्राप्तातें : काहिं नव्हे उपकारातें ॥ तथापि स्वयें आपणातें : सोडविलें जेणें येथुनि ॥ ७७ ॥ तें जें त्याचें साधुकृत्य : तेणे तेंहि कृतकृत्य ॥ आणि मजहि तो पुरस्कृत्य : सर्व लोकामाजि ॥ ७८॥ त्या आभाराची उत्तीर्णता: माझेनि तों नव्हे सर्वथा ॥ जया उपकारासि तत्वता : पारुचि नाहिं ॥ ७९ ॥ अवो म्या एसें विचारिलें : जें देवाचें आयुष्यें संपादिलें ॥ तर्हि मज जें संतोपविलें : तें फिटेना ऋण ॥ ८० ॥ सोडुनि अन्य कामातें : जे कोण्ही आराधिति मातें ॥ जें आराधन समर्पलें तें : माघौतें फिरेना ॥ ८१ ॥ जेवि समुद्रीं गंगा मिळालि : माघौति नाहिं आलि ॥ तेवि कृत्यें जें मज अर्पिलिं : मदाकारें तें होति ॥ ८२ ॥ मग कोणें कोणा लागुनि : उत्तीर्ण व्हावें कैसें भामिनी ॥ तुह्मी स्वाचरितिं करुनि : कृतकृत्या असा ॥ ८३ ॥ अवो मज जे भजति : त्यांसि ब्रह्मपदें तुच्छ होति ॥ तेथें भजावया पुरति : भिन्नता कैंचि ॥ ८४ ॥ किंवा मज वेगळें कांहिं : सर्वथा सेव्य नाहिं ॥ तरि म्या तुह्मासि काई : आपणावीण द्यावें ॥ ८५ ॥ तया मज प्रियोत्तमातें : तुह्मी निजशुद्धाचारतें ॥ साधिलें मज पुरते : देणेचि नलगे आतां ॥ ८६ ॥ नाना गृहादि सोडिते वेळे : आधिं मातें अवलंबिलें ॥ त्याचि आचरणें जालें : सुखास्पद ॥ ८७ ॥ असो बहुं बोलावें किति : तुह्मी आभारिलें स्वचरिति ॥ त्याची उत्तीर्णता हेचि पुरति : जे मि संतोषलों ॥ ८८ ॥ यावीण द्यावया कांहिं : मज तवं सामर्थ्य नाहिं ॥ ऐसें श्रीकृष्ण बहुं कांहिं : निजउदारत्वें बोलिले ॥ ८९ ॥

एवं या द्वात्रिंशातितमाध्याइं : इतुकें संपादलें कांहिं ॥ त्या गोपी श्रीकृष्ण-विरहिं : पीडल्या होत्या बहु ॥ ९० ॥ त्या विरह प्राप्तीचें कारण : त्यांचाचि कांहिं दुर्गुण ॥ तो कृष्णसंयोगीं प्रतिबंधन : वोडवला होता जो ॥ ९१ ॥ त्या प्रतिबंधाची निवृत्ति : केली वर्णुनि कृष्णकीर्ति ॥ मग प्रकटोनि ते मुर्ति : संतोपल्या त्या गोपी ॥ ९२ ॥ नातरि कृष्णें रमाकांतें : निजावियोगाभासानिमित्तें ॥ आकर्पुनि त्यांचिं चित्तें : प्रतिबंधातें तया ॥ ९३॥ निवारुनि तियां प्रति : निजप्रकटता आइति ॥ संपादुनि गोपिका सती : समजाविल्या प्रश्नोत्तरें ॥ ९४ ॥ हा गुह्याकार जो काहिं : तो श्रीशुकेंद्रें सकळहि ॥ वर्णिला या द्वात्रिंशाध्याईं : परीक्षिति रायाप्रति ॥९५॥ ऐसी कथा शौनकादिकांतें : सांगीतली व्यासशिष्यें सूतें ॥ तेचिं नित्यानंदें मातें : अनुग्रहुनि स्मरविलि ॥ ९६ ॥ नाना मातें करुनि द्वारभूत : हा विलास निजचरित ॥ त्यांतें वर्णउनि माझें चित्त : शोधिलें निजकृपें करिं ॥ ९७ ॥ आतां यया निःपापा गनिं : ते : भीमातीरविलासिनी ॥ विठ्ठलमुर्ति मनोहारिणी : सदां असो प्रकट हे ॥ ९८ ॥ मिं जो विहितकर्मभ्रष्ट : त्या माझे कामादि शत्रु नष्ट ॥ तेणेंकरिं हे संसारकष्ट : त्यांतें नाशातें पावउ कृष्णमुर्ति ॥ ९९ ॥ एवं वर्णितां हे हरिकीर्ति : जगत्पवित्र जे भागवती ॥ निस्तरेन आतां मिं जन्मपंक्ति : भगवत्कृपेस्तव येथें ॥ ५०० ॥ नाना करितां कृष्णकीर्तन : नित्यानंदि सुखावलें मन ॥ वाचा होवोनि पावन : कृतकृत्य पावलों ॥ १ ॥ आतां हे असो कथन : पुढें वर्णिजेति हरिगुण ॥ सर्वत्र असो शिवकल्याण : निर्विघ्नस्वरुप ॥ २ ॥ हें करितां कृष्णकीर्तन : श्रोतिं असावें सावधान ॥ हरिपदिं चित्त समाधान : निरंतर असावें ॥ ५०३ ॥ इति श्रीभागवते महापुराणे दशमस्कंधे रासक्रीडावर्णनं (गोपीसांत्वनं) नाम द्वात्रिंशोध्याय : ॥३२॥

श्रीकृष्णार्पणमस्तु.

ॐ

श्रीमद्भागवतांतर्गत

# रासपंचाध्यायी.

---

## अध्याय ५.

श्रीगणाधिपतये नम: ।। श्रीसरस्वत्यै नम: ।। श्रीगुरुभ्यो नम: श्रीविठ्ठलाय नम: ।। श्रीनित्यानंदपदयुगळ : स्मरोनि चित्त करूं निर्मळ ।। कृष्णगुण गाऊं प्रांजळ : भागवत दशमस्कंधि ।।१।। असो श्रीकृष्णें नंदसुतें : अधिष्ठुनि रासक्रीडेतें ।। आकर्षुनि गोपींचि चित्तें : वृंदावनाचा ठाइं ।। २ ।। कृष्णें क्रीडतिये वेळे : नावेक तिरोधान योजिलें ।। तें तिरोधानचि जाले : उपकारी गोपिकांतें ।।३ ।। कांजे त्यांसि जाली जे अहंता : तेथें संचरोनि कृष्णाचिंता ।। त्या कृष्णाचि गुण गातां : सांडिली निःशेष ।। ४ ।। तेणे संतोषोनि श्रीकृष्ण : देऊनि निज सन्निधान ।। करुनि प्रश्न परिहरण : समजाविल्या गोपी ।। ५ ।। ऐसी हे गताध्यायकथा : यावरि इये अध्याइं आतां ।। त्या निजानुचरा वनिता : रमविल्या आपणें ।। ६ ।। असो अधिष्ठुनि ते मंडळि : आरंभिली वनकेळी ।। आणि प्रवेशोनि नदिजळिं : जळक्रीडा केली ।। ७ ।। तें अवघें राया-लागुन : सांगते जाले व्यासनंदन ।। तेंचि केलें अनुकथन : सुतें शौनकादिकां-प्रति ।। ८ तो कृष्णगुणानुवाद : मिहिं प्राकृतभाषानिबंध ।। स्मरोनि नित्यानं-दपद : वदेन यथामति ।। ९ ।। नित्यानंदें कृपा करावी : विघ्नाचि प्रवृत्ति न व्हावीं ।। इये प्रसंगी न यावी : महंती मज लागुन ।। १० ।। नातरि महंतीनें हें चित्त : न व्हावें कदां विषयरत ।। नाना न भासावें दृश्य जात : सत्यत्वें कदापि ।। ११ ।। मज श्रीकृष्णें वांचुन : कदा न भासो हें जन वन ।। श्रीकृष्णिं विनटलें हें मन : मग दुःख दैन्य कैंचें ।।१२।। जरि आंगा आली महंति : तरि तेचि दैन्याची मुर्ति ।। मग जे काहिं

व्युत्पत्ति : ते गंधर्व नगर हुडे ॥ १३ ॥ नाना तया गर्व प्रवेशे : वोसंडिजे रमाधींशें : ॥ मग संचरोनि देहपिसें : अनेक जन्मशतें फिरवि ॥ १४ ॥ ह्मणौनि कृष्णे रमानाथें : नित्यानंदें सर्व हृदिस्थें ॥ निज चरणीं मच्चित्तातें : सुखाड करावा सर्वदा ॥ १५ ॥ मग तें चरणरजोभुक्त : तुच्छ देखोनि विषयजात ॥ सरोनि जाईल निमित्त : दंभोपक्रमाचें किं ॥ १६ ॥ नातरि मज रमानाथें : स्वीकेलें हें जाणवेल मातें ॥ जें तद्गुणवर्णना परतें : काहिं न स्मरेल जरि मज ॥ १७ ॥ यया चोखाळलिया मनिं : ते लीळाविग्रहधा- रिणी ॥ भीमातीरानिवासिनि : तिष्ठेल हृदइं जेव्हां ॥ १८ ॥ तेव्हां विश्वासले- नि चित्ते : वर्णितां या गुण-कीर्तीतें ॥ सर्व विघ्नाभास मातें : निर्विघ्न होईल हा ॥ १९ ॥ असो आतां हे बहु स्तुति : प्रकृत कथा वर्णु भागवति ॥ ऐसें बोलताति रायाप्रति : श्रीशुकेंद्र योगी ॥ २० ॥

**श्री शुक उवाच.**

**इत्थं भगवतो गोप्यः श्रुत्वा वाचः सुपेशलाः ॥**
**जहुर्विरहजं तापं तदंगोपचिताशिषः ॥ १ ॥**

रायातें पूर्वोक्त प्रकारें : सुरसें आणि अर्थगंभीरें ॥ त्या गोपीतें प्रत्युत्तरें : बोलालिं कृष्णें ॥ २१ ॥ असो पुर्वाध्यायाचा अंतिं : गोपीप्रश्नपरिहारोक्ति ॥ बोलता जाला श्रीपति : समाधानार्थ ॥ २२ ॥ तयां पवित्रा वाक्यातें : आ- इकोनि तें गोपीशतें ॥ कृष्णविरहसंतापातें : सांडिति जालिं ॥ २३ ॥ जेवि विद्यावृत्तीअधीन : ' ब्रम्हास्मि ' हें अनुसंधान ॥ येथें वृत्ति सत्यत्वें करुन : भेदात्मक जें ॥ २४ ॥ मग तें येतां फळ दशे : वृत्ति निर्विशेषिं समरसे ॥ नातरि व्यापाराचि नाशे : ध्येयध्यानरुप ॥ २५ ॥ तो ध्येय- ध्यानादि समस्त : आयासुचि पात्रे अस्त ॥ तैसेंचि येथें हे वृत्त : वडोनि आलें ॥ २६ ॥ नावेक तिरोधानयुक्ति : रचिली व्यवधानाप्रति ॥ तेणें त्या कृष्णपरा गोपसती : चिंताक्रांत जाल्या ॥ २७ ॥ त्या चिंतनव्यापारें करुन : श्रमाचें जालें आगमन ॥ परि तेणेंचि उपशमन :

पावला सर्वही तो श्रम ॥ २८ ॥ तया श्रमाचिया निवृत्ति : प्रत्यक्ष जालि कृष्णमुर्ति ॥ किंवा कृष्णांचिया प्राप्ति : श्रमनिवृत्ति जालि ॥२९ ॥ कां जे जालियांहि सान्निधान : अपेक्षिजे कृष्णवचन ॥ त्या श्रवणे तो गोपिगण : निश्चित जाला ॥ ३० ॥ नातरि तो नंदानंदन : जगद्गुरु सर्व जीवन ॥ जालिययांते गुरुसन्निधान : तद्वाक्यश्रवण अपेक्षित ॥ ३१ ॥ कां जें तो अपरोक्ष चिन्मुर्ति : तेथें प्रमाणें न सरति ॥ लक्षणायुक्त प्रवृत्ति : कृष्णवाक्या तेंचि घडलि ॥ ३२ ॥ यालागि आईकोनि वाक्यार्था : गोपी जाल्या आधिरहिता ॥ श्रीकृष्णविरहव्यथा : सांडिली तिहिं ॥ ३३ ॥ त्या किंलक्षणा गोपकांता : तरि तदंगसंगपुर्णमनोरथा ॥ असो कृष्णांगसंग पावतां : पुर्ण कामा ज्या ॥३४॥ नाना सर्वावयवयसंपन्न : ते मूर्ति मंगळायतन ॥ देखोनि तो गोपीगण : अवाप्तमनोरथ जाहला ॥ ३५ ॥ असो देखोनि रमणमुर्ति : मनोरथांची समाप्ति ॥ पावोनि त्या गोपीसर्ता : वाक्याधिकारिणी॰ जाल्या ॥ ३६ ॥ एवं त्या प्राप्तमनोरथा : प्राशूनि कृष्णमनोरथा ॥ सांडिली विरहव्यथा : श्रीकृष्णविश(ष)ईक ॥ ३७ ॥ ह्मणाल देखोनि कृष्णातें : असोनि पुर्ण मनोरथें ॥ मग तापु कैंचा त्यांतें : जो तद्वचनें सांडिला ॥ ३८ ॥ तरि पुर्णकामा होंत्सात्या : तद्वियोग स्मरत होत्या ॥ तेणें विक्षिप्तचित्ता त्या : मागुत्या लक्षिल्या ॥ ३९ ॥ ह्मणोनि त्या कृष्णवचनें : तया विक्षेपातें सांडुनि ॥ त्या विगतज्वरा भामिनी : जाल्या गोपी ॥ ४० ॥ जेवि उपजली विद्यावृत्ति : शाश्वता अविद्या निवृत्ति ॥ जाली तऱ्हि पुरति : वस्तुप्राप्ति नव्हेचि ॥ ४१ ॥ अहो काळत्रयाच्या ठाइं : भगवंतें वीण दुजें नाहिं ॥ तेथें प्रवृत्तिचि नसे कांहि : मां निवृत्ति कैंची काय ॥ ४२ ॥ यास्तव निवृत्तीची अस्फुर्ति : नेहटेना जवं पुरति ॥ तंवरि साक्षात् संस्थिति : भगवंति न घडे कदां ॥ ४३ ॥ येणेंचि न्यायें करुन : जालियांहि कृष्णसन्निधान ॥ अपेक्षित जालें तद्वचन : वियोगतापशमनार्थ ॥ ४४ ॥ आतां त्या गोपी कृष्णसंगता : जऱ्हि जालिया अवितता ॥ तथापि देहांतपर्यंता : किंचित् व्यवहारिं होत्या ॥ ४५ ॥ उपाधि जऱ्हि बाध्यमान : तऱ्हि बाधित हें देहभान ॥

श्रीकृष्णेंसि तो गोपीजन : भेदाभासें राहिला कैसा ॥ ४६ ॥ तरि यावत् भेद समाप्ति : ते भावना न्यावया निष्कृति ॥ ऐसी काहिं विचारुनि युक्ति : रचिली कृष्णे हे ॥ ४७ ॥ अथवा गेलियां भेदभान : केवळ यावत् देहावसान ॥ भक्तांसि आपणेंचि करुन : क्रमावा काळ ॥ ४८ ॥ यालागि योजुनि हा विलास : करुनि रासक्रीडेचेंमिष ॥ त्या गोपिसिं रमाधीश : खेळला तो ऐसा ॥ ४९ ॥

**तत्रारभत गोविंदो रासक्रीडामनुव्रतैः ॥**
**स्त्रीरत्नैरन्वितः प्रीतैरन्योन्याबद्धबाहुभिः ॥ २ ॥**

तत्र पदें ते नदी पुलिन : तेथें करुनि प्रश्नपरिहरण ॥ असतां समाहित-मन : गोपिकासमुदाय ॥ ५० ॥ असो तेथें त्या निर्विक्षिप्ता : गोपी विगत विरहव्यथा ॥ देखोनि त्यांतें रमाभर्ता : विचारुनि निजमनिं ॥ ५१ ॥ आपुला॰ ठाई अनुव्रतें : तें स्त्रीरत्नें गोपिकाशतें ॥ तिहिंसिं रासक्रीडेतें : आरंभिता जाला कृष्ण ॥ ५२ ॥ त्यां गोपिकांचें विशेषण : केलें जें सर्व स्त्रीरत्न ॥ कां जें साधारण जो स्त्रीजन : तो मूढ स्वभाव ॥ ५३ ॥ त्यां-माजि हें गोपिकाशतें : सांडुनि निजभावातें ॥ जाणोनि कामोपशमाते : श्री कृष्णिंच रतलिं ॥५४॥ कां जें कामानळ पीडितां : भगवंतुचि येक रक्षिता ॥ अन्यथा हे कामाग्नि व्यथा : कोण्हाचेनि शमेना ॥५५॥ येका श्रीकृष्णा वांचुन : या कामशमाचें साधन ॥ विषयांतरातें सेउन : काम वृद्धीतेंचि पावतसे ॥ ५६ ॥ जेवि घृताचिया आहुती : अग्नीची इच्छावी उपशांति ॥ तेवि विषयांचिया प्राप्ति : निःकामता इच्छावी ॥ ५७ ॥॰ ह्मणोनि त्या कृष्णरता रामा : मनुष्यांमाजि उत्तमा ॥ सदां असावया तृप्त कामा : शरण आल्या येथें ॥ ५८ ॥ या कारणें तिहिंसिं श्रीकृष्ण : जाला क्रीडापरायण ॥ ऐसें बोलिलें तें राया जाण : युक्ताचि योजलें ॥ ५९ ॥ असो स्त्रीरत्न संज्ञें करुनि : बोलिल्या शुद्धाधिकारिणी ॥ याचि हेतु त्या प्रियचारिणी : कृष्णप्रिया ॥ ६० ॥ नाना सौंदर्याधिक्यें करुनि : प्रिया त्या कृष्णा लागुनि ॥ तरि कायेरमेहुनि : त्या सुंदरा होत्या ॥ ६१ ॥ सर्व सौंदर्यभुषण : सकळ सौष्ठव्याचें

सदन ॥ ते रमादेवी आपण : शरण आलि भगवंता ॥ ६२ ॥ परि तिजकडे जगदीश : करीचिना अवलोकलेश ॥ असो अळुमाळ तीस : पाहेचिना जो ॥ ६३ ॥ तेथें त्या राणटा स्त्रीजाति : त्यांचें सौंदर्य वाणावें किति ॥ काइतो षड्गुणसंत्ति : स्त्रीलंपट जाला ॥ ६४ ॥ तस्मात् त्या व्रजवासिनि : भक्तामाजि शिरोमणि ॥ सर्वस्वातें तिहिं सांडुनि : श्रीकृष्ण साधिला ॥ ६५ ॥ तेणेंचि इये लोकिं त्यातें : स्त्रीरत्नत्व योजले निरुतें ॥ आणि कृष्णासहि त्यां परतें : प्रिय नसे काहिं ॥ ६६ ॥ ह्मणोनि ते गोपिकाशत : श्रीकृष्णाचे परम आप्त ॥ तेणेंसि तो यशोदासुत : क्रीडेसि प्रवर्तला ॥६७॥ आतां तो स्त्रीरत्नजन : श्रीकृष्णजितें आवरुण(न) ॥ तेथें राहिला तें किलक्षण : तेंहिं आइका ॥ ६८ ॥ तरि त्या सर्व गोपी येकसरें : चित्तें असोनि तदाकारें ॥ बाहु धरुनि परस्परें : मंडळाकार जाल्या ॥ ६९ ॥ नाना दाउनि बाहुबंध : तिहिं तोडोनि वृत्तिछेद ॥ आपणेंसि श्रीकृष्णनिभेद : अंतस्थ योजिला ॥ ७० ॥ कदाचित् खंडेल वृत्ति : तरि अंतरेल कृष्णमुर्ति ॥ इया हेतु त्या व्रजसती : बद्धबाहु जालिया ॥ ७१ ॥ कां जें एकदां स्वस्थें चित्तें : नव्हतिं ह्मणोनि आमुतें ॥ वंचिलें आतां कोण पां यातें : विसंबेल जिवें प्राणें ॥ ७२ ॥ या हेतु त्या सर्वा प्रमदा : परस्परें बाहुबद्धा ॥ असोनि श्रीकृष्णा गोविंदा : राहिलिया वेढुनि गोपी ॥ ७३ ॥ एवं तो नंदानंद गोविंद : तिया गोपीहस्तिं निबद्ध ॥ आदरिता जाला स्वच्छंद : रासक्रीडेतें राया ॥ ७४ ॥ ते क्रीडा ह्मणाल काइ : तरि बहु नर्तकी येकेठाइं ॥ मेळउनि मांडिजे जो काहिं : नृत्यसमारंभु तो ॥ ७५ ॥ ऐसिये रासक्रीडेतें : आरंभिल जे नंदसुतें ॥ तें सविस्तरें निवेदजेत : तुजला आइक राया ॥ ७६ ॥

**रासोत्सवः संप्रवृत्तो गोपीमंडलमंडितः ॥**
**योगेश्वरेण कृष्णेन तासां मध्ये द्वयोर्द्वयोः ॥**
**प्रविष्टेन गृहीतानां कंठे स्वनिकटं स्त्रियः ॥ ३ ॥**

यं मन्यैरन्नभस्तावद्विमानशतसंकुलम्
दिवौकसां सदाराणामौत्सुक्यापत्दृतात्मनाम् ॥ ४ ॥

तो रासोत्सव पुर्वोक्त : जो गोपीमंडळमंडित ॥ त्या प्रमदांसि आवृत : जेथें क्रीडला कृष्ण ॥ ७७ ॥ तयां सर्वांचें आधिष्ठान : जेणें तो रास शोभायमान ॥ तया कृष्णाजि वांचुन : अर्थता काहिं नसे ॥ ७८ ॥ ह्मणोनि सूचिलें येथें : जें श्रीकृष्णें कमळाकांतें ॥ त्या यशोदा नंदसुतें : प्रवर्तविला रास ॥ ७९ ॥ निजशोभा जे सनातन : तिया शोभा शोभउन ॥ निज प्रवेशें करुन : प्रकटिला उत्सव ॥८०॥ तो जो प्रवेश वर्णिला : तो प्रत्यक्षही प्रकट केला ॥ तेथें गोपीसमुह मिळाला : बद्धमंडळाकृति ॥ ८१ ॥ तियां दोंदोवीं माझारि : एकलाचि नटधारि ॥ प्रतियुग्मिं तो मुरारि : तिष्ठला तेथें ॥ ८२ ॥ आतां त्यां दोवींदोवि मधें : तिष्ठोनि सच्चिदानंदें ॥ काय केलें तरि विनोदें : कंठिं धरिलें तियांतें ॥ ८३ ॥ नाना तेणें उभय हस्तें : दोविंचा गळग्रहणातें ॥ संपादुनि आपणयांतें : निकट केलें त्यांसि ॥ ८४ ॥ एवं इये प्रक्रिये करुन : त्या रासोत्सविं प्रवेशोन ॥ तो गोपीमंडळमंडन : शोभविता जाला उत्सवातें ॥ ८५ ॥ आतां जरि ह्मणाल काहिं : जें तो येकुचि सर्वां ठाईं ॥ कैसा तिष्ठला तरि नाहिं : श्रीकृष्णिं आश्चर्य हें ॥ ८६ ॥ प्रस्तुत तो नंदकुमार : परि योगेश्वरांचा ईश्वर ॥ जो एकलाचि जगदाकार : न होउनि जाला ॥ ८७ ॥ नाना अविष्ठुनि मायेतें : आपुला रूपिं जगातें ॥ दाउनि स्वप्रवेशें वृद्धीतें : पाववितें येणें हें जग ॥ ८८ ॥ या विशेषाकरिं पाहिं : एकरसता हालवली नाहिं ॥ किंबहुना त्याचा ठाइं : बुद्धिविलासुचि नसे ॥८९॥ हे जे काहिं नाना भाव : ते ज्याचिये मायेचा प्रभाव ॥ येथें हा कोण नवलाव : जे जे प्रतियुग्मिं असणे ॥९०॥ असो जोडोनि साधनसंपत्ति : जेथें ठेउनि चित्तवृत्ति ॥ योगी योगातें साधिति : अनेक जन्मार्जितें ॥ ९१ ॥ ऐशा योगाचा जो ईश्वर : तोचि स्वता नंदकुमार ॥ तेणे आरंभिला रासप्रकार : प्रवेशोनि तेथें ॥ ९२ ॥ असो जयाचिया किं सत्ता : योगी उसंतिती योग-

पंथा ॥ तोचि योगेश्वर हा स्वाता : नंदानंदन ॥ ९३ ॥ जयातें त्या गोपि एकांतिं : एकेचि काळिं समस्तिं ॥ जाणती जें हा निकटवर्ति : आपणा तेंचि असे ॥ ९४ ॥ असो अविधिया कृष्णातें : तिया आपुलालिया मतें ॥ आपआपणा परतें : देखत्या नाहिं जाल्या ॥ ९५ ॥ एवं येणें मिषें करुन : त्यां स्त्रियांचें परिछिन्न ज्ञान ॥ तोडोनि निज संनिधान : दिधलें जें काहिं ॥ ९६ ॥ त्या सांनिध्याचि उपस्थिति : वेगळाली सूचिली निगुति ॥ जेवि जीवन्मुक्त भोगिति : स्वानुभवातें ॥ ९७ ॥ किंवा स्वप्राप्ती ही वरौति : न मोडोनि ऐक्यात्मस्थिति ॥ प्रति गोपिकांचिया भक्ति : सार्थका केल्या ॥ ९८ ॥ असो कोणेही स्थितीचा ठाइं : प्राप्तीसि खंडना नाहिं ॥ या लागि सांनिध्याहुनि काहिं : भजनमार्गे विशेष ॥ ९९ ॥ आतां ऐसा उक्त रीति : तो रास आणिला आकृति ॥ तवं विमानपंक्तिशतिं : व्यापिलें आकाश ॥ १०० ॥ विमानें कोणांचिं ह्मणासि : तरि दिवौकस जे स्वर्गवासि ॥ जाणोनि रासोत्सवासि : ते सहदार आले नभिं ॥ १ ॥ असो विमानारूढ असोन : स्वस्त्रियां सह वर्तमान ॥ आकाशिं आले देवजन : रासोत्सवदर्शनातें ॥ २ ॥ एवं जाणोनि रासोत्सवातें : पावोनि औत्सुक्यातें ॥ सपत्निक देवि नभातें : व्यापिलें आपुले विमानिं ॥ ३ ॥

**ततो दुंदुभयो नेदुर्निपेतुः पुष्पवृष्टयः ।**
**जगुर्गंधर्वपतयः सस्त्रीकास्तद्यशोऽमलम् ॥ ५ ॥**

मग रास भरोनि चित्तिं : आकाशगतविमानस्थि ॥ सदारदेविं तो रमापति : पुजिला निजवैभवें ॥ ४ ॥ हर्षें दुंदुभि वाजविलें : त्रैलोक्य सनादित केलें ॥ आणि आकाशिहुनि प्रेरिलें : पुष्पराशी अनेक ॥ ५ ॥ असो दिव्य सुमनमाळा : वाइल्या कृष्णाचिया गळां ॥ आणि पुष्पपुंज विखरिला : रासमंडळिं त्या ॥ ६ ॥ आणि स्त्रियांसहित तेथें : गन्धर्वपति आले होते ॥ तेही निर्मळ कृष्णयशातें : गाते जाले बहु आनंदें ॥ ७ ॥ असो गन्धर्विणींतें घेउन : आले होते गंधर्वगण ॥ तिहिं केलें बहु गायन : निर्मळा कृष्णयशाचें तेथें ॥ ८ ॥ नाना गोपींचा सत्कृत्ती : तिहिं आकर्षिली सुरपांक्ति ॥

तेचि तेथें जाली व्यापिती : गोपी हृद्गगनातें ॥ ९ ॥ तिहिं ते हृदयवर्तिनी : योगमाया विलासिनी ॥ पूजिली देवीं मुक्तसुमनीं : सच्चिदानन्दनमुर्ति ॥१०॥ असो सदार गंधर्वेश : श्रीकृष्णाचें निर्मळ येश ॥ देववाद्योसीं ससंतोष : वर्णिते जाले गीत गातां ॥ ११ ॥

**वलयानां नूपुराणां किंकिणानां च योषिताम् ॥**
**सप्रियाणामभूच्छब्दस्तुमुलो रासमण्डले ॥ ६ ॥**
**तत्रातिशुशुभे ताभिर्भगवान्देवकीसुतः ॥**
**मध्ये मणीनां हैमानां महामरकतो यथा ॥ ७ ॥**

यावरि त्या व्रजयोषिता : रासोत्सवभरिताचित्ता ॥ पावोनि श्रीकृष्णाकारता : देहादीकातें विसरल्या ॥ १२ ॥ त्या कृष्णपरायणा : सांडोनि देहादि भावना ॥ जाल्या प्रेमाप्लुतमना : त्या रासमंडळाचा ठाइं ॥ १३ ॥ पुरःसरोनि कृष्णजीतें : करितां परमनृत्यातें ॥ वलय पदें कंकणातें : लागत असतां परस्परें तें ॥ १४ ॥ कंकणें चलनातें पावोनि : उमटले सुस्वर ध्वनि ॥ आणि नुपुरें जें चरणीं : तेंहिं वाजलिं अति मधुरें ॥ १५ ॥ कांची पदें कटिमेखळा : तेथें क्षुद्र घंटिका सकळा ॥ त्या किंकिणी हिं नृत्य-वेळा : वाजत्या जालिया ॥ १६ ॥ एवं वलयें नूपुरें किंकिणी : त्यांचे जे जाले कलध्वनि ॥ ते अवघे येकवाटुनि : तुमुळ नाद जाला ॥ १७ ॥ नाना त्या कृष्णमया सती : देहादीकिं नसोनि स्मृति ॥ परि तिहिं त्या शब्दितीं : स्तविला श्रीकृष्ण ॥ १८ ॥ नादस्तोत्रें गोपीसंगगुणें ॥ तें जाले कृष्णपरा-यणें ॥ तिहिं केलिं गुणगायनें : रासरंगिं कृष्णाचें ॥ १९ ॥ किंवा त्या कृष्णास्था जाल्या सती : तेणें तया भूषणाकृति ॥ बंदीजन गुण गाति : श्रीकृष्णजीचे ॥ २० ॥ अथवा तो नव्हे निनाद : नेणों जाला उपनिषत् शब्द ॥ तेणें स्तविला गोविंद : नन्दानन्दन ॥ २१ ॥ ह्मणोनि तो देवकी-सुत : साक्षात् श्रीभगवन्त ॥ शोभला गोपिकांसहित : रासरंगाचा ठाईं ॥ २२ ॥ देवकीसुतत्वें येथें : निवारिलें प्राकृतत्वातें ॥ भगवन्त पदें कृष्णातें : उपनिषदें प्रतिपादिति ॥ २३ ॥ असोनि तो उपाधिशुन्य : सकळ शोभेचें

सदन ॥ आपुले शोभे शोभउन : त्या गोपिकासमुदायातें ॥ २४ ॥ हा रास आणुनि रुपासि : आपण शोभला विशेषिं ॥ रासरंगें स्वयें तिहिंसि : अखण्डता दाविलि ॥ २५ ॥ यालागि सप्रिय गोपीजन : आणि गोपीसह श्रीकृष्ण ॥ वर्णिला येणें करुन : शोभला रासरंगु ॥ २६ ॥ आतां गोपीसहवर्तमान : कैसा शोभला श्रीकृष्ण ॥ काइ तो गोपिकामय आपण : असता जाला ॥ २७ ॥ तरि येणें कमळानाथें : आपुलिया लीळानुपथें ॥ शोभिजेतें जालें स्वता येथें : बहुंताप्रकारें ॥२८॥ आपुला महिमा जो कांहिं : तो सर्वथा नुलंवने(णे) नाहिं ॥ सर्व होउनि सर्वा ठाईं : निज महत्वें असे ॥ २९ ॥ येथें नसोनि परिछिन्न : सर्वाकार नव्हे आपण ॥ तो या गोपी मंडळातें व्यापुन : भिन्न असे ॥ ३० ॥ ऐसी अनुभवाचि खुण : ते दृष्टांतें करिं जाण ॥ जेवि सुवर्णाचे मणिगण : माळे चा ठाईं ॥ ३१ ॥ तया हेममणी मध्यस्थ : जैसा शोभे महा मकरत ॥ तेवि तो देवकीसुत : गोपी मधें शोभे ॥ ३२ ॥ एवं येणें दृष्टांते करुन : दाविली असंगत्वाची खुण ॥ शोभिचाहि विशेष गुण : सूचिला ऐसा ॥३३॥ त्या गौरवर्णा हेमस्थानि : कृष्ण शाममकरतमणि जेवि रत्न शोभे सुवर्णि : तैसा कृष्णगोपीसंयोगु ॥ ३४ ॥ सांडुनि देहाभिमान : तो कृष्णमय गोपी-जन ॥ परि निजरुपासि विलक्षण : नाहीं जाला कृष्ण ॥ ३५ ॥ जेवि विगलिताभिमान : जे कोण्ही जीवन्मुक्त जन ॥ ते देहानुसंधानशुन्य : ब्रह्ममयाचि जाले ॥ ३६ ॥ परि निर्विशेष जें काहिं : ते जीवन्मुक्ताकार नाहिं ॥ ब्रह्म निरुपम काळत्रईं : सचिदानंदस्वरुप ॥ ३७ ॥ तेंचि हे कृष्णाख्य ब्रह्म : जेणें क्षोभला रासंभ्रम ॥ ते न संडोनि निज वर्म : निर्विशेषेंचि राहिलें ॥ ३८ ॥ असो येथेंचि हा प्रस्तुत : एकलाचि जो नंदसुत ॥ अनेकां गोपीं समवेत : वेगळाला रमता जाला ॥ ३९ ॥ ऐसे जे कांहिं बोलिलें : तें येथें विरुद्ध योजलें ॥ कां जें एक कृष्णरूप वर्णिलें : गोपी मंडळामाजि ॥ ४० ॥ तरि येथें जें एक वचन : तें दोंही प्रकारें प्रमाण ॥ कां जें सर्वगत हा श्रीकृष्ण : नाना भासेंहिं येकला ॥ ४१ ॥

प्रति गोपीसि कृष्णप्राप्ति : तेथेंहि नाहिं भिन्न रीति ॥ परस्परें कृष्ण संगति : जाणितली नसे कोण्ही ॥ ४२ ॥ जे जे कृष्णमय जाली : ते ते चि भेदातें विसरलि ॥ एकाकी चि अनुभविली : श्रीकृष्णमुर्ति तियेनें हे ॥ ४३ ॥ असो आपुलालिया मतें : येकल्या कृष्णजितें ॥ जाणितलें मग तियेतें : स्फुरेचिना काहिं अन्येत्र ॥ ४४ ॥ एवं एकत्व न संडोनि : सर्वत्र वर्ते जनि वनि ॥ येणें न्यायें गोपिका कृष्णि : रमल्या एकत्र भावें ॥ ४५ ॥ सा गोपी सहवर्तमान : शोभला तो नंदानंदन ॥ आतां कैसा तो गोपिजन : कृष्णेसि शोभता जाला ॥ ४६ ॥

पादन्यासैर्भुजविधुतिभि : सस्मितैर्भ्रूविलासै-
र्भज्यन्मध्यैश्चलकुचपटैःकुंडलैर्गंडलोलैः ।
स्विद्यन्मुख्यः कबररशनाग्रंथयः कृष्णवध्वो
गायंत्यस्तं तडित इव ता मेघचक्रेण रेजुः ॥ ८ ॥

श्रीकृष्णावांचुनि काहिंहि : ज्यांसि कोठेंहि आवडि नाहिं ॥ निरंतरहि कृष्ण पाइं : मानसे ज्यांचि ॥ ४७ ॥ यालागि कृष्णवधुगण : त्या गोपिकांचे विशेषण ॥ पावोनि कृष्णसंन्निधान : या रासप्रसंगें ॥ ४८ ॥ त्या शोभत्या जाल्या जें काहिं : राया वर्णावें तें किती काइ ॥ तैसा आणिक काहिं नाहिं : उपमाचि येथें ॥४९॥ तथापि काहिं सलक्षण : उपमेसहवर्तमान ॥ तें करिजेतें निवेदन : आइकावें श्रोतिं ॥ ५० ॥ ह्मणाल त्या कोणे लक्षणिं : शोभत्या जाल्या कामिनी ॥ तरि कृष्णक्रीडास्थानि : त्या नृत्य करितां ॥ ५१ ॥ पादचलनादिकें करुन : मुखिं आले स्वेदकण ॥ तो स्वेदमुखी गोपीगण : विरजला ॥ ५२ ॥ त्या धर्माचि निमित्यें : न व्याविधेचेनि पंथें ॥ नृत्य करितां तेथें : चळली हातपाये ॥ ५३ ॥ तेणेंचि अङ्गें करुन : करितां भावदर्शन ॥ मुख नेत्र हस्त चरण : आंग मोडिती इतस्तता ॥ ५४ ॥ संतोषावा वैकुंठराव : ह्मणोनि दाविती हावभाव ॥ अत्यन्त रसाविर्भव : वोडवे ज्या प्रकारें ॥ ५५ ॥ त्या नृत्यविद्यानिपुणा : कृष्णसंतोषपरायणा ॥ असोनि सस्मितवदना : भ्रुकुटीस्फुरणें ॥ ५६ ॥ असो

संतोषावा रमेश : ह्मणोनि दाविती विलास ॥ जेणे हा सुरस रास : वोडवे अतिशयें ॥ ५७ ॥ त्या नृत्यांगत्वें करुन : दाविलें भ्रुकुटीचळण ॥ तेथें सस्मीत गोपीजन : सघर्म मुखही शोभला ॥ ५० ॥ तो दावितां नृत्यविलास : सुक्ष्म जे त्यांचे मध्यदेश ॥ त्यांतें पहातां सुरेश: गंधर्वगणहि संतोशले ॥ ५९ ॥ असो त्या निमित्तें करुन : कटीभाग पावले चळण ॥ तेहि नावेक कारण : स्वेदाविर्भवासि जालें ॥ ६० ॥ तोचि समई सकळ : त्यांचे कुचहि जाले चंचळ ॥ कां जे तेथें प्रवेशावे तत्काळ : निजप्रिये श्रीकृष्णें ॥ ६१ ॥ असो त्या भाग्याच्या अंगना : पावोनि कृष्ण संनिधाना ॥ गोपी विगताभिमाना : विकळावयवा जाल्या ॥ ६२ ॥ प्रेमोद्रेकाचे निमित्तें : आदरिलें जें काहिं नृत्यें ॥ ते नंदानंदन हृदिस्थे : कळारुपासि आणिलि ॥ ६३ ॥ नाचतां फिरातियेवेळे : स्तनजघन नेत्र स्फुरले ॥ वस्त्रेहि जालिं शिथिलें ॥ नेणतीचि काहिं ॥ ६४ ॥ असो आंगि भरोनि कृष्णरंग : चंचळ जालें सर्वांग ॥ वोडवला मध्य भंग : कुचकुंभहि स्फुरले ॥ ६५ ॥ तेणेंचि अंगभ्रमणें : इतस्तता गेलिं वसनें ॥ चित्तें हरिलिं नंदानंदनें : विसरालिया देहभावातें ॥ ६६ ॥ त्यां कुचपटांतें सांवारितां : तेही श्रम जाले तत्वता ॥ तेणे घर्म आले इतस्ता : मुखावरि सर्वांचा ॥६१॥ आणि त्यांचियां गंडप्रांतिं : कुंडलें हिं स्फुरत होतिं ॥ तेणें चळकुंडलगंडा सती : शोभत्या जालिया ॥ ६८ ॥ नाना संतोशाचेनि बळें : ते कुंडलें जालि विलोलें ॥ तेणेंहि कपोळ व्यापिलें : घर्मकारिं गोपिकांचे ॥ ६९ ॥ एवं तें तरुणींचिं शतें : करित असतां नृत्यातें ॥ सर्वांग चलनानिमित्तें : स्वेदयुक्त मुखें जाहलिं ॥ ७० ॥ किंवा तें रुप चित्तिं भरलें : तेणें सत्वोद्रेक कोंदलें ॥ तें निवोनि स्वेदरूप जालें : उवरलिं तन्मुखें ॥ ७१ ॥ त्या किंविशेशणा सती : तरि कबररशनाअग्रंथि ॥ ह्मणिजे एकत्र केशपंक्ति :माथां बांधिले बुचंड ॥७२॥ त्यांचे सुटोनि सर्व ग्रंथि : विखरल्या केशपंक्ति ॥ आणि कटिसुत्रें जें होति : तेहिं मुक्तबंधनें जालें ॥ ७३ ॥ ह्मणोनि कबररशना : अग्रंथि बोलिल्या अंगना ॥ नाना पावोनि श्रीकृष्णा : बंधमुक्त जाल्या ॥७४॥

त्या असोनि नृत्यपरायणा : करित्या जाल्या गुणगायना ॥ चित्तिं भरोनि यदुराणा : सकळा युवती ॥७५॥ कृष्णगुण गातिये वेळे : प्रेमाचें भरित आलें ॥ तेणे देहभाव विकळ जाले : सुटल्या ग्रंथि ॥ ७६ ॥ एवं त्या मुक्तबंधना : अग्रंथि कबरशना ॥ गात होंत्साल्या नृत्यमाना : शोभलिया रासरंगि ॥ ७७ ॥ पारि त्यासि शोभा जे काहिं : स्वतंत्रें जालि नाहिं ॥ जेवि मेघचक्राचा ठाइं : वीजा झळकति ॥ ७८ ॥ तेवि तो घनश्याममुर्ति : तदाधारें त्या गोपी सती ॥ विद्युत्स्थानि विराजती : शुद्ध सत्वाथिल्या ॥ ७९ ॥ नाना तो तरुणीजन : बाधितां भासे भिन्न भिन्न ॥ भासतांहि असाधरण : कृष्णभक्तिमहिमा ॥ ८० ॥ एवं एकपणासि भंगु नाहिं : आणि प्रति गोपिचा ठाइं ॥ एकनिष्ठत्वेंहिं पाही : बहुंधा जाला ॥ ८१ पारि बहुत्व जे भासलें : तें कृष्णि नाहिं उपतिष्ठलें ॥ सकळ मेघ मिळोनि यकले : मेघ-चक्र जैसे ॥ ८२ ॥ तैशा विविधा त्या आकृति : पारि येकाचि कृष्णमुर्ति ॥ तया मेघःशामिं त्या युवती : सौदामिनी नेणों ॥ ८३ ॥ किंग कृष्णाख्य चिद्गग-नि : चिच्छक्ति अभ्रायितिनि ॥ तेथें चित् द्युति सौदामिनी : शोभल्या गोपी ॥ ८४ ॥असो श्रीकृष्ण प्रीत्यर्थ : तिहिं संपादिलें नृत्य ॥ आणि गीतकळा यथार्थ : निवेदिली श्रीकृष्णजीतें ॥ ८५ ॥ तया गीतांचें लक्षण : आइक राया सावधान ॥ ज्या गायनें प्रेममुर्ति कृष्ण : संतोशातें पावला तो ॥८६॥

**उच्चैर्जगुर्नृत्यमाना रक्तकंठ्यो रतिप्रियाः ॥**
**कृष्णाभिमर्शमुदिता यद्गीतेनेदमावृतम् ॥ ९ ॥**

त्या करित होंत्सात्या नृत्यातें : उच्चमाने गाइलिं गीतें ॥ तिहिं आवरुनि विश्रांतीतें : प्रेमास्पदें जालिं ॥ ८७ ॥ असो त्या गोपी कृष्णमना : ज्या वथोक्त नृत्यमाना ॥ गात्या जाल्या उच्चमाना : अनेका प्रकारें ॥ ८८ ॥ त्या उच्चस्वरें करुन : दुमदुमिलें भूमिगगन ॥ विश्व हि गेलें हारपोन : कृष्णा-नन्दमय जालें ॥ ८९ ॥ त्या तरुणी किंविशिष्टा : तारि रागोद्गारिं रंजि-तकंठा ॥ अतिप्रिया वैकुंठपिठा : श्रीकृष्णातें ॥ ९० ॥ अथवा त्या गोप-जाया : कृष्णीं बहुं रतिप्रिया ॥ ह्मणीजे इच्छिती भोगावया : वारंवार कृष्णातें

॥ ९१ ॥ असो करितां रागोद्धार : ते कंठ जाले रागाकार ॥ नाना तिहिं आलापिले स्वर : ते घुमघुमिले कंठि ॥ ९१ ॥ नाना स्वर जे उल्लेखिले : ते आधिं कंठि पक्क जाले ॥ मग त्या गांभिर्यें निवाले : बहि: प्रदेशीं ॥९३॥ त्या कळेतें प्रकटउन : तिहिं पूजिला श्रीकृष्ण ॥ मग कृष्णें गोपीतें संतोषान : अभिमर्शिलें स्वहस्तें ॥ ९४ ॥ जेणें त्या कृष्णाभिमर्शिता : संजादिल्या अति मुदिता ॥ जें जाल्या त्या हर्षिता : विकसितवदना ॥ ९५ ॥ नाना स्वरांचें मिश्र केलें : परि कृष्णातें कंठिं धरिलें ॥ तेणें माधुर्यासही आलें : माधुर्यें येथें ॥ ९६ ॥ ह्मणोनि त्या गीताविशिष्टा : कृष्णप्रेमारंजितकंठा ॥ संभोगप्रियी वैकुंठा : आवडल्या त्या ॥ ९७ ॥ मग त्या आवडीचेनि भरें : कृष्णें यशोदाकुमरें ॥ कुरवाळुनि निजकरें : परम संतोषातें पाववित्या ॥ ९८ ॥ तेणें संतोषें त्या नृत्यमाना : गात होत्साल्या अंगन ॥ तया गायनें त्रिभुवना : व्यापीलें सर्वत्र राया ॥ ९९ ॥

काचित्समं मुकुंदेन स्वारजातीविमिश्रिता : ।
उन्निन्ये पूजिता तेन प्रीयता साधुसाध्विति :
तदेव ध्रुवमुन्निन्ये तस्यै मानं च बह्वदात् ॥ १० ॥

त्यां माजि कोण्ही येक वनिता : श्रीकृष्णसंगें गीत गातां ॥ असो मुकुंद जो मुक्तिदाता : प्रत्यक्ष ब्रह्म ॥ २०० ॥ त्या मुकुंदेसहवर्तमान : तेथेंचि टेउनियां मन ॥ करित असतां उन्नयन : षट्ज्यादि स्वर-ज्यातिभेदाचें ॥ १ ॥ ते षड्जादि स्वर भेदें : उच्चस्वरें गाता ताल छंदें ॥ कृष्णगायनेंसिं अभेदें : नाना राग उच्चारीती जाली ॥ २ ॥ ऐसी जाणोनि निपुणता : तेणें संतोषोनि रमाभर्ता ॥ तियतें स्वरानुकारु करितां : भली भली ह्मणतिलें ॥ ३ ॥ तो स्वरोद्घोष कौलक्षण : जेणें जेणें मानवला श्रीकृष्ण ॥ तरि कृष्णें सहवर्तमान : जर्‍हि गायिलें तिया ॥ ४ ॥ तर्‍हि तियेचें तें उद्घोषित : कृष्णस्वरेंसिं आमिश्रित ॥ ह्मणजे कृष्णगायनेंसिं निवडत : अंतराळासि गेले ॥ ५ ॥ असो समागमें आलाप केले :

तऱ्हिं त्या गोपीचे स्वर निवडले ॥ उच्चमानें अतिक्रमिले : कृष्णस्वरातें तिहिं ॥६॥ राया तो सर्व कळावंत : जगद्गुरु जगन्नाथ ॥ परि त्यां स्वभक्तांतें मान देत : तयाचेनि मनःछंदें ॥७॥ आपुले स्वरातें आवरुन : त्या गोपिकेचें गायन ॥ उच्चतेसि पाउनः अत्यंय शोभविलें श्रीकृष्णें ॥ ८ ॥ जेवि परीक्षेतें अनुसरोन : परमासिद्धां पासुन ॥ शिष्य निजयुक्तिबळें करी न्युन : आचार्यपक्षातें ॥९॥ मग तियाचि आचार्योपास्ति : शिष्य जो जाला सुमति ॥ त्या शिष्याचा उपपत्ती : विशेषें विराजति ॥ १० ॥ असो आचार्यकृपामंडित : शिष्यें जो केला सिद्धांत ॥ तेणें आचार्यनिगदित : शोभेतें पावतें ॥ ११ ॥ तैसीचि तेहि गोपांगना : करिती जाली स्वरगर्जना ॥ कृष्णप्रेमाप्लुतमना : तद्गीतानुसर गातां ॥ १२ ॥ तान्हें कृष्णप्रेमाबळें : तिया जें स्वरमान नेलें ॥ तें नावेकसें आगळें जालें : श्रीकृष्णस्वरमानाहुनि ॥ १३ ॥ असो तेणें भक्तवेळायितें : सदां ऐसेंचि वर्तिजेतें ॥ रथीत्व देऊनि अर्जुनातें : सारथ्य केलें आपणें ॥ १४ ॥ राजदुतागमनकाळें : उद्धवशीक्षेतें अंगीकारिलें ॥ आणि गोपाळाचेनि बोलें : न केलें काई पां ॥ १५ ॥ असो स्वताह्रा श्रीकृष्ण : सर्व कळांचें उत्पत्तिस्थान ॥ सकळ मंगळायतन : सच्चिदानंदमूर्ति जो ॥ १६ ॥ आणि श्रीकृष्णाचा ठाइं : बुद्धिविलासु हा जो काहिं ॥ तो अर्थता जेथें नाहिं : कोण्हेही काळें किंचित् ॥ १७ ॥ हा भज्यभजनप्रकार : बोध्यबोधकव्यवहार ॥ प्रिय आणि तो प्रियकर : ऐसें विलासलें बहु ॥ १८ ॥ हें याचें अचिंत्य महिमान : वर्णील पां किती कवण ॥ आतां प्रकृत गुणगायन : करावें श्रीकृष्णाचें ॥ १९ ॥ वर्णुनि कृष्णगुणकीर्ति : वाचा करावी शुभवती ॥ रमवावी आपुलि मति : प्रेमगंगाकल्लोळीं ॥ २० ॥ असो हे कथाचि प्रस्तुत : निजगीतेंसिं अमिश्रित ॥ तिये गोपीचें आळापित : सुरस जालें बहुत ॥ २१ ॥ जाणोनि सुस्वर गायकेतें : निज प्रेमप्लुतें गोपितें ॥ तेणें प्रेमाळाचेनि कांतें : कृष्णें भलें भलें ह्मणतिलें ॥ २२ ॥ आतां तियेचें तें उन्नीत : सुस्वर जें उद्घोषित ॥ तेथें तदनुसार अपेक्षित : ध्रुवाख्य जो तालविशेष ॥ २३ ॥ तया ध्रुवता-

ळाचि संपादनां : त्या गीताचिमाजि केली जाणा ॥ जेणें तो यदुराणा : मानवे आपणयातें ॥ २४ ॥ असो आइकोनि तें उन्नीत : तालघोष राहिले तटस्थ : परि तियातिल छंद समस्त: गीताचि माजि दाविले ॥ २५ ॥ नाना तियेचें उच्चमान : नाना नाद पावले अवसान ॥ परि स्पष्ट विचारेंचि करुण (न) : तालभेद योजिले तिया ॥ २६ ॥ असो उमटतां छंदग्राम : ताल वाजवितां अति दुर्गम ॥ परि तिया दाविलि सुगम: ताल खता अवचि ॥२७॥ एवं करितां ध्रुवगायणा (ना): तेथें तालछंदग्राममूर्छना ॥ करुनि साहित्यकल्पना : ध्रुव प्रकटिला ॥२८॥ त्या ध्रुवतालातें दाविलें : तेणेंहि तें ब्रह्म सावळें ॥ संतोशोनि अत्यंत मानिलें : तिये गोपिकेतें ॥ २९ ॥ अहो कृष्णाची येकि कळा : तेथें सर्वरसवृत्तिमेळा ॥ आतां ऐसा कैंचा रस उरला : जो अन्यत्र सेविजे ॥३०॥ नाना रति जाली कृष्ण पाईं: मग अन्यापेक्षा वृथा काई ॥ जरि अन्य इच्छा चि नाहिं : तरि कृष्णसुख जोडे ॥ ३१ ॥ जे पाळे कृष्ण सुखातें : ते कां वर्तती पराक्पंथे ॥ प्रवृत्तिमार्गें कैंचें तयातें : कृष्णप्राप्तीसंगाचें सुख ॥ ३२ ॥ हे मदनमोहन मुर्ति : सर्व कामोपशांतिकर्ति ॥ तेथें जडली जे चितवृत्ती : ते जरि देहादिकिं भजेल ॥ ३३ ॥ मग कृष्णभक्तीची वार्त्ता : अवचियाचि होति वृथा ॥ कृपा न ये ।चि भगवंता : जन्मोनि व्यर्थ जाइजे ॥ ३४ ॥ असो प्रस्तुत येथें: त्या गोपीनें गाइलि कृष्णगीतें ॥ तेथेंचि छंदप्रासतालातें : दाविलें कौशल्य ॥ ३५ ॥ त्या गोपिकेसि नंदसुतें : सर्व कौशल्ये कळवंतें ॥ संतोषोनि त्या रमाकांतें : बहु प्रकारें सन्मानिलें ॥ ३६ ॥ ते जे सप्त स्वरप्रकार: निषाद ऋषभ गांधार ॥ षड्ज मध्यम धैवत स्वर : पंचम इत्यादि सप्त स्वर हे ॥ ३७ ॥ एवं नृत्यगीतादि करुन : श्रीकृष्णातें संतोषउन ॥ त्या गोपी पावोनि सन्मान : काये केलें तें आइकावें ॥ ३८ ॥

**काचिद्रासपरिश्रांता पार्श्वस्थस्य गदाभृत : ॥**
**जग्राह बाहुना स्कंधं श्लथद्वलयमल्लिका ॥ ११ ॥**

त्या माजि कोन्हि येकि सती : प्रसन्न देखोनि कृष्णमुर्ति ॥ अथवा नाहि जालि जाणति : कृष्णेसिं भिन्नत्व ॥ ३९ ॥ कांजें भिन्नत्वाचें कारण :

होतां देहादि अभिमान ॥ त्या देहभावातें सांडुन : ऐक्यता पावली कृष्ण ॥ ४० ॥ यावरि प्रारब्धानुवर्ति : जे काहिं भेदाची आकृति ॥ तिनुकीचि देहस्थितिगति : उरलि दृश्याकारें ॥ ४१ ॥ ऐशा व्यवहाराच्या ठाईं : कृष्णापरतें सेव्य नाहिं ॥ ग्राह्यग्राहकता जे काहिं :ते कृष्णसेवोपकारि मात्र ॥ ४२ ॥ यास्तव बाह्यवृत्ति करुन : केलें नृत्यगीत सलक्षण ॥ प्रसंन्न होतांचि श्रीकृष्ण : अलौकिका जालि ॥ ४३ ॥ नाना नृत्यादिकें करुन : श्रम आले जे घडोन ॥ त्या श्रमोविकारि समाधान : कृष्णि पावलि तत्काळ ॥ ४४ ॥ तया समाधान तेथें : ते सरली तारतम्यांतें ॥ तथापि संस्कारें कृष्णातें : आलिंगावया गेलि ॥ ४५ ॥ असो निजबाहुकरुन : देवों गेलि आलिंगन ॥ तव अवचितें जालें ग्रहण : कृष्णस्कंधाचें ॥ ४६ ॥ ते होती जिया कृष्ण सत्ता : तो कृष्ण पाठिसिं उभा होता ॥ त्याच्या स्कंधातें ते श्रान्ता : धारिती जाली ॥ ४७ ॥ येथें पार्श्वस्थ बोलोनि कृष्ण : सूचिलें प्रत्यक्ग्रहण ॥ वृत्तीचें विश्रान्ति सदन : दाविलें प्रत्यगूरुपिं ॥ ४८ ॥ राया ह्मणसि ते सुंदरा : रत जाली नंदकुमारा ॥ तरि ते कैसि कामाचारा : प्रत्यक्त्वें भजी-नली कृष्णि ॥ ४९ ॥ तरि तो नव्हे नंदकुमार : साक्षात् विष्णु गदाधर ॥ केवळ नारायणावतार : श्रीकृष्णाकार ब्रह्ममूर्ति ॥ ५० ॥ ऐसें जाणोनि ते युवति : कृष्णि योजली पराक्स्थिति ॥ तियेची नाहीं जाली मति : जें हा नन्दकुमार कृष्ण ॥ ५१ ॥ असो ग्राम्यबुद्धी करुन : तो नहिं रतला गोपी-जन ॥ कृष्ण जाणोनि कामोपशमन : शरण आला त्यातें ॥ ५२ ॥ श्रीकृ-ष्णाचेनि सांगातें : मदन पावावया वृद्धीतें ॥ त्या नाहिं आल्या येणें मतें : शरण श्रीकृष्णातें ॥ ५३ ॥ त्या प्राकृत भावें असत्या : तरि कां कृष्णातें आवडल्या ॥ गोपी आप्ता कां होत्या : अवाप्तसर्वकामातें ॥ ५४ ॥ ह्मणोनि ते गोपी श्रांतचित्तें : पार्श्वस्था श्रीकृष्णाजितें ॥ वश जाली त्याचिया खांदातें : धरुनि निजहस्तें ॥ ५५ ॥ येथें उत्प्रेक्षा जे केलि : ते साच चि घडोनि आलि ॥ तिहिं सगुण रुपेंचि साधिली : सायोज्यता ह्मणोनि ॥ ५६ ॥ अहो अनादरुनि सगुण : साधुं ह्मणती शास्त्रज्ञ ॥

तेणें पाविजे समाधान : हे काय घडे सर्वथा ॥ ५७ ॥ सेविली नाहिं रमण मूर्ति : तवं निरसेना देहाहंकृति ॥ जन्ममरणाचिया पंक्ति : निरसती ना तंवरि ॥ ५८ ॥ येणें निमित्तें ते युवती : नृत्यगीतश्रांत होंतसाती ॥ स्कंधातें जाली धरिती : पार्श्वगत श्रीकृष्णाचिया ॥ ५९ ॥ देहभावातें विसरली : ती कैसी येथें जागवली ॥ तरि कंकणें निकळें जाळिं : सुटलिया मल्लिका ॥ ६० ॥ असो करितां रास नर्तन : श्रीकृष्णिं विरालें मन ॥ ते जाली गलिताभिमान : सांडिला कटाक्ष हा ॥ ६१ ॥ तेणें कंकणें श्लथें जालिं : सुटली माथाची पुष्पावळि ॥ जेवि युत्थाना पावुनि आली : समाधीसि वृत्ति ॥ ६२ ॥

**तत्रैकांसगतं बाहुं कृष्णस्योत्पलसौरभम् ॥**
**चन्दनालिप्तमाघ्राय हृष्टरोमा चुचुम्ब ह ॥ १२ ॥**

तवं त्यांत येकि युवती : पावोनि तांडवोपरति ॥ कृष्ण बाहुतें हुंगीत होंतसाती : चुम्बिती जाली तेथें ॥ ६३ ॥ झगसी तांडव निवृत्ती : ते पावली कृष्णिं विश्रान्ति ॥ मग बाहुचुम्बनि प्रवृत्ति : कां जाली तियेची ॥ ६४ ॥ तरि तो बाहु निजसंगत : प्रवृत्ती अपेक्षारहित ॥ प्रमादादि विगलित : स्वरुपानुभवीं जेवि असे ॥ ६५ ॥ तेवि ते असतां नृत्यवती : कृष्णें कवळिली होती ॥ कृष्णकरेंसि संगति : पूर्वीच असतांहिं ॥ ६६ ॥ तया निजस्था बाहुतें : अवघ्राणोनि चुम्बिलें तेथें ॥ जेवि समाधिस्थ योगी वस्तुतें : स्वानुभवें सेविती ॥६७॥ विशेषणान्तरें करुन : त्या बाहुचें आइका लक्षण ॥ तरि तो वनमाळी कृष्ण : कमळमाळायुक्त ॥ ६८ ॥ त्या कमळिं निजदृति : कृष्णदेहिं अर्पिली होती ॥ त्या सुगंधा बहुतें युवती : हुंगोनि चुंबिती जाली ॥ ६९ ॥ नाना गोपीचित्तें प्रेमळें : कृष्णकंठिं होतिं कमळें ॥ तया सौगंध्यें वेधिलें : सर्व शरीर कृष्णाचें ॥ ७० ॥ त्या सुगंधा बाहुसेवेप्रति : पात्र जाली ते युवती ॥ येऱ्हविं सेव्यसेवनगति : कृष्णाचा ठाईं कैंचि ॥ ७१ ॥ असो तें जें बाहुचुंबन जाण : केलें अवघ्राण करुन ॥ कां जें कृष्णांगिं विलेपण ( न ) ; चंदनाचें सर्वत्र ॥ ७२ ॥ तया सचंदना बाहुतें : अवघ्राणुनि

चुंबनातें ॥ करुनि ते विश्रांतीते : पावली गोपिका ॥ ७३ ॥ जेवि सदाचारें करुन : ईश्वरें भजती भक्तजन ॥ भगवंतिं असोनि शरण : बहु तरले सन्मार्गें ॥ ७४ ॥ विचारुनि सप्रदायातें : भक्त भजती श्रीहरीतें : तेवि भक्तार्पितचंदनातें : हुंगोनि ते गोपी ॥ ७५ ॥ हृष्टरोमा होत्साती : कृष्णबाहुतें जाली चुंबिती ॥ असो अत्यंत श्रमली होती : कृष्णवियोगें ॥ ७६ ॥ आजि साधुनि कृष्णातें : निस्तरली जन्मशतकृतें ॥ वोवाळिलें आपणातें : त्या सुखा वन्हुनि ॥ ७७ ॥ एवं ते गोपिकाशतें : श्रीकृष्णावरुनि जीवितें ॥ वोवाळुनियां तयातें : आप्त जालि बहु ॥ ७८ ॥ आतां त्या आप्तत्वाचें उचित : जाणोनि तेणें त्वरित ॥ काय केलें तें प्रस्तुत : अवधारिं राया ॥७९॥

**कस्याश्चिन्नाट्यविक्षिप्तकुंडलत्विषमंडितम् ॥**
**गंडं गंडे संदधत्या अदात्तांबूलचर्वितम् ॥ १३ ॥**

राया कोण्ही येकि युवती : तांडवा पासुनि निवृत्ति ॥ पावोनियां जाली भजती : अति निकट कृष्णेसिं ॥ ८० ॥ ॥ जियेचि नाचतां दोन्हि : कुंडलें झळकालें कानी ॥ ते कुंडलप्रभा येउनि : गंडस्थळि विराजली ॥ ८१ ॥ ते कुंडलप्रभामंडित : गंडस्थळ जें प्रभान्वित ॥ असो जें तेजस्कर संमत : कृष्णगंडेसिं जालें ॥ ८२ ॥ असो हे नृत्यगीतलहरी : ते कृष्णप्रेमासागरिं ॥ उठिली तेणें ते व्रजसुंदरी : अतिशयें शोभली ॥ ८३ ॥ तया प्रेमोद्रेकबळें : आंदोळलिं दोन्हीं कुंडलें ॥ तें कुंडलतेज विस्फोरलें : गल्लप्रदेशाचा ठाईं ॥ ८४ ॥ ते सतेज गंड जें काहिं : ठेविलें कृष्णगंडाचा ठाई ॥ तें कृष्णकपोलहि पाहिं : उक्तविशेषणयुक्त चि ॥ ८५ ॥ अनुसरोनि गोपीनृत्यातें : कृष्णेंहिं नृत्य केलें होतें ॥ त्या नृत्य वेगें चलनातें : पावलिं कुंडलें तें हिं ॥ ८६ ॥ त्या कुंडलाची जे दीप्ति : ते आली गंडस्थळाप्रति ॥ नाना कुंडलप्रभा ते किंतिः कृष्णप्रभेचा पाडें ॥ ८७ ॥ या लागी कृष्णें निजकान्ति : संर्पीली कुंडलां प्रति ॥ तें कुंडलें हिं जालिं अर्पिति : ते चि प्रभा कृष्णातें ॥ ८८ ॥ तत्रं ते गोपी नृत्यवति : पाहों गेली तत्प्रभासंपत्ति ॥ तत्काळ तें निजविस्मृति : विसरली नृत्यातें ॥ ८९ ॥ जेवि सूर्याचिया दीप्ती :

निवडेचिना चंद्रज्योति ॥ ना तरि चंद्रोदयीं संपत्ति : निवडेना नक्षत्रांचि ॥ ९० ॥ जेवि पाहतां कृष्णवदन : निज विलासातें विसरोन ॥ कृष्ण शोभेमाजि मिळोन : गेली ते तत्काळ ॥ ९१ ॥ जेवि चिदाभासाचेनि हातें : देहगेहादि दृश्यातें ॥ चैतन्यें प्रकाशिजेतें: आपुले प्रकाशेंकरिं ॥ ९२ ॥ त्या चैतन्यें जीवत्वभूतें : देहिंच जालें शोभिजेतें ॥ मग तो जिव निज रुपातें: अवलोकितां चि ॥ ९३॥ सांडुनि तें जीवपण : निजसत्तेसि जाये मिळोन ॥ जेथें प्रकाश्यप्रकाशकभान: हारपोनि जाये सर्वहि ॥ ९४ ॥ तैसेंचि येथेंहिं काहिं : योजिलें गोपिकेसि पाहिं ॥ कृष्णगंडस्थळाचा ठाइं : निज गंडातें ठेउनियां ॥ ९५ ॥ निज शोभेचिया संपात्ति : लाजोनि ते गोपयुवती ॥ श्रीकृष्णि जाली मिळती : मिष करुनि काहिं एक ॥ ९६ ॥ असो हे गुढार्थ व्युत्पत्ति : प्रकट कथा वर्णु आइती ॥ तिया कृष्णमुखाप्रति : आणिलें आपुलें मुख ॥ ९७ ॥ अपेक्षुनि तांबूलचर्वितातें : वोडविलें निज मुखातें ॥ अपेक्षुनि महावाक्यातें : मुमुक्षु जेवि वर्तती काहिं ॥ ९८ ॥ गुरुचिया मुखा निकट : शिष्य आणिति श्रवणपुट ॥ तेविचि येथेंहि प्रकट : योजलें त्या गोपीकेतें ॥ ९९ ॥ मग राया तेणें रमाकांतें : तांबूल जे चाविले होते ॥ ते त्या मुखनिकटे गोपीतें : देईजेते जाहले ॥ २०० ॥ नाना तेणें मिषें करुन : त्या निजरुळें गोपी लागुन ॥ आपुलें अधरामृतपान : करविजेतें जाले कृष्णें ॥ १ ॥ कां जें तो कृपाळुवांचा नाथ : जाणोनि तियेचा भावार्थ ॥ त्या भावासि उचितार्थ : तांबुल हि दिधले ॥ २ ॥ जेवि देखोनि शिष्यभावार्थ : सद्गुरु जे करुणावंत ॥ त्या शिष्यातें निजानुभूतार्थ : आत्मत्वें अर्पिति ॥ ३ ॥ तेवि तो रमारमण : तिये गोपिके करउन ॥ करविता जाला चर्वण : चर्विता तांबूळाचें ॥ ४ ॥

**नृत्यंती गायती काचित्कूजन्नूपुरमेखला ॥**
**पार्श्वस्थाच्युतहस्ताब्जं श्रांताधात्स्तनयोः शिवम् ॥ १४ ॥**

अन्य येकि गोपी नाचती : आणि गातही होंत्साती ॥ वर्णितां कृष्ण गुणकीर्ति : प्रेमोत्सुका जाली ॥ ५ ॥ असो जाणोनि तन्माहिमान :

उत्सुक जालें गोपीमन ॥ जें या सुखरूपीं मिळोन : सर्व प्रकारें असावें सदां ॥ ६ ॥ यावत् उपाधिबाध : हा जो आभासिक भेद ॥ त्याचा होउनि अपवाद : तुटोनि जावो आतां सत्वर ॥ ७ ॥ ऐसी उत्सुक जाली चित्तिं : परि यावत्प्रारब्धनिवृत्ति ॥ काहिं येक भेदाची आकृति : न मोडे कदां ॥ ८ ॥ तथापि औत्सुक्यें करुन : निजपार्श्वस्थ जो श्रीकृष्ण ॥ जिये सत्तेकारें आपण : क्रीडत होती ॥९॥ त्याचा हस्ताब्जाचा ठाइं : लीलापद्म होतें जें कांहिं ॥ त्या अच्युतहस्ताब्जातें पाहीं : धरुनि स्वंकरें ॥ १० ॥ निजकुचयुगाचा ठाइं : ते ठेविती जाली पाहिं ॥ नाना त्या हस्ताब्जाते हृदइं : धरिलें तिया ॥ ११ ॥ नातरि ते लीळाकमळ : श्रीकृष्णाचें कौतुहळ ॥ जेणें मिषें हे जगजाळ दाविलें निजांगिं ॥ १२ ॥ नाना त्या कमळाकृति : हे विश्वलीलांत : पाति ॥ ते लीळा दावि निज-हास्तिं : स्वकटाक्षलेश ॥ १३ ॥ असो ते लीलाविडंबन : दाविलें आपणा अधीन ॥ आणि सर्व सांडुनि शरण : आपणासि जे येति ॥१४॥ तयांप्रति हें जगजाळ : निजमायाकौतुहल ॥ ऐसे दावावया तें कमळ : गोपीहस्तगत केलें तेणें ॥१५॥ असो कृष्णि मिळाली सती : तेणें कमळ आलें हातिं ॥ त्यातें जाली धरिती : निज हृदयाचा ठाइं ॥१६॥ त्या कमळासि कृष्णसंग : म्हणोनि केला परिष्वंग॥ त्या आळिंगनें निजअनंग : लाजविला तिया ॥१७॥ असो ते हृदइं धरुन : उपशमीला स्वमदन ॥ तें कमळ म्हणाल किंलक्षण : तरि शिव जे सुखरुप ॥ १८ ॥ ह्मणिजे सदानन्दरूप : स्पर्श मात्रें सर्व सन्ताप ॥ नाशोनि श्रीकृष्णस्वरुप : भजतयां भक्तांतेंकारे ॥ १९ ॥ कां हें जे विशेषवृत्ति : कृष्णीं न मिळे प ती ॥ तंवरि कैंचि सुखप्राप्ति : विषयलंपटा जीवातें ॥ २० ॥ म्हणोनि ते गोपीसुजान (ण) : स्वकुचिं कमळातें धरुन ॥ स्वता श्रीकृष्णिं मिळोन : पावलि आनन्द ॥ २१ ॥ कां जें कृष्णप्राप्तीचें लक्षण : जें सन्तापाचें शमन ॥ या कारणें त्यातें आलिंगुन : फेडिला सन्तापं ॥ २२ ॥ नाना तें गोपिकाशतें : पाहोनि कृष्णवदनातें ॥ पूर्वी च तापनिवृत्तीतें : पावलिं होतिं अवघिं हिं ॥ २३ ॥ परि उत्सुकता जे काहिं :

तोचि जाली तापाचा ठाइं ॥ मग कमळातें हृदंई : धरुनि नाशिला सन्तापु ॥२४॥ एवं शिवरूप म्हणोन : कमळाचें केलें विशेषण ॥ त्याचें ऐसें दाविलें लक्षण: काहिं एक यथामति ॥२५॥आतां कमळ कुचिं धरिती : ते किंविशिष्टा युवति ॥ तरि नुपुरें पाई होतिं : आणि मेखळा जे कटिसुत्र ॥ २६ ॥ तांडव करितिये वेळे : त्या नूपुरिं गजर केले ॥ आणि मेखळासंबंधि जाले : क्षुद्रघंटिकानिनाद ॥ २७ ॥ ह्मणोनि ते व्रजबाळा : कूजन्नूपुरमेखळा ॥ प्रिया ही जाली तमाळनीळा : कुचिं पद्म धारणें ॥ २८ ॥ एवं आधिष्ठुनि रमाभर्ता : क्रीडत्या जाल्या गोपकांता ॥ त्या वर्णि पूर्वोक्ता : दोनि चारि मुख्य मुख्या ॥ २९ ॥ आतां येणें लक्षणें करुनः तो अवघा हि गोपीजन ॥ क्रीडला तें हिं वर्तमान : संक्षेपें आइक राया ॥ ३० ॥

**गोप्यो लब्ध्वाच्युतं कांतं श्रिय एकातवल्लभम् :**
**गृहीतकंठ्यस्तद्दोर्भ्यां गायंत्यस्तं विजह्रिरे ॥ १९ ॥**

ऐशा सर्वा ही कृष्णकामिनी: भाग्याच्या व्रजवासिनी ॥ इच्छाकांतातें पावोनि : नंदानंदना कृष्णातें ॥३१॥ त्या कृष्णातें गात होत्सात्याः रासरंगी जाल्या रमत्या ॥ श्रीकृष्णप्रेमातें भोगित्या : एकसरें यथेष्टा ॥ ३२ ॥ किंविशेषणा त्या सुंदरी : तरि कृष्णें निजबाहुकरिं ॥ तिष्ठोनि दों दोवीं माझारि: दों दों हस्तिं वेगळाल्या ॥ ३३ ॥ कंठि धारिल्या होत्सात्या : तया कांतातें गात गात्या ॥ तेणेंसि जाल्या क्रीडत्या : रासरंगा माझारि गोपी ॥ ३४ ॥ एवं भगवत्प्राप्ति ही वारि : भक्तांची वर्तती हेचि परि ॥ भगवत्सेवनें चि नरिं : क्रमावा काळ सर्वदा ॥ ३५ ॥ निजऐक्यलें करुन : श्रवण मनन कीर्तन ॥ भगवंताचे चि अनुचिंतन : करिती भगवद्भक्त ॥ ३६ ॥ राया बाधिता भासमुळ : मुक्ताचें असावें होंचि शीळ ॥ या हेतु गोपीमंडळ: रमविलें श्रीकृष्णें ॥ ३७ ॥ नातरि येणेंचि निमित्तें : निदिध्यासाचें दृढतेतें ॥ अनुलक्षुनि गोपिकांते : खेळविलें रंगिं ॥ ३८ अन्यथा हे बाधित भान : विक्षेपाचें चि कारण ॥ ह्मणुनि हरिगुणवर्णुन : निर्विक्षिप्त असावें ॥ ३९ ॥ या चि हेतु तो गोपीजन : असोन हिं तत्संनिधान ॥

नृत्यगीतादिकिं करुन : संतोशविता जाला ॥ ४० ॥ ह्मणसी कृष्णसंगें कांता : त्या पावलिया निजार्था ॥ मग कां संनिध असतां : क्षोभकारिणी जाल्या ॥ ४१ ॥ ऐसें ह्मणसी प्रस्तुत : तरि तो साक्षात् किं अच्युत ॥ जो काळभइं विपरित : आपुले निष्ठसि नव्हे ॥ ४२ ॥ राया लोकत्रयाचा ठाइं : कृष्णें वांचुनि सत्य नाहिं ॥ आतां निज-विलासिं काइ : तो आसक्त होइल ॥ ४३ ॥ नाना हें हिं असो आतां : तो श्रीवल्लभ लोकभर्त्ता ॥ ज्यातें एकांतिं सिंधुसुता : सेवित असे निरंतर ॥ ४४ ॥ तेथें नव्हे जो आसक्त : त्यासि हें काये गोपीशत ॥ तरि भक्ति बळें जाले आप्त : तें विकारास्पद कैसें ॥ ४५ ॥ असो कृष्णाचे जे नव्हति : तेथें कामादिप्रवृत्ति ॥ आणि कृष्णातें जे स्मरति : ते निःकाम जाणावे ॥४६॥ त्यासि गोपिकांचेनि संगें : काइ क्षोभविजेल अनंगें ॥ त्यांतें भोगुनि निज रंगें : अवाप्तकाम जो ॥ ४७ ॥ एवं तें कृष्ण कामिनीशतें : गाउनिया कृष्ण गीतें ॥ कृष्णप्रेमाभरितचित्तें : क्रीडतिं जालिं कृष्णसंगे ॥ ४८ ॥ ऐसें पुर्वोक्त लक्षण : केलें रासरंगाचें वर्णन ॥ आतां प्रकारांतरें करुन : व-र्णिजेतें तें चि ॥ ४९ ॥

**कर्णोत्पलालकविटंककपोलघर्म-**
**वक्त्रश्रियो वलयनूपुरघोषवाद्यैः ॥**
**गोप्यः समं भगवता ननृतुः स्वकेश-**
**स्रस्तस्रजो भ्रमरगायकरासगोष्ठ्याम् ॥ १६ ॥**

तरि आता त्या कृष्णमनाः व्रजवासिनी गोपांगना ॥ ज्या वदनशोभासंपन्नाः तिये रास सभेचा ठाइं ॥ ५० ॥ श्रीकृष्णाचेनि सांगातें : करित्या जाल्या नृत्यातें ॥ त्या माजि सर्वांहिं कळातें : दावित होत्सात्या ॥ ५१ ॥ त्यात मुखशोभेचि निमितें : तें हिं वर्णिजेताति येथें ॥ जिया मुखशोभा रासातें ॥ आणीलि शोभा ॥ ५२ ॥ तरि त्यांचिया कर्णप्रांतिं : कमळें जे खोविलिं होतिं ॥ त्या पद्मशोभा मुखकांति : विकसली बहु ॥ ५३ ॥ तें पद्मशोभाविकासितें : सुंदरें मुखें प्रशस्तें ॥ आणि केशभुषागें शोभिनें :

कपोळें जें मुखाचिं ॥ ५४ ॥ असो त्या कुरळांचि हारि : आली गंडस्थळा वरि ॥ ते तेथें भूषणाचे परिं : मिरविले कुरळ केश ॥ ५५ ॥ तें जें केश-युक्तें कपोळें : तियें मुखश्रीयेतें प्रकटिलें ॥ आणि घर्मबिंदुही आले: तयां मुखाच्या ठाईं ॥ ५६ तें जें घर्मयुक्तें वदनें : जाळिं श्रियेचिं सदनें ॥ जयातें देखोनि मदने : लज्जेतें पाविजेतें तत्काळ ॥५७॥ असो त्या गोपी कृष्णचित्ता : श्रीकृष्णाचे गुण गातां ॥ कृष्ण प्रेमरंगिं नाचतां : महोत्सवें भरलिया ॥५८॥ तया महोत्सवाचेनि बळें : तिये शोभेचि अंकुर आले ॥ ते अवघे उपतिष्ठले : वदनाचा ठाईं ॥५९॥ तिया वदनशोभामंडना : रासप्रसंगिं गोपललना ॥ शोभल्या कृष्णप्रेमसंपन्ना : महासंभ्रमयुक्ता ॥६०॥ आनि(णि) कत्या व्रजवनिती : ह्मणसि किंविशेषणयुक्ता ॥ त्या रासोत्सवि नाचतां : सुटले जे केश ॥ ६१॥ त्या अलकां पासुनि सकळा : सुटलिया सुमनमाळा ॥ त्या मुक्तपुष्पकेशा अबळा : शोभलिया बहु ॥ ६२ ॥ असो कृष्णसंगातें इच्छुनि : मनोवृत्ती येकवटुनि ॥ सम्पादिली अव्यभिच्यारिणी : साधनस्वरुपा भक्ति ॥ ६३ ॥ परिच्छिन्न स्वभावें करुन : जालें जें कृष्णावलम्बन ॥ तेंचि भक्तिचें साधन : आभासनिवृत्तीचें ॥ ६४ ॥ एवं ते परिछिन्नमति : तदाकारें ते अळकग्रंथि ॥ सुटोनि त्या सुमनोवृत्ती : मिळालिया श्रीकृष्णिं ॥ ६५ ॥ ऐसेया लक्षणें करुनि: तयां मुक्तकेशा पासुनि ॥ त्या सुमनमाळा सुटोनि : श्रीकृष्णिं समर्पलिया ॥ ६६ ॥ एवं त्या केशस्रस्तस्रजा : गात होत्सात्या नंदात्मजा ॥ अविष्टुनि राससमाजा : नाचल्या जाल्या गोपी ॥ ६८ ॥ किंवा नेच्छुनि सहायातें : रास पावला उत्सवातें ॥ परि अपेक्षित जाला तेथें : पुष्पांचा अति वर्षाव ॥ ६९ ॥ यास्तव केशग्रंथा पासुनी : विलंबिनी माळा सुटोनी : त्या येथें पुष्पवृष्टिस्थानिं : योजलीया राया ॥ ७० ॥ आतां कीर्तीं त्या तांडवातें : वाद्यें हिं जालिं अपेक्षितें ॥ तेंहि संपादलिं समस्तें : त्या नृत्याचाचि ठाईं ॥ ७१ ॥ तारि संपादिता नृत्यकळा : करिं होत्या कंकणमाळा ॥ त्या चळण पावतां उठिला : त्यां पासुनि नाद ॥ ७२ ॥ तो जो काहिं वलय-ध्वनि : रंगिं योजला वाद्य स्थानि ॥ आणि नूपुरें होतिं चरणिं : तियां गोपी-

कांचिया ॥ ७३ ॥ ते हिं पावतां चळनातें : प्रसवालिं सुस्वरा नादातें ॥ तो नादहि योजला तेथें : वादित्र जे सारंगिरथानिं ॥ ७४ ॥ तैसाचि घोष-पदें करुनि : कटिसुत्रिं होत्या किंकीणी ॥ त्या क्षुद्रघंटिका पासुनि : उत्पन्न जाला घोष ॥७५॥ तो जो घागारीया घोष : योजला मृदंगविशेष ॥ इत्यादि ध्वनितिं संतोष : पावविला श्रीकृष्ण ॥ ७६ ॥ एवं वल्यादि वाद्यें तिन्हि : ताळवीणामृदंगस्थानिं ॥ तिहिंसिं तिया कामिनी : नाचत्या जाल्या ॥ ७७ ॥ नाना कृष्णिं समर्पुनि चित्तें : करित्या जाल्या नृत्यातें ॥ अनाहत नाद तेथें : प्रकटले अकस्मात ॥ ७८ ॥ असो सम्पादिता कृष्ण-प्राप्ति : मुख्य साधन : कृष्णप्रीति ॥ त्या प्रितीमाजी सम्पादति : साधनें अवधिं ॥ ७९ ॥ श्रीकृष्णिं भक्ति जडली : तरि हे यात्राचि सफळ जाली ॥ कर्तव्यताचि सरोनि गेलि : मग श्रम कैंचे ॥ ८० ॥ राया त्यां भक्ताचा ठाइं : प्रचार जो भासतसे पाहिं ॥ त्या माजि न संचरे कांहिं : स्वधर्मत्याग-दोष ॥ ८१ ॥ ते भक्त कामिं नसोनि रति : सर्वत्र उदास असति ॥ सांडुनि भगवद्भक्ति : नव्हती विधितत्पर ॥ ८२ ॥ ऐसे जे अनासक्तशीळ : त्याचा विधिहि नव्हे विकळ ॥ वेदाज्ञेसि प्रतिकुळ : नव्हती सर्वथा ॥ ८३ ॥ स्वजा-तिचिया भेदेंकरिं : ते नव्हती परधर्माचारि ॥ ज्या धर्माचा जो अधिकारि तेथेंचि वर्ते ॥ ८४ ॥ हे असो विस्तारकथा : त्या कृष्णचित्ता गोपकांता ॥ नृत्यातें कारित असतां : त्या राससभेमाजि ॥ ८५ ॥ अनायासें चि करुनि : सम्भवले वल्यादि ध्वनि ॥ ते योडवले वादित्रस्थानिं : सुस्वर वीणाताळबद्ध ॥ ८६ ॥ आतां त्या सभेच्या ठाइं : शोभा वर्णिली जे कांहिं ॥ ते सभावि-शेषण काइ : किंलक्षण जारि ह्मणसि ॥८७॥ नाना नृत्य यावया व्यक्ति : योजली वाद्यसंपत्ति ॥ परि गायकहि पाहिजेति : त्या तांडवसमईं ॥ ८८ ॥ तरि नाचतां त्या वेल्हाळा : सुटल्या त्या पुष्पमाळा ॥ त्या कुसुमाश्रमें जो आला : भ्रमर समुदाये तेथें ॥ ८९ ॥ तो स्वार्थातें विसरोन : त्या नृत्याचा ठाईं लुब्धमन ॥ श्रीकृष्णाचें गुणगायन : कारिता जाला सुस्वर ॥९०॥ असो ते भ्रमरपंक्ति : तो महोत्सव भारोनि चित्तिं ॥ वर्णिता जाली गुणकिर्ति :

राया श्रीकृष्णाची ॥ ९१ ॥ ते स्वभावें जर्‍हि मूढ : तर्‍हि गायक योजले प्रौढ ॥ तेणें तो रचला सुदृढ : समारंभ नाट्याचा ॥ ९२ ॥ ते जाचि मुढमति : परि भक्तांचिया संगती ॥ सांडुनि विषयांची रति : अत्यंत सुबुद्धि जाले ते ॥ ९३ ॥ नाना तिहिं नृत्यसंबंधिं : संपादिला गायनविधि ॥ मुढ स्वभाव परिसुबुद्धि : ते जाले भक्त समागमें ॥ ९४ ॥ त्या मतिकौशल्यें करुन : शोभलें तांडवगायन ॥ तेणें तिहिं साविला श्रीकृष्ण : त्या गोपिकाचेनि समागमें ॥ ९५ ॥ एवं तो गोपिकाजन : भगवंतें सहवर्तमान ॥ नाचता झाला सगायन : वल्यादि संगे रासरंगाचा ठायिं ॥ ९६ ॥ नाना सर्वत्र असे कृष्णसंग : परि गोपीचा तेथेंचि अनुराग ॥ तेणें विशेषे तो रंग : वोडवला तेथें राया ॥ ९७ ॥ अहो कृष्णेंसिं संगति नाहिं : ऐसा पदार्थ असे काई ॥ परि प्रीति न जोडे कृष्णपाईं : उबगोनि विषयातें ॥ ९८ ॥ तंवरि कृष्णसंगाचें सुख : नेणती विषयासक्त मुर्ख ॥ या कारणें धन्ये होचि देख : कृष्णिच रतले ॥ ९९ ॥ असो हा भाग्याचा गोपीजन : श्रीकृष्णे सहवर्तमान ॥ तो रासमहोत्सव संपन्न : नृत्य करिता जाला ॥ ४०० ॥ एवं रासरंगामाझारि : श्रीकृष्णाचिये शोभेकरिं ॥ शोभलिया त्या व्रजसुंदरी : तें वाखाणिलें ऐसें ॥ १ ॥ असो हारिविलास जो काहिं : यासि अणुहि स्वातंत्र्य नाहिं ॥ भगवन्माया-प्रवाहिं : जैसें हें जग शोभतें ॥ २ ॥ तैसें चि हें हीं क्रीडाजात : येथें सत्ताभूत भगवंत ॥ कृष्ण परमार्थें प्रस्तुत : विचारितां निर्विशेष वस्तु हे ॥३॥ त्यासि हा विलास शोभवणें : तो मायाप्रवाह आचरणें ॥ परि स्वता हें जें करणें : तें अकर्तृत्व सत्तेकरिं ॥ ४ ॥ आतां उत्तरश्लोकें करुन : ऐसेंचि दाविलें महिमान ॥ तिहिंसिं रमला नंदानंदन : तें आइक राया ॥ ५ ॥

एवं परिष्वंगकराभिमर्शनै:
स्निग्धेक्षणोद्दामविलासहासैः ॥
रेमे रमेशो व्रजसुन्दरीभि-
र्यथार्भकः स्वप्रतिबिम्बविभ्रमः ॥ १७ ॥

एवं या प्रकारें करुन : जैसा काहिं तो गोपिकाजन ॥ भगवंतेंसिं विराजमान : क्रीडला रासरंगाचा ठाइं ॥ ६ ॥ तैसाचि तोही त्या सुन्दरीसिं : बहु शोभला कृष्ण सुखराशि ॥ जैसा उडुगणेंसिं शशी : विराजतसे गगनिं ॥७॥ असो त्यां गोपिकांसि मिळोन : तो रमेश नन्दानन्दन ॥ श्रीकृष्ण लक्ष्मीपरिणयन : रमता जाला रासरंगि ॥ ८ ॥ येथें रमाधीश हे खुण : दाविला असंगोदासीन ॥ त्या कृष्णासिं हा गोपीजन : भक्तित्वें चि आवडला ॥ ९ ॥ रमा जेथें पदसंवाहिनी : तेथें काय व्रजवासिनी ॥ केवळ राणटा गौळिनी : सौन्दर्य तें किति ॥ १० ॥ पारि कृपाकलितचित्तें : रमेश वश होउनि त्यातें ॥ व्रजसुन्दरीचेनि सांगातें : रमता जाला येथेष्ट तो ॥ ११ ॥ येऱ्हविं त्या प्रेमास्पदीं काहीं : रमावया दुजेंचि नाहिं ॥ तेणें रमिजे आणिके ठाइं : ऐसें काय वस्तु असे येथें ॥ १२ ॥ येणें अभिप्रायें रमेशें : तिया प्रेमळाचेनि सौरसें ॥ रमिजेते जालें काहिं ऐसें : भासोनि आलें नावेक ॥ १३ ॥ तें जें संभोगलक्षण : तरि परिष्वंग जो आळिंगन ॥ त्यां गोपीतें प्रेमें करुन : पोटेंसिं दृढ कवळिलें जें ॥ १४ ॥ आणि जो कराभिमर्ष : ह्मणजे केला कुचयोनीस्पर्श ॥ तैसाचि स्निग्धेक्षण लेश : जें प्रेमावलोकन ॥ १५ ॥ असो पाणिस्पर्शें त्यांतें : सूचिलें निज संभोगातें ॥ जेविं करस्पर्शें अनुभवातें : शिष्यासि दाविती गुरु ॥ १६ ॥ आणि अवलोकन मिषें : वारिलें भिन्नभावपिसें ॥ आपण वेगळें सर्व त्यांतें : दाविलें अर्थ शुन्य विश्व ॥ १७ ॥ नातरि करस्पर्श करुन : त्यांतें केलें सावधान ॥ अवलोकनें त्यांचें मन : आणिलें आपुले ठाइं ॥ १८ ॥ आणि दृढालिंगनरीती : दाविली निजसंगप्रतीति ॥ आणि उद्दाम विलासगति : सूचिलें संभोगातें ॥ १९ ॥ असो उदारभोगविलास : जे अधरकुचिं नखदंतदंश : जिहिं विरतांचें मानस : उत्सुकता पावतें ॥ २० ॥ जिहिं विलासिं करुन : प्राकृता विषयांहुनि मन ॥ विरमोनि सेविति सदन : भगवत्पदें करत योगी ॥ २१ ॥ जेवि गुरु स्वानुभवातें : वेदशास्त्ररहस्यातें ॥ प्रकटउनि सच्छिष्यातें : परमनिष्ठेतें पावविति ॥ २२ ॥ तेवीचि तो

चक्रपाणी : अद्भुत आचरणें करुनि ॥ निजस्था केलिया कामिनी : विपरीत-भावनानाशें ॥ २३ ॥ आणि हास्य जे प्रकटिलें : तेणें उक्तार्थातें दृढ केलें ॥ निजरुपिं बळकाविलें : त्यांचिया चित्तवृत्तीतें ॥ २४ ॥ किंवा न मोडोनि स्वस्थिति : हे विचित्राकार प्रतीति ॥ जाणोनि मायाविलासगति : हास्य केलें श्रीकृष्णें ॥ २५ ॥ नाना त्या हास्यें करुन : दाविली संतोषाची खुण ॥ हा सुखाभासु तो संपूर्ण : निजानंदाचा लेश ॥ २६ ॥ आपण सुखानुभवमूर्ति : जेथुनि सुखलहरिया येति ॥ आणि पावती समाप्ति : आनंदसागरिं त्या ॥ २७ ॥ ऐसेनि आत्म-परामर्षे : घडोनि आलें हांस्या ऐसें ॥ ह्मणोनिया प्रसंगि रमेशे : हास्ये दाविलें नावेक ॥ २८ ॥ तें हास्य करितिये वेळे : सर्व शोभेसि अंकुर आले ॥ जिया शोभा हें धवळिलें : रासमंडळ अवघें हिं ॥ २९ ॥ एवं आलिंगनादि करुन : व्रजसुंदरीसिं मिळोन ॥ रमेश जो नंदानंदन : रमता जाला रासप्रसंगिं ॥ ३० ॥ असो तो रमेश श्रीकृष्ण : व्रजसुंदरीसिं मैथुन : कारिता जाला सलक्षण : उक्त प्रकारें रासोत्सावें ॥३१॥ ह्मणसी श्रीकृष्ण आत्स्येकरुन : जरि ब्रह्म सनातन ॥ केवळ एकाकी भेद-शुन्य : निर्विकार ॥३२॥ अहो तया कृष्णाचा ठाईं : हें विरुद्ध नव्हे काइ ॥ जेथें कर्तृत्वादि विशेष नाहिं : येथें हे क्रीडा कैंची ॥ ३३ ॥ ऐसें असेल तुझा मनिं : तरि आइक राजाशिरोमणि ॥ अर्भक दृष्टांतें करुनि : हें घडतें तेथें ॥ ३४ ॥ अगा बाळक जैसा काहिं : निज प्रतिबिंबाचा ठाईं ॥ अहंममता जान्हि नाहिं : तथापि खेळतसे तेथें राया ॥ ३५ ॥ असो तो जैसा संकल्पशुन्य : प्रतिबिंबोसिं रममाण ॥ तैसा येथें रमारमण : क्रीडला गोपिकांसि गा ॥ ३६ ॥ तियां गोपांगनि सहित : हा समारंभु काहिं जो अद्भुत ॥ हे अवघें मिळोनि भात : जैसा तंदुळांचा ॥३७॥ तैसा एक कृष्ण जनिवनिं : त्या जळिं विश्वप्रतिबिंबस्थानि ॥ त्या माजि हे ही एक वेल्हावणी : रासरंग हा ॥ ३८ ॥ सर्वाही कळाचें कौशल : सौगंध्यादि गुण निर्मळ ॥ सौष्ठव्य जें किं सकळ : आकारलें जें येथें ॥ ३९ ॥ आणि जे निजप्रभा सर्वगत : ते समर्पुनि अवघी

येथें ॥ त्या रासोत्सवीं रमानाथ : संभोग करित असतां ॥ ४० ॥ तो श्रीकृष्ण आत्माराम : जो स्वप्रतिबिंबविभ्रम ॥ अर्भकआचारितोपम : क्रीडतां जाला तिहिंसिं ॥ ४१ ॥ असो हा विस्तार आतां : प्रस्तुत त्या गोपवनिता ॥ ज्या त्यक्तविषया समस्ता : शरण आल्या कृष्णातें ॥ ४२ ॥ तिहिंसि रमारमण : संभोग करितां सलक्षण ॥ असो करितां त्यांतें मैथुन : शोभल्या अपुर्व त्या ४३ ॥ त्या संभोगलक्षणलक्षिता : एकसरेंच समस्ता ॥ कैशा जाल्या ते ही अवस्था : अवधारिं राजया ॥ ४४ ॥

**तद्‌गंसगंप्रमुदाकुलेन्द्रियाः**
**केशान्दुकूलं कुचपट्टिकां च ॥**
**नांजः प्रतिव्योढुमलं व्रजस्त्रियो**
**विस्रस्तमालाभरणाः कुरूद्वह ॥ १८ ॥**

तें जें कांहिं उक्त लक्षण : कृष्णें सम्पादिलें मैथुन ॥ तेणें जालें वीर्य-पतन : व्रजस्त्रियांसि सम्भोगसमई ॥ ४५ ॥ असोनि तो अच्युतरता : त्या केल्या रेतस्खळिता ॥ तेणें सर्वाहि व्रजकांता : विकळेंद्रिया जाल्या ॥ ४६ ॥ राया कृष्णांगसंगप्राप्ता : त्या गळितवीर्या समस्ता ॥ महाआनन्दभरिता : भक्तिप्रमसंपन्ना कार्ष्णि ॥ ४७ ॥ असो त्या गोपिकांचें चित्त : अन्यविषयाशारहित ॥ आनन्दप्रेमोद्रेकप्लुत : मुरालें श्रीकार्ष्णि ॥ ४८ ॥ तेणें सर्व इंद्रियें गळालीं : देह कटाक्षें सांडवलीं ॥ विषयभाव विसरालें : कृष्ण सम्भोगाकलितें ॥ ४८ ॥ या कारणें त्या व्रजांगना : बोडवल्या विकळमना ॥ पावतां कृष्णमैथुना : स्खलितवीर्या सुखावल्या तेथें ॥ ५० ॥ आतां इंद्रियें विकळें जालिं : ते कोणें लक्षणें लक्षिलिं ॥ तरि भूषणादिकें होतिं धरिलिं : पूर्वि अनेकें जें ॥ ५१ ॥ तें अवघें विकळें जालिं : त्यांत कटीचा पुष्पावळी ॥ ते कटाक्षें नाहीं धारिलि : पुर्विलियाचे परि तिहिं ॥ ५२ ॥ तैसिंच रत्नादिखाचितें : भूषणे कण ( न ) कमण्डितें ॥ तेहिं श्लथें जालिं समस्तें : मैथुन सरतिये समइं ॥ ५३ ॥ असो पुष्पमाळा पासुनि : मुक्त जाल्या सुमनश्रेणी ॥ जेवि गृहमेधी जे कोण्हि : त्या गृहस्थांचि मनें ॥५४॥

तें लाहोनिया सत्संगति : गृहापासुनि मुक्त होति ॥ तेवींचि त्या ही कुसुमजाति : माळा बंधमुक्ता जाल्या ॥ ५५ ॥ लाहोनि श्रीकृष्णसंगातें : अवावींचि वोडवलि श्लथें ॥ नाना येणें चिन्हें गोपीशतें : बंधमुक्तें लक्षिलि ॥ ५६ ॥ तैसिंचि कंकणादि समस्तें : भूषणेंहि पावलि श्लथतेतें ॥ एवं येणें चिन्हें गोपीशतें : बहु शोभालि ॥ ५७ ॥ एवं विश्रस्तमाळाभरणा : त्याशोभलिया गोपांगना ॥ आतां अनुमानांतरें विकळमनां ॥ लक्षिल्या ऐशा ॥ ५८॥ केशबंध होते जे शिरिं : ते नाहिं बांधिले पुर्वील्या परिं ॥ मुक्तकेशा त्या सुंदरी : संभोगसुखिं रतल्या ॥ ५९ ॥ आणि तेव्हां ते गोपकलत्रें : नेसालिं होतिं पट्टवस्त्रें ॥ आणि पांघुरति विचित्रें : वसनें जें होतिं ॥ ६० ॥ ते हिं तेथेंचि गळालिं : परि तिहिं नाहिं सांभाळालिं ॥ आणि कुचपट्टिका ते काळिं : सुटोनि गेल्या ॥ ६१ ॥ असो कुच झांकिति वस्त्रें : संभोग करिता कळासुत्रें ॥ तेहिं सुटलिं परि कृष्णतंत्रें : नेणती ते ते काळीं॥६२॥एवं केशादि भूषणातें : यथावस्थित धरावयातें ॥ सावध न होतीच गोपीशतें : कृष्णमैथुनें सुखावलिं ॥६३ ॥ कृष्णसंभोगें गोपीजन : आनंदार्णवीं जाला मग्न ॥ तेणें त्यांचा इंद्रियगण : विकळ वोडवला तेव्हां ॥६४॥ असो कृष्णाचिया संगति : गळित जालि अहंकृति ॥ सुटोनि गेलि चिदाचिद्ग्रंथि : कार्य ग्रंथि सहित ॥ ६५ ॥ कृष्णिं जरि पुरतें मन : तरि कैंचा हा देहाभिमान ॥ मग तत्सुखिं जें प्रतिबंधन : त्यातें तोचि निवारील ॥ ६६ ॥ कृष्णिं जडतां चित्तवृत्ति : जालि जे प्रतिबंधप्राप्ति ॥ तरि त्या विघ्ननाशा प्रति : कृपेवीण अन्योपाय न चले ॥६७॥ ह्मणोनि भले जे सज्जन : श्रवण स्मरणादि करुन श्रीकृष्णातें संतोषउन : संकट निवारण करिति ते ॥ ६८ ॥ मां या तव साक्षात् कृष्णभक्ता : सदां सुरतप्रेमें आसक्ता ॥ त्या मुक्तबंधना काममुक्ता : येथें नवल काईसें ॥ ६९ ॥ सदां होतां सुरतप्रसंग : सर्वेंद्रियांगिं त्यासि कृष्णसंग ॥ तेणे होऊनि गलितअनंग : सुखें काळ क्रमिती त्या ॥ ७० ॥ असो हें रहस्यकथन : आतां बोलों कथानुसंधान ॥ कृष्णसंगें तो गोपीकाजन : सुरतप्रसंगाचा ठाईं तेथें ॥ ७१ त्यांच्या गळाल्या चित्त-

वृत्ति : सुटलिया केशवस्त्रग्रंथि ।। मुक्त माळाभरणा त्या सती : कृष्णसुखें शोभल्या राया ।। ७२ ।। ते कैसी ह्मणाल विकळता : तरि कृष्णें त्यांसि संभोगितां ।। त्या जाल्या मदनच्युता : रेतस्राव उसळले तेव्हां ।। ७३ ।। तिहिं निवांत डोळे झांकिले : हात पाय ही पसरिले ।। श्रीकृष्णसुखिं चित्त मुरालें : तेणे निवांत राहिल्या ।। ७४ ।। नाना या कृष्णसुखाचि जाति : तु हीं जाणसि गा कुरुपती ।। तुज भागवतोत्तमाप्रति : दुर्गम असे काइ राया ।। ७५ ।। असो त्या ज्या गोपवनिता : साक्षात् कृष्णाकाळितीचित्ता ।। या सुरत योगें क्रिडतां : निवाल्या कृष्णसंगें सदां ।।७६।। ऐशा त्या कृष्णसुखभरा : जाल्या विकळेंद्रियशरीरा ।। हें कायी राया कुरुप्रवीरा : नवल जालें रासोत्सविं ।। ७७ ।। पाहावया रासोत्सवातें : विमानारुढ आकाशगतें ।। आलि होतिं देवांगनाशतें : कृष्णात्मकें होत्सातिं ।। ७८ ।। त्यासि जे काहिं जाली अवस्था : तेहि राया पारिस आतां ।। आप्त होवावा रमाभर्ता : हे उत्सुकता जाली ।। ७९।।

**कृष्णविक्रीडितं वीक्ष्य मुमुहुः खेचरस्त्रियः**
**कामार्दिताः शशांकश्च सगणो विस्मितो भवत् ।।१९।।**

त्या सुरस्त्रिया देवकांता : खेचरा ज्या आकाशगता ।। जाल्या कृष्णकामपिडिता : ते सम्भोगक्रिया देखोनि ।। ८० ।। त्या असोनि विकळमना : जाल्या त्या कामोद्भवसम्पन्ना ।। प्रसन्न होउनि यदुराणा : सुरत करो आमुसिं ।। ८१ ।। पाहा आम्ही स्वर्गवासिनी : श्रीमन्ता भोगविलासिनी ।। सुन्दरा चतुरा देवकामिनी : परि हें सुख नाहिं ।। ८२ ।। आम्ही सम्पादुनि बहु सुकृतें : पावलों अमर सम्पत्तीतें ।। परि पाहोनि कृष्ण सुरताते : अति तुच्छा वोडवलों ।। ८३ ।। पाहा या राणटा गौळिनी : भाग्याच्या कैशा व्रजभामिनी ।। नित्य कृष्णसगें मैथुनिं : रमताति गोपी कैशा ।। ८४ ।। कोणींकडे हा रमाभर्त्ता : कोणकिडे राणटा वनिता ।। गोपी कैशा आवडल्या आतां : संभोगतां कृष्णातें ।। ८५ ।। असो रमेसि वंचुनि पांहिं : महत्व हि ठेविलें ठाई ।। ब्रह्मादिका जें सुख नाहिं : तें दिधलें गोपिकातें ।। ८६ ।।

साक्षात् वैकुण्ठरमण : ज्यातें सेविति रमा आदि करुन ॥ योगी आणि ब्रह्मेशान : तो कैसा पां वश जाला यांतें ॥ ८७ ॥ ऐसें विचारुनि सुरांगना : त्या कृष्णकामार्दितमना ॥ देखोनि कृष्णभोगरचना : विकळ जालिया अतिशयें ॥ ८८ ॥ एवं देखोनि कृष्ण क्रिडिता : खेचरा स्त्रिया कामार्दिता ॥ असोनि कृष्णचिंतनाचित्ता : मोहातें पावलिया त्या ॥ ८९ ॥ तैसाचि शशांक जो चंद्र : आकाशीं उदैला तो सुभद्र ॥ नक्षत्रि सहित आला विनिद्र : कृष्णरासदर्शनातें ॥ ९० ॥ देखोनि कृष्णक्रीडित : असोनि तोहि विस्मितचित्त ॥ नक्षेत्रेंसिं रासंसंभ्रमभरित : मोहातें पावला महोत्सवें ॥ ९१ ॥ असो तोहि रासदर्शनासक्त : असता जाला सुविस्मित ॥ गगनि असोनि तो मोहित : अस्तातें विसरला किं ॥ ९२ ॥ नातरि त्या गोपीकांचि मनें : कृष्णें केलि निज अधीनें ॥ त्या मनोभवें चंद्रें तेणें : निजगति विचारिलि कृष्णि ॥ ९३ ॥ असो श्रीकृष्णें नंदसुतें : इया गोपिकाचेनि सांगातें ॥ मज आन केलें ऐस्या (शा) चंद्रातें : भरवसा जाला चित्तिं ॥ ९४ ॥ येणें निमित्तें तो उडुपति : असतां जाला कुंठितगति ॥ रासोत्सव स्वचित्तिं : विस्मयातें पावला तो ॥ ९५ ॥ एवं उक्त लक्षणें करुन : तियां सुंदरींसहित श्रीकृष्ण ॥ प्रति युग्मिं असोनि समान : रमता जाला तेथें ॥ ९६ ॥ तोचि तेथें उपसंहारार्थ : बोलिलानि अर्थु प्रस्तुत ॥ बोलिजे तो आणि तन्निमित्त : या क्रिडचें काइ ॥ ९७ ॥ ते निमित्त संकेतें करुन : आईक राया सावधान ॥ एकलाचि तो नंदानंदन : बहुधा कां जाला ॥ ९८ ॥

**कृत्वा तावन्तमात्मानं यावतीर्व्रजयोषितः ॥**
**रेमे स भगवांस्ताभिरात्मारामोपि लीलया ॥२२॥**

तो येकलावि रमाभर्ता : आणि अनेकी त्या गोपककांता ॥ तियां बहुतेंसि तो क्रीडतां : अनेकें स्वरुपें धरिलिं ॥ ९९ ॥ तें बहुत्व संपादितें वेळे : साधनांतर नापेक्षिलें ॥ आपणोचि स्वता भासविलें : आपणातें क्रीडावया बहुधा ॥ १०० ॥ जेवि यया विश्वाचा सृजनि : निमित्त उपादान दोन्हि ॥ एकलाचि आपण असोनि : प्रकटिलें हें विश्व ॥ १ ॥ तयोचि

रासोत्सवीं येथें : तेणें स्वताचि आपणयातें ॥ जितुकिं तें गोपिकाशतें : तितुकिया रुपें प्रगटिलें ॥ २ ॥ आपुलेचि लीळे करुन : त्या सुंदारीं सहवर्तमान ॥ तो साक्षात् वैकुंठरमण : रमता जाला सुरत-प्रसंगें तेथें ॥३॥ तो जन्हि अवाप्तसर्वकाम : विष्णु साक्षात् आत्माराम ॥ जो सुखस्वरुप निःसीम : तन्हि क्रीडला तो राया ॥ ४ ॥ आतां अपि यणें संकेतें सुचिलें ऐसें काहिं येथें ॥ जें त्या सुन्दरिचिं प्रतिश्रुतें : राहिलिं होतिं वरप्र-दानें ॥५॥ तिहिं त्या कात्यायनीतें : आराधुनि प्रार्थिलें होतें ॥ जें अवो कात्या यनि आमुतें : वर देइं नंदसुत ॥६॥ असो देवीचें मिष केलें : पारि कृष्णातेंचि प्रार्थिलें ॥ ऐसें जाणोनि कृष्णें दिधलें : वर प्रदान गोपीतें ॥७॥ जें आतां तुह्मीं जा गृहाप्रति : पुढें माझे संगें रमाल रातिं ॥ एवं प्रत्यकें निजप्राप्ति : नेमिली प्रतिज्ञा त्यांतें ॥८॥ येन्हवीं तो कृष्ण आत्माराम : जो आवाप्तसकळकाम ॥ परि या निमित्तें हा संभ्रम : संपादुनि रमला ॥ ९ ॥ एकलीचि कृष्णमुर्ति : बहुधा जाली अनेकि प्रति ॥ नाना त्या प्रेमळांचि प्रीति : तदाकारें योजली ॥ १०॥ एवं तो श्रीकृष्ण भगवान : षड्गुण· ऐश्वर्य संपन्न ॥ तो क्रीयाप्रयो-जनहीन : आत्मानंदभरें ॥ ११ ॥ याचि जो क्रियेचा प्रचार : तो भक्तानुग्रहानुसार ॥ श्रीकृष्ण स्वता निर्विकार : भक्तैकभावन ॥ १२ ॥ एवं आत्माराम भगवान : व्रजयोषितांसिं मिळोन ॥ तितुकिं हिं रुपें धरुन : लीळेकरीं रमला रासरंगिं कृष्ण ॥ १३ ॥ आणि अनुसरोनि कृष्णातें : तिहिं वोपिलि निजजीवितें ॥ न देखोनि कृष्णापरतें : वेंचिलें सर्व आपुलें कार्यांग ॥ १४ ॥ आपुलें चारितें संपुर्णें : करित्या जालिया कृष्णार्पण ॥ तेणें संतोषिला तो सुजाण : सर्वात्मा श्रीकृष्ण तिहिं ॥ १५ ॥ मग कृपाळुवें रमाकांतें : संभोगुनि त्यां योषितातें ॥ क्रीडाश्रम जाला तो स्वहस्तें : निवा-रिला ऐसा राया ॥ १६ ॥

**तासामतिविहारेण श्रांतानां वदनानि सः ।**
**प्रामृजत्करुण : प्रेम्णा शंतमेनाग पाणिना ॥ २० ॥**

तिहिं केला क्रीडाविहार : जो नृत्यसुरतादि प्रकार ॥ जेणें प्रसंगें तो गदाधर : संतोषविला रासोत्सवि ॥ १७ ॥ त्या संतोषातें अवलंबुन : रंगि शोभविला गोपीजन ॥ चित्तें त्यांचिं आकर्षुन : आत्मनिष्ठें केलिं तेणें ॥ १८ ॥ त्या विहारें गोपवनिता : असत्या जाल्या अतिश्रांता ॥ त्या श्रमातें जाला निवारिता : रमाकांत कृष्ण ॥ १९ ॥ असो वदनातें परिमार्जिता : ह्मणिजे मुखिं घर्म आला होता ॥ तो निजहस्तें पुशिता : जा ा कृपाभरें ॥ २० ॥ जाणोनि तें शुभाचरण : खवळलें कृपाळुपण ॥ तयां कृपातुषारिं सिंचोन : श्रम परिहारार्थ गोपींचिया ॥ २१ ॥ मुखावरि श्रमघर्म आले : त्या स्वेदमुखातें पुसिलें ॥ कृपेंकारिं कुरवाळिलें : प्रेमभरें निजहस्तें करुन २२ ॥ तया हस्ताचें केलें लक्षण : शंतम ऐसें विशेषण ॥ सकळ सुखाचें अवसान : परम सुखाची मुस ॥ २३ ॥ तेणें सुखात्मकें निजहस्तें : तियां सांताचिया मुखांतें ॥ परिमार्जिले सप्रेमचित्तें : कृपाळुवें श्रीकृष्णें ॥ २४ ॥ किंवा दिर्घमैथुन श्रमें : त्यांचि मुखें जालिं सघर्मे ॥ त्या मुखातें पुसोनि करुणें प्रेमें : कुरवाळिलें स्वहस्तें ॥ २५ ॥ दीर्घ काळ कारितां मैथुनें : त्यांचि सघर्मे जालिं वदने ॥ प्रेमें पुसोनि कृष्णें करुणें : सुखहस्तें स्पर्शिलें त्यांतें ॥ २६ ॥ असो करुण ऐसें जे लक्षण : कृष्ण सुचिला कामपुर्ण ॥ तो स्वता आत्माभिरमण : निर्विकार भक्तप्रिय ॥ २७ ॥ त्यासि त्या रासोत्सवाचा ठाइं : सर्वथा प्रयोजन नाहिं ॥ तथापि भक्तप्रियत्वें पाहिं : अनादि विलास असे ॥ २८ ॥ यया भक्तप्रेमासि मुळ : तो सदा आत्म प्रेमाशीळ ॥ त्या स्वप्रेमें निजवत्सल : आवडति भगवंतातें सदां ॥ २९ ॥ जे भगवंतिं न भजति : त्या वारि तो कदा न करि प्रीति ॥ या लागि सांडुनि अहंकृति : भगवंतिं प्रीति जयांसि ॥ ३० ॥ त्यां निजवत्सळां भक्तातें : भगवते हिं भजिजेतें ॥ भक्तद्वारें हिं आपणा परतें : नावडेचि भगवंतासि ॥ ३१ ॥ यास्तव त्या विहारश्रांता : वर्णिल्या ज्या व्रजवनिता ॥ त्या आवडोनि निजभक्ता : तेणें कुरवाळिल्या हस्तें ॥ ३२ ॥ नाना हस्त स्पर्शें करुन : त्या गोपींचें श्रमनिवारण ॥ करुनियां त्यांसि समाधान : निज रुपिं दिधलें ॥ ३३ ॥ जेवि साधनश्रांता प्रति :

आइती लाभे स्वरुपस्थिति ॥ तेवि त्या व्रजवासिनी सति : कृष्णहस्तें स्पार्शील्या ॥ ३४ ॥ नाना करस्पर्शे करुन : विप्रतिपत्तीतें निवारुन ॥ निजस्वरुपिं समाधान : पावविलें गोपीतें कृष्णें ॥ ३५ ॥ जेवि अधिष्ठुनि विद्यावृत्ति : अविद्येचि करुनि निवृत्ति ॥ शीघ्र पावति भगवंति : भगवद्भक्तसानिध्य ॥ ३६ ॥ किंवा तेणें करुणाहस्तें : त्यां श्रमाक्रांता गोपीकांतें ॥ सावध केलें जेवि निद्रितातें : उठविजे सावधें ॥ ३७ ॥ आतां कृष्णपाणिस्पर्शिता : त्या सहर्षा गोपकांता ॥ निजचारितिं भगवंता : पूजिल्या जाल्या ऐशा ॥ ३८ ॥

**गोप्यः स्फुरत्पुरटकुंडलकुंतलत्विड्**
**गंडश्रिया सुधितहासनिरीक्षणेन :**
**मानं दधत्य ऋषभस्य जगुः कृतानि**
**पुण्यानि तत्कररुहस्पृश उत्प्रमोदाः ॥ ९२ ॥**

त्या पूर्वोक्ता गोपकांता : बहु आवडल्या नंदसुता ॥ स्वकरें कुरवाळुनि आत्मा : ज्या केल्या श्रीकृष्णें ॥ ९३९ ॥ तया कृष्णकरा पासुन : जाले जे उत्पन्न नखगण ॥ तिहिं त्या स्पर्शिल्या ह्मणोन : तत्कररुहस्पृशा गोपी ॥ ४० ॥ तत्कररुहस्पृशा होंत्सात्या : उत्कृष्ट प्रमोदातें पावल्या ॥ जें अतिसुखसंपन्न त्या : मान देत्या ऋषभासि ज्या ॥ ४१॥ असो लाधोनि करस्पर्शातें : कृष्णिं असोनि वित्तें ॥ आलें जें काहिं आनंदभरितें : तें न सांवरे त्यांतें ॥ ४२ ॥ यालागि त्या आनंदभरिता : सर्वस्वें असोनि कृष्णस्था ॥ तिहिं तो आपला भर्ता : पूजिला होंत्सात्या ॥ ४३ ॥ असो ऋषभशब्दें पति : जगदीश जो रमणमुर्ति ॥ त्याचिये पूजेते धरुनि चित्तिं : मानित्या स्वाभिमें ॥ ४४ ॥ त्या निजपतिचिये पूजेते : करितिं जालिं गोपीशतें ॥ तें जरि तुह्मी ऐसे ह्मणाल येथें : किमात्मका ते पुजा ॥ ४५ ॥ तरि त्यांचिया श्रवणीं : प्रत्येकें कुंडलें दोनि दोनि ॥ तें दिव्य सौंदर्गें आंदोलोनि : सुप्रभेतें प्रसावलिं जैं ॥ ४६ ॥ नाना अंतःप्रेमाचेनि बळें ; तें कुंडलें जालिं चंचळें ॥ तेणें त्यांचिं तेजें

बहळें : फांकाळिं गंडस्थळांचा ठांई ॥ ४७ ॥ ते जे कुंडलप्रभा आली : तिया गंडस्थळें शोभविलिं ॥ नातरि गल्लातें व्यापुनि गेली : सर्वां मुखां वरि ॥ ४८ ॥ कुंतळ शद्बें केशावळी : ते केशांवरि ही पसरली ॥ तिया कुंतळश्रीयाही विराजलीं : कपोळें तियांचि ॥ ४९ ॥ त्या ज्या कुटिल कुंतळाच्या हारी : त्या येउनि कपोळांवरि ॥ तेणें शोभल्या सुंदरी : कुंडलकुंतळदीप्तगंडा त्या ॥ ५० ॥ असो कपोळांचिया प्रभा : कुरळासि आलि ते शोभा ॥ जेवि मेघवृंदें चंद्रबिंबा : समागमे शोभा पावति ॥ ५१ ॥ तियां केशपंक्तिं आवृत : शोभले उभय गंडप्रांत ॥ एवं कुंडलकुंतलमंडित : कपोळश्री विराजली ऐसी ॥ ५२ ॥ त्या उत्कृष्ट श्रियेकरिं कांता : पूजिता जाल्या रमानाथा ॥ असो स्वसौभाग्यें निजभर्ता : पूजिला गोपिकिं ॥ ५३ ॥ तैसिंचि कृष्णें मनें हरिलिं : तें आनंदार्णविं बुडालिं ॥ तें हास्य मिषें बाहीरिं आलिं : निजपतिपुजे लागिं ॥ ५४ ॥ कृष्ण प्रेमाचेनि सुरवाडें : शोभलें अमृताचेनि पाडें ॥ तें सुधित हास्य कृष्णा पुढें : उपायन संपादिलें तिहिं ॥ ५५ ॥ ऐसिं सुधितें हास्यं करुन : पुजिला आपुला रमण ॥ असो क्रिया मात्र कृष्णार्पण : जाली त्या गोपिकांची ॥५६॥ आणि त्यांचें जें निरीक्षण : म्हणिजे विलासावलोकन ॥ तेणेंहि तिहिं स्वामिपुजन : संपादिलें निजप्रेमें ॥ ५७ ॥ एवं प्राकृतातें वीसरोन : श्रीकृष्णि तो युवतीजन ॥ अंतरिं रंगला तें लक्षण : बाहिर लक्षिलें किं ऐसें ॥ ५८ ॥ येणें आचरणें करुन : त्यांचें अंतर्बाह्य जालें कृष्णार्पण ॥ तेंचि महत्पुजन : स्वामिचें योजिलें राया ॥ ५९ ॥ येऱ्हविं त्या मंगळमायिं : गोपीची शोभा ते किती काई ॥ जे श्रीरमा ज्या कृष्णपाई : लोळतसे सर्वकाळ ॥ ६० ॥ तेथें या ललनाचि रीति : कृष्णपाइं काइ होईल सरति ॥ या लागि अर्पुनि स्वप्रीति : निजविलासें पुजिला पति ॥ ६१ ॥ जेवि त्या योगीयांचें मन : अमानित्वादि चिन्हिं करुन ॥ अनुलक्षिजेंतें संस्थान : पावले जे स्वरुपीं ॥ ६२ ॥ तेचीं त्यांची समर्पे पुजा : तेवि तिहिं हा यदुराजा ॥ पुजिला तेणें अधोक्षजा : परम संतोष

जाला ॥ ६३ ॥ मग तेणें सर्वज्ञ समर्थें : परम कांतें गोपीनाथें ॥ स्विकरुनि तिये पुजेतें : स्मरण प्रेरिलें किर्त्तनिं ॥ ६४ ॥ तेणें संतोष प्रवळें : त्या गोपिकांचें हृदये द्रवलें ॥ त्या प्रेमोद्रेकें त्यांसि स्मरलें : कृष्णाचे गुणप्रसंग ॥ ६५ ॥ ते जे निजकांताचे गुण : पावनासि हि अतिपावन ॥ त्या पुण्यें कर्माचें कीर्त्तन : करित्या जाल्या गोपि ॥ ६६ ॥ जन कृपा कळवळुन : कृष्णें केलें तनुधारण ॥ जें सर्व सौभाग्याचें सदन : पवित्रतास्वरुप ॥ ६७ ॥ याचि अवतारिं स्वकौतुकें : कर्मे जें केलिं अलौकिकें ॥ जें सकळदुःखनाशकें : श्रवणस्मरणकीर्तनमात्रें ॥ ६८ ॥ जें पूतनादि वधात्मकें : जें इंद्रादिगर्वमोचकें ॥ जें विरिंच्यादिस्तुतिकारकें : आणि व्रजजनार्तिहर्ति ॥ ६९ ॥ जें काळिया मथनपरें : जें दावाग्निप्राशनकरें : उचलोनि गोवर्धन करें : गाइगोपी गोपाळादिरक्षणें ॥ ७० ॥ जें वृंदावन विहरणें : उत्प्रसंगे दैत्यनाशनें ॥ गाइगोपाळवत्स पाळणें : वत्सपाळ•वत्सरुपधरें ॥ ७१ ॥ जें मुरलिवादनपरें : जे गोपिकाविरहहरें ॥ जें रासोत्सवक्रीडाकरें : गोपीसुरतप्रसंगें ॥ ७२ ॥ त्या पावना कर्मातें स्मरोन : सर्वत्वातें विसरोन ॥ करित्या जाल्या गुणगायन : कामशमनावें ॥ ७३ ॥ असो पावोनि करस्पर्शातें : छेदुनि हृदयग्रंथितें ॥ गुण वर्णिले सुप्रशस्तें : निजकांता कृष्णाचे ॥ ७४ ॥ आतां कृष्णप्राप्तिचें लक्षण : होउनि सक्ताभिमान ॥ सर्व कर्तव्यातें सारुन : कृष्णाचे गुण वर्णावे ॥ ७५ ॥ नाना त्या कर्तव्यशुन्या प्रति : विशेषें नाहिं विधिशास्ति ॥ परि अनादि स्वप्रकृति : उगे राहों नेदि ॥ ७६ ॥ म्हणोनि कर्तव्य सरलें : तर्हि आत्माराम जे जाले ॥ तथापि नाहिं सांडिलें : हरिभजन कोण्हि ॥ ७७ ॥ येणेंचि विचारें करुन : लब्धप्रसाद गोपीजन ॥ करिता जाला गायन : श्रीकृष्णगुणाचें ॥ ७८ ॥ आतां तया पुजा प्रभावता : तो श्रमहर्ता रमाभर्ता ॥ संतोषोनि निजवशता : दाविली त्यातें ॥ ७९ ॥ तें काहिं येक लक्षण : निजकामोद्रेकआविष्करण ॥ दाउनि सांगोपांग : प्रकट श्रीवशता ॥ ८० ॥ ऐसें हि कृष्णाचें आचरण : उत्तर श्लोकें करुन ॥ आइक राया सावधान : निवेदिजेतें ॥ ८१ ॥

**ताभियुतः श्रममपोहितुमगसंग-**
**घृष्टस्रजः स कुचकुंकुमरंजितायाः ।**
**गंधर्वपालिभिरनुद्रुत आविशद्वाः**
**श्रांतो गजीभिरिभराडिव भिन्नसेतु : ॥ २३ ॥**

त्या रासोत्सवप्रसंगें करुन : केलें जें नृत्य बहु मैथुन ॥ तेणें जो श्रम तन्निवारण : विचारुन चित्तिं ॥ ८२ ॥ असो त्या गोपिकां लागुन : संपादुनि स्वसन्निधान ॥ तिहिंसिं जाला क्रीडमान : रासरंगउत्सवें ॥ ८३ ॥ त्या उत्सवि तें गोपीशतें : अनुसरोनि श्रीकृष्णातें ॥ करिति जालिं नृत्यादिकातें : स्वामिपुजे लागिं ॥ ८४ ॥ तेणें जो प्रेमा उसळला : तो श्रमरूपें जाणवला ॥ त्या श्रमनिवारणातें प्रवेशला : जलाशयातें कृष्ण ॥ ८५ ॥ ते जें जळप्रवेशलक्षण : तरि परस्परें कळवुन ॥ त्या कामिनीसिं परिवारुन : यमुना डोहीं प्रवेशला ॥ ८६ ॥ आधिं रासप्रसंगें करुन : करुनि चुंबन स्तनमर्दन ॥ आलिंगनादि दीर्घ मैथुन : संपादिलें जें काहिं ॥ ८७ ॥ त्या परस्परें अंगसंगकाळिं : कंठि होत्या मुक्तादि रत्नावळी ॥ पुष्प माळाहि मिरवलि : अंगसंगवर्षणें ॥ ८८ ॥ ते माळाशोभा किंलक्षण : तरि कारितां अंगवर्षण ॥ गोपींचें कुचकुंकुमलेपन : तें कृष्णकुचांसि लागलें ॥ ८९ ॥ त्या कुचकुंकुमे माळावाळि : अत्यंत लोहित रंगली ॥ आणि सुवासितही जाली : विशेषें ते समइं तेथें ॥ ९० ॥ तिया माळासुगंधें करुन : तेथें मिळाले भ्रमरगण ॥ त्या भ्रमरासिं उपमान : गंधर्वपतिचें घडलें ॥ ९१ ॥ जेवि निजपतितें लक्षुन : गंधर्व कारिती गायन ॥ तेवि ते भ्रमर प्रधानगण : मिरवले निज समुदायेसिं ॥९२॥ श्रीकृष्णातें अनुसरोन : कारिते जाले गुणगायन ॥ बहु गुंजारवें करुन : सुनादित होसाते सन्निध ॥९३॥ तया भ्रमरिं गीयमान : त्यां युवतिं सहवर्तमान : करावया श्रमनिवारण : प्रवेशला यमुना ह्रदजळिं॥९४॥नाना कृष्णि भक्तसंग : तिये निर्विशेष जो अनुराग ॥ त्या अनुरागिं मुनिभृंग : अनुभवरसलुब्ध जे ॥९५॥ ते पावोनि परम शांति : भगवंताचे क्रीडागुण गाति ॥ त्यां भक्तिं परिवारित श्रीपति : शांतिरुपें

शोभला ॥ ९६ ॥ तेथें अनुभव समाधान : तेंचि सांचिनलें जीवन ॥ तेथें प्रवेशला नारायण : मनोवृत्तीसहित ॥ ९७ ॥ किंवा तत्प्रीतीतें अनुसरोन : धरुनियां रुप रमण ॥ तिहिंसि क्रीडोनि आपण : फळरुपही जाला ॥ ९८ ॥ तें जें कौतुकाचें विश्रमण : निजस्वरुप सनातन ॥ सकळांचें जें किं जीवन : त्या स्वरुपात्मकें जळीं ॥ ९९ ॥ तया भक्तकदंबेसहित : प्रवेशला तो नंदसुत ॥ नावेक भाव दाविला निवांत : परि तो विशेष आकर्षिला ॥ ६०० ॥ ऐसा परमार्थ जो काहिं : तो दाविला गोपिचा ठाइं ॥ कांजे श्रीकृष्णिं विभाग नाहिं : विशेष निर्विशेष ॥ १ ॥ येथें जे काहिं क्रीडती स्थिति : तोचि विश्रांतिचि विश्रांति ॥ साक्षात् हे कृष्णमुर्ति : उपनिषदर्थ जे ॥ २ ॥ वाग्जाळातें घेउनी मन : परतलें जया पासुन ॥ तेंचि प्रत्यक्ष रुप रमण : राया श्रीकृष्णाचें हें ॥ ३ ॥ शास्त्रीय प्रक्रिया जे काहिं : ते या विलासिं विरुद्ध नाहिं ॥ या श्रीकृष्णाजिचा पाइं : परापरताचि नसे ॥ ४ ॥ असो हा सर्व परमार्थ : कथान्वयोचि धरुं प्रस्तुत ॥ त्या भ्रमरिं गीयमान सुगीत : सुंदरिंसिं सह ॥ ५ ॥ करावया श्रमनिवारण : विलासिया तो नंदानंदन ॥ प्रवेशता जाला जीवन : त्या यमुना नदीचें ॥ ६ ॥ तया श्रीकृष्णाचें विशेषण : भिन्नसेतु ऐसें ह्मणोन ॥ तिये विषइं उपमान : मदगजाचें दिधलें ॥ ७ ॥ इभराट् इया ख्याति : जैसा तो मदोन्मत गजपति ॥ येउनि जळाशयाप्रति : हस्तिनिसहवर्तमान ॥ ८ ॥ श्रमनिराकरण निमित्तें : प्रवेशला जळाशयातें ॥ तोडोनि पदगळ बंधनातें : क्रीडतसे महांनदीजाळें ॥ ९ ॥ तिये क्रीडायुक्त कलोळिं : जळमर्यादा आप्लाविली ॥ किंवा जळनिरोधार्थ केलि : होती सेतुरचना ॥ १० ॥ तोडोनि जळबंधारातें : तेणें गजिनीसि क्रीडिजेतें ॥ तैसीचि येथेंहिं नंदसुतें : सेतुमर्यादा तोडिली ॥ ११ ॥ तेथें सेतुबंध ह्मणाल काइ : तरि वेदमर्यादा जे काहिं ॥ मन प्रशांत जालें नाहिं : श्रीकृष्ण स्वरुपिं ज्यांचें ॥ १२ ॥ तयां विषय लंपटांप्रति : स्वकर्मप्रेरका त्या श्रृ(श्रु)ति ॥ यथेष्टाचारनिवारणार्थि : प्रवर्तलिया असति ॥ १३ ॥ तें जें काहिं विधिवचनें : साक्षात् कृष्णिं अप्रयोजनें ॥

ह्मणोनि गोपिचिं आचरणें : पवित्रता पावलिं तें ॥ १४ ॥ त्यांचि मनें असोनि कृष्णस्थें : न देखती विधिभंगातें ॥ कांजें कृष्णेंवीण त्यांतें : स्फुरलेंचि नाहिं दुजें ॥ १५ ॥ मग त्या ललनाचा ठाइं : विधीसि अवसर नाहिं ॥ आणि श्रीकृष्णि तों काहिं : प्रवृत्ति ना निवृति ॥ १६ ॥ असो श्रीकृष्णि अन्यथा मति : तंवरि भेदप्रतीति ॥ भेदमुळें विषय असती : तेथें विधी वचनें ॥ १७ ॥ अहो पावलियां कृष्णातें : विधिवाक्यें न सरति तेथें ॥ या विषया पासुनि चित्तें : उपरमालिं ज्यांचि ॥ १८ ॥ कर्तव्यचि सरोनि गेलें : विध्युक्त अप्रयोजक जालें ॥ तेणें भिन्नसेतुत्व घडलें : श्रीकृष्णातें ऐसें ॥ १९ असो कृष्णि मिळते वेळे : विधिनिषेध हारपले ॥ आणि कृष्ण तों पाहिलें : सेतुचि नसे मां बंध कैचा ॥ २० ॥ तथापि यणे प्रसंगवशें : वडोनि आलें नावेकसें ॥ परमार्थें काहिंच नसे : आभास मात्र हा ॥ २१ ॥ असो अनुसरोनि कृष्णातें : फेडुनि ठेविलें वस्त्रातें ॥ नग्न असोनि क्रीडेतें : आरंभिलें तिहिं ॥ २२ ॥ नग्न प्रवेशोनि जळातें : गोपिंसिं क्रीडतां कृष्णातें ॥ सेतुभंग घडला तो येथें : विरुद्ध नव्हे कदापि ॥ २३ ॥ कां जें अवलंबुनि कृष्णातें : जिहिं सांडिलें सर्वस्वातें ॥ भिन्नसेतु भासे परि येथें : तो विरुद्धचि नव्हे ॥ २४ ॥ एवं भिन्न सेतु ह्मणोन : जया कृष्णाचे केलें विशेषण ॥ तो गोपीसहवर्तमानः नग्न क्रीडला राया ॥ २५ ॥ अतां प्रवेशोनियां जळिं : तेणें कैसी केली जळकेळि ॥ आणि कैशा त्या गोपवाळी : भजल्या कृष्णातें ॥ २६ ॥

> **सोंभस्यलं युवतिभिः परिषिच्यमान :**
> **प्रेम्णेक्षितः प्रहसतीभिरितस्ततोंग ॥**
> **वैमानिकैः कुसुमवर्षिभिरिड्यमानो**
> **रेमे स्वयं स्वरतिरत्र गजेंद्रलील : ॥ २४ ॥**

अगा ये अंगा परीक्षिति : उत्तमश्लोक श्रीपति ॥ त्यां कामिनीं सहित सप्रीति : तो प्रवेशला त्या जळिं ॥ २७ ॥ सात्वितंत्रीं कहा : श्रीकृष्ण आत्माभिरमण ॥ जो प्रकृतिनिवृत्तिशून्य : अवाप्तकाम ॥२८॥ तो तिहिं परि-

षिच्यमान : त्या जळामाजि असोन ॥ क्रीडता जाला रमारमण : गोपीसिं युक्त ॥ २९ ॥ असो त्या ज्या गोपयुवती : उक्तलक्षण ब्रजसती ॥ कृष्णस्था असोनि तत्प्रीती : नीच नवी ज्यांचि ॥३०॥ तिहिं समस्ति युवतीं : शिंपिला होंत्साता श्रीपति ॥ अधिष्ठुनि त्याची मीतीः क्रीडला तिहिंसिं ॥ ३१ ॥ आणिक तों किं-विशेषण : तरि समस्ता गोपी मीळोन ॥ तिहिं स्वप्रेमावलोकन : समर्पिलें जयातें ॥ ३२ ॥ असो सर्वाहि प्रेमसंपन्ना : भाग्याच्या पुण्यनयना : ज्या प्रेमकटाक्षइक्षणा : तिहिं प्रेमें पाहिला जो ॥ ३३ ॥ नाना त्यांच प्रेम जें प्रजळ : नेत्रिं योजें प्रेमजळ ॥ त्या जाळें तो जळदनीळ : प्रेमाथिला हों-त्साता ॥ ३४ ॥ ते अधिष्ठुनि त्या गोपबाळी : तो खेळतां जळ कल्लोळिं ॥ भाग्याचा त्यासि वनमाळि : फावला प्रत्यक्ष ॥ ३५ ॥ नाना तिहिं प्रिया लागुन : केलें प्रेमजळें स्नपन ॥ आणि प्रेमेक्षणे संमर्पुन : योजिली पुजा प्रियाची ॥ ३६ ॥ आतां त्या गोपी किंविशेषणा : जिहिं पुजिला तो यदुराणा ॥ तरि त्या प्रहसितानना : सुखावल्या तत्संगें ॥ ३७ ॥ अथवा गोपीकांची जे प्रीती : ते कृष्णिं समर्पिली पुरति ॥ तेणे संतोषलि ते मूर्ति : तिया प्रेरिलें हास्य ॥ ३८ ॥ त्या सुखभरें हास्ययुक्ता : प्रसन्नवदना योषिता ॥ तिहिं त्या जळें इतस्तता : सिंचिला होंत्साता कृष्ण ॥ ३९ ॥ तिहिंसि तो यमुनाजळिं : करिता जाला जळकेळि ॥ स्वसुखें त्यातें वनमाळी : रमवीत होंत्साता तेथें ॥ ४० ॥ आणिक तो गोपीरमण : ह्मणाल किंविशेषण ॥ तरि विमानस्थ देवगण : तेथें जे आले होते पुर्वि ॥ ४१ ॥ ते लक्षुनि रासोत्सवातें : अधिष्ठुनि विमानशतें ॥ कृष्णदर्शन-लालसें तेथें : उत्साहें आकाशगत होते जे ॥ ४२ ॥ ते स्वर्गी पासुनि ये-उन : पुष्पसंभारातें घेउन ॥ पुजिते जाले अमरगण : पुष्पवृष्टिकरिं श्री कृष्णातें ॥ ४३ ॥ तिहिं वैमानकिं स्तूयमान : करितां गुणगायन ॥ तो स्वतां क्रिडापरायण : रमता जाला तत्प्रेमजाळें ॥ ४४ ॥ असो नभगतें सुरशतें : अधिष्ठुनिया विमानातें ॥ वर्षत होंत्सातिं कुसुमातें : कृष्णगुण गात गातां ॥ ४५ ॥ तें महोत्साहभरितचित्तें : निर्मळा कृष्णयशातें ॥

अपेक्षुनि निजकल्याणातें : वर्णित असतां ॥ ४६ ॥ तो नंदानंदन वनमाळी : त्या युवतीप्रेमकल्लोळीं ॥ करिता जाला आनंदकेळि : आत्माराम असोन हिं ॥ ४७ ॥ असो तो नित्यानंदघन : सच्चिदानंद परिपूर्ण ॥ तथापि भक्ता लागि सकरुण : अनादि स्वभाव याचा ॥ ४८ ॥ त्या भक्त प्रेमाचिया लालसा : तो रमला प्राकृता ऐसा ॥ हस्तिनीं सहित जैसा : मदोन्मत हस्ती रमतसे ॥ ४९ ॥ त्या मदोन्मता गजाचे परिं : गजिनीतुल्य त्या सुंदरी ॥ तिहिंसि तो बाळ ब्रह्मचारि : रमला कौतुकें ॥ ५० ॥ तो गज आसक्त जैसा काहिं : रमतां गजिनींचा ठाइं ॥ तैसा हा आसक्त नसोन हिं । रमला भक्तिप्रेमें ॥ ५१ ॥ परि दाउनि आसक्तरीती : रंजविल्या व्रजयुवतीं ॥ आपुला ठाइं त्यांची पुरती : चित्तवृति वळकाविली तेणें ॥ ५२ ॥ एवं दाउनि गजेंद्रलीळा : जळिं तिहिंसि तो क्रीडला ॥ वाहरि वृत्तांत वर्तला : तोही आइक सावध ॥ ५३ ॥

**ततश्च कृष्णोपवने जलस्थल-**
**प्रसूनगंधानिलजुष्टदिक्तटे ॥**
**चचार भृंगप्रमदागणावृतो**
**यथा मदच्युद्द्विरदः करेणुभिः ॥ २५ ॥**

त्या जळक्रीडेतें संपादुनः तियां गोपी सहवर्तमान ॥ नदानंदन श्रीकृष्णः विचरता जाला कृष्णोपवनिं ॥ ५४ ॥ असो त्या जळक्रीडेवरि : तो गोपीरमण मुरारी ॥ यमुना उपवना माझारि : फिरता जाला सर्वत्र ॥ ५५ ॥ तें यमुनेचें उपवन : जरि ह्मणाल विलक्षण ॥ तरि त्या वनातें आश्रुन : जळाशय जे होते ॥ ५६ ॥ तत्संबंधी त्या पुष्पजाति : अति सुगंधातें प्रसवति ॥ आणि तेथेंचि वनस्पति : होते पुष्पसंपन्न ॥५७॥ त्या कुसुमाकरांचि द्युति : बहु सौगंध्याचि संपत्ती ॥ ऐसे जळाश्रयें वनस्पति : सुमनसुगंधित ते ॥ ५८ ॥ तेणें सुगंधें तेथें पवन : राहिला दिशातें व्यापुन ॥ त्या पवनेंकरीं उपवन : सुगंधित जाळें ॥ ५९॥ आणि तट या पदें संज्ञीत : त्या उपवनाचे जे प्रांत ॥ तेहि सुगंध-वायुस्पर्शित : असते जाले ॥ ६० ॥ एवं ते यमुनोपवन : अत्यंत सुगंधें

संपन्न ॥ तेथें तो सुगंधित पवन : व्यापला सर्वत्र ॥६१॥ त्या सुगंध पवनें स्पर्शित : उपवनाचे दिशाप्रांत ॥ ते दिग्भेद जाले सुगंधित : भवंताले अवघेही तेणें ॥ ६२ ॥ असो या सुगंधें करुनि : दुरस्थही प्राणी असोनि ॥ अनायासेंचि तेथुनि : विश्रांतीतें पावति ॥ ६३ ॥ तया उववना माझारि : घेउनियां व्रजसुंदरी ॥ तो यशोदानंदन श्रीहरी : क्रीडता जाला ॥ ६४ ॥ नाना तो उत्सव प्रकटउनि : तयां निजभक्तां लागुनि ॥ तो आपुलीया प्रेमाजीवनि : रमविता जाला ॥ ६५ ॥ यावरि दैवनिबंधन : प्राप्त जालें जें विहरण ॥ तें करावया दैवक्षपण : बाहेरि आणिल्या ॥ ६६ ॥ जेवि कोण्ही योगीजन : अविद्येतें निवर्तउन ॥ गुरुशास्त्रवीचारें करुन : पावती समाधीतें ॥ ६७ ॥ तथापि प्रारब्धप्रेरित : ते देहयात्राक्षपणार्थ ॥ स्वरुपीं असोनि चित्त : व्यवहारिं वर्तति ॥ ६८ ॥ परि त्यांप्रें ते विहरण : समाधीसिही समाधान ॥ असोनि करी संन्निधान : स्वरुपेसिं ॥ ६९ ॥ तेवि गोपिकातें मुरारि : यमुनाजीवना बाहेरी ॥ आणुनि तियेचाचि तीरीं : उपवना माजि क्रीडला तो ॥ ७० ॥ तेणें भक्तांचिया करुणें : सकळांतर्गतें सुजाणें ॥ यशोदानंदनें श्रीकृष्णें : तियां ललनातें घेऊनि तेथें ॥ ७१ ॥ आपुलेनि छंदें त्यां सांगातें : सुखें जालें विचरिजेतें ॥ तोचि विचरण गोपींतें : समाधिस्थानि योजिले॥७२॥अहो भलते प्रकारें चित्तिं: सदां असावी कृष्णमुर्ति ॥ मग तेथे समाधि ते किति : सर्वोपरमस्वरुप ॥७३॥यया अर्थातेंचिं लक्षुन : वर्णिलें कृष्णाचें विचरण॥आणि येथें तेहिं उपवन: समहिमान वर्णिजें असे ॥७४॥तो उपवनिं विचरता : जो श्रीरमादेवीचा भर्त्ता॥ तो श्रीकृष्णजी प्रथमता : सविशेषण वर्णिला असे येथें ॥ ७५ ॥ त्या सुंदरीं सहवर्तमान: ऐसी पुर्विंचि दाविलि खुण ॥ तो जो काहिं प्रमदागण: त्या प्रमदागणेंसिं आवृत ॥ ७६ ॥ असो उपवना माझारि : भवंताल्या प्रमदांच्या हारी ॥ तो नंदानंदन कृष्ण हरी : विचरता जाला निजविलासें ॥ ७७ ॥ नातरि त्या तरुणीं सहित : तो क्रीडता जाला रमानाथ ॥ येणें सुचविला संकेत : निष्क्रियत्वाचा कृष्णविषइं ॥ ७८ ॥ पुरःसरुनि प्रमदांतें : क्रीडणें घडलें श्रीकृष्णा

तें ॥ कां जें भक्तवात्सल्या परतें : त्यासि प्रयोजनचि नाहिं ॥ ७९ ॥ अनादि विलासें करुन : दाउनि देवभक्तपण ॥ आपुलेचि ठाइं तो आपण : भक्तत्वें हिं भजत असे ॥ ८० ॥ तेथें भेदासि नसोनि ठाव : हा अनादि लीलास्वभाव ॥ जऱ्हीं क्रियेचा असंभाव : तऱ्हि भक्तनिमित्तें घडलें हें ॥ ८१ ॥ यास्तव हे जे काहिं प्रवृत्ति : ते भक्तांचि केवळ प्रीति ॥ त्या अवाप्तकामासि ये रीति : विहार घडला ॥ ८२ ॥ असो तो अवाप्तपुर्णकाम : परि भक्तकामकल्पद्रु(द्रु)म ॥ तो स्वता असोनि निष्कर्म : तिहिंसिं रमला येथें ॥ ८३ ॥ या रासोत्सव प्रसंगें : कृष्ण क्रीडता जाला आंगे ॥ किंवा याअनंगाच्या अनंगें : क्रीडविल्या गोपी ॥ ८४ ॥ तो क्रियाप्रचार जो काहिं : भासला श्रीकृष्णचा ठाईं ॥ परि त्यासि घडला नाहिं : कियाभिमान ॥ ८५ ॥ एवं तो नंदयशोदासुत : अंगीकारुनि भक्तभावार्थ ॥ प्रमदागणआवृत : विचरला त्या वनि ॥ ८६ ॥ परि त्या वीचरणीं काहिं : त्यासि कर्तृत्वाभिमान नाहिं ॥ ये विषईं दृष्टांत असे तोहि : आइक राया ॥ ८७ ॥ जैसा काहिं तो मदच्युत : महां गज अत्यंत मत्त ॥ गंडापासूनि मद श्रवत : ऐसा मदोन्मत्त हस्ती ॥ ८८ ॥ तेणें मदान्वितें गजें काहिं : विधि अविधि जाणनें नाहिं ॥ परि उगेंचि याति प्रवाहिं : गजिनी सवें ॥ ८९ ॥ त्या वनोपवनाचा ठाइं : तेंगें उगेंचि फिरावें सर्वत्रहि : तैसाचि येथें श्रीष्ण-हि : विचरला तिहिंसिं ॥९० ॥ आणि सुगंधित पुष्पमाळा : होत्या कृष्णाचिया गळां : लुब्ध होत्साते परिमळा : भ्रमर होते निकट ॥ ९१॥ ते भ्रमतां गंध-लोलुप : गुंजित होत्साते समीप ॥ कृष्णगुण गाउनि मधुप : काळ क्रमिति कृष्णसंयोगें ॥९२॥ त्यां भ्रमारिं तो गीयमान : तिहिंसिं सह वर्तमान ॥ मदगजाचे परिं नंदनंदन : विचरला गोपीं सहित तो ॥ ९३ ॥ एवं भ्रमरप्रमदावृत : ह्मणिजे भृंगि गोपीं सहित ॥ तो नसोनि कोठें आसक्त : फिरला इतस्तता तेथें ॥ ९४ ॥ जो स्वरुपानंदभरित : सर्व काल विशेषरहित ॥ सर्वथा हे अनात्म दृश्यजात : उपकरेना जेथें कदापि ॥ ९५ ॥ त्यासि या प्रचाराचा काहिं: अणुमात्र अनुगम नाहिं ॥ हें विश्वचि जयाचा ठाइं : अभासोनि अर्थ-

ता नसे ॥ ९६ ॥ अथवा तो सत्ता साधारण : अवघेचि ठाइं जो समान ॥ कृष्णेंसि हा भृंगगोपीजन : निर्विशेषें उपचरला ॥ ९७ ॥ या लागि अधिष्ठुनि मायतें : तिहिंसिं कृष्णें विचरिजेतें ॥ पारि हें तेणें परमार्थे : काहिंचि अंगी केलें नाहिं ॥ ९८ ॥ तो स्वता निःकाम असोन : गोपिचें केलें कामशमन ॥ ऐसें काहिं आलें घडोन : पारि तो सदा अनासक्त ॥ ९९ ॥ कां जयाचि अभिप्रायातें : इयेचि ग्रंथि मुनिनाथें ॥ सुचिलें तेंहिं पुढें प्रशस्ते : वाखाणिजेल प्रसंगें ॥ ७०० ॥ प्रस्तुत कथानुसंधान : केलें रासोत्सव वर्णन ॥ त्या उत्सवाचें उपसंहरण : अवधारिं राज चुडामणि ॥ ७०१ ॥

**एवं शशांकांशुविराजिता निशाः**
**स सत्यकामोऽनुरताबलागणः ।**
**सिषेव आत्मन्यवरुद्धसौरतः**
**सर्वाः शरत्काव्यकथारसाश्रयाः ॥ २६ ॥**

एवं पुर्वोक्त लक्षण : त्यां गोपीं सहवर्तमान ॥ तो सत्यसंकल्प श्रीकृष्ण : क्रीडला जो येथें ॥ २ ॥ अधिष्ठुनि रासक्रीडेतें : सेविता जाला त्यां रात्रीतें ॥ असो रात्रिलक्षणें येथें : एकांत सुचिला ॥ ३ ॥ नातरि तो जो गोपीजन : जो गृहादिकिं आशाविहिन ॥ सर्व सांडुनि त्यांचें मन : कृष्णपर जालें ॥ ४ ॥ त्या एकनिष्ठा चित्तवृत्ति : वृत्तिरुपें शोभल्या राति ॥ तियां रात्रीतें तो श्रीपति : सेविता जाला ॥ ५ ॥ जऱ्हि तो सुजान श्रीकृष्ण : सदां सर्वत्र विद्यमान ॥ तथापि तत्प्राप्तीचें स्थान : शुद्धांतःकरण राया ॥६ ॥ ह्मणोनि त्यांच्या चित्तवृत्ति : त्या वृत्तिस्वरूपा या राति ॥ रात्रि संकेतें त्या एकांतिं : आप्त केल्या कृष्णें ॥ ७ ॥ तियां शोभना रात्रीतें : सेविलें तेणें नंदसुतें ॥ त्या रात्री सविशेषणा तुतें : निरोपिजेताति राया ॥ ८ ॥ तरि शशांक जो निशापति : तत्संबंधी ज्या रश्मिपंक्ति ॥ तिहिं उज्वालिता शोभति : भक्त चित्ताचे परिं ॥ ९ ॥ तेणें निशाभिनिवेश केला : तो आजि सार्थक योजला ॥ स्वचरितिं संतोषविला : वैकुंठीचा राणा कृष्ण ॥ १० ॥ कींवा मनोभिमान धरीला : तोही आजिचि सार्थ जाला ॥

जो गोपमिनें आराइला : कृष्णप्राप्ति लागि ॥ ११ ॥ यास्तव रासोत्सवाचा ठायिं : उपकार जाला चंद्राचाहि ॥ परि कृष्णि सत्यत्वें नाहिं : उपकरे ऐसें येथें ॥ १२ ॥ एवं चंद्रांशुमंडिता निशा : नावेक प्रिय जाल्या रमेशा ॥ जेथें त्यां गोपींची आशा : फळदशेसि आली ॥ १३ ॥ आत त्या रात्रिचें लक्षण : विशेषणांतरें करुन ॥ जियां रात्रितें रमारमण : सेविता जाला गोपीसवें ॥ १४ ॥ तरि शरत्काळसंभव गुण : जे कवीश्वरिं कथ्यमान ॥ निर्मळां जाळिं संपुर्ण : जलाशय जेथें होते ॥ १५ ॥ तयां जळाशयांतर्वर्ति : कमळांचिया शुद्ध पंक्ति ॥ त्या विकासलिया विराजति : आणि वायुहा जेथें ॥ १६ ॥ आणिक ही उचित गुण : जिहिं एकांतासि येतें मन ॥ ज्यातें वर्णिती कवी-जन : या शरत्काव्यकथा ज्या ॥ १७ ॥ तेथें जे काहिं रसोत्पत्ति : तद्र-साश्राया शारदीया राति ॥ ज्या सर्व गुणाच्या संपत्ति : कृष्णप्राप्तिकरा ॥ १८ ॥ जेवि योगियांचिं चित्तें : स्वरुपलब्धिचे निमित्तें ॥ नाशोनियां दुष्टा गुणातें : शुद्ध गुणें शोभति ॥ १९ ॥ तेवि त्या उत्तमगुणा निशा : प्रीतिकरा जाल्या रमेशा ॥ ज्यां म जि सांडु सर्वाशा : अबळासमुदाय तो ॥ २० ॥ वोवाळुनि निज जीवितें : तो प्रिय जाला कृष्णजीतें ॥ या लागि ह्मणतिलें त्यांतें : जें अनुरताऽबळागण ॥ २१ ॥ ह्मणिजे अबळा ज्या वनिता : त्या सांडुनि गृहादि आस्था ॥ कृष्णिव ज्या अनुरक्ता : तिहिंसि युक्त तो ॥ २२ ॥ सर्वें वेउनि गोपजाया : पूर्वोक्ता ज्या रात्री तिया ॥ शरत्काव्यकथारसा-श्रया : सेविल्या त्या श्रीकृष्णें ॥ २३ ॥ एवं उत्सवातें अधिष्ठुन : त्यां गोपीं सहवर्तमान ॥ रमता जाला नंदानंदन : त्यांचिया इच्छा-नुरुप कृष्ण ॥ २४ ॥ तरिहि आत्मनिष्ठे पासुन : सर्वथा न पवे स्खलन ॥ ह्मणोनि सौरत जें मैथुन : तें करितां त्या गोपींसिं ॥ २५ ॥ प्राकृतां पुरुषांचा ठाईं : साधारण मदन जो काहिं ॥ जो सुरत प्रांतसमइं : वीर्यरूपें च्यवन पावतो ॥ २६ ॥ परि कृष्णें भोगितां गोपीगण : न पवेच वीर्य च्यवन ॥ त्या सौरताचें संरोधन : करिता जाला कृष्ण ॥ २७ ॥ स्वता असोनि कामपूर्ण : त्यांसि पावउनि रेतच्यवन येणें न्यायें सत्यकाम कृष्ण : रमला गोपिकांसि तेथें

॥ २८ ॥ किंवा सत्यकाम हें संज्ञा : जें पूर्वीं त्यांसि केली संभोगाज्ञा ॥ ते केली सत्य प्रतिज्ञा : या रासप्रसंगीं ॥ २९ ॥ असो तो स्त्रीकाम जो काहिं : रोधिला आपुलें ठांइ ॥ न भंगोनि पुर्णत्व पाहिं : कृष्णें भोगिल्या गोपी ॥ ३० ॥ तो अवाप्तसकळकाम : तेथें कैंचा स्त्रीकामागम ॥ परि त्यांसि दाविला हा संभ्रम : कामकळा सौरतसुखाचा ॥ ३१ ॥ असो स्वता असोनि निःकाम तो भक्तकामकल्पदृ(द्रु)म ॥ निजजनमनविश्राम : योगमाया विलासिया ॥ ३२ ॥ तो भक्तकाजकैवारि : भक्तां लागि काय न कारि ॥ या प्रसंगें सुंदरी : गोविल्या निजस्वरूपिं ॥ ३३ ॥ किंवा सौरत जें आत्मप्रीति : आत्मत्वें भक्तांची रति ॥ त्या प्रीतीस्तव निजसुरतिं : त्या आत्मानिष्टा केलिया ॥ ३४ ॥ एवं त्या गोपीकां सांगातें : रमिजेतें जालें रमाकांतें ॥ आणि त्याही सांडुनि स्वपतितें : वश जाल्या कृष्णासि ॥ ३५ ॥ ऐसें जें घडोनि आलें : तेणें रायाचें मन सकोचलें ॥ हा अधर्म ऐसें भासलें : सारांकित जाला येथें ॥ ३६ ॥ ह्मणोनि श्रीशुकेंद्रा प्रति : करिता जाला प्रश्नोक्ति ॥ जे आइकतां रुशि (ऋषि) पंक्ति : अनुवर्णिली सूतें हिं ॥ ३७ ॥

॥ राजोवाच ॥

**संस्थापनाय धर्मस्य प्रशमायेतरस्य च**
**अवतीर्णोहि भगवानंशेन जगदीश्वर : ॥ २७ ॥**

तेणें रायें अभिमन्युसुतें : या परीक्षितें भागवतें ॥ संबोधुनि श्रीशुकातें : बोलिलें ऐसें जें ॥ ३८ ॥ अगाये ब्राह्मणा आइकें मात : तो साक्षात् श्रीभगवंत ॥ जगदीश्वर जगन्नाथ : निजांशें अवतरला ॥ ३९ ॥ येथें अंश संज्ञे करुनि : माया जाणावी चिद्रूपिणी ॥ तिये मायतें अधिष्ठुनि : धर्मसंस्थापना लागि यथें ॥ ४० ॥ आणि धर्माहुनि इतर : अधर्म जो अशास्त्राचार ॥ ज्या अधर्मीं रत पामर : निरयार्णविं पडती दुर्जन ॥४१॥एवं धर्माधर्म जे यथोक्त त्यांत धर्मपाळणार्थ ॥ आणि अधर्मनिरासार्थ : अवतरला जो आपण ॥ ४२ ॥ तो सांडुनि निज धर्मातें : अवलंबुनि उयार कर्मातें ॥ उपेक्षुनि

वेदवर्मातें : कैसा पां प्रवर्तला तो दुराचरणीं ॥ ४३ ॥ तो निषिद्धाचार किंलक्षण : तरि परदाराभिमर्शन ॥ मेळउनि परस्त्रीजन : संभोगिला आपणें ॥ ४४ ॥ असो अधर्मा माजि पाईं : सामान्य आचरला नाहिं ॥ परम अन्याय जो काहिं : परस्त्रीसंगचि हा ॥ ४५ ॥ त्या परदाराभिमर्शीतें : कैसें जालें अनुष्ठिजेतें ॥ ह्मणाल अवडित ही घडतें : प्रमादास्तव कांहिं ॥ ४६ ॥ तरि न्याय किंवा विपरीत : असती अवघे शास्त्रोक्त ॥ तया शास्त्रीं भगवंत : वेगळा नसे सर्वथा ॥ ४७ ॥ ते उक्त धर्म इये जनीं : बोलिले जे सेतुस्थानीं ॥ त्या सेतुतें लंघिती जे कोण्हि : ते दंड्य भगवंतातें ॥ ४८ ॥ कां जे त्या धर्मसेतुचा कर्ता : आपण त्या धर्माचा वक्ता ॥ आणि उक्त धर्माचा पाळिता : स्वताचि भगवंत ॥ ४९ ॥ असो तो शास्त्रयोनि : आणि शास्त्रवक्ते जे कोण्हि ॥ त्याचे बुद्धिमाजि प्रवेशोनि : आपण वक्ता ॥ ५० ॥ आणि शास्त्रद्रुष्टे जे कोण्हि : तेथें न्यायरुप होउनि ॥ त्या अधर्मियांतें दंडोनि : धर्मातें संरक्षिता ॥ ५१ ॥ त्या सर्वद्रष्ट्या कृष्णातें : प्रमाद काइसा आला येथें ॥ परि प्रत्यक्ष धर्मातें : उच्छेदिलें दिसतें ॥ ५२ ॥ येथें आणिक विचारुं आतां : जें तो धर्माचा वक्ता कर्त्ता ॥ जन्हि स्वधर्म पाळिता : या लोकाचा ठाईं ॥ ५३ ॥ तथापि तो होउनि कामी : जरि प्रवर्तला या अधर्मि ॥ तरि त्याचा ठाईं कामोर्मी : अघटिता सदां ॥ ५४ ॥ ऐसें विचारुनि स्वचित्तिं : मागुती राजा परीक्षिति ॥ त्या विप्रेंद्रा शुका प्रति : बोलतुसे ऐसें ॥ ५५ ॥

**स कथं धर्मसेतूनां वक्ता कर्ताभिरक्षिता ॥**
**प्रतीपमाचरब्द्रह्मन्परदाराभिमर्शनम् ॥ २८ ॥**

आइक विप्रेंद्रा विनती : तो पुर्णकाम यदुपति ॥ अधिष्ठुनि हे मायाशक्ति : अवतरला येथें ॥ ५६ ॥ अवलंबिला नराकार : परि तो ईश्वरांचा ईश्वर ॥ जिया सत्ता हें चराचर : वर्तत असे सकळही ॥ ५७ ॥ जेथें कामाची उभारणी : तैसा नव्हे तो क्षुद्रज्ञानी ॥ अवघियांहिं सुखांची खाणी : परम आनंदाचि मुर्ति ॥ ५८ ॥ जेणें आपुलिये सत्तें : रविजें येगडिया विश्वातें ॥ परि तो आपणा परतें : न देखेचि काहिं तेथें ॥ ५९ ॥ ह्मणोनि

तो सदां आत्मतृप्त : आपुलेचि ठाइं नित्य रत ॥ सकळकामसंप्राप्त : आपणेंचि करिं त्यासि ॥ ६० ॥ असो त्या कृष्णाहुनि परतें : कृष्णा सारिखें कैंचें येथें ॥ जें आवडेनि तयातें : क्षोभकारि होईल ॥ ६१ ॥ ज्या कृष्णाचिया अनोळखि : कामाचि प्रवृत्ती या लोकीं ॥ आणि कृष्णेंकरिं जे सुखी : ते निःकाम सदां ॥ ६२ ॥ त्या कृष्णासि कामें आकळिलें : हें कैसें घडोनि आलें ॥ त्याहि वरी कैसें योजलें : अत्यंत निंद्य कर्म हें किं ॥ ६३ ॥ कामी जे कोण्हीं असति : ते ही निंद्यकर्मि न प्रवर्तति ॥ मां कृष्ण तों धर्ममुर्ति : तेथें हें कैसें योग्य ॥ ६४ ॥ अहो निंद्य कर्मानिमित्त : विकारीही नव्हती आसक्त ॥ मां श्रीकृष्ण सदां तृप्त : त्यासि हे न घडावें ॥ ॥ ६५ ॥ याचा अभिप्राय जो काहिं : आह्मासि तों न पडे ठाइं ॥ बहु विचारिलें परि पाहिं : संशयो न तुटेचि ॥ ६६ ॥ आतां तुह्मि स्यामि सुव्रत : संदेह छेदानें समर्थ ॥ ह्मणोनि आमुचा प्रस्तुत : छेदावा संशयो ॥ ६७ ॥ एवं राजा तो परिक्षिति : सर्वज्ञ श्रेष्ठ कुरुपति तथापि लोकसंदेहनिवृत्ति : पुसता जाला हे ॥ ६८ ॥ तेणें प्रश्न केला पुर्वोक्त : त्या प्रश्नाचिया परिहारार्थ ॥ बोलतुसे मुनिनाथ : ते आवधारोतु सज्जन ॥ ६९ ॥ त्याचि अर्थाचि पुनरुक्ति : आइकतां ते ऋषि पंक्ति ॥ सूत बोलिला शौनकां प्रति : नैमिषारण्यि हें ॥ ७० ॥

॥ श्रीशुक उवाच ॥

**आप्तकामो यदुपति : कृतवान्वै जुगुप्सितम् ।**
**किमभिप्राय एतं नः संशयं छिंधि सुव्रत ॥ २९ ॥**

अगा ये राया परीक्षिति : तुवां केलि जे प्रश्नोक्ति ॥ तेचि आइक प्रत्युक्ति : निःसंदेहचित्तें ॥ ७१ ॥ तरि जे तपोज्ञानें संमृद्ध : ईश्वर जे पुराणप्रसिद्ध ॥ जे कोण्हीं समर्थ सुसिद्ध : देवऋष्यादिजन ॥ ७२ ॥ त्यांचा जो धर्मव्यतिकर : कदाचित् घडला संकर ॥ भासला जर्‍हि दुराचार : तर्‍हि तो विरुद्ध नव्हे कदा ॥ ७३ ॥ व्यास अगस्ति पाराशर : दुर्वासादि ऋषि थोर थोर ॥ असोनहिं ते विधिकिंकर : शापानुग्रहसमर्थ स्वता ॥ ७४ ॥ असो तपोबळें संपन्न : मृत्युलोकिं जे वर्तमान ॥ विश्वामित्रा-

दिऋषिजन : विधि विषयही असोनि ।। ७५ ।। ते सामर्थ्यवंत होत्साते : उल्लंविते जाले धर्मातें ।। तरि तो विधिव्यतिक्रम त्यांतें : बाधक जाला काइ येथें ।। ७६ ।। तिंहिं तपोत्कर्षतेजोबळें : उद्भूत दोषांतें जाळिलें ।। निरहंकृति कर्म घडलें : तें अकर्मचि जाणावें ।। ७७ ।। किंवा अनुसंधान नसोनि : अकस्मात् आलें घडोनि ।। तें पेटउनि ज्ञानाग्नि : जाळिलें तिहिं निःशेष ।। ७८ ।। असो जे पुनः सृष्टीतें करते : येवढिया सामथ्यातें धर्ते ।। मग विविव्यतिक्रम त्यांतें : बाधील काइ राया ।। ७९ ।। आतां तो देव महां पिता : प्रजापति जो सृष्टिकर्त्ता ।। तो हि देखोनि निजदुहिताः कामातुर जाला तत्सौंदर्यें ।। ८० ।। तो जो व्यतिक्रम घडाला : तो काइ तेणे विधीभंग केला ।। कां जे विधीच न प्रवर्तला : तेथें विधिभंग तो काइ ।। ८१ ।। असो विधीच जेथें नाहीं : त्यासि अविधि तो काइ ।। प्रयोजनेवीन तें कांहिं : त्यापासुनि न घडे सर्वहि ।। ८२ ।। आणि इंद्रचंद्रादि अमर : कर्मभुमीहुनी इतर ।। त्यांचा ठाइं जो काहीं प्रचार : निषिद्धा ऐसा देखिला कीं ।। ८३ ।। परि तें जें कर्म घडलें : तें काय त्यांसि बाधक जालें ।। कां जे विधीनें नाहीं गोविलें : इंद्रचंद्रादिकांते ।। ८४ ।। असो त्यां स्वर्गस्थांप्रती : नाहिं कर्मशास्त्र प्रवृत्ति ।। यास्तव केलें कर्म मागुति : अदृष्टफळातें नेंदि ।। ८५ ।। एवं जे कोण्ही तपोधन : जे ब्रह्मादि-तेजसंपन्न : त्यांचा दुराचार त्यालागुन : दोषास्पद न करी तो ।। ८६ ।। जेवि सकळभक्षक अनळ : पेटविला जो प्रबळ ।। त्यासि समर्पिलें तें सकळ : भस्मीभूत होत असे ।। ८७ ।। त्या माजि पडलें जें कांहिं : तें त्यासि विचारणें नाहीं ।। तेवि तपोवंताचा ठाइं : जरि निषिद्धाचार जाला ।। ८८ ।। त्या तपोवन्हिमाजि पडला : तो तात्काळ भस्म ज़ाला ।। तो फळार्थ नाहिं उरला : ते जो तपसामर्थ्यें ।। ८९ ।। एवं ईश्वरावें इये जनि : संपादित सामर्थ्य जे कोण्हि : तपोनिष्ठ आणि ज्ञानि : ख्यात जाले जे जे ।। ९० ।। तिहिं निषिद्ध ही जें केलें : तें त्यांसि फळ नाहिं जालें ।। मां कृष्ण तो ब्रह्म सावळें : इश्वरांचा इश्वर ।। ९१ ।।

मनुष्माकारें हि विशेषिं : सर्व सामर्थ्याचि राशि ॥ त्याहुताशाचाही हुताशिं : विरुद्ध तें काइसें ॥ ९२ ॥ आणि अमरत्वें हि पाहतां : जो पितामहाचाही पिता ॥ जन्हि तो धर्मवक्ता शास्ता : तन्हि विधिकींकर नव्हे ॥ ९३ ॥ अमरत्वाचेनि सामर्थ्यें : न बाधीजे त्या अमरांतें ॥ तें अमरेश्वरा श्रीकृष्णातें : बाधील कोने न्यायें राया ॥९४॥ हा यशोदानंदानंदन : श्रीकृष्ण लीळावतरण ॥ उभये प्रकारेंहिं करुन : दोषभागी नव्हे तो.॥९५॥ जैं कल्पांतजळीं पहुडला : तैं ब्रह्मा नाभिपद्मि जाला ॥ मग तेथुनि विस्तारला : हा जगदाकार येव्हडा ॥ ९६ ॥ तेथे अमर आणि ऋषिपंक्ति : त्याचा लेखा तो काइ किति ॥ तया कार्ष्णि विधिशास्ति : घडेल पां कैसि ॥ ९७ ॥ तोचि हा जो यदुनंदन : कृष्णमुर्ति मनोरमग ॥ जो पृथ्विभारापहरण : अलौकिककर्मा प्रस्तुत ॥ ९८ ॥ त्या यमसदना पासुनि : ज्या गुरुपुत्रातें आणुनि ॥ गुरुदक्षिणेतें निस्तरोनि : अऋणी जाला आपण ॥ ९९ ॥ अतिक्रमुनि विप्रशापाते : निजभृत्या उद्धवातें ॥ उपदेशुनि निजज्ञानातें : संप्रदायार्थ ठेविलें येथें ॥ ८०० ॥ भंगुनि त्या इंद्राचा मान : मखिं यजिला गोवर्धन ॥ मगइंद्रकोपा पासुन : रक्षिले निजव्रजस्थ ॥ १ ॥ काळियातें निष्काशुन : शुद्ध केलें यमुनाजीवन ॥ तेणें वांचविले प्राण : गाई वत्स गोपाळांचे ॥ २ ॥ पुतना तृण बकासुर : अघ केशिक धेनुक खर ॥ केशनरकादि निशाचर : अनायासें मारिले हे ॥ ३ ॥ आणिक हि सांगावें किति : शरण येउनि प्रजापति ॥ लाजोनि करितां स्तुती : भयभीत जाला तो ॥४॥ तया इश्वरेश्वराप्रति : हे विधिभंग कैसे बाधिति ॥ तेणें भलतेहि एके रिति ॥ तारावीं दीनजनें ॥ ५ ॥ त्यासि भक्तकृपेवीण काहिं : सर्वथा कर्तव्यचि नाहिं॥ त्या पुर्णकामासि कोठें हिं : इच्छा वि नसे ॥ ६ ॥ अहो रविचिया राउळिं : काइ दीपें करावी दीवाळि ॥ किंवा क्षीरोदवीसी नव्हाळी : अजादुग्धाचि ॥ ७ ॥ अथवा पक्वान्नें भुकेळिं : गंगेसि तृशा उपजळि ॥ काइ चंद्रकळा उबेजली : व्यजनातें इछि ॥ ८ ॥ तरि तो आत्माभिराम : अवाप्तसकळ-काम ॥ स्वता अपेक्षुनि गोपिसंगम ; कामी होईल ॥ ९ ॥ एवं तो यशोदा

नंदन : असोनि मदनमोहन ॥ परि तो तेणें गोपीका जन : रंजविला नावेक ॥१०॥ परि इये क्रीडेचा ठाइं : तो कृष्ण कामि जाला नाहिं ॥ तथापि येथें जें कांहिं : भासलें विरुद्धसे ॥११॥ ईश्वरत्वें कृष्णाच्या ठाइं : तें विरुद्धचि न- सें कांहिं ॥ आतां आणिक ये विषई : तुज होईल आशंका हे ॥ १२ ॥ कां जे प्रस्तुत इये लोकिं : श्रेष्ठ जें जें आचरती कीं ॥ त्या त्या तें पाहोनि आणिकीं : वर्तिजेतें तैसें तैसेंचि कर्म ॥ १३ ॥ यालागि येणें हि करुन : श्रेष्ठांचे जें दुराचरण ॥ तेंचि धर्मोच्छेदाचें कारण : जाणावें सर्वत्र इये सृष्टी मधें ॥ १४ ॥ ऐसें जरि ह्मणसी येथें : तरि आइक याहि उत्तरातें ॥ जें श्रेष्ठोक्त मान्य सर्वांतें : परि आचरण कृताकृत कि ॥ १५ ॥

नैतत्समाचरेज्जातु मनसापि ह्यनीश्वरः ।
विनश्यत्याचरन्मौढ्याद्यथा रुद्रोऽब्धिजं विषम् ॥ ३१ ॥

राया जो कोण्ही अनीश्वर : केवळ जो विधिकिंकर ॥ जो सर्वदा विषय- तत्पर : इंद्रिया अधीन वर्तत असे ॥ १६ ॥ तेणें करावें शिष्टवचन : परि नाचरावें दुराचरण ॥ सामर्थ्येंवीण उलंघन : स्वकर्माचें न करावें मुर्खत्वें ॥ ॥ १७ ॥ जरि तेणें कोणे हिं काळें : कदाचित दुष्कर्म केलें ॥ तरि सर्व स्वार्थातें दवडिलें : अधःपतन पाविजेल किं ॥ १८ ॥ अहो या सेतुभं- गाचा ठाइं : आणिकासि अधिकार नाहिं ॥ हा इंद्रियग्राम जिहिं : जिंकिला असेल ॥ १९ ॥ ते जे तपोज्ञानें समर्थ : शापानुग्रहिं सामर्थ्यवंत ॥ ईश्वरत्वें त्यातेंचि उचित : हा अलौकिकाचार ॥ २० ॥ इतर जे तपोज्ञानहिन : जे असमर्थ मुर्ख जन ॥ ते आचरतां दुराचरण : नाशातें पावती तत्काळ कि ॥ २१ ॥ जैसा तो रुद्र जो भगवंत : तेणें विष जें समुद्रोद्भूत ॥ तें गिळुनि केलें कंठगत : स्वस्थ असोनि स्वानंदें ॥ २२ ॥ त्याहूनि जो इतर जन : तें प्राशितांचि विष दारुण ॥ तत्काळ पावेल तो मरण : स्पर्शमात्रें निश्च- येंसि ॥ २३ ॥ असो रुद्राहुनि जे हीन : तिहिं केलें विष प्राशन ॥ तरि त्यांसि पावतां मरण : विलंब नलगे कांहिं ॥ २४ ॥ तैसा अविचारें जो कोण्ही : आपुलेचि ठायीं मुक्त मानी ॥ तो सर्वथा विरुद्धाचरणीं : पावेल

नाश राया ॥ २५ ॥ असो उत्तक्रमें करुन : जालें जन्हि निजात्मज्ञान ॥ भाग्येंकरिं वासनाविहीन : जाला कदाचित् ॥ २६ ॥ तथापि संस्कारें करून : राहिलें जरि तारतम्यभान ॥ काहिं विहिताविहितज्ञान : उरलें जवंवरि ॥ २७ ॥ तंवरि हें पापाचरण : सर्वथा पाववी पतन ॥ विरुद्ध फळातें भोगउन : कष्टवील अनुजन्मि ॥ २८ ॥ ज्याचें काळावरि शासन नाहिं : त्यासि काळ सोडील काइ ॥ नेणत पाडील पाइं : कृतकर्मवेडि ॥ २९ ॥ यांलागि ईश्वराचा आचार : केवि आचरती अनीश्वर ॥ आचरती तरि पामर : पडतील अपाइं ॥ ३० ॥ ह्मणासि श्रेष्ठाचार लक्षुनी : वर्तावे इतरिं सुजनिं ॥ हा जो शास्त्रार्थ कैसेनि : प्रमाण होइल ॥ ३१ ॥ असो जें जें आचरती ज्ञातें : तेंचि प्रमाण आणिकातें ॥ तरि उक्त निरूपण येथें : विरुद्ध होईल ॥ ३२ ॥ ऐसें गमेल तुझा चित्तीं : तरि येचि विषइं पुडति : आइक धर्माचरणाप्रति : शास्त्रचि प्रमाण ॥ ३३ ॥

**ईश्वराणां वचः सत्यं तथैवाचरितं क्वचित् ॥**
**तेषां यत्स्ववचोयुक्तं बुद्धिमांस्तत्समाचरेत् ॥ ३२ ॥**

जयांचि ईश्वरत्वें ख्याति : हे शास्त्रें जयांचिया उक्ति : आचारासि प्रमाणें होति : तत्शास्त्रवचने येथें ॥ ३४ ॥ जे कोण्ही शास्त्रप्रसिद्ध : वशिष्ठादिक वृद्ध वृद्ध ॥ जयाचिया उक्ती निर्विवाद : सर्वत्र संमता जनासि ॥३५॥ हेंचि ईश्वराचें आचरण : तरि तें करावें लोकिं प्रमाण ॥ जरि यगेसि तयाचें वचन : ऐक्यता पावे धर्मशास्त्रिं ॥ ३६ ॥ आणिक तत्कर्म जें काहिं : जेथें वचन संमत नाहिं ॥ तें कोण्हासही कदापि हि : कर्तव्यचि नसे ॥ ३७ ॥ एवं ईश्वर जें सलक्षण : त्यांचें वचनाचि प्रमाण ॥ तें जें काहिं बोलिलें तें जाण : मानावें सत्यत्वें ॥ ३८ ॥ आणि त्यांचें जें आचारित : तें कदाचित् मानावें सत्य ॥ जें काहिं तद्वाक्यसंमत : असेल लोकमान्य ॥ ३९ ॥ म्हणोनि येथें बुद्धिवंति : त्यां इतरांची वर्तती रीति ॥ न विचारुनि ते जे बोलति : तेंचि आदरावें जानें ॥ ४० ॥ एवं थोराचें आचरित : जें काहिं शास्त्रेंसि संमत ॥ तें घ्यावें आणि विपरीत : तें न करावें सर्वथा ॥ ४१ ॥ तें अत्यंत

सामर्थ्यबळें : त्यांसि बाधक नाहिं जालें ।। पारि आणिकें जरि आचरिलें : तारि संकटिं पाडिल ।।४२।। कां जें तपोज्ञानेंसंपन्न : ते असोनि विकारशुन्य ।। कदाचित् विधिउल्लंघन : कोण्हे एके निमित्तें घडे ।। ४३ ।। तरि अचिंत्य तेजोबळें : त्यासि तें विरुद्ध न जालें ।। आणि तें तत्कीर्तीसि योजलें : सर्व जना माजि महत्वें ।। ४४ ।। तस्मात् इश्वरांचें जें उक्त : ते सर्वांसि प्रमाणभूत ।। पारि त्यांचे सामर्थ्याचरित : असाध्य तें आणिकातें ।। ४५ ।। एवं यणे उक्त प्रकारें करुन : राजप्रश्नाचें परिहरण ।। केलें तेंचिं सविशेषण : बोलताति मुनिनाथ ।। ४६ ।।

**कुशलाचरितैस्तेषामिहस्वार्थो न विद्यते ।।**
**विपर्ययेण चानर्थो निरहंकारिणां प्रभो ।। ३३ ।।**

तो राजा राजचूडामणी : भागवतां माजि तो अग्रणी ।। या लागि हे प्रभो ह्मणोनि : संबोधिलें श्रीशुकेंद्रें ।। ४७ ।। प्रभो आइक परीक्षिती : त्यां ईश्वरांची वर्तती स्थिति ।। पूर्वग्रंथें जें कांहिं तुजप्रति : निवेदिलें कृताकृत ।।४८।। तयां ईश्वरांचा ठाइं : विहिताचा नियम नाहिं ।। किं अनियताचा त्यांसि कांहिं : अस्वार्थही नसे येथें ।। ४९ ।। स्वरुपानंद लाभेंकरुन : ते सर्वत्र त्यक्ताभिमान ।। हें अविद्याकृत दृश्यभान : नसे त्यांसि सर्वथा ।। ५० ।। असा हा प्रपंच जो कांहिं : तो सकारण जेथें नाहिं ।। मग त्यांसि प्रयोजन काइ : ग्रहणत्यागविषयिक ।। ५१ ।। किंवा सदाचारें जें व्हावें : तत्स्वरूपचि ते स्वभावें ।। आतां अकर्मे संभवावें : विरुद्ध फळ त्यांसि कांहिं ।। ५२ ।। तरि त्यां ईश्वराचा ठाइं : या दृश्याची वार्ता ही नाहिं ।। परंतु उगाचि हा जो कांहिं: प्रकृतिप्रवाह यांचा ।। ५३ ।। तें जरि प्रवाह पतित : विधिसि जाले विपरीत ।। तरि तें विरुद्धाचरित : आणिकांसि प्रमाण नव्हें ।। ५४ ।। ते जे तिहिं साहस केले : ते प्राकृता योग्य नाहीं जाले ।। जैसें समुद्रिं वर्षलें : मेघां पासुनि उदक हें ।। ५५ ।। एवं कृष्णाहुनि इतर : महत्प्रभावें जे जे इश्वर ।। ब्रह्मेंद्र चंद्रादि अमर : किंवा वसिष्ठ विश्वामित्रादि ऋषि ।। ५६ ।। त्यांचे जें प्रवाहचरित : न्याय अथवा विपरित : तें त्यांसि न जालें फळवंत : कदा-

चित काहिंहिं ॥ ५७ ॥ मां साक्षात् श्रीकृष्णाचा ठाइं : राया हे आश्चर्य काई ॥ तुवां काय आइकिला नाहिं : कृष्णाचा महिमां ॥ ५८ ॥

**किमुताखिलसत्वानां तिर्यंमर्त्य दिवौकसाम् ।**
**ईशितुश्चेशितव्यानां कुशलाकुशलान्वयः ॥ ३४ ॥**

राया हा नंदानंदन : हें याचें मायाविडंबन ॥ परि हे चराचर जन : सर्वही प्राणी ॥ ५९ ॥ हें विश्व जयाचिया सत्ता : पात्रलें असे सर्वसंस्था ॥ ह्मणोनि हा कृष्ण शास्ता : सकळांचाहि ॥ ६० ॥ सर्व प्राणी ते कोण कोण : तरि पशु पक्षी सर्पादि गण ॥ पर्वत वृक्ष लता तृण : आकाशादि तत्वें ॥ ६१ ॥ आणि देव गंधर्व किंनर : यक्ष राक्षस असुर ॥ खेचर नर जळचर : इत्यादि चराचर सकळ सत्वें ॥ ६२ ॥ जो या विश्वाचा येक शास्ता : जो सकळांचाही रक्षिता ॥ तोची श्रीकृष्ण क्रीडता : जाला गोपी सवें ॥ ६३ ॥ त्या ई-श्वराचिं ईशितव्यें : धर्मसंरक्षणकर्त्तव्यें ॥ जें भक्तांसि होती स्मर्त्तव्यें : प्रारब्धक्षया लागि ॥ ६४ ॥ त्यां कर्त्तव्यामाजि काहिं : कुशलाकुशलन्वयो नाहीं ॥ शुभाशुमचि त्याचा ठाई : गणना चि नसे ॥ ६५ ॥ अंगीकारुनि मायतें : त्या निज मायेचेनि हातें ॥ जें जें कर्त्तव्य भासलें तेथें : तें कर्त्त-व्यचि नव्हे त्याचें ॥ ६६ ॥ अहो कर्तृत्व चि नाहिं ॥ तेथें पापपुण्यें लेखा काइ ॥ कुशलाकुशलान्वयो काहिं : कृष्णक्रीडेमाजि नसे ॥ ६७ ॥ तो श्रीकृष्णजी किलक्षण : तरि आइक तो समहिमान ॥ त्याचें जें लीळा-क्रीडण : तें बंधक नव्हे त्यातें ॥ ६८ ॥

**यत्पादपंकजपरागनिषेवतृप्ता योगप्रभावविधुताखिलकर्मबंधाः ॥**
**स्वैरं चरंति मुनयोपि ननह्यमानास्तस्येच्छयात्तवपुषः कुत एव बंधः ३५**

जयाचे पदपद्मपराग : सेवित जाले ऋषिभृंग ॥ होउनि सर्वत्र वीतराग : पदसरें जि जडले ॥ ६९ ॥ असो ज्या पदरजिं तृप्त : ह्मणोनि ते सर्वत्र विरक्त ॥ तोचि योगियांसि यथोक्त : परम योग घडला ॥ ७० ॥ तया योग-प्रभावबळें : सर्व कर्मबंधातें धुतलें ॥ मग प्रारब्ध जें उरलें : देहोपा-

धिसंगें ॥ ७१ ॥ त्या बाधितप्रवाहेंकरिं : ते असती यथेच्छाचारी ॥ सर्व प्रयोजनशून्य तन्हि : उपाधिप्रवाहें वर्तती ॥ ७२ ॥ जेवि जन्हि वायुवेग गेला : तान्हि वृक्षिं डोल उरला ॥ किंवा लक्ष्य भेदुनि पुढें नेला : संधानबळें शर जैसा ॥ ७३ ॥ तेवि अज्ञान नाशाही वरि : प्रारब्धप्रवाहेंकरिं ॥ ते वर्तती निजाचारिं : इतरां ऐसें ॥ ७४ ॥ तोही त्यांचा प्रचार जो काहिं : तो सर्वत्र समान नाहिं ॥ भूमिकाभेदेचि पाहिं : ते यथेच्छ वर्तती ॥ ७५ ॥ कोण्ही उन्मत्त जडा ऐसे : वर्तती भूमिकाविशेषें ॥ नेणतीच त्यांचीं मानसें : तारतम्यातें ॥ ७६ ॥ बाधितही भेदभान : नेणेचि जयाचें मन ॥ त्यां प्रति विधि तो कोण : निषेध तो काइ येथें ॥ ७७॥ सदां शुष्कपर्णासमान : ते सर्वत्र संकल्पशुन्य ॥ वर्ततांहिं त्यांचें अंतःकरण : क्रियालिप्त नव्हेचि सर्वथा ॥ ७८ ॥ वसतिस्थान ना स्वनाम : विवेकु ना निजसंभ्रम ॥ समान अथवा हें विशम : आठउाचि नसे जयांसि काहीं ॥७९॥ ऐसिये अवस्थेचा ठाइं : विधि आणि निषेध तो काई ॥ उगाचि पतितप्रवाहिं : विधि घडो किंवा निषेध ॥८०॥ तो कर्माभास काहिं त्यातें : सर्वथा न पाववी फळांतें ॥ आतां जाणति जे तारतम्यातें : अधिकारपरत्वें ॥ ८१ ॥ ते निषेध्य नसोनि चीत्तीं : परि निषिद्ध नाचरति ॥ आणि कार्येवीणहिं करिति : जें शास्त्रीय असे तेंचि ॥ ८२ ॥ तें करूनहिं त्या कर्माचा ठाइं : आदर विशेषें नाहिं त्यांत कर्तव्यही जें काहीं : देहसंबंधाचि पुरतें ॥ ८३ ॥ द्रव्यार्जनादि व्यवहार : सांडुनि असत्यादि विकार ॥ केवळ देहस्थिति प्रकार : ते वर्तती उदासीन ॥ ८४ ॥ ऐसें जें काहिं संपादलें : तें शुभकर्मा ऐसें भासलें ॥ परि त्यांसि तें नाहिं जालें : कर्म फळदातें ॥ ८५ ॥ कां जें जन्हि ते कर्म शरीरिं : तान्हि तत्पद सेवेचि करिं ॥ ते वर्तती स्वैर विहारी : मुक्तबंध होंत्साते ॥ ८६ ॥ किंवा त्यांसि नसे कहिं आस्था : स्वेच्छाचार हाचि आतां ॥ परि परमार्थें विचारितां : ते आत्मनिष्ठ ॥ ८७ ॥ जयांचिया चित्ताचा ठाइं : कर्मफळाचि इच्छा नाहिं ॥ तरि त्यांचें कर्म तें काई : बंधन होईल ॥ ८८ ॥ यास्तव ते ननहामान : ह्मणिजे वर्तती निर्बंधन ॥ तेथ

दच्छालाभसंपन्न : मुक्त बंध सदा ॥ ८९ ॥ एवं ज्या पदरजोलेशा : लुब्ध जाले त्याचि हे दशा ॥ मां श्रीकृष्ण रमाधीशा : कर्मबंधी मानावा कैसा ॥ ९० ॥ जो नसोनि कर्माअधीन : स्वेच्छा वपुतें धरून ॥ केवळ भक्त परिपाळण : अवतारासि निमित्त ॥ ९१ ॥ राया तया कृष्णाचा ठाईं : कर्मबंधाची वार्त्ता कायि ॥ सर्वथा त्यासि आलि नाहिं : सेतुभगंता कर्माचि ॥ ९२ ॥ आतां कृष्णस्वरुपलक्षण : आणि कैसा तो मुक्त-बंधन ॥ आईक राया सावधान : तेहिं सांगतों ॥ ९३ ॥

**गोपीनां तत्पतीनांच सर्वेषामेव देहिनां ॥**
**योंतश्चरति सोध्यक्षः क्रीडनेनेह देहभाक् ॥ ३७ ॥**

या ज्या प्रेमळा गोपी सती : ज्या वर्णील्या किं तुज प्रति ॥ आणि त्यांचे मुख्य प्रति : गोपाळ जे ॥ ९४ ॥ आतां होंचि ह्मणावें काइ : देहधारी जितुका काहिं ॥ त्यामाजि कृष्णेवीण नाहीं : परमार्थे वस्तुगत्या ॥ ९५ ॥ तयां सर्वांचिया अंतरिं : स्वता असोनि सुत्रधारि ॥ आपुले योगमायेकरिं : बुद्धींद्रियचाळक ॥ ९६ ॥ ययां सर्वांतें भासउन : आपण जाला अधि-ष्ठान ॥ अणुमात्रहि कृष्णेविण : स्थितिगतीते न पवे कांहि ॥ ९७ ॥ ह्म-णोनि सर्वाध्यक्ष्यसंज्ञ : सर्वसाक्षी जो संगशुन्य ॥ तो नव्हे देहधारी श्री-कृष्ण : या क्रीडणेंकरिं ॥ ९८ ॥ राया अवधारिं प्रस्तुत : जेवि शुक्ति नव्हे-गा रजत ॥ सूर्योपाधि योगें भासत : रौप्याकारें शिंपि हे ॥ ९९ ॥ तेवि श्री-कृष्णाचा ठाईं : योगमायोपाधिप्रवाहिं ॥ भासलें जन्हि उदंड काहिं : तथापि तो प्रत्ययसाक्षी ॥ १०० ॥ तें साक्षित्व ही जें काहिं : भासलें कृष्णाचाचि ठाईं ॥ परि विचारितां तेथें नाहिं : साक्ष्यसाक्षित्वासि थारा ॥ १ ॥ परमार्थें असती साक्षिता : तरि अवश्य येती विकारता ॥ आतां हें जे क्रीडाप्रवाहता : तो वृत्तिविलास अववा ॥ २ ॥ ते चिद्विलासवृत्ति काहिं : श्रीकृष्णेंसि पृथक् नाहिं ॥ जैसी उष्णता अनुभवितां हिं : अग्नीसिं भिन्न नसे ॥ ३ ॥ तेवि विकारि जितुके काहिं : श्रीकृष्णेंसि भिन्न नाहीं ॥ परि कृष्णासि तें कधींहिं : विकारी न करि ॥ ४ ॥ ऐसी जे स्वरुपस्थिति : तेचि हे कृष्ण मंगळमुर्ति ॥ तेथें हे काय

उपतिष्ठति : तदाभासिक धर्म ॥ ५ ॥ हें अवघें चि असो आतां : या पर-
दारा गोपकांता ॥ परियांसि जे काहिं परता : ते गोपाळ संबंधे चि ॥ ६ ॥ तरि
गोपिंसहवर्तमान : गोपाळत्वें हिं तोचि कृष्ण ॥ हें कृष्णमायाविडंबण : जें येकिं
अनेक भासलें ॥ ७ ॥ एवं श्रीकृष्णेंवीण पाहिं : कोण्हासहि स्वतंत्रता नाहिं
हा परापर भास जो काहिं : तो जीवदशेसि ॥ ८ ॥ जेवि घटादिकातें काहिं :
मृत्तिकेसि परत्व नाहीं ॥ अनेकाकारें भासतां हिं : मृत्तिकाचि अवधि ॥ ९ ॥
तेवि श्रीकृष्णाचा ठाइं : गोपीगोपाळ आणि विश्वहि ॥ अभिन्नत्वें भासलें परि
काहिं : कृष्णेंवीण नसे ॥ १० ॥ आतां हें भान जें मिथ्याभूत : तें
जीवन्मुक्तासि चि अनुभूत ॥ श्रीकृष्ण तों वेदविख्यात : साक्षात् ब्रह्म ॥ ११ ॥
तया श्रीकृष्णाचें जें नव्हे : ऐसें एथें काय आहे ॥ तरि गोपिकांतें चि हें पाहे
परत्व कैंचे आलें राया ॥ १२ ॥ एवं सर्वगत श्रीकृष्ण : असोनि सर्वांचेहिं
जीवन ॥ बोलिलें विशेष वचन : जें गोपी आणि तत्पती ऐसें ॥ १३ ॥
याचा आशय ऐसा असे : जें गोपीसंगसुरतसें ॥ श्रीकृष्णासि घडला नसे :
परदाराभिमर्श ॥ १४ ॥ येवढें हें जें जगद्भान : तें कृष्णेसिं नसे भिन्न ॥
ह्मणोनि तो संगविहीन : निर्विकार वस्तु किं ॥ १५ ॥ हा जगदाभास जो
काहिं : तो दृश्यप्रतीतीचा चि ठाइं ॥ परि कृष्णेसिं किंचित् हि : व्यवधानें
नसे हा ॥ १६ ॥ आतां भेद नसे जेणेसिं : तेथें हे प्रवृत्ति जालि कैसि ॥
तरि अधिष्ठुनि मायेसि : घडला हा क्रीडाविलास ॥ १७ ॥ या क्रिडा
प्रसंगें करुन : भक्तकृपेतें अनुसरोन ॥ मनुष्यनाट्यानुकारण : दाविलें
श्रीकृष्णें स्वता ॥ १८ ॥

**अनुग्रहाय भूतानां मानुषं देहमाश्रितः ॥**
**भजते तादृशीः क्रीडा याः श्रुत्वा तत्परो भवेत् ॥ ३८ ॥**

हें श्रीकृष्णाभिधानें करुन : केलें मनुष्यतनुधारण ॥ स्वता नसोनी प्रयोजन :
भक्तानुग्रहार्थ ॥ १९ ॥ अनादियोगमायावशें : जेथें हा भेद नसोनि असे ॥
त्या प्रकारेंचि नाविकसें : हें हिं तनुधारण ॥ २० ॥ त्या मनुष्यदेहानुसार :
दाविले हे क्रीडाप्रकार ॥ तेथें असोनि निर्विकार : सच्चिदानंदानुभवें ॥ २१ ॥

जो स्वस्थितीसि भंगकर : तो चि जाणावा पापाचार ॥ आतां हा जो क्रिडानु- कार : कृष्णें जो दाविला ॥ २२ ॥ तेणें हा विकारि असता : जरि असती विषयास्था ॥ प्राकृताचे परिं क्रीडता : अनुसंधानें वांचुन ॥ २३ ॥ तरि आइकतां या कथेतें : कैसे पां हे लोक तरते ॥ मागुती संसार दुःखातें : न भोगिते कैसे पां ॥ २४ ॥ अगा राया प्रस्तुत येथें: आइकोनि कृष्णक्रिडा ते ॥ तरोनि सकळ दुरितातें : तत्पर होति सर्व जन ॥ २५ ॥ तस्मात् हें पावना- चरण : नव्हे धर्मच्छेदाचें कारण ॥ या श्रवणमात्रेंकरुन : दुरितकोटीतें तरति नर ॥ २६ ॥ ह्मनसि सत्कर्मे करुन : कां न तरती दीन जन ॥ करुनिया स्वधर्माचें श्रवण : पापक्षय नव्होचि काई ॥ २७ ॥ ऐसें गमेल गा प्रस्तुत: तरि कृष्ण सर्वांचाही आप्त ॥ या लोकत्रयाचा जो नाथ : ब्रह्मादिकांचा गुरु ॥ २८ ॥ अधिकारपरत्वेंकरुन : अवघेचि करावे स्वजन ॥ त्यांत कोण्ही साधनसंपन्न : आणि विषयरत ॥ २९ ॥ यां सर्वासही सेव्य असावें : सर्वि हिं तत्पर होआवें ॥ या अभिप्रायें वासुदेवें : क्रीडि- जेते जाले ॥ ३० ॥ जे श्रृंगाररसिं आसक्त : त्यांसि हाचि रस प्रस्तुत ॥ सेव्य असोनि त्यांचें चित्त : स्वनिष्ठ करावें॥ ३१ ॥ जे कोण्ही सारवस्तुवेत्ते : त्यांसि तें हिं प्राप्त असे येथें : ते जाणोनि क्रीडातत्वातें : कृष्णतत्पर होति ॥ ३२ ॥ त्या कथरसाचे सेवन : करुनि मुक्त मुमुक्षु जन ॥ ते यथाधिकारें करुन : सुखेंकरिं असति ॥ ३३ ॥ असो या विनोदें करुन: ज कोण्ही बहिर्मुख जन ॥ त्या बहिर्मुखाचें हिं मन : आपुले ठाईं असावें ॥ ३४ ॥ ह्मणोनि इयां रासरंगिं : ठाण मांडुनियां त्रिभंगी ॥ मुरलीनादें त्यां तन्वंगी : रंजवील्या कृष्णें ॥ ३५ ॥ त्या कामासक्तें हिं चित्तें : नापे- क्षितीचि आणिकातें ॥ आपणेवीण अन्य त्यांतें : न मानावेंचि कांहिं ॥ ३६ ॥ ऐसें विचारुनि तत्वतां : श्रीकृष्ण सर्वांतरवेत्ता ॥ अनुसरोनि श्रृंगारपंथा : आत्मनिष्ठा केल्या ॥ ३७ ॥ एवं भलतेंहि आचरित : तें सर्वभूतानुग्रहार्थ ॥ ते असो विधीसि उचित : किंवा विपरित असो ॥ ३८ ॥ परमार्थे त्याचा ठाइं : या दोहिंचें प्रयोजन नाहिं ॥ परि भक्तानुग्र हिं सर्वांहिं : योग्य असे कृष्णातें

॥ ३९ ॥ नाना अंचित्य शक्तिबळें : सर्व ही योग्यता पावलें ॥ जें अशुभाकारें भासलें : तें चि शुभत्वासि आलें ॥ ४० ॥ त्या शुभकथाश्रवणलेशें : श्रीकृष्णि बुद्धि प्रवेशे ॥ या अभिप्रायें रमाधीशें : क्रीडिजेते जाले ॥ ४१ ॥ आतां उत्तर श्लोकें करुन : त्या अचिंत्य शक्तीचें लक्षण ॥ रायाप्रति व्यासनन्दन : प्रकटिताति ऐसें. ॥ ४२ ॥

**नासूयन् खलु कृष्णाय मोहितास्तस्य मायया ॥**
**मन्यमानाः स्वपार्श्वस्थान्स्वान्स्वान्दारान्व्रजौकसः ॥ ३८ ॥**

राया त्या गोपी गोपकांतां : कृष्णा जवळि असतां ॥ त्यांच्या भर्त्तारांच्या चित्ता : नव्हेचि क्षोभु ॥ ४३ ॥ असो ते गोप व्रजैकस : द्वेषिती चि ना श्रीकृष्णास ॥ न भासे त्यांच्या मनास : निजदारावियोगु ॥ ४४ ॥ त्यांसि त्या निजवनिता : जाणवल्या निज पार्श्वस्था ॥ ह्मणिजे तिहिं मानिलें स्वकांता : पाठीसि निजेल्या ॥ ४५ ॥ असो त्या गौळियांसि : त्या ज्या गेल्या कृष्णापासि ॥ हें कळलें नाहिं निजशय्येसि : त्या जवळि देखिल्या तिहिं ॥ ४६ ॥ येथें होइल कल्पना : जें पुर्वी त्या गोपललना ॥ येतां कृष्णसन्निधाना : निवारिलिया भ्रतारिं ॥ ४७ ॥ न मानुनि त्या निवारणातें : त्या आल्या कृष्ण होता तेथें ॥ तरि हें काये त्यां गोपांतें : चोजवलें नाहिं ॥४७॥ ऐसें मानेल काहिं : तरि इश्वरिं आश्चर्य नाहिं ॥ हे अचिंत्य शक्तीचा ठाईं : काय काय न घडे ॥ ४९ ॥ ते कृष्णमायेनें मोहिले : हें मुळिंच असे सुचिलें ॥ कोण कोण नाहिं भ्रमले : कृष्णमायामोहित जन ॥ ५० ॥ एंव मायामोहित होंत्साते : पृष्ठिभागिं निजदारांतें : ते गोपाळ जाले जाणते : आपुले आथुरणावारि ॥ ५१ ॥ ह्मणोनि श्रीकृष्णाचा ठाइं : त्यासि द्वेष जाला नाहिं ॥ नाना सकळात्मा तो काई : द्वेषासि विषयो ॥ ५२ ॥ किंवा सर्वात्मया श्रीकृष्णातें : पात्रतांचि निजदारांतें ॥गोपाळिं आपणयां परतें : देखिलेंचि नाहिं त्यांसि ॥ ५३ ॥ यास्तव तो सर्वात्मा कृष्ण : द्वेषासि नव्हे भाजन ॥ यया आचिंत्य शक्तीकरुन : जन्हि दाविला असे भेद ॥ ५४ ॥ राया तुवां जो केला प्रश्न : जे ह्य शिष्टाचार प्रमाण :

तेणें हे साधारण जन : वर्तती ऐसे चि सर्वत्र यथें ॥ ५५ ॥ तरि ते विषयासक्तमन : कर्मानुबंधी जीव जन ॥ ते उपजले दैवाअधीन : काळग्रस्त सर्व ही प्राणी ॥ ५६ ॥ ऐसें ते प्राकृत देहधारी : धर्मसेतुतें भंगिती जरि ॥ तरि ते महांनरक घोरिं : पडतिल तेंच समई ॥ ५७ ॥ न विजारुनि स्वतपोबळ : न पाहोनि निजकुळशीळ ॥ वर्तती विषयव्याकुळ : उल्लंघोनि जे धर्मातें ॥ ५८ ॥ जरि करिती स्वेछाचरण : तरि पावती अधःपतन ॥ ते मानुनियां मुढ जन : श्रीकृष्णतुल्य आपणातें ॥ ५९ ॥ ते जाणावे असुरासमान : जे नेणती कृष्णमहिमान : ज्यांसि नसे शास्त्रज्ञान : मां विज्ञान कैंचें ॥ ६० श्रीकृष्ण सर्वांसि अभिन्न : परि हें नसे कृष्णासमान ॥ ऐसें काहिं गुप्तज्ञान : नेणती ते ॥ ६१ ॥ होउनि अज्ञान-निवृत्ती : जरी जाली आत्मप्रतिति ॥ तरि विधिनिषेधिं प्रवृत्ति : नसो कदाचित् ॥ ६२ ॥ परि यावद्देहपतन : प्रारब्धाचा क्षय नसोन ॥ शरीरसंबंधें करुन : कर्मप्रवृत्ति ही घडली काहिं ॥ ६३ ॥ त्या शरीरोपाधीचा ठाइं : तार्तम्य तों मांडलें नाहिं ॥ त्या तार्तम्यानुसार पाहिं : कर्मतार्तम्य हिं मानावें ॥ ६४ ॥ कां जें अन्य देहाचें सामर्थ्य : अन्य देहिं नसे उमटत ॥ हें नेणोनि जन उन्मत्त : येथेष्टाचारिं प्रवर्ततसे ॥ ६५ ॥ या कर्मजन्या देहाकृति : स्वेच्छादेहि केवि तुल्य होति ॥ या स्वेच्छादेहि प्रवृत्ति : वेदशास्त्रांची ही नाहिं ॥ ६६ ॥ एवं जे देहाद्यभिमानी : हा सूक्ष्म विचार ने-णोनि ॥ वर्तती शास्त्रातें उल्लंघोनि : ते नरकार्णविं पडति ॥ ६७ ॥ अहो अचिंत्य शक्तिबळें : तें कृष्णिंच शोभेसि आले ॥ कां जें हे साक्षात् ब्रह्म सावळे : श्रीकृष्णाकारें ॥६८॥ राया येचि प्रसंगाचा ठाइं : आणिक ही नवल पाहिं ॥ हे कृष्णगोपीक्रीडा जें काहिं : ते जालीचि नाहिं नेणो ॥ ६९ ॥

**ब्रह्मरात्र उपावृत्ते वासुदेवानुमोदिताः ॥**
**अनिच्छंत्यो ययुर्गोप्यः स्वान्गृहान्भगवत्प्रियाः ॥ ४० ॥**

राया उक्तलक्षणयुक्त : त्या कृष्णसंगें गोपीजात ॥ क्रीडत असतां अकस्मात : ब्राम्ह मुहुर्त आलें ॥ ७० ॥ ब्रह्मरात्र पदें करुन : ब्राम्ह्यमुहुर्ताचें

अभिधान ॥ ह्मणजे रात्रिचें अवसान : उषःकाळ जाला ॥ ७१ ॥ असो गोपिकेच्छाशार्वरी : ते शोभली कृष्णेच्छाचंद्रकरी ॥ कृष्णेच्छा होती जंवरि : तंवरि राहिलि ते निशा ॥ ७२ ॥ मग क्रीडोपरम इच्छिला : तेव्हांचि उषःकाळ जाला ॥ एवं काळ नसतां योजला : ऐसें इच्छेस्तव जालें ॥ ७३ ॥ भगवत्प्रिया गोपिका त्या : कृष्णानुमोदिता होत्सात्या ॥ इच्छा नव्हती परि जात्या : जाल्या आपुलाल्या गृहांप्रति ॥ ७४ ॥ किंवा आतां जावों गृहांप्रति : हे त्यांसि इच्छाचि नव्हति ॥ परि अकस्मात् पाहाती : तवं स्वस्वगृहिं च होत्या नेणो ॥ ७५ ॥ त्यां सर्वांमाजि कोणातें हिं : चालणें जाणवलें नाहिं ॥ केवळ कृष्णेच्छेकारिं पाहिं : संपादलें ऐसें हें ॥ ७६ ॥ एवं भगवत्प्रिया समस्ता : त्या वासुदेवेच्छाप्रेरिता ॥ स्वचित्तिं इच्छा ही नसतां : निजगृहिं च होत्या ऐसें जालें ॥ ७७ ॥ असो त्या गोपी गोपांगना : सांडुनि गृहादि भावना ॥ कृष्णानुमोदिता तन्मना : तत्सुखें सुखावल्या ॥ ७८ ॥ तव मागुती दैवप्रेरकें : वासुदेवें यदुनायकें ॥ त्रिभुवनाचेनि आदिजनकें : श्रीकृष्ण आत्मारामें ॥ ७९ ॥ प्रेरुनि विशेष वृत्ति : प्रविष्टउनि गृहां प्रति ॥ निज रुपिं लाउनि प्रीति : स्वाचारिं प्रवर्तविल्या ॥ ८० ॥ जेवि कोण्ही योगीजन : श्रवणादि क्रमें करुन ॥ असोनि भगवत्परायण : भगवदासक्तचित्त जाले ॥ ८१ ॥ तथापि ते तन्निष्ठ होत्साते : प्रारब्ध क्षपणनिमित्तें ॥ अवलंबुनि देहोपाधीतें : काळक्रमण करिति ॥ ८२ ॥ तेवि त्या गोपवनिता : पुष्कळ कृष्णप्रेम भोगितां ॥ नावेक होउनि उपाधिगता : कृष्णानुमोदनें सकळा हि ॥ ८३ ॥ इच्छिलें हिं नसोनि तिहिं : पावोनि आपुलाल्या गृहिं ॥ चित्तें ठेउनि कृष्णपाइं : वर्तत्या जाल्या व्यवहारिं ॥ ८४ ॥ एवं इत्यादि येणें ग्रंथें : वर्णिलें रासक्रीडेतें ॥ जें श्रीकृष्णें व्रजयोषितांते : आत्मनिष्ठ केलें जेथें ॥ ८५ ॥ या कथेचा श्रवणिं पठणिं : ज्या श्रेयातें पावती प्राणी ॥ ते यथावत बादरायणीं : वर्णिताति ऐसें ॥ ८६ ॥

विक्रीडितं व्रजवधूभिरिदंच विष्णोः श्रद्धान्वितोनु

**श्रृणुयादथ वर्णयेद्यः ॥ भक्तिं परां भगवति प्रतिलभ्य**
**कामं हृद्रोगमाश्वपहिनोत्यचिरेण धीरः ॥ ४१ ॥**

हें विष्णुगोपीविक्रीडित : जें काहिं अलौकिकाचरित ॥ जेथें कृष्ण गोपिसमवेत : रमला रासरंगी ॥ ८७ ॥ या क्रीडितातें जो कोण्हीं : परम आदरें करुनि ॥ श्रद्धायुक्त असोनि : आइकेल किंवा वर्णिल ॥ ८८ ॥ तो परम भगवद्भक्तीतें : पावेल श्रवणसामर्थ्यें ॥ आणि मननिदिध्यासपंथे : तत्कृपा होइल ॥ ८९ ॥ भगवंताहुनि जे अन्य : ते जाणावे अर्थविहीन ॥ केवळ तन्मायाविडंबन : बुद्धिविलासु हा ॥ ९० ॥ यालागि तेथुनि ते वृत्ति : काढुनि लाविजे भगवंतिं ॥ तेथें उपजउनि प्रीति : तदाकार होये॥९१॥ असो सांडुनि बुद्धिकृतें : बुद्धिसाक्षी भगवंतातें ॥ जाणोनि भजता तेथें : मग वृत्तित्व कैंचें ॥ ९२ ॥ ऐसी जे परा भक्ति : वेदांती ह्मणती हे चतुर्थी ॥ आइकतां पठतां हरिकीर्ति : त्या भक्तीतें पावेल नर ॥ ९३ ॥ मग पावोनि त्या भक्तीतें : नाशिजेल स्वहृद्रोगातें ॥ हृद्रोग जो विषयास्थेतें : सांडिजेल श्रवणमात्रें ॥ ९४ ॥ आतां विषयो असतां चित्तिं : श्रवणि कैसी होय प्रवृत्ति ॥ तरि स्वधर्मे चित्तवृत्ति : प्रवर्तेल श्रवणादिकीं ॥ ९५ ॥ पुण्यातिशयसामर्थ्यें : शमउनि हृद्रोगकामातें ॥ श्रवणादीकीं बुद्धि प्रवर्ते : भगवद्भक्तिप्रभावेंकरिं ॥ ९६ ॥ श्रवणादि अभ्यासें जन : होउनि विषय कामहीन ॥ मग पराभक्तिहुताशन : प्रकट होइल तत्काळ ॥ ९७ ॥ तो त्या कामादि तृणगणातें : जाळील आपुले सामर्थ्यें : हें अर्थास्तव घडलें एथें : परि मग काम कैंचा ॥ ९८ ॥ जरि सूर्यतेज प्रभाकरिं : वसों येईल शार्वरि ॥ तरि हरिभक्ति जालियावरि : कामादिक राहातील ॥९९॥ कामबीजाचें होतां भर्जन : भगवंतिं जडेल मन ॥ भक्तिकरिं करितां भजन : मनोलय होये क्रमें करुन ॥ १००० ॥ एवं धीर जो नर या जनिं: जो अहंकारातें सांडुनि ॥ या कथा श्रवणिं पठणिं : असक्त होंत्साता निरंतर जो ॥१॥ पावोनि भगवद्भक्तीतें : सांडिजे सकळ कामातें ॥ नेणों तो नव्हताचि येथें : आभासमात्र होता जो कांहिं ॥ २ ॥ ह्मणोनि हें कथा कल्याणव्रति : पावन जे भागवती ॥ सेव्य जाली सकळां प्रती : भक्तजन

हृद्रोग विनाशिनी हे ॥ ३ ॥ ऐसी राया परीक्षितीप्रति : हे पावन भगवत्कीर्ति ॥ वर्णिता जाला तो योगमूर्ति : विप्रशापें प्रायोपशमनाचा ठाइं ॥ ४ ॥ जे कथा परम पावन : जेथें गोपीसवें श्रीकृष्ण ॥ रासरंगीं रमला ते गुणगण : प्रकट केले सर्व लोकत्रयांत ॥ ५ ॥ ऐकोनत्रिंशतितमा पासुन : त्रयत्रिंशति तमावसान ॥ ह्मणीजे एकुणतीसादि जाण : तेहतीसांत पांच अध्याये ॥ ६ ॥ शुकें वर्णिली मृत्युसंजीविनी : जे कृष्णकथा कल्याणी ॥ तेचि सुतें नैमिषारण्यि : शौनकादिकां प्रति ॥ ७ वर्णिली तेथूनि प्रकटली : ते परंपरागत आली ॥ तेचि प्रस्तुत मज प्रेरिलि : नित्यानंद गुरुराजें ॥ ८ ॥ ते भगवद्गुण पावन : निजपापक्षयालागुण ॥ हेंची चित्तशुद्धीचें साधन : विचारुनि वर्णिली ॥ ९ ॥ जे यथाधिकारे वर्णिली : तिया पापें क्षयातें पावलिं ॥ आतां प्रसन्न असो माउलि : कृष्ण मुर्ति मज ॥ १० ॥ नाना माझा हृदयभुवनिं : विठ्ठलाकृति मनोहारिणि ॥ कटीतें हस्तिं कवळुनि : तिष्ठतसो सदा ॥ ११ ॥ तेथेंचि जडो माझें मन : सांडुनि इतर बणवण ॥ हा जो मिथ्या देहाभिमान : तो न नो मज आतां ॥ १२ ॥ जरि कृपा न करी रमेश : तरि हो ज्ञानाचा आभास ॥ तो आणुनि ज्ञानगर्वास : नाशील कृतश्रमातें ॥ १३ ॥ जें कर्मक्षयाचें कारण : तेंचि होइल प्रतिबंधन : मेळउनि हे अज्ञानजन : वाढवील महंती लोकामाजि ॥ १४ ॥ ह्मणोनि कृपाळुवें श्रीनाथें : दीनाचेनि दयावंतें ॥ श्री नित्यानंदें भगवंतें : राखावे मज दिनालागि ॥ १५ ॥ वर्णितां हे गुणकीर्ती : नाशावि माझि चिदाचिदग्रंथि ॥ निस्तरोनि संसारविपति : असावें निवांत ॥ १६ ॥ असो आतां हे विनवणी : कृपा करावी साधुजनि ॥ या भगवंताचा गुण वर्णनि : अनुमोदन असावें ॥ १७ ॥ या पंचाध्यायक्रीडेवरी : तो नंदानंदन मुकुंद हरि ॥ निजभक्तजनकैवारि ॥ वर्तता जाला काइ आतां ॥ १८ ॥ जें वर्णील व्यासनंदन : उत्तरग्रंथें गुणकथन ॥ तेंचि प्राकृत बंधें करुन : मि हिं वर्णीन यथामति ॥ १०१९ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे दशमस्कंधे रासक्रीडावर्णनं नाम त्रयस्त्रिंशतितमोध्यायः ॥ ३३ ॥

**श्रीकृष्णार्पणमस्तु.**

ॐ

# श्रीमद्भागवत

दशमस्कंध

व

त्यावरील शिवकल्याणांची प्राकृत टीका.

---

६

# रासपंचाध्यायी.

---

मूळ पोथ्यांवरून

**गणेश बळवंत मोडक, बी. ए.**

यांनीं छापून प्रसिद्ध केली.

---

आकोला ( वऱ्हाड. )

चैत्र शुद्ध प्रतिपदा, शके १८२६.

---

किंमत १ रुपया.

# प्रस्तावना.

मृद्वीका रसिता सिता समशिता स्फीतं निपीतं पयः ।
स्वर्यातेन मया सुधाप्यधायि कतिधा रंभाधरः खंडितः ॥
सत्यं ब्रूहि मदीय जीव भवता भूयो भवे भ्राम्यता ।
कृष्णेत्यक्षरयोरयं मधुरिमोद्गारः क्वचिल्लक्षितः ॥ *

जगन्नाथराय.

इतर सांप्रदायिक ग्रंथाप्रमाणें श्रीमद्भागवत हा सांप्रदायिक ग्रंथ होय, परंतु इतर सांप्रदायिक ग्रंथाप्रमाणेंच तोही सर्वांच्या हातांत पडून भागवताची मराठी अवतरणें छापून प्रसिद्ध झालीं. मुद्रणकलेनें श्रीमद्भागवतास इतकी प्रसिद्धि मिळाली असल्यामुळें या अद्वितीय ग्रंथाची ओळख मराठी वाचकांस करून देण्याची गरज नाहीं. या ग्रंथाच्या द्वादश स्कंधापैकीं दशम स्कंधांत श्रीकृष्ण परमात्म्याचे गुणवर्णन केलें आहे, हें सर्वविश्रुतच आहे. दशमस्कंधावर ज्या मराठी टीका आहेत, त्यांपैकीं शिवकल्याणांची टीका ही उत्कृष्टांपैकीं एक आहे. ही अद्याप छापली गेली नाहीं, व ती फार विस्तृत असल्यामुळें व अशा ग्रंथाविषयीं आमच्या लोकांच्या अनास्थेमुळें ती छापून काढण्याचें कामही कठीणच आहे. तथापि तें आम्ही हातीं घेतलें आहे व तें तडीस नेण्यास परमेश्वर समर्थ आहे.

दशम स्कंधाच्या नव्वद अध्यायांपैकीं पूर्वार्धांत एकूणपन्नास अध्याय आहेत. त्यांतून रासपंचाध्यायीचे पांच अध्याय आह्मीं वाचकांस प्रथम सादर करीत आहों. एकंदर पूर्वार्धाची नऊ पुस्तकें करण्याचा आमचा विचार आहे.

---

* द्राक्षासवाची चव घेतला, साखर खाल्ली, पांढरें स्वच्छ दूधही प्यालों, स्वर्गांत जाऊन अमृतसेवनानें तृप्त झालों व रंभेचें अधरखंडन पण कितीदां तरी केलें, तथापि संसारांत पुनः पुनः घोंटाळणाऱ्या हे माझ्या जीवा खरेंच सांग कीं त्वां कृष्ण या अक्षरद्वयाच्या उच्चाराच्या गोडीवर केव्हां तरी लक्ष दिलें काय ?

रासपंचाध्यायी हें त्यांतील सहावें पुस्तक होय; यानंतर सर्व पुस्तकें प्रथमपासून क्रमानें छापून काढण्याचा विचार आहे. रासाचें पुस्तक वर्षप्रतिपदेच्या सुमुहुर्तावर बाहेर निघत आहे व सवडीनुसार इतर पुस्तकेंही बाहेर पडतील. एक पुस्तक वर्षप्रतिपदेस तर दुसरें गणेश चतुर्थीस या क्रमानें पुस्तकें निघावीं असा अंदाज आहे.

शिवकल्याणाच्या सुरस टीकेच्या साहाय्येंकरून **श्रीकृष्ण परमात्म्याच्या** सुस्वर वेणुनादानें सर्व रसिक वाचकवृन्दाच्या चित्तवृत्ती क्षणभर तरी तल्लीन व्हाव्या, हा या ग्रंथप्रकाशनाचा मुख्य हेतु आहे. अंतःकरण शुद्ध करून व चित्तवृत्ति लीन करून जो कोणी या ग्रंथाकडे येईल त्याला श्रीकृष्णाच्या मुरलीचा कर्णमधुर ध्वनि शिवकल्याण खचित ऐकवितील अशी आमची खात्री आहे. परमात्म्याच्या वेणुरवाच्या आड येऊन कर्णकटु बेसुर उत्पन्न करणाऱ्या अनेक आक्षेपांचे योग्य निरसन शिवकल्याणांनीं स्थळोंस्थळीं केलें आहे. पाश्चात्यांचे अथवा पाश्चात्यविद्याप्रकाशितांचे आक्षेप शिवकल्याणांना अर्थातच माहीत नव्हते; किंबहुना श्रीकृष्णास परमात्म्याचा अवतार समजणाऱ्या भाविक लोकांसाठींच शिवकल्याणांनीं टीका लिहिली आहे. तथापि प्रतिभावान कवी हे आपले ग्रंथ सर्वत्रांसाठीं निर्माण करितात व शिवकल्याणांचाही ग्रंथ या कोटींतीलच होय. जे कोणी लक्षपूर्वक ग्रंथ वाचतील व पाश्चात्य विद्येनें नव्हे, तर विद्याभासानें जे कोणी आपले नेत्र जाणूनबुजून मुद्दाम झांकणार नाहींत, त्यांना खचित या रासवर्णनापासून बोध होईल.

शिवकल्याण हे मोठे योगी होते व संपूर्ण दशम स्कंधाचा परमार्थरीत्या यांनीं अर्थ समजाऊन दिला आहे. जगाच्या उत्क्रांतीसाठीं परमेश्वरानें जे अनेक अवतार धारण केले, त्यांपैकीं श्रीकृष्णाचा पूर्णावतार होय. रामावतारानें उत्तम साधकाचें चित्र उत्कृष्टपणें लोकांच्या मनावर वठतें, व कृष्णावतार सिद्धपुरुषलक्षणें समजाऊन देण्यासाठींच झाला असें ह्मटल्यास चालेल. पापपुण्याचीं बंधनें सिद्धास कशीं असणार? ज्याचा भेदभाव समूळ नष्ट झाला, त्याला कर्म आणि अकर्म असें कांहींच उरलें नाहीं.

तेव्हां या दृष्टीनें पाहतां ज्या परमात्म्याच्या ठायीं स्त्रीपुरुष हा भावच नाहीं, त्यानें रासप्रसंगीं केलेल्या क्रीडा या केवळ ईशलीलाच होत. श्रीकृष्णानें केलेल्या क्रीडा आपण करूं ह्मणणाऱ्या ग्राम्य पुरुषास तसें करण्यास हक्कच पोंचत नाहीं. रासक्रीडेच्या प्रसंगीं श्रीकृष्णाचें वय अवघें ७ वर्षांचें होतें, त्यामुळें आक्षेप घेण्यास अवकाशच नाहीं असें जें ह्मणणें आहे तें जरी एकीकडे ठेविलें, तरी वरिष्ठ कोटीच्या पुरुषांस जीं कृत्यें करण्यास मोकळीक असते, तीं कृत्यें हीन कोटीच्या लोकांस करितां येत नाहींत, हें तत्व सर्वत्र प्रचलित आहे. घरांतील वडील माणसांशीं अज्ञानानें स्पर्धा करणारें लहान मूल अनेक प्रसंगीं पश्चात्ताप पावतें, हें आपण नेहेमीं पहातों. आपल्या कर्तव्याकर्तव्यतेचा विचार न करतां व आपलें बलाबल न पहातां, तसेंच आपल्या स्थितीकडे दुर्लक्ष्य करून जे कोणी आपणास अनुचित, परंतु वरवर पहाणाराच्या दृष्टीनें योग्य, अशीं कृत्यें करण्यास धजावतात,* त्यांना अनुभवांतीं कर्माकर्मांचा विचार अनेकतः करावा लागतो असेंच कळून येईल. श्रीकृष्णपरत्म्याच्या क्रीडेचा गूढार्थ न समजून, व स्वार्थसाधू लोकांचे धर्माच्या नांवाखालीं मोडणारे कांहीं पंथ पाहून, तेवढयावर श्रीकृष्णास नांवें ठेवणारांनीं या गोष्टीचा शांतपणें निदान विचार तरी करावा. रासरंगाचा प्रसंग हा केवळ दूषणास्पद असून त्याचा विचार करणें सुद्धां भावी पिढीच्या नीतीस विघातक आहे, असें ह्मणणें ह्मणजे सध्देतूनेंच कां होईना परंतु आपलें अज्ञत्व व आग्रही स्वभाव व्यक्त करणें होय. अशा प्रकारानें भागवतांतील या प्रकरणावर पांघरूण घालूं इच्छिणाऱ्या लोकांचे हेतू सिद्धीस जाणें हें सध्यांच्या काळांत शक्य नाहीं. रासरंगाची कथा व त्यावरील चर्चा हीं लहान मुलांच्या कानावर पडतां नये, तसें झाल्यास त्यांच्या कोमल व निर्मल अंतःकरणावर घातुक परिणाम होऊन त्यांच्या नीतीस धक्का बसेल असें ह्मणणाऱ्या

---

* कां जें अन्य देहाचें सामर्थ्य : अन्य देहीं नसे उमटत ॥ हें नेणोनि जन उन्मत्त : यथेष्टाचारिं प्रवर्ततसे ॥ १६९ ॥—रास. ५. शिवकल्याण.

लोकांस सध्याची आमच्या समाजाची स्थिति कळत नाहीं, असें तरी ह्मणावें किंवा नीतिमत्तेचें मान वाढविण्याच्या सदिच्छेनें सध्याच्या मनूंत नसणारें अज्ञान लहान मुलांमध्यें गृहीत धरून तो एक प्रकारचा नकली निर्मळपणा कायम ठेवण्यासाठीं हे लोक व्यर्थ प्रयत्न करतात, असें असावें. श्रीकृष्णाच्या बाललीला लहान मुलांच्या कानावर सुद्धां जाऊं नयेत असा प्रयत्न करणें जरी स्तुत्य मानलें तरी शक्य नाहीं; कारण या गोष्टी कोणच्या तरी रूपानें आबालवृद्धांस अवगत असतात; फरक येवढाच कीं कोणास त्या भाविक लोकांच्या तोंडून दैवीकृत्यें ह्मणून कळतात व कित्येकांस त्या जुन्या धर्माची चेष्टा करणाऱ्या कुटाळांच्या मध्यस्तीनें अश्लील ह्मणून कळतात. कसेंही असो, लहान मुलांच्या कानावर या गोष्टी पडूं नयेत असा प्रयत्न करणें हें सूर्यावर पांघरूण घालण्यासारखेंच होणार आहे. अर्जुनासारखा भक्त अकृत्रिम प्रेमानें, तर शिशुपालासारखा शत्रु अनुपम वैरानें, कृष्णमहिमा वाढविण्यासच कारणीभूत होतो. तद्वतच सध्यांच्या मनूंत सुद्धां धर्माभिमानी भक्तीनें, तर अल्पविद्यादूषित टवाळकी करण्याच्या दुर्बुद्धीनें, कृष्णकथा प्रचलित ह्या करतातच. तेव्हां कृष्णलीला झांकून ठेवण्याचा प्रयत्न व्यर्थ होय. योग्य प्रयत्न ह्मणजे कृष्णकृत क्रीडेच्या तत्वार्थाची मीमांसा करणें व तो नीट समजून घेणें हाच, असें आह्मी समजतों. श्रीकृष्ण परमात्म्याचीं कृत्यें दूषणार्ह आहेत असें स्थापन करूं पहाणाऱ्या जनांच्या दृष्टीनें सुद्धां असेंच ठरेल, कीं जर एकादी वाईट गोष्ट प्रचलित झाली हें निश्चित असेल तर मग ती झांकण्याचा प्रयत्न न करितां तिचा विस्फोट व खंडण जोरानें कसें होईल याचाच विचार केला पाहिजे.

आमच्या पुराणांतील वर्णनें सर्व लाक्षणिक अर्थानेंच समजलीं पाहिजेत, असें एक मत अलीकडे प्रचलीत आहे, व त्यांत पुष्कळ सत्यांश आहे. पुराणांचा अर्थ लाक्षणिक घेतल्यानें त्यांची गोडी विशेष समजते हें खरें आहे, व त्यांमधील खरा बोध करून घेणें असल्यास लाक्षणिक अर्थावरच मुख्यत्वें लक्ष असलें पाहिजे हें उघड आहे. परंतु परमेश्वर जेव्हां अवतारकृत्यासाठीं मनुष्यदेह धारण करितो, तेव्हां त्याच्या हातून सर्व कृत्यें सत्यत्वानें घडतातच.

त्या कृत्यांचा लाक्षणिक व गूढ अर्थ निराळा असतो म्हणून तीं कृत्येंच मुळीं घडलीं नाहींत असें मात्र नव्हे. उदाहरणार्थ, अक्कलकोटच्या स्वामींनीं कोणा बाई-चें कुंकू पुसून टाकिलें म्हणजे त्याचा लाक्षणिक अर्थ त्या बाईचा नवरा मेला असा असूं शकेल, परंतु त्यामुळें कुंकू पुसून टाकिलें या गोष्टीच्या सत्यत्वास बाध येत नाहीं. ती गोष्ट घडली हें खरें, व त्या गोष्टीचा प्राकृत कृत्याच्या पलीकडे गूढार्थ असूं शकेल हेंही खरें, हेंच तत्व शिवकल्याणांच्या ग्रंथांत सर्वत्र दिसून येईल. पुराणांतील गोष्टी निव्वळ रूपकें होत, हें मत आ-ह्मांस तरी पसंत नाहीं. परमेश्वराची अवतारकृत्येंच सर्व रूपकात्मक असतात असें आह्मीं समजतों. अर्थात् रासक्रीडेच्या वर्णनांत सांगीतलेलीं कृत्यें श्रीकृष्णांच्या हातून मुळींच घडलीं नाहींत, हें ह्मणणें आह्मास संमत नाहीं. तीं कृत्यें प्रत्यक्ष घडलीं नाहींत असा कविकटाक्ष कोठेंही नाहीं. मूळ भागवतांत ही नाहीं व शिवकल्याणांच्या टीकेंतही नाहीं.

प्रपंचांतील सर्व संबंधांत स्त्रीपुरुष संबंध हा विशेष महत्वाचा व विशेष पवित्र मानलेला आहे. आर्य वाङ्मयांत अनेक प्रसंगीं प्रकृति-पुरुष किंवा माया-ब्रह्म यांचे स्पष्टीकरण करण्यासाठीं स्त्री व पुरुष याच सांसारिक संबं-धाची योजना केलेली असते. प्रकृतिपुरुषाचें ऐक्य स्पष्ट करून दाखविण्यास दुसरा कोणचाही प्रेमाचा प्रकार समर्थ नसतो. स्त्रीचें पतीवर असणारें प्रेम केवळ निष्कपट व सर्वतोपरी पूर्ण असतें. प्रेमाच्या इतर प्रकारांत कोठें ना कोठें तरी न्यूनता भासतेच, परंतु पतिव्रतेच्या पतीवरील प्रेमांत स्वार्थत्याग ओतप्रोत भरलेला असतो. पत्नी पतीच्या आज्ञेबाहेर जावयाची नाहीं; पती शिवाय भार्येस दुसरा प्रेमाचा विषय नाहीं; तिचें अपत्यावरील प्रेमसुद्धां दु-सऱ्या प्रतीचेंच किंबहुना पत्नीचें अस्तित्वच केवळ पतीसाठीं. जीवशिवाचें ऐक्य प्रतिपादन करण्यास स्त्रीपुरुषसंबंधच योग्य होय, व याचमुळें श्रीकृ-ष्णांनीं आपल्या अवतारकृत्यांत जीं अनेक कार्यें केलीं, त्यांत रासक्रीडेंतील मधुर भक्तीचें वर्णन सर्व साधुसंत प्रमुखत्वानें करितात. परमेश्वरास आपलें सर्वस्व अर्पण केलें पाहिजे, ही कल्पना कोणच्याही धर्मांत सांपडेल व ती

हल्लीं सुधारलेल्या राष्ट्रांतील धर्मांतही पण आहेच. या ह्मणण्याचें सत्यत्व त्या त्या धर्मांची पुस्तकें वाचल्यास कळून येणार आहे तेव्हां ज्या गोपींनीं आपलें सर्वस्व परमेश्वरचरणीं अर्पण केलें होतें, त्यांची भक्ति उच्चतम कोटीची होती हें उघड होय. कोणच्याही मार्गानें परमेश्वराचें अक्षय्य चिंतन करणारास तो कृपावन परमात्मा प्राप्त होतो, हें श्रीमद्भगवद्गीतेंत स्पष्ट करून सांगितलें आहे.* भगवंतांनीं अनेक लोकांशीं अनेक प्रकारचे संबंध आणून त्या सर्वांचा उद्धार केला हें श्रीमद्भागवताच्या वाचकांस निराळें सांगावयास नको.

येवढें मात्र येथें मुद्दाम सांगून ठेवलें पाहिजे, कीं या विषयाचा स्वस्थपणें विचार करण्याच्या हेतूनेंच हा ग्रंथ वाचल्यास त्यापासून फायदा होणार आहे. ग्राम्य बुद्धिनें मात्र हा ग्रंथ कोणी हातीं घेऊं नये, अशी सविनय प्रार्थना आहे. पतिपत्नी संबंधाची पवित्रता न समजून हे शब्द उच्चारतांच पशुवृत्तीचा मनांत संचार होण्याइतक्या ज्यांच्या प्रकृती नाजुक व चंचल झाल्या असतील, त्यांनीं या ग्रंथाच्या नादीं लागूं नये, व तशाच प्रकृतीच्या आपल्या आप्तइष्टांच्या हातीं हें पुस्तक पडूं नये अशी खबरदारी घ्यावी.

आतां प्रस्तुत आवृत्तीबद्दल दोन शब्द लिहिले ह्मणजे झालें. शिवकल्याणांच्या चरित्रासंबंधीं माहिती फारच थोडी मिळते. पैठण व दौलताबाद या दोन प्रसिद्ध शहरांशीं त्यांचा संबंध होता हें स्पष्ट आहे. श्रीमद्भागवत दशमस्कंधावरील त्यांची टीका समग्र छापून निघाल्यावर त्यांच्या संबंधीं जी माहिती सांपडेल तेवढी देण्याचा आमचा विचार आहे. तोंपर्यंत ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवावर टीका लिहिणारे तेच हे शिवकल्याण, येवढें सांगितलें ह्मणजे पुरे. अकोल्यापासून सुमारें ६ मैलांवर उगवें नांवाचें एक लहानसें खेडें आहे. तेथील देशमुखांजवळ या भागवताच्या पूर्वार्धाची प्रत आह्मांस प्रथम मिळाली. त्या प्रतीच्या शेवटीं शक १७०६ आहे. उत्तरार्ध येथें मिळाला

---

* शिवकल्याणांनीं दिलेल्या वर्णनाशिवाय वाचकांनीं ज्ञानेश्वरींतील नवव्या अध्यायांतील बत्तिसाव्या श्लोकावरचें व्याख्यान पहावें.

नाहीं. पुढें खुद्द अकोल्यांतील रामदास स्वामींच्या मठांतील पोथ्या तपासतां तेथें समग्र दशमस्कंधाची प्रत आह्मांस सांपडली. या प्रतींत पूर्वार्धाचे कांहीं अध्याय सांपडत नाहींत. ही प्रत उगव्याच्या प्रतीपेक्षां सुमारें ४९ वर्षांनीं जुनी आहे व पुष्कळ शुद्ध आहे. प्रत काळजीपूर्वक सुवाच्य लिहिली आहे, व ही उगव्याच्या प्रतीपेक्षां सर्वतोपरी चांगली आहे. यांतील रासपंचाध्यायीचा शक १६६१ हा आहे. या प्रतीबरहुकुम आह्मीं हें पुस्तक छापून काढलें आहे. शिवकल्याणांची स्वतःची प्रत मिळती तर शुद्धांशुद्धतेबद्दल अधिक खात्री वाटती; तथापि येऱ्हवीं सुद्धां जुन्या प्रतीची शुद्धलेखनपद्धति ठेविल्यानें भावी व्याकरणकर्त्यास उपयोग होईल असें वाटून जुनें शुद्धलेखन कायम ठेविलें आहे. रा. रा. वि. का. राजवाडे यांनीं ही सुचना प्रथम आह्माला केली याबद्दल आह्मी त्यांचे आभारी आहों. मुळाबरोबर प्रत करण्याची काळजी घेतली आहे, तरी कांहीं चुका राहिल्या आहेत त्यांच्याबद्दल वाचक क्षमा करितील अशी आशा आहे.

आकोल्यांतील आमचे रसिक मित्र डा. दत्तात्रय कृष्ण केलटकर यांच्या प्रोत्साहनानेंच केवळ हा ग्रंथ बाहेर पडत आहे. त्यांचे आभार मानण्याचें धाष्टर्य आह्मीं करीत नाहीं, कारण ग्रंथप्रकाशक वास्तविक तेच आहेत ह्मटलें असतां चालेल. आमचे मित्र रा. रा. कृ. ग. सहस्रबुद्धे, रा. रा. गो. द. खंडकर व रा. रा. ह. रा. पिटके यांनीं ग्रंथाचा शेवटचा अध्याय लिहून काढण्याच्या कामीं आह्मांस मदत केली हे त्यांचे आमच्यावर उपकार आहेत. ग्रंथप्रकाशनास मदत केलेल्या सद्गृहस्थांची यादी पुढें जोडलीच आहे.

आकोला
फाल्गुन वद्य २ शके १८१८.

ग. ब. मोडक.

ॐ

श्रीमद्भागवतांतर्गत

# रासपंचाध्यायी.

---

## अध्याय १*

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीनित्यानंदसद्गुरुश्रीविठ्ठलाय नमः ॥ आतां स्मरोनि नित्यानन्दचरण : करुं हरिगुणकीर्तन ॥ करिजैतें पावन : निजवाग्देवतेते ॥१॥ तो वृंदावनविलासी : गोपीमानसनिवासी ॥ श्रीकृष्ण सुखराशी : भक्तैकसखा ॥ २ ॥ अधष्ठुनि मायेतें : प्रवर्तोनि जनक्रीडार्थें ॥ साधारण चित्तें : निजस्थें करावि ॥ ३ ॥ आणि या भवार्णवापासुन : त्रासले जे मुमुक्षु जन ॥ त्यांसि विशेषें शांतसदन : योजिलें पाहिजे ॥ ४ ॥ ऐसें चिर्ति धरुन : आणि प्रस्तुत व्रजवासिजन ॥ सर्वथा जो शरण : सर्वत्याग करुनि ॥ ५ ॥ तयासि पाववावया विश्रांति : प्रकटावी रमणमूर्ति ॥ यास्तव तो गोपीपती : गोपिकांसवें ॥ ६ ॥ धरुनि उत्तमा विग्रहातें : अधिष्ठुनि वृंदावनातें ॥ क्रीडला तें मुनिनाथें : संग्रहिलें अत्रें ॥ ७ ॥ जे जे कार्हि मुनिभाप : लोकोद्धाराचिया आशा ॥ श्रीशुकें कौरवेशा : परीक्षिती प्रति ॥८॥ निवेदिली कृष्णकीर्ति : उत्तम कथा भागवती ॥ ते सूतें शौनकांप्रति : अनुवादिली असे ॥ ९ ॥ तोचि मज अतिमन्दातें : नित्यानंदें दीननाथें ॥ आदेशिलीं माझीं दुरितें : निरसावया आवर्धि ॥ १० ॥ यया गुणराशि निक्षित मन : असे सांडुनि इतर वणवण ॥ न देखों हें विषयसाधन : जेणें कृतार्थेलें बहु ॥ ११ ॥ असो मीं स्वधर्मरहित : वेदशास्त्र अनधीत ॥ अव्युत्पन्न असंमत : अनधिकारि ॥ १२ ॥ तया म्यां निस्तरावे दुरितें : असावें सद्गवगेनी सरतें ॥ म्हणोनि

---

* श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधाच्या पूर्वार्धांतील २९ ते ३३ अध्यायांस **रासपंचाध्यायी** ही संज्ञा आहे. एकोणतिसाव्या अध्यायास येथें पहिला अध्याय असें म्हटलें आहे.

मन्नार्थे : कृपा करूनि ॥ १३ ॥ योजिलें वरदानिं : मग हरिगुणवर्णनीं ॥ प्रवर्तविली माझी वाणी : मनहिं तत्पर केलें ॥ १४ ॥ ह्मणौनि मिं प्रवर्तलों येथें : परि इतुकेंचि असो मातें ॥ न स्मरावें आणिकातें : माझेनि मनें ॥ १५ ॥ हे अत्यंत विलासवती : भागवती भव्य मूर्ति ॥ कटींतें कवळुनि हस्तिं : माझया हृत्पीठिं ॥ १६ ॥ तिष्ठत असो अनपाइनी : न स्मरो विषयादिकाहिं ॥ सदां सत्प्रेमरसडोहिं : निमग्न असो मन ॥ १७ ॥ मग मीं त्रिगताभीमान : करीन तद्गुणकीर्तन॥वाचा होईल पावन : निस्तरेण(न) दुरितें ॥ १८ ॥ आळउनि रमालीळ : नित्यानंदे क्रमेल काळ ॥ हें व्यर्थ विषयजाळ : न गोंविल मातें ॥ १९ ॥ विचारिलें या अर्थातें : प्रवर्तलों येथें ॥ जे गतकथा संबंधातें : सूचिजे ऐसें ॥ २० ॥ मागें वरुणाल्या पासुन : जालें नंदाचें आगमन ॥ मग निजलोकदर्शन : नन्दादिकांसि केलें ॥ २१ ॥ स्वरुपाचिया अभिव्यक्ति : या अध्यस्ताचिया निवृत्ति ॥ ते सर्व गोपपंक्ति : स्वरूपालोकारुढ केली ॥ २२ ॥ मागुती स्वपदानुचारी : आणुनि पूर्ववृत्तिवरिं ॥ मग तो वृंदावनविहारी : स्वयें क्रीडता झाला ॥ २३ ॥ यावरि त्या गोपकांता : सदा ज्या स्वसांन्निध्यार्ता ॥ सांडुनियां समस्ता : गृहकृत्यातें ॥ २४ ॥ अवलोकावया कृष्णवदन : तृषित ज्यांचे नयन ॥ वाचा गुणपरायण : सदां ज्यांचि ॥ २५ ॥ त्यांचिया आर्तिशमनातें : विचारुनि नन्दसुतें ॥ स्वसांनिध्यें त्यांतें : परम शांत करावें ॥ २६ ॥ या हेतु रासरंगिं : टाण मांडुनि त्रिभंगिं ॥ विचरोनि नाना भंगी : तो कंदर्पभंगिं क्रीडता जाला ॥ २७ ॥ नाना तो रमारमण : कंदर्पदर्पहरण ॥ हें प्रकटावया खुण : युक्ति रचिलिं ॥ २८ ॥ मिळोनि गोपिकांचिं शतें: विंधितां नेत्रकटाक्षशरपातें ॥ अणुमात्राहि त्यातें : नव्हेचि विकारु ॥ २९ ॥ जेवि तो पर्वतपति : वायुवेगें तिळरति ॥ न क्षोभोनि निर्वृत्ती : न सेडीतु असे ॥ ३० ॥ तेवि तो यशोदानन्दन : कंदर्पदर्पापशमन ॥ रासमण्डळमंडन : विस्तारिता जाला ॥ ३१ ॥ नाना तया कामदर्पहरातें : भजोनि गोपिकाशतें ॥ निजकामनिवृत्तीतें : पावतीं जालिं ॥ ३२ ॥ ऐसें संपादावया कांहिं : प्रवर्तलि हे पंचाध्याई ॥

श्रृंगाररसयुक्त शांतिडोहिं : श्रवणारूढिं आसिजे ॥ ३३ ॥ ऐसि सुचना जे काहिं : प्रकटिजेल ठाइं ठाइं ॥ हा श्रृंगाररसाचि पाहिं : शांतरसें मांडला ॥ ३४ ॥ त्यांतु प्रथम इये अध्याइं : सम्पादिजेल इतुकें काहिं ॥ त्या गोपांगना स्वगृहिं : असतां कृष्णें ॥ ३५ ॥ प्रवेशोनि वृंदावनातें : गाउनि सुरसें वेणुगीतें ॥ त्या गोपिकांचिं चित्तें : आकर्षुनि अवधिं ॥ ३६ ॥ आपण होता तेथें : नेउनि त्यां प्रेमळांतें ॥ उक्तिप्रयुक्ति त्यांतें: प्रेमसंप्लुत करुनि ॥ ३७ ॥ रासरसमारंभाचेनि पंथें : सादर करुनि त्यांतें ॥ नाविक वंचुनिया तेथें : अप्रकट जाला ॥ ३८ ॥ ऐसि कथा जे काहिं : बोलिजेल इये अध्यायिं ॥ त्यांतु प्रथम श्लोकें काई : राया परीक्षितीप्रति ॥ ३९ ॥ बोलिजेल मुनिनाथें : श्रीशुकें व्याससुतें ॥ तेंचि म्यांहि वर्णिजेतें : नित्यानंदकृपा ॥ ४० ॥ नातरि ज्याचें हें गुणकीर्तन : तो सादर असो रमारमण ॥ भीमातरिमंडन : विलासिया हारि ॥ ४१ ॥ आपली मति प्रमाण : वर्णिजेति हरिगुण ॥ कृपा करुत सज्जन : पावऊत पार ॥ ४२ ॥ प्रत्यक्ष शांतस्वरूप : जो नित्यानंद निर्विकल्प ॥ तो सफळ करु संकल्प : कीर्तनविषइं ॥ ४३ ॥ असोनि शुद्धचित्त : वर्णवातें निर्विक्षिप्त ॥ न चुकावा पदपदार्थ : निरसावि विघ्नें ॥ ४४ ॥ बहु काय बोलों येथें : अवलोकावें मज दीनातें ॥ कृपा करावी समर्थें: श्रीनित्यानंदें ॥ ४५ ॥

॥ श्रीशुकउवाच ॥

**भगवानपि ता रात्रीः शरदोत्फुल्लमल्लिकाः**
**वीक्ष्य रंतुं मनश्चक्रे योगमायामुपाश्रितः ॥ १ ॥**

श्रीशुकें रायातें : ऐसें येथें बोलिजेतें ॥ स्मरोनि पुर्वकथेतें : अपिशब्दें करुनि ॥ ४६ ॥ जें ते नंदादि व्रजवासी : केले ब्रह्मलोकदर्शि : अनुभउनि स्वरुपासि : विस्मित जाले ॥ ४७ ॥ यावरि तो नन्दसुत : श्रीकृष्णाख्य भगवंत ॥ स्मरोनि प्रतिश्रुत : देखोनि त्या रात्रि ॥ ४८ ॥ पुर्वि ज्या गोपसुता : निजप्राप्तीलागि वितता ॥ असोनि व्रतस्था : जलमज्जनाचा ठाइं ॥ ४९ ॥ वस्त्राहरणनिमित्तें : आकर्षूनि त्यांचि चित्तें ॥ आश्वासिलें त्यांतें :

जें आगामिनि रात्री ॥ ९० ॥ माझेनि वो सांगातें : क्रमतील त्या तुमतें ॥ ऐसें त्यां कुमारीतें : प्रतिश्रुत जें केलें ॥ ९१ ॥ त्या ज्यां रात्री नियमिता : देखोनि लक्षणोक्ता ॥ तो संकेत जाला स्मरता : जे रमावें येथें ॥ ९२ ॥ स्वता तो कामपुर्ण : सर्वथा कर्तव्यशून्य ॥ तथापि तो भक्तभावन : भक्तवत्सळ सदां ॥ ९३ ॥ भक्तांसि जें प्रार्थ्य : तेंचि त्यासि कृत्य ॥ ह्मणौनि प्रति सु(श्रु)तांत सत्य : करणें पडलें ॥ ९४ ॥ त्या रात्री ज्या नियमिता : कैश ह्मणाल आतां ॥ तरि शरत्काळयुक्ता : विकासितसुमना ॥ ९५ ॥ ह्मणिजे तयां निशांतवर्ति : उगवल्या पुष्पजाति ॥ एवं त्या बहु शोभति : शरदाक्षपा ॥ ९६ ॥ तियां देखोनि रात्रींतें : स्मरलि कुमारींचि इप्सितें ॥ ते इच्छापुर्णार्थ क्रीडेतें : अवलंविलें कृष्णें ॥ ९७ ॥ जेविं कोण्हि साधक जन : भगवंतिं सदां शरण ॥ साधनातें निस्तरोन : मोक्षाधिकारि जाले ॥ ९८ ॥ मग त्यांचा कार्यार्थ : विचारुनि गुरुनाथ ॥ बोधउनि वाक्यार्थ : तत्पदातें पाववि ॥ ९९ ॥ तेवि तेणें नन्दसुतें : गोपिकांचि प्रशस्तें चित्तें ॥ त्यक्तविषयकामयुक्तें : जाणोनियां पैं ॥ ६० ॥ स्मरोनि संकेतातें : आरंभिलें क्रीडेतें ॥ या प्रसंगें त्यांतें : निजस्थ करावें ॥ ६१ ॥ नातरि रात्रिसंज्ञे करुन : निजप्राप्तिचें लक्षण ॥ जें काळिं गोपीजन : अधिकारी जाला ॥ ६२ ॥ तो जो काळ प्रशस्त : स्वकृपाशरद्युक्त ॥ शुभसम्भारभारित : देखोनि कृष्णें ॥ ६३ ॥ नातरि रात्रि हें अनुवादन : सुचिलें एकांतलक्षण ॥ जे काळिं निर्विक्षिप्त मन : धैर्यातें पावे ॥ ६४ ॥ असो देखोनि उत्तम काळातें : स्मरोनि त्यांचि प्रतिश्रुतें ॥ श्रीकृष्णें विहारातें : धरिलें मनिं ॥ ६५ ॥ ह्मणाल तो आत्माराम : अवाप्तसर्वकाम ॥ योगीमनविश्राम : साक्षात् ब्रह्म सनातन ॥ ६६ ॥ त्यासि या कर्माचा ठाइं : प्रवृत्तीसि हेतु काई ॥ या ग्राम्य व्यवहारें नाहिं : प्रयोजन कदापि ॥ ६७ ॥ तरि अंगीकरुनि योगमायेतें : हें अघटितही घडों येतें ॥ सर्व व्यवहार येथें : त्याची सत्ता ॥ ६८ ॥ हा मायतें नांगीकारिता : तरि कैंचि हे विश्वता ॥ निःसंगत्वादि प्रथा : कैसेन होति ॥ ६९ ॥ हे योगमाये करिं पाहिं : जालें तें जालेंचि नाहिं ॥ अनादि आभासें काई :

काय येक न घडे ॥ ७० ॥ जरि आभासि हें जगद्भान : तरि यासि भगवंत-पण ॥ उपाधीतें विलासउन : अनुपहिंतताही घडली ॥ ७१ ॥ आणि जें उपाधिभान : तें उपहितें सहवर्तमान ॥ तो उपहितार्थहि आपण : आभास-रूपें जाला ॥ ७२ ॥ एवं जीवोपाधि जीवत्व : आणि अनुपहित जें शुद्धत्व ॥ हें न विकारोनि महत्व : निजविलासें घडतें ॥ ७३ ॥ हे जे विलासशक्ति : तेचि योगमाया हे ख्याति ॥ निर्विशेष भगवंतिं : अनादि असे ॥ ७४ ॥ अग्नीचा ठाइं उष्णांश : कीवां उदकामाजि रस ॥ आकाशीं अवकाश : निर्विशेष जेवि ॥ ७५ ॥ तेवीचि भगवंतिं : निर्विशेष हे शक्ति ॥ योगमाया हे ख्याति : अनादि असे ॥७६॥ असो निर्विशेष दृक्स्थिति : तेथेंचि जे चिच्छक्ति ॥ जियेच्या अभिव्यक्ति : निर्विशेषता आली ॥ ७७ ॥ तेंचि योग-मायेचें लक्षण : तिया आपणा आपण ॥ विशेषें भासमान : तो अंगिकारु तिचा ॥ ७८ ॥ असो बहु बोलों किति : सविशेषें भेदप्रतीति ॥ तेचि वि-श्वघटनेचि युक्ती : योगमाया जाणावी ॥ ७९ ॥ तियेतें आश्रुन : भगवंतु विश्वकारण ॥ सर्पादि भासाचें कारण: रज्वादि जेवि ॥ ८० ॥ ऐसी हे अनादि रचना : नाना विलासकल्पना ॥ तदंतःपाति हाही जाणा : भगवंताचा विहारु ॥ ८१ ॥ ह्मणाल हें भासलें असतां भान : चैतन्य सर्वत्र साधारण ॥ सर्वदा विकारशून्य : निष्क्रियत्वें असे ॥ ८२ ॥ यथें श्रीकृष्णाचा ठाईं : विशेष तो काइ ॥ ऐसा जरि काहिं : आक्षेप जाला ॥ ८३ ॥ तरि हा न होनि माये अधिन : मायेते अंगीकरून ॥ सविग्रह दाविलें दर्षण (र्शन): लोकपा-ळनार्थ ॥ ८४ ॥ या लोकाचा ठाईं : विडंबन दावितुसे काहिं ॥ परि कृत-कर्मधर्मबंधनाहिं : प्रवृत्ति यासि ॥ ८५ ॥ हें कर्मनिबंधन जीव : तैसा नव्हे हा अभिप्राव ॥ कर्मवशें जीव सर्व : संसरति सदा ॥ ८६ ॥ कींवा या जीवाचि माझारि : जे मोक्षाधिकारि ॥ अविद्या निवृत्तीही वरि : तिष्ठती यावदैवभोग ॥ ८७ ॥ उक्तसाधनपंथें : पाउनि अविद्यानिवृत्तीतें ॥ कर्तव्यार्थ काहिं त्यातें : नुरोनि सुखें असति ॥ ८८ ॥ स्थितिमात्र संरक्षण : तिष्ठती क्रियां शून्य ॥ ऐसेंहिं न येजिल क्षण ; श्रीकृष्णाचा ठाईं ॥८९॥ योगमायेतें अधिष्ठुन :

जैसा हा रचिला सविकार जन ॥ तैसाचि विकारशून्य : विग्रहाभास हा ॥ ९० ॥ ऐसि हे अनादि स्थिति : तेचि हे श्रीकृष्णमुर्ति ॥ नाना विलास वति : स्थिति देवता हे ॥ ९१ ॥ (?) पाहातां या रमणरूपातें : दु:खातें तरतां भक्ति शतें ॥ आसुरांचि अयुतें : विरोनि जाति ॥ ९२ ॥ साधारण चित्सत्ता जे कांहिं : तियेसि निपटुनि भेद नाहिं ॥ हा विस्तारला असताहिं : लोकरमणविग्रह ॥ ९३ ॥ हें सामर्थ्यविशेषवशें : सर्वांसिहि भासत असें । श्रीकृष्ण साक्षाद्ब्रह्म ऐसें : वेदप्रतिपाद्य ॥ ९४ ॥ जयाच्या चरणांबुजलेशा : सदा ब्रह्मादिकांसि आशा ॥ हा जगदाभास ठसा : निजमुखिं दाविला ॥ ९५ ॥ आणि विश्वरुपदर्शनप्रसंगें : जग जाला आपण आंगें : नातरि अनंतें जगें : दाविलिं निजरूपिं ॥ ९६ ॥ नातरि तो सत्यलोकपति : एकली हे शामसुन्दरमूर्ति ॥ असंख्यात आकृति : देखता जाला ॥ ९७ ॥अनंता गुणवर्णनिं : नुपरे विधींची वाणी ॥ भ्रू (भ्रू) भंगमात्रें श्रेणी : असुरांच्या वधिल्या॥ ९८ ॥ एवं हा नन्दानन्दन श्रीकृष्ण : योगमायेतें पुर : सरून ॥ रासरीती करून : विहरता जाला ॥९९॥

**तदोडुराजः ककुभः करैर्मुखं प्राच्या विलिंपन्नरुणेन शंतमैः**
**सचर्षणीनामुदगाच्छुचो मृजन् प्रियः प्रियाया इव दीर्घदर्शनः॥२॥**

पूर्वोक्तिं करुनि : श्रीकृष्णें जवं धरिलें मनिं ॥ तव उडुराज उदेला गगणीं (नीं) : त्या क्षणाचा ठाईं ॥ १०० ॥ असो तो नक्षत्रपती : चंद्र ऐसी ख्याति ॥ तो घेउनि स्वसंपत्ति : कृष्णार्थ आला ॥ १ ॥ नाना ते नक्षत्रगण : कृष्णाचे बंदीजन ॥ श्रीकृष्ण जें क्रीडापरायण । उदैलें तेथें ॥ २ ॥ येऱ्हविं चंद्राचें लक्षण : त्या रात्रि दीर्व दर्शन ॥ तें सांडुनि उदयमान : कृष्णानुचर जाला ॥ ३ ॥ निजमर्यादेतें सांडुनि : कृष्णें जें क्रीडेतें धरिलें मनिं ॥ तेचि काळिं तो उडुमणि : उदैला आकाशिं ॥ ४ ॥ कोणे येके कर्माचे फळ : जोडला आजि रमालीळ ॥ ह्मणोनि मर्यादाभंग विकळ : मानिला नाहिं तेणें ॥ ५ ॥ जेवि भगवंति रंगलें मन : उक्त धर्म विसर्जुन ॥ जाणते जे जन : परिव्राजन करिती ॥ ६ ॥ तेवि तो उडुनाथ : केवळ श्रीकृष्णप्रीत्यर्थ ॥

सांडुनि काळ नियत : ऐलाडाचि उदैला ॥ ७ ॥ आतां ते उदयाची स्थिती : कोण लक्षणें उमटति ॥ काय करित होंत्साता उडुपति : उदैला आकाशिं ॥ ८ ॥ तरि करशब्दें करुन : शुद्ध जे स्विकरण ॥ तयां किरणीं उत्पन्न : अरुणता जाली ॥ ९ ॥ तेजे लोहितप्रभा : तिया प्राचीमुखा आली शोभा ॥ असो उदयसंबंधी नभा : प्राची संज्ञा ॥ ११० ॥ तें जें दिशावदन : त्यातें निज किरणोत्पन्न ॥ त्या अरुणतेचें विलेपन : करित होंत्साता ॥ ११ ॥ एवं उदैते वेळे : प्राचीमुख आरक्त केलें ॥ नातरि तेणें आणिलें : उपायेण श्रीकृष्णजीतें ॥ १२ ॥ निजकिरणिंची अरुणता : अर्पिली श्रीकृष्णनाथा ॥ तेणें प्रसंगे जाला सरता: रासविहारिं ॥ १३ ॥ नाना त्या गोपींचि मनें : कृष्णें करितां स्वाधीनें ॥ त्यासंबंधें तेनें : संतोषविजेतें जाले ॥ १४ ॥ आपण मनोभिमानी दैवत : तें मन जालिया कृष्णस्थ ॥ तरि सर्वथा मि कृतार्थ : जालों हें मानिलें ॥१५॥ ह्मणोनि न गणूनि स्वकाळ : उगउनि अति प्रांजळ ॥ स्वचारितिं रमालीळ : पूजिला तेणें ॥ १६ ॥ नातारि पुरःसरोनि चंद्रातें : आलिंगिलि गोपिकांचि चित्तें ॥ कां जें वैकुंठदैवतें : आपणातें स्मरिलें ॥१७॥ आह्मि तवं जडजाती : सत्वर न पावों त्या एकांतिं ॥ यालागी प्रार्थूनि उडुपति : पाठविला तिहिं ॥ १८ ॥ ह्मणोनि चंद्रें तेणें : गोपिकामनोहरणें ॥ सर्वथिं उगवनें : राया कृष्णजीतें ॥ १९ ॥ असो त्या नक्षत्रनाथें : निजउदये निमित्तें ॥ उद्भउनि अरुणतेतें : त्या रंगें करुन ॥ १२० ॥ प्राचीमुखातें लिंपिलें : निजरागें सुरंग केलें ॥ जेवि कुंकुमरागें रंगिलें : प्रमदामुखातें प्रियें ॥ २१ ॥ आणिक तो उडुमाळी : काये करिता जाला ते काळिं : सर्व हे जन मंडळी : निज अवलोकनार्थ ॥ २२ ॥ तो जो साधारण जन : अर्कतापें तप्यमान ॥ त्या तापाचें निवारण : करित होंत्साता ॥ २३ ॥ नातरि जै क्रीडला कृष्ण : तैं उत्साह पावला जन ॥ ग्लानि गेली निवोन : शांति जालीं मनें ॥ २४ ॥ तो उत्साह त्याच्या मनि : प्रेरिता जाला उडुमणि ॥ निजरश्मी स्पर्शोनि : सावध केलें ॥ २५ ॥

तत्संबंधी कृष्णकथा : येउनि ज्या श्रवणपंथा ॥ निवारेल भवव्यथा : तयाची जाणा ॥ २६ ॥ नाना तेणें सीतकरें : चेवविलिं त्यांचि अंतरें ॥ रास आरंभिला रमेश्वरें : हे सुचना केली ॥ २७ ॥ ते जे पवित्र गुणकीर्ति : तेथें असावें श्रवणार्थि ॥ दुरितांच्या पंक्ती : सरोनि जाति ॥ २८ ॥ ऐसी होतां जाणवणी : तिहिं सांडिली ग्लानि ॥ उदय केला कृष्णगुणिं : आतां काय चिंता ॥ २९ ॥ या गुणकीर्तनपोतें : उतरों वृजिनार्णवातें ॥ या लक्षणें ग्लानीतें : सांडिलें जनें ॥ १३० ॥ एवं तेणें रमानाथें : श्रीकृष्णें नन्दसूतें॥ स्मरोनि तें प्रतिश्रुतें : त्रीडा धरिली मनिं ॥ ३१ ॥ एवं तो पूर्वोक्तलक्षाणिं : उदैला नक्षत्रमणि ॥ त्या रासमण्डळमण्डनि : उपकरता जाला ॥ ३२ ॥ त्या शोभे सहवर्तमान : शोभलें कैसें वृंदावन ॥ आणि तो नन्दनन्दन : काय करिता जाला ॥ ३३ ॥

**दृष्ट्वा कुमुद्वंतमखंडमंडलम् रमाननाभं नवकुंकुमारुणम् ।**
**वनं च तत्कोमलगोभिरंजितम् जगौ कलंवामदृशां मनोहरम् ॥ ३॥**

पूर्वोक्तें करुनी : उदैला जो उडुमणि ॥ ऐसिया लक्षणि : लक्षिला राया ॥ ३४ ॥ ज्या उदयातें प्रतीक्षुनि : मुकुलिता होत्या कमळिनी ॥ या रश्मिस्पर्शें करुनि : विकासलिया ॥ ३५ ॥ या अर्थें कुमुद्वंत : बोलिला तो निशानाथ ॥ जो मंडळअखंडित : संपूर्ण कळा ॥ ३६ ॥ असतांहि कळान्यूनता : तो उगवला पुरता : अकाळींचि समस्ता : कळापूर्ण जाला ॥ ३७ ॥ नातरि विचारुनि कृष्णोद्देशातें : सांडिलें क्रमातें ॥ जेविं सांडिजे क्रमज्ञानातें : बुद्धि जडे भगवंति ॥ ३८ ॥ तेवि समय न गणून जाला तो कळापुर्ण ॥ पाहावया कृष्णवदन : उगवला चन्द्र ॥ ३९ ॥ कृष्णी उत्सुक जाला : कळाविभागातें विसरला ॥ सम्पूर्ण उगवला : अखंडित-मंडळ ॥ ४० ॥ नाना सानुभव सर्वज्ञान : जेवि भगवंतिं भजे विज्ञान ; तेवि तो कळापूर्ण : प्रकटला तेव्हां ॥ ४१ ॥ परि तो ज्योत्स्नामाळी : उगवेचा होता जे काळिं ॥ तेव्हां कैसी योजली : मंडळ कृतितें ॥ ४२ ॥

रमादेवीचें वदन : जें सर्वशोभासदन ॥ न्यून्याधिक्यविहीन : अतिवर्तुळ जैसें ॥ ४३ ॥ तेवि येणें क्षमानाथें : स्मरोनि रमामुखातें ॥ काहिं एक आपणयातें : सादृश्य आणिलें ॥ ४४ ॥ आणि ते नवकुंकुमयुक्त : सुरंग-रागरंजित ॥ तेवि किंचित् उडुनाथ : साम्यता पावला ॥ ४५ ॥ असो तें शशिमंडळ कैसें : तरि वर्तुळ रमानना ऐसें ॥ नव कुंकुम शोभे तैसें : सुलोहित जें ॥ ४६ ॥ उदयरागें रंगोनि : तो उगवला गगनिं ॥ नातरि प्रेमा भरला मनिं : श्रीकृष्णाजिचा ॥ ४७ ॥ कृष्णिं जो अनुराग : तेणें तो शोभला सुरंग ॥ लोपोनिया निजरंग : स्वस्थ जाला ॥ ४८ ॥ असो रमेचेनि चिंतनें : जोडिलिं उभय लक्षणें ॥ कां जे मनि धरिलें तेणें : मिहिं आवडेन ॥ ४९ ॥ नातरि हें असो येचि ठाईं : सर्व सौंदर्यें कृष्णपाईं ॥ तेथें हे शोभा ते काई : परि दाविला विलासु ॥ ५० ॥ सांडुनि विषयरति : जरि काहिं उपजे भक्ति ॥ भगवत्प्रीतीची युक्ती : इतुकीचि असे ॥ ५१ ॥ प्रेमा उपजे प्रबळ : तरि वश्य होय रमालीळ ॥ वांचुनि इतर पाल्हाळ : नसरें तेथें ॥ ५२ ॥ असो हे भावार्थकथा : चालती कथाचि वदुं आतां ॥ कृष्ण क्रीडापर असतां : उगवला जो चंद्र ॥ ५३ ॥ तया उक्त लक्षणाते : आणि रश्मिरंजित वनातें ॥ देखोनि नन्दसुतें : काय करिजेतें जालें ॥ ५४ ॥ चन्द्राचें लक्षण : पूर्वोक्तें करुन ॥ यावरि तें वन : शोभलें कैसें ॥ ५५ ॥ उदेला जो सुधाकर : त्याचे कोमळ रश्मिकर ॥ जे सुधासमर्पणद्वार : ता-पशमक ॥ ५६ ॥ तयां सोज्वळिं रश्मियुक्त : तें वन शोभले दीप्तिमन्त ॥ शांत श्रीमण्डित : सुधाप्राय ॥ ५७ ॥ उक्तलक्षणा चन्द्रातें : आणि तन्मण्डिता वनातें ॥ देखोनि मधुरां गीतातें : तो नन्दानन्दन ॥ ५८ ॥ विचित्रा गायनकळा : प्रकटूनि गाता जाला ॥ तो कमळनयन सावळा : विलासिया कृष्ण ॥ ५९ ॥ त्या गीताचें लक्षण : तरि वामशब्दें स्त्रीजन ॥ नातरि वक्र अवलोकन : या निमित्तें वामदृशा ॥ ६० ॥ त्या स्त्रियांचें मनोहर : ऐसे गाइले मधुर ॥ पापतापापहर : ग्लानिनाशक ॥ ६१ ॥ नातरि नयन मिषें करुन : आकारलें त्यांचें मन ॥ असतें जाले प्रसन्न : दैवताप्रसादें

॥ ६२ ॥ ह्मणोनि त्या वामनयना : निर्देशिल्या गोपांगना ॥ अधिकार-सम्पन्ना : गीतासिं जाल्या ॥ ६३ ॥ कां जे तो गीतप्रभाव काहिं : साधारण ऐसा नाहिं ॥ त्या सुलोचनाचि पाहिं : अंगींकेल्या येथें ॥ ६४ ॥ एवं त्या वामलोचना : शुद्धचित्ता गोपांगना ॥ अधिकारसंपन्ना : कृष्णसान्निध्यातें ॥ ६५ ॥ त्यांसि कृष्णगीत मधुर : जालें असे मनोहर ॥ सांडोनि व्यवहार : कृष्णपरा जाल्या ॥ ६६ ॥ एवं उडुनाथें स्पर्शित : देखोनि वन प्रशस्त ॥ कृष्णें गाईले गीत : गोपीमनोहर ॥ ६७ ॥

**निशम्य गीतं तदनंगवर्धनं व्रजस्त्रियः कृष्णगृहीतमानसाः ॥**
**आजग्मुरन्योन्यमलक्षितोद्यमाःस यत्र कांतो जवलोलकुंडलाः ॥ ४॥**

मग त्या व्रजकांता : श्रीकृष्णें गृहीताचित्ता ॥ स्वगृहिं अनासक्ता : त्यक्त-गृहधर्मा ॥ ६८ ॥ त्या आइकोनि कृष्णगीतातें : जात्या जाल्या तेथें ॥ योगी प्रत्यक्पंथे : पावती जेवि ॥ ६९ ॥ ते कृष्णगीत कौलक्षण : तरि तत्कामाचें वर्धन ॥ असो आइकोनि गायन : दर्शनार्ता जाल्या ॥ ७० ॥ जेवि कोण्हि शोधित मन : आइकोनि वेदवचन ॥ वाक्यार्थपरायण : मुमुक्षु होति ॥७१॥ तेवि त्या कृष्णाचित्ता : आईकोनि तया गीता ॥ असत्या जाल्या आर्ता : जाकळलिया विरहें ॥ ७२ ॥ केव्हां श्रीकृष्णसुधाकरें : तृप्ती कीजे तन्नेत्रच-कोरें ॥ केव्हां अमृतमधुरें : कीजेल तृप्तकाम ॥ ७३ ॥ श्रीकृष्णीं होउनि रता नाइकों संसारवार्ता ॥ केव्हां विरहव्यथा : शमवील कृष्ण ॥ ७४ ॥ जंव्हि आह्मि कृष्णचिंत्ता : जवं नाहिं केलों स्वस्था ॥ तंवरि हा भवपंथा : दुःसह आह्मा ॥ ७५ ॥ त्या गीतातें आइकोनि : विरहकातरा कामिनी ॥ निजगृहा-पासुनि : कृष्णा निकट आल्या ॥ ७६ ॥ तें जें आगमन काहिं : परस्परें प्र-कट नाहिं ॥ येका कृष्णाचा ठाईं : बहुतींची आशा ॥ ७७ ॥ लालसेचेनि भरें : चोरिलिं तिहिं अंतरें ॥ कां जे आपणाचि जावें एकसरें : साधिल कृष्ण ॥ ७८ ॥ या कृष्णसंगाचा ठाईं : बहुतें काजकाई ॥ लोकिकें चाड नाहिं । जरि आवडे श्रीकृष्ण ॥ ७९ ॥ कृष्णप्रीति जरि पुरी : वृत्तीसिहि चोरि ॥ एकाकी कृष्ण सेजारीं : पहुडावें सुखें ॥ ८० ॥ एवं त्या गोपकांता : पृथ

कल्वें कृष्णाचित्ता ॥ येकीसि येक न कळतां : आल्या तेथें ॥ ८१ ॥ जेथें तो लक्ष्मीरमण : करित होता कलगायन ॥ तेथें तो गोपीगण : न जाणत आला राया ॥ ८२ ॥ त्यांचें गमनलक्षण : अति वेगें करुन ॥ तेणें जालें अन्दोलन : कुण्डलयुग्माचें ॥ ८३ ॥ असो सत्वर चालतां चाली : कुण्डलें हालों लागलीं ॥ नाना त्यामिषें विलसली : श्रीकृष्णभक्ती ॥ ८४ ॥ अन्तारें प्रेमा उसळला : तो कुंडलिं प्रकट केला ॥ देहभाव शिथिळ जाला : हें जाणवलें नावेक ॥ ८५ ॥ एवं त्या गतिचपळा : गोपी विलोलकुंडला ॥ होता जेथें घनसावळा : तेथें आल्या मिळाल्या ॥ ८६ ॥ जेवि योगी कृष्ण-परायण : करावया तत्वविवेचन ॥ संसारभूमीतें सांडुन : सद्गुरुप्रति येति ॥ ८७ ॥ तेवि त्या कृष्णकामिनी : गृहसंगातें सांडुनि ॥ श्रीकृष्ण होता विजनिं । तेथें सर्व आल्या ॥ ८८ ॥ आतां चालतां ते चाली : कर्में शि-थिलें जालिं ॥ कोणा चिन्हिं वोळखिलिं : तेंहिं आइका ॥ ८९ ॥ असो आइकोनि कृष्णगीतें : गृहकर्में असमाप्तें ॥ सांडुनि त्या प्रत्यक्पंथें : तत्काळ आल्या तेथें ॥ ९० ॥

**दुहंत्योभिययुः काश्चिद्दोहं हित्वा समुत्सुकाः ॥**
**पयोधिश्रित्य संयावमनुद्वास्यापरा ययुः ॥ ५ ॥**

कितिएक गोपांगना : करित होत्या गोदोहना ॥ ते सांडुन उत्सुकमना : आल्या तेथें ॥ ९१ ॥ कितिएक गोपगृहिणी : पात्रें दुग्धि भरोनि ॥ ठेविलिंहिं जे क्षणिं : चुलीचा ठाइं ॥ ९२ ॥ तवं अकस्मात् आइकिला ध्वनि : त्यातें गेल्या विसरोनि ॥ तें दुध न उतरोनि : त्वरित गेल्या ॥ ९३ ॥ आणि संयावशब्दें जाण : जें गोधूमखंडकण ॥ देशभा-षाविशेषण : सांजा ऐसें ह्मणति ॥ ९४ ॥ तो तप्त उदकेंसिं युक्त : चुली-वरि पाकार्थ ॥ ठेविला तवं अकस्मात : आइकिला सुस्वर ॥ ९५ ॥ त्या कलगीतें वेधितमना : विव्हळ ज्या गोपांगना ॥ नुतरितां गोधुमकणां : तत्का-ळ गेल्या ॥ ९६ ॥

परिवेषयंत्यस्ताद्धित्वा पाययंन्त्यः शिशून्पयः ॥
शुश्रूषंत्यः पतीन्काश्चिदश्नंत्योपास्य भोजनम्॥ ६ ॥
लिंपत्यः प्रमृजंत्योन्या अंजंत्यः काश्च लोचने ॥
व्यत्यस्तवस्त्राभरणाः काश्चित्कृष्णांतिकं ययुः ॥ ७ ॥

आणिकही गोपकांतां : पतिसुतादि समस्तां ॥ परिवेषण करितां : चतुर्विधें अन्नें ॥ ९७ ॥ आइकतां गीतध्वनि : तें गेल्या विसरोनि ॥ गीतें खोंचलिया मनिं : चालिल्या तेथुनि ॥ ९८ ॥ जेवि तत्वमस्यादिवाक्यार्थें : भेदिलिं मुमुक्षुचि चितें ॥ सांडुनि दृश्य भुमीतें : प्रत्यगर्थि रमति ॥ ९९ ॥ तेवि त्या भामिनी : आइकोनि कृष्णध्वनि ॥ त्या परिवेषणातें सांडुनि : त्या निकट गेल्या ॥ २०० ॥ कितियेक पुत्रवंत्या : पुत्रातें दुग्ध पाजितां ॥ याहुनि इतर कृत्या : विसर्जुनि ॥ १ ॥ तवं आइकोनि कृष्णगीतें : टाकोनि त्या कर्मातें ॥ श्रीकृष्ण होता तेथें : आलिया त्या ॥ २ ॥ आणिका गोपगृहिणी : स्वस्थचित्तें करुनि ॥ असोनि निजभवनि : पतीतें सेवितां ॥ ३ ॥ आइकोनि कृष्णगीता : तेथूनि जाल्या निवृत्ता ॥ श्रीकृष्ण होता : तेथें आलिया ॥ ४ ॥ जेवि एकवाटुनि सर्व वृत्ती : चिदाभासपरा होति ॥ सांडुनि दृश्य संपत्ति : एकनिष्ठ बुद्धि ॥ ५ ॥ ते साधनाचेनि पंथें : त्वंपदशोधननिमित्तें ॥ निजावच्छिन्ना चैतन्यातें : भजोनि विचारिं योग्य जाली ॥ ६ ॥ तें आइकोनि गुरुवाक्यातें : सांडुनि चिदाभासातें ॥ अनुसरोनि तत्पदार्थातें : तदाकार होयें ॥ ७ ॥ सांडुनि परिच्छिन्नाभिमान : स्वस्वरुपिं संस्थान ॥ पावावयाचें साधन : निदिध्यास कीजे ॥ ८ ॥ तैसें सांडुनि पतिसवेतें : गोपिका प्रत्यक् पंथें ॥ कृष्ण होता तेथें : चालिल्या राया ॥ ९ ॥ नातरि सेवाफळभूत : तें आइकिलें कलगीत ॥ कृष्णनिकट त्वरित : येत्या जाल्या ॥ १० ॥ आणि सांडुनि अन्य कृत्या : भोजनें करित होत्या ॥ गीति वेधल्या होत्सात्या : तत्काळ आल्या ॥ ११ ॥ असो सांडुनि भोजनातें : गेल्या कृष्ण होता तेथें ॥ मुमुक्षु निजकर्मातें : विसर्जिती जेंवि ॥ १२ ॥ नानीकरुनि प्राणधर्म : मुमुक्षु आत्माराम ॥ सेविति तेवि निः-

काम : आलिया गोपी ॥ १३ ॥ कितिएक गोपस्त्रिया : विलेपने करित होतिया ॥ उद्वर्तनादि क्रिया : संपादितां ॥ १४ ॥ कितिएक सुलोचना : शुद्धदृष्टि गोपांगना ॥ कज्जळें भरोनि नयना : शोभवितां ॥ १५ ॥ तवं आईकोनि कृष्णध्वनि : नेत्रांजन विसर्जोनि ॥ जेथें होता यदुमणी : तेथें आल्या ॥ १६ ॥ एवं कृष्णकळावंतें : प्रेरुनि कलगीतें ॥ तिया गोपिकांतें : निजवश केलें ॥ १७ ॥ त्या सुगीतवेधितमना : व्यत्यस्तवस्त्रभूषणा ॥ चालिल्या व्रजांगना : कृष्णा निकट ॥ १८ ॥ असो वस्त्रें भूषणें जें काहिं : होति त्यांचा ठाईं ॥ ते त्या काळीं सर्वांहिं : विपरीत धरिलिं ॥ १९ ॥ कृष्णगीतें वेधिलिं चित्तें : विसरल्या तारतम्यातें ॥ वस्त्रें नेसल्या विपरीतें : तैसिच भूषणें ॥ २० ॥ कर्णभूषणें जें काहिं : तें लेइल्या अंगुळीचा ठाईं ॥ आणि कटिभूषणें तिहिं : वाइली गळां ॥ २१ ॥ करभूषणें जें कांहिं : त्यांतें लेइल्या पाइं ॥ आणि नासाभूषणें तिहि : खोंविलि सिरिं ॥ २२ ॥ नेसत वस्त्रें परिधानें : वोढिलिं तिहिं प्रावर्णें ॥ किंवा वस्त्रें सांडुनि आस्तरणें : नेसल्या त्या ॥ २३ ॥ एकीं अनुसंधानराहित्यें : शिरिं धरिलें वस्त्रांतें ॥ शिरोभूषणें कटितें : अळंकारिलिं कितियेकिं ॥ २४ ॥ कंठिं माळांचिया भावना : लेइल्या रशना ॥ कटीचा ठाइं अंगना : माळा लेइल्या ॥ २५ ॥ एवं इत्यादि लक्षणें : व्यत्यस्त वस्त्राभरणें ॥ वेणुगीतें वेधिलिं मनें : कृष्णाजवळि आल्या ॥ २६ ॥ नाना कृष्णप्रातिचिये वेळे : संसारिकें पडलिं विकळें ॥ परि अंतरिं रूप सावळें : ठसावलें विशेषें ॥ २७ ॥ दृश्याहुनि परतली वृत्ती : ते जाली कृष्णा सवती ॥ तेणें त्याची बाह्यस्थिती : बोड-वली विकळ ॥ २८ ॥ एवं त्या व्रजांगना : विकळवसनभूषणा ॥ मुरलि-ध्वनिविव्हळमना : कृष्णाप्रति आल्या ॥ २९ ॥ आतां त्यांसि जातिये वेळे : राया एक नवल जालें ॥ कृष्णिं चित्त रंगलें : ते न फिरोचि मागें ॥ ३० ॥

**ता वार्यमाणाः पतिभिः पितृभिर्भ्रातृबंधुभिः ॥**
**गोविंदापहृतात्मानो नन्यवर्तंत मोहिताः ॥ ८ ॥**

त्या कृष्णाप्रति गोपगृहिणी : चालिल्या राया जे क्षणीं ॥ तेव्हां त्यांचे भर्तार येउनि : वारिलें त्यांतें ॥ ३१ ॥ या रात्रीचा ठाईं : कृष्णा जवळ काज काइ ॥ ऐसें बहुं कांहिं : वार्जेलें त्यांतें ॥ ३२ ॥ आणि भाउ सोइरे जे कोण्हि : बापेंहिं त्या कामिनी ॥ निवारिल्या परि मनीं : संचरला कृष्ण महद्भुत ॥ ३३ ॥ असो कृष्णें मोहिल्या अंतरिं : न येतीच वृत्तीवरि ॥ त्या वार्जिल्या सुंदरी : न फिरती ॥ ३४ ॥ नाना कृष्णप्राप्तीचा ठाईं : विघ्न वोडवलें जें काहिं ॥ परि तें न मानिले तिहिं : कृष्णस्थ चित्तें ॥ ३५ ॥ अगा विषयिं जरि आसक्ति : तरि त्याज्य नव्हे विधिशास्ति । आतां कृष्णभक्तां प्रति : निवृत्तीच इष्ट ॥ ३६ ॥ असो लक्षुनि विषयासक्ति : कर्मकांडाची प्रवृत्ती ॥ येथें शिष्टाचारां प्रति : हा संकोच केला ॥ ३७ ॥ आतां कृष्णि रंगलीं चित्तें : कर्तव्य नुरेचि त्यातें ॥ देहनिर्वाहहि ज्यांतें : नयेचि आड ॥ ३८ ॥ ऐस्या कृष्णरतचित्तातें : जन्हि आलिं विघ्नशतें ॥ तें नचलती प्रवृत्तीपंथें : निवृत्तिपर जे ॥ ३९ ॥ एवं त्या गोपकांता : कृष्णमोहिचित्ता ॥ कृष्णानिकट जातां : निवारिल्या तिहिं जन्हि ॥ ४० ॥ तथापि त्या निषे-धातें तिहिं : सर्वथा मानिलें नाहिं ॥ गृहादि सम्बन्ध जिहिं : सांडिला निःशेष ॥ ४१ ॥

**अंतर्गृहगताः काश्चिद्गोप्योलब्धविनिर्गमाः ॥**
**कृष्णं तद्भावनायुक्ता दध्युर्मीलितलोचनाः ॥ ९ ॥**
**दुःसहप्रेष्ठविरहतीव्रतापधुताशुभाः ॥**
**ध्यानप्राप्ताच्युताश्लेषनिर्वृत्या क्षीणमंगलाः ॥ १० ॥**
**तमेव परमात्मानं जारबुद्ध्यापि संगताः ॥**
**जहुर्गुणमयं देहं सद्यः प्रक्षीणबंधनाः ॥ ११ ॥**

त्यांमाजि ज्या कोण्हि : अन्तर्गृहातें अधिष्ठुनि ॥ असो दुःप्रवेश जेथुनि : निर्गम नव्हे ॥ ४२ ॥ ऐशा गृहा माझारि : कोणी होत्या व्रजनारी ॥ त्या मधुर गीतातें जन्हि : आइकिले तिहिं ॥ ४३ ॥ तन्हि तयांसि ते क्षणि : निर्गमुचि न पुरे तेथुनि ॥ पति सुतादि जनीं : निरोधिलें बहु ॥ ४४ ॥

मग त्या कृष्णचित्ता : सर्वदा तद्भावयुक्ता ॥ जऱ्हि कृष्णमायामोहिता : परि अलब्धनिर्गमा ॥ ४५ ॥ येकवाटुनि सर्व वृत्ती : आठविली कृष्णमती ॥ असो कृष्णातें त्या सति : ध्यात्या झाल्या ॥ ४६ ॥ त्या सभाग्या अंगना : असोनि मिळितलोचना ॥ हृदयमंदिरिं यदुराणा : आणिला तिहिं ॥ ४७ ॥ त्या ध्यानमयी कृष्णमुर्तीतें : आळिंगुनि स्वचित्तें ॥ या गुणमया देहातें : सांडित्या जाल्या ॥ ४८ ॥ त्यांसि साक्षात् रमानाथ : ध्यानप्रसंगें जो आप्त ॥ त्यातें पावोनि तें त्रिजात : उद्धरलें राया ॥ ४९ ॥ आणि इतरा ज्या कामिनी : कर्मसाम्यातें पावोनि ॥ आइकतांचि वेणुध्वनि : त्यक्ताशा जाल्या ॥ ५० ॥ कृष्णस्मरणनिमित्तें : पुण्योत्कर्षसामर्थ्यें ॥ पूर्वींचिं सर्व दुरितें : सरिलिं होतिं ॥ ५१ ॥ न्याहाळितां कृष्णवदन : सदा तटस्थ नयन ॥ गुंतलें ज्यांचे मन । श्रीकृष्णशोभे ॥ ५२ ॥ सदां ज्यांची वाणी : गुंतली गुणवर्णनिं ॥ कर्ण गुणश्रवणिं : गुंतले राया ॥ ५३ ॥ श्रीकृष्णें ज्यांचा काळ : सदां क्रमला प्रांजळ ॥ रागद्वेषादि सकळ : मुराले तत्संगें ॥ ५४ ॥ कृष्णभजनतीव्राग्नि : तेणें दुरिततृणश्रेणि ॥ जाळुनि कृष्णकामिनी : त्या शुद्धचित्ता होत्या ॥ ५५ ॥ गृहसंगातें अतिक्रमुन : कृष्णवाक्य प्रतिक्षुन ॥ किंचित् आश्रमावलंबुन : होत्या स्वगृहिं ॥ ५६ ॥ तंव आइकोनि कृष्ण-गीतें : सांडुनि सर्वाश्रयातें ॥ श्रीकृष्ण होता तेथें : आलिया राया ॥ ५७ ॥ सांडितां सर्व बंधातें : कृष्ण जोडला त्यांतें ॥ आतां येणेंजाणें तो येथें : विलासमात्र ॥ ५८ ॥ आतां ज्या गोपकांता : प्रस्तुत प्रतिबंधयुक्ता ॥ होत्या अंतर्गृहगता : गोविल्या भर्तारिं ॥ ५९ ॥ त्या सांडुनि सद्यःप्राप्तीतें : पावोनि ध्यानमार्गातें ॥ आळिंगुनि कृष्णातें : त्यजिलें उपाधि ॥ ६० ॥ आइकोनि वाक्यवृत्ती : श्रीकृष्णेंसि प्रतियुक्ती ॥ चाळुनि अविद्यानिवृत्ती : जाली नाहिं ॥ ६१ ॥ मग ध्यानाचिया तीव्रगति : प्रांतिं प्रसन्न कृष्णमूर्ति ॥ करुनि त्या सती : कृष्णास्था जालिया ॥ ६२ ॥ असो ध्याना-चेनि बळें : अंतरिं कृष्णें आलंगिलें ॥ त्याभिषें प्रेरिलें : आत्मज्ञानातें ॥ ६३ ॥ त्या ज्ञानें अज्ञाननिवृत्ति : पावोनि सांडिलि देहाकृति ॥ श्रीकृष्णि अवस्थिति :

पावल्या त्या ॥ ६४ ॥ ह्मणाल नसोनि अविद्यानिवृत्ति : कृष्णि जारबुद्धि होति ॥ जारबुद्धिने त्या सति : पावल्या कैशा ॥ ६५ ॥ ऐसें मानेल तुमतें : तरि जारबुद्धि जऱ्हि त्यांतें ॥ तऱ्हि हा परमात्मा येथें : विरुद्ध नव्हे ॥ ६६ ॥ असो कृष्ण मानिला जार : जो पतीहुनि पर ॥ त्या परबुद्धिनें नंदकुमार : सेविला तिहिं ॥ ६७ ॥ प्राकृतें लक्षणें काहिं : न देखोनि कृष्णाचा ठाइं ॥ तो उत्तमत्वें मानिला तिहिं : परमपुरुष ऐसें ॥ ६८ ॥ नाना आईकोनि गुरुवाक्य : शोधिलें नाहिं सविवेक ॥ न जाणती तात्विक : कृष्णआत्मा ऐसें ॥ ६९ ॥ जेवि प्रपंचाहुन विलक्षण : वेदें वर्णिलें निर्गुण ॥ तें वेदवाक्यें करुनि प्रमाण : मुमुक्षु भजति ॥ ७० ॥ नाना विशेष विग्रहाचा आकृती : मुमुक्षुहि तेचि स्मरती ॥ तऱ्हि स्वरुपप्रभावशक्ति : मुख्य मतीच त्यांचि ॥ ७१ ॥ तेवी परमात्मा श्रीकृष्ण : हें तवं नव्हे अप्रमाण ॥ त्या परमात्मावि स्त्रीजन : परत्वें पावला ॥ ७२ ॥ आतां निजात्मा श्रीपति : तो काये देईल अन्य गति ॥ बुद्धीहुनि बळवती : वस्तुशक्ति येथें ॥ ७३ ॥ वस्तुशक्तीचा ठाईं : बुद्धीची अपेक्षा नाहीं ॥ ऐसा न्याय जो काहिं : तो अन्यथा नव्हे ॥ ७४ ॥ श्रीकृष्ण प्रत्यक्पदार्थ : तेथें परत्वें जऱ्हि चित्त ॥ तऱ्हि फळ तों यथावत : आत्मत्वें देइल ॥ ७५ ॥ कां जें ज्यारबुद्धीहीसाटिं : साक्षात् कृष्णोंसिंच भेटि ॥ फळहि त्यांतें शेवटिं : श्रीकृष्णसंग ॥ ७६ ॥ ह्मणाल कर्मनिबंधन : जीवासि देहधारण ॥ तरि भोगिल्या वांचुन : टाकिला कैसा ॥ ७७ ॥ तरि तें प्रारब्धबंधन : तत्काळ जालें क्षीण ॥ कर्मक्षय आणि कृष्णध्यान : एके काळिं जालें ॥ ७८ ॥ ह्मणाल त्या होत्या गृहगता : काहिं असेल गृहास्था ॥ येणें लक्षिलि आसक्तता : त्यांते प्रथम तों सत्वशुद्धि कैंचि ॥ ७९ ॥ अहो त्यांतें ध्यानगत : कैसा जोडला भगवंत ॥ शुभाशुभसंचित : क्षीण जालें नसतां ॥ ८० ॥ तरि प्रेष्ठविरह जो काहिं : त्यांचेनि साहावेला नाहिं ॥ कृष्णवियोगें त्यांसि पाहिं : अवस्था जे जाली ॥ ८१ ॥ तेचि जाले तपपर्यंत : तेणें नाशिलें कर्मजात ॥ त्या तीव्रतापें विधुत : कल्मषा जाल्या ॥ ८२ ॥ असो तीव्रताप जाला :

तोचि सुकृतें फळला ॥ पापार्णव आटला : जालिया शुद्धचित्ता ॥ ८३ ॥ तें जें शुद्धचित्तें : कृष्ण प्रकटला तेथें ॥ एवं एककाळें त्यांतें : उभय योग घडले ॥ ८४ ॥ तीव्र ध्यानगति : प्रारब्धाचि समाधि ॥ तेव्हां तया शुद्ध-चित्तिं : प्रकटिजेते कृष्णें ॥ ८५ ॥ ऐसें जें शास्त्रश्रवण : तें येथें योजिलें प्रमाण ॥ आतां पुण्य जें जालें उत्पन्न : कृष्णविरहें ॥ ८६ ॥ त्या पुण्याच्या उन्नति : जेव्हां व्हावी वैकुंठप्राप्ति ॥ तेथें त्यांसि सद्योमुक्ति : योजलि कैसि ॥ ८७ ॥ तरि ध्यानयोगें करून : प्रत्यक्ष जें कृष्णदर्शन ॥ तेणें तें पुण्य क्षीण : तया ज्ञाने जालें ॥ ८८ ॥ साक्षात् कृष्णि आळिंगिलें : त्या मिषें ज्ञानातें प्रेरिलें ॥ सुख देउनि नाशिलें : अज्ञान त्यांचें ॥ ८९ ॥ त्या ज्ञान-शक्तीचा ठाइं : शुभाशुभ कैंचें काइ ॥ जीवन्मुक्ति सुखहि : नुधवीच माया ॥ ९० ॥ त्या येणे लक्षणें अबळा : योजल्या सुमंगळा ॥ साक्षात् ब्रह्मी घडला : अवसरु त्यांतें ॥ ९१ ॥ एवं कृष्णविरहतापें : जळालिं निःशेष पापें ॥ आणि श्रीकृष्णें निजरुपें : आळिंगिलें सद्य ॥ ९२ ॥ त्या आळिं-गनसुखप्राप्ति : स्वता कृष्ण जाला गति ॥ पुण्याची पंक्ती : विरोनि गेली ॥ ९३ ॥ येथें मंगळलक्षण : जाणावी पुण्याची खुण ॥ तें कृष्णि पावउन : आपण विरालें ॥ ९४ ॥ अथवा विरहतापें करुन : पापें गेलि जळोन ॥ मग पुण्यचय सम्पुर्ण : पूर्वार्जित उरला ॥ ९५ ॥ प्रारब्धभोगाचा अंतिं : ध्यानाचिया उन्नति ॥ श्रीकृष्णातें जिया सती : आळिंगित्या जाल्या ॥ ९६ ॥ त्या आळिंगनप्रभावकळा : पुण्यचयही विराला ॥ त्या भाग्याच्या प्रेमळा : पावल्या कृष्णि ॥ ९७ ॥ एवं या प्रकारें करुन : केलें मंगळाशुभाचें व्याख्यान ॥ आतां कोण्हि अभिज्ञ जन : ऐसें ह्मणति ॥ ९८ ॥ जें प्रारब्धक्षये नसतां : त्या कैशा पावल्या श्रीनाथा ॥ तरि कर्मक्षय तों अर्थता : तेचि काळिं लक्षिला ॥ ९९ ॥ असो तिहिं तीव्रध्यान बळें : आयुष्यातें संकोचिलें ॥ हें स्थुळहि नाहिं केळें : गोपाळा आधिन ॥ ३०० ॥ कां जे ते अत्यंत मुर्ख : कृष्ण-प्राप्तिचे निरोधक ॥ हें जर्‍हीं अतात्विक : यां आधिन नसो ॥ १ ॥ किंवा हे या जडाचे पति : यावरीच यांची शास्ति ॥ तरि असो यांचिया हातिं :

होंचि सांडावें ॥ २ ॥ ऐसें जड अर्पावें यांतें : स्वताचि साधु कृष्णातें ॥ तिहिं विचारुनि आयुष्याते : संकोचिले तेव्हां ॥ ३ ॥ परि प्रारब्धभोग : बळवंत : तो भोगक्षय अवस्य प्राप्त ॥ जाला त्याची यथाव्रत : गति योजिलि ॥ ४ ॥ आइकोनि त्या गीतातें : कृष्णदर्शनार्तचित्तें॥जालिं परि प्रस्तुत त्यांतें : गोविलें त्या संबंधें ॥ ५ ॥ तया कृष्णविरहानाळें : संतप्तता भोगासि आली ॥ तया तापें सरलिं : पुर्विल दुःकर्में ॥ ६ ॥ आनि ध्यानमार्गें करुन : कृष्णि जालें आळिंगन ॥ तेणें जो काहिं उत्पन्न : सुखविशेष ॥ ७ ॥ त्या सुखभोगाचिया प्राप्ति : सरली सुकृतांची पंक्ति ॥ हें देहारंभकें ये रिति : नासलि शुभाशुभें ॥ ८ ॥ आतां या व्याख्यानें करुन : ऐसेंहि जालें निष्पन्न ॥ जें स्वधर्मानुष्ठान : करितिये वेळे ॥ ९ ॥ ब्राह्मणादि दोहिं : क्लेश जे क्रमिले काहिं ॥ त्या क्लेशद्वारें तिहिं : पुर्वदुरितें सारिलिं ॥ १० ॥ किंवा वैराग्यमुळें करुन : केलें जरि परिव्राजन ॥ शीतोष्णादि सहन : तेणें घडलें ॥ ११ ॥ तें दुरितांचें फळ भोगिलें : हें न्यायें प्राप्त जालें ॥ आतां अधर्माचरणिं घडलें : सुख जें कांहि॥ १२ ॥ स्नानादि त्याग वेळे : शरीरक्लेश जे चुकले ॥ तें त्यांसि आलें : फळासि प्राक्पुण्य॥ १३ ॥ऐसें करितां निरुपण : खण्डेल हें सत्साधन ॥ किंवा साधनरुपें दुराचरण : फळलें जरि ॥ १४ ॥ तरि तें पुण्याचरण : सर्वथा नव्हे क्रियमाण ॥ कर्माचें फळ कारण : फळांतरासि कैसें ॥ १५ ॥ फळासि फळप्रसंग जाला : ऐसा विरुद्धार्थ घडला ॥ तरि यदर्थिं योजिला : निर्णय ऐसा ॥ १६ ॥ शरीराचा ठाइं : सुखदुःखें जालिं जें काहिं ॥ तें पुण्यापुण्य फळें नाहिं : संदेह येथें ॥ १७ ॥ आणि स्वधर्माचरण : तें कर्म क्रियमाण ॥ हेंहिं नव्हे अप्रमाण : सर्व शास्त्रयुक्त ॥ १८ ॥ तैसेंच वैराग्यादि उत्पन्न : हें महत्पुण्याचें महिमान ॥ ईश्वरार्थ अनुष्ठान : तेहिं तैसेंचि ॥ १९ ॥ ऐसा उभयता विसंवाद : एक एकेंसि विरुद्ध ॥ आतां ये रिती निर्विवाद : करिजे आइका ॥ २० ॥ स्वधर्माचरणाचा ठाइं : मन जरि वश नाहिं ॥ तरि निष्पन्नचि नव्हे काहिं : साधनप्रसंग ॥ २१ ॥ वश जालियां मना : नुपजे क्लेशादि भावना ॥ एवं मन प्रवर्ते शुभसाधना :

तो पुण्यमहिमा ॥ २२ ॥ तया शुभाचरणप्रवाहिं : स्थूळ शरीराचा ठाईं ॥ दुःख सुखाभाव जो काहिं : तो शरीरदोष ॥ २३ ॥ कोण्हि यका काळें : साहिजे तो तेजोबळें ॥ सीतचि त्या वेळें : प्रशस्तें सेवि ॥ २४ ॥ किंवा बळवीर्या होतां हाणि : सीतेंचि उपजे ग्लानि ॥ उष्ण लाभें मानें : अत्यंत सुरवाड ॥ २५ ॥ आणि कोणें काळें करुनि : उष्णोंहिं उपजे ग्लानि ॥ एवं शीतोष्णादि दोन्हि : व्यभिचारें फळति ॥ २६ ॥ तस्मात् दैववशें : शरीर संबंध दोषें ॥ शरीराश्रयेंचि उमटतसे : सुखदुःखादि आकार ॥ २७ ॥ परि प्रारब्धाचेनि बळें : सुखास्पदहि काहिं आलें ॥ आणि अंतरिं उपजलें : वैराग्य तेथें ॥ २८ ॥ तें शरीरासि सुखकर : परि मनासि दुष्कर ॥ न करिजेचि अंगीकार : सुखेंकरिं त्यांचा ॥ २९ ॥ किंवा अंतरिं भोगासक्ति : आणि शरीरिं दोषोत्पत्ति ॥ तेणें विरुद्धत्वें फळा येति : सुखास्पदहि भोग ॥ ३० ॥ त्या सुखाभासें करुन : निस्तरणें पडे वृजिन ॥ जेवि मिष्ट पक्कान्न : तेणें प्राणसंकट जालें ॥ ३१ ॥ किंवा पंचाग्निज्वाळा : सोसितां मानिती सोहळा ॥ ऐसी क्रियमाण कळा : मनाचा ठाईं ॥ ३२ ॥ आणि भोगक्षणाचा ठाईं : सुखदुःखें उपजती देहिं ॥ त्या भोगिंहिं नाहिं : एकहि नेम ॥ ३३ ॥ शरिरिं शक्ति अशक्ति : भोगीं सुखदुःखें होति ॥ तया उभयें निस्तरती : पुण्यपापें जन ॥ ३४ ॥ किंवा एकार्थे कर्मफळ : दोहिंसहि अनुकुळ ॥ शरीरभोगही प्रांजळ : मनासही मानें ॥ ३५ ॥ किंवा एकाचां कर्मगति : उभयताहि सुखदुःखदाति ॥ एवं प्रसंगें उपपत्ति : दाविली ऐसी ॥ ३६ ॥ आतां असो हे येथें : अनुसरो प्रकृत कथेतें ॥ गीतश्रवणें गोपिकांतें : जाली जे अवस्था ॥ ३७ ॥ त्यां माजि तन्तर्गृहगता : कोण्हिएकी गोपकांता ॥ तिहिं स्मरोनि नन्दसुता : टाकिलें निजदेह ॥ ३८ ॥ असो सद्यः श्रीकृष्णातें : भेटावया निर्गमातें ॥ *न देखोनि ध्यानमार्गातें : अवलंबिलें तिहिं ॥ ३९ ॥ तया ध्यानमार्गें करुन : श्रीकृष्णातें आलिंगुन : उपाधीतें सांडुन : मिळालिया कृष्णिं ॥ ४० ॥ आनि त्या तीव्र ध्यान बळें : प्रारब्धातें नाहिं गणिलें : तेणें योगें सारिले : शुभाशुभ

* " न देखोनि " ह्या बद्दल मुळांत बरेच ठिकाणीं ' नेंदखोनि ' असें आहे.

भोग ॥ ४१ ॥ ऐसें राया परीक्षितीतें : निवेदिलें व्याससुतें : आइकोनि रायातें : उपजली शंका ॥ ४२ ॥ जें पूर्वोक्तें ग्रंथें : प्रशंसिलें वस्तुस्वभावातें ॥ जान्हिं त्या गोपिकांतें : जारबुद्धि कृष्णिं ॥ ४३ ॥ तथापि वस्तुप्रभावकळा : ब्रह्मत्वें कृष्ण फळला ॥ असो श्रीकृष्णिं फावला : अवसरु त्यांतें ॥ ४४ ॥ तरि पतिसुतादि जन : हे काये होसि अभिन्न ॥ 'सर्व ब्रह्म' हें वेदवचन : व्यर्थ असे कायि ॥ ४५ ॥ तरि पतिसुतादि भजनिं : मोक्ष कां न पवति प्राणि ॥ सन्यासादि विधि याजनिं : व्यर्थ प्रवर्तला काई ॥ ४६ ॥ एसें रायाचा चित्तिं : उपजोनि श्री शुकेंद्राप्रति ॥ बोलतुसेतें यथामति : वाखाणिजेतें ॥ ४७ ॥

॥ राजोवाच ॥

**कृष्णं विदुः परं कांतं न तु ब्रह्मतया मुने ॥**
**गुणप्रवाहो परमस्तासां गुणधियां कथम् ॥ १२ ॥**

अहो आइकावें मुनिनाथें : ऐसें गमतसे मज येथें ॥ जें त्या गोपी श्रीकृष्णातें : ऐसें जाणत होत्या ॥ ४८ ॥ हा आम्हा पासुनि पर : किंवा निजपतिहुनि इतर ॥ रमणीय अति सुंदर : मनोनयनरंजन ॥ ४९ ॥ ऐसें त्या सुंदरा : यशोदानंदकुमारा ॥ मुनिजनमनोहरा : जाणतीया जाल्या ॥ ५० ॥ पारि साक्षात् सच्चिदानंदघन : केवळ ब्रह्म सनातन ॥ ऐसें तो गोपीजन : जाणता नाहिं जाला ॥ ५१ ॥ का जे त्या गुणबुद्धि गोपकांता : रजसत्वादि गुणयुक्ता ॥ देहादिकिं अहंममता : परिच्छिन्नाभिमान ॥ ५२ ॥ ह्मणौनि स्वरूपभुताकृष्णातें : जाणितलें परत्वें त्यातें ॥ सर्पबुद्धी रज्जूतें : सर्पत्वेंसि परत्व ॥ ५३ ॥ तेवि त्यागोपगृहिणीं कृष्णासि परत्वें मानुनि ॥ आपण जाल्या विरहिणी : श्रीकृष्णार्थ ॥ ५४ ॥ कृष्णविषयकि अज्ञान : जे किं गुणप्रवाहसंज्ञ ॥ तेणें त्यांसि आत्मा कृष्ण : परत्वें गमला ॥ ५५ ॥ तया कृष्णिं त्यांसि मति : ब्रह्मत्वें नव्हती पुरति ॥ तरि अज्ञानाची निवृत्ति : कोणे रिति जाली ॥ ५६ ॥ अधिष्टान ज्ञानेंविण : कैसें नाशलें अज्ञान ॥ हें देहादि प्रपंचभान : नाशलें कैसें ॥ ५७ ॥ अज्ञानाचिया अनिवृत्ति :

कैशा त्या प्राप्तगति ॥ श्रीकृष्णि विश्रांति : कैशा गोपी पावल्या ॥ ५८ ॥ एवं एतल्लक्षण : रायाच्या मनिं प्रश्न ॥उपजला तें निवेदन : श्री शुकाप्रति केलें॥५९॥ तया प्रश्नाचें परिहरण : उत्तर ग्रंथें करुन ॥ करावया व्यासनंदन : बोलताति ऐसें ॥ ६० ॥

॥ श्रीशुक उवाच ॥

**उक्तं पुरस्तादेतत्ते चैद्यः सिद्धिं यथा गतः ।**
**द्विषन्नपि हृषीकेशं किमुताधोक्षजप्रियाः ॥ १३ ॥**

राया हें पुर्वी तुतें : बोलिलें उपपत्तिपंथें ॥ तो चैद्य पावला सिद्धीतें : द्वेषित होत्सांता कृष्णातें ॥ ६१ ॥ असो विख्यात शुशुपाळ : चैद्य देशाचा भुपाळ ॥ अनुजन्मि रमालीळ : द्वेषिला तेणें ॥ ६२ ॥ त्या संबंधेंचि येथें : पावला परम गतीतें ॥ ते साद्यंत कथा तुतें : सांगीतली पूर्वि ॥ ६३ ॥ एवं द्वेषबुद्धि भगवंतिं : पावला तो चैद्यपति ॥ मां या तरि गोपिकासती : प्रेमपात्रा कृष्णाचिया ॥ ६४॥ पाहावया कृष्णवदन : सदां तृषार्तनयन ॥ वाचा ज्यांचि पावन : कृष्णगुण वर्णितां ॥ ६५ ॥ सदा ज्यांचें मन : असोनि कृष्णा अधिन ॥ कांहिंहिं त्यांवांचुन : चिंतिलेंचि नाहिं ॥६६॥ राया पाहोनि कृष्णजीतें : तृणप्राय केलिं जीवितें ॥ सांडुनि सर्व आशेतें : सदां कृष्णकामा त्या॥६७॥ ह्मणसी कृष्णि ब्रह्मबुद्धि नसतां : कैशा त्यां गोपकांता ॥ गति पावल्या यासि आतां : पुशिला हेतु ॥६८॥जें जीवमात्र साधारण : परमार्थें चैतन्यघन ॥ परि जीवबुद्धी करुन : असत्य जालें ॥ ६९ ॥ तेवींचि कृष्णाचा ठाइं : ब्रह्मबुद्धि त्यांसि नाहिं ॥ तरि परमार्थें कृष्णपाइं : पावल्या कैशा ॥ ७० ॥ ऐसें आक्षेपिलें असतां : रायें त्या मुनिनाथा ॥ तेंचि प्रश्न उत्तर पुनः आतां : सिद्ध जालें ॥ ७१ ॥ द्वेशाचिया अनुवृत्ति : कृष्णि ब्रह्मबुद्धि नव्हति ॥ तरि तो चैद्यपति : कैसा ब्रह्मत्व पावला ॥ ७२ ॥ ऐसें राया जरि तुतें : मानलें असेल येथें ॥ तरि विशेषणद्वयें कृष्णातें : याचिलागि वर्णिलें ॥ ७३ ॥ द्वेषबुद्धी करुन : चैद्याचें जेथें होतें मन ॥ तो कृष्णराया जाण : हृषीकेश स्वयें ॥ ७४ ॥ जयाचिया सत्ते करुन : वर्तत असे इंद्रियगण ॥ नव्हे जो-

इंद्रियां अधीन : अनावृतस्वरूप ॥ ७५ ॥ जयाचिया दृष्टि काहिं : हा प्रपंचुचि जाला नाहिं ॥ स्वस्वरूपाचाचि ठाइं : अभिगमन सदां ॥ ७६ ॥ तैशाचि त्या गोपकांता : सदां श्रीकृष्णिं अभिरता ॥ श्रीकृष्णें ज्या निजात्मा : मानिल्या राया ॥ ७७ ॥ असो त्या सुन्दरा : कृष्णाच्या प्रियकरा ॥ सदा नंदकुमारा : आवडती बहुं ज्या ॥ ७८ ॥ अधोक्षज हें विशेषण : जो अनावृतज्ञान ॥ शब्दातें घेउनि मन : परतलें जेथुनि ॥ ७९ ॥ मनें सहवर्तमान : इंद्रियें जे अक्षगण ॥ त्या मनेंद्रियजनित ज्ञान : तें अक्षज म्हणिजे ॥ ८० ॥ तें जेणें अधः केलें : म्हणिजे तेणें नाहिं प्रकाशिलें ॥ अधोक्षज बोलिलें : या हेतु कृष्णातें ॥ ८१ ॥ एवं श्रीकृष्णाचा ठाईं : उपाधीचा स्पर्श नाहिं ॥ केवळ लीलाविग्रही : सच्चिदानन्दस्वरूप ॥ ८२ ॥ इतर जीव जे कोण्हि : सदा परिच्छिन्नात्मज्ञानी ॥ उपाधिधर्मेंचि करुनि: निजग्रहण ज्यांचें ॥ ८३ ॥ देहादिकाहुनि परतें : स्वण (?) नाहिं ज्यांच्या चित्तातें ॥ देहादिकचि ज्यांतें : स्वरुपत्वें मानलें ॥ ८४ ॥ त्या देहसंबंधे करुनि : शुभाशुभ आचरोनि : त्या शुभाशुभें जन्मश्रेणी : सोसिती जीव ॥ ८५ ॥ एवं आपणातें नेणते : नाना दुःखातें सोसिते ॥ हे विषयसुखचि ज्यातें : परमगतित्वे मानलें ॥ ८६ ॥ तयां जीवांतें जे भजति : ते, तियेचि गतीतें पावती ॥ आतां हा सच्चिदानन्दमूर्ति : विलासविग्रही कृष्ण ॥ ८७ ॥ अनादि प्रवाहें करून : सृष्ट्यादिकांचें आयतन ॥ प्रपन्नार्तिहरण : साक्षात् ब्रह्म ॥ ८८ ॥ हे जे मनोहराकृति : ते प्रपन्नांची विश्रांति ॥ परि स्वता नाहिं प्रतीति : काळत्रइं ऐसी ॥ ८९ ॥ निरसोनि अविद्येतें : ब्रह्मत्वें जें राहिलें चित्तें ॥ हा प्रपंचाभास जयातें : राहिला भासों ॥ ९० ॥ जे योगिराज कोण्हि : सदां ज्यातें वाहती मनिं ॥ जयाचि गुणकथा आइकोनि : क्रमिती काळ ॥ ९१ ॥ तोचि हा नंदानंदन : साक्षात् ब्रह्म सनातन ॥ सदां अलुप्तमहिमान विलासिया कृष्ण ॥ ९२ ॥ नेणोनिहिं महिमानातें : जे कोण्हि भजती यातें ॥ त्याचे गतिविषयिं तुतें : संदेह काय राया ॥ ९३ ॥ द्वेषाचियाहि भावना : पावला ज्यातें चैद्यराणा ॥ मां या तवं गोपांगना : अतिप्रिया कृष्णा ॥ ९४ ॥

ऐराया त्या गोपकांता : ब्रह्मादिकाहुनि आता ॥ मानुनि ययां अधीनता : विच-रला कृष्ण ॥ ९५ ॥ त्या नेणती कृष्णमहिमान : हें व्यवहारें आलें घडोन ॥ परि कृष्ण नव्हे प्राकृत जन : हा निश्चयो होता ॥ ९६ ॥ या जगदाभा-साहुनि पर : आकृति श्यामसुंदर ॥ नव्हे हा नंदकुमार : हें मानलें होतें त्यांतें ॥ ९७ ॥ या त्रैलोक्यामाजि काहीं : कृष्णासमान वस्तु नाहीं ॥ सें निजमतें तिहीं : मानिलेंचि होतें ॥ ९८ ॥ असो परोक्षज्ञानाचिया परि : श्रीकृष्णातें त्या सुंदरी ॥ भजोनि विरहकातरी : असत्या जाल्या ॥ ९९ ॥ आतां उपाधित्यागाचेंनि पंथें : साक्षात् श्रीकृष्णजीतें ॥ भजोनि निजजीवितें : साठविलीं कृष्णि ॥ ४०० ॥ एवं लीलाविग्रही कृष्ण : येथें विग्रहावें अनुकरण ॥ तें नव्हे कर्मजन्य : प्राकृताचे परि ॥ १ ॥ भलतेही रिति : याचा ठाईं अनुवृत्ति ॥ तेचि सर्व साधन संपत्ति : होउनि फळे ॥ २ ॥ असो हें रूप मनोहर : साक्षात् मोक्षाचें द्वार ॥ हा नव्हे गुणविकार : भजनीय भक्तांचें ॥ ३ ॥

**नृणां निःश्रेयसार्थाय व्यक्तिर्भगवतो नृप ॥**
**अव्ययस्याप्रमेयस्य निर्गुणस्य गुणात्मनः ॥ १४ ॥**

राया या लोकत्रयाचा ठाईं : प्राणिजात जितुकें काहीं ॥ असो देही सर्व ही पाहिं : मनुष्यादिक जे ॥ ४ ॥ तयांचया कल्याणार्थ : भगवंत जाला व्यक्तिमंत ॥ ह्मणौनि नरांच्या निःश्रेयसार्थ : व्यक्ति हे भगवंताचि ॥ ५ ॥ त्यामाजि साधारण जन : कलिमोहाकलितमन ॥ सुखाभासेंहि करुन : दुःखचि भोगिति ॥ ६ ॥ त्यांसि येणें प्रसंगें करुन : आपुलें अलौकिकाचरण ॥ अद्भुत जे काहिं गुण : अति मनोरम्य ॥ ७ ॥ तिये रमणीय गुणकथेतें : प्रकटउनि राखिजेतें ॥ संसारीही होत्साते : जे रंजती गुणश्रेणी ॥ ८ ॥ तया श्रवणप्रभावें करुन : त्यायातें अधिष्ठुन ॥ अनुक्रमेंचि ते साधारण : निःपाप होत्साते ॥ ९ ॥ अधिष्ठुनि भगवद्भक्ति : सांसारिकातें विसर्जिति ॥ आठउनि भगवद्व्यक्ति : रमती तेथें ॥ १० ॥ मग त्याचें जें कल्याण : त्याहुनि काय आन ॥ ये रिति साधा-

रण जन : व्यक्तिप्रसंगे तरति ॥ ११ ॥ आणि जे कोण्हि कृतपुण्य : अत्यंत सभाग्ये जन : या दुःखापासुन : सुटों जे, ह्मणति ॥ १२ ॥ जे विषयातें विटले : भगवंतातें विकले ॥ हें कमळनयन सावळें : कृष्णाख्य ब्रह्म ॥१३॥ या विग्रहाचा ठाइं : संन्यासिलें जिहिं सर्वहि ॥ मोक्षाचिहि काहिं : न धरुनि भीड ॥ १४ ॥ केवळ कृष्णाचेचि होति : स्वताचि ते परमगति ॥ आतां कल्याण तयांप्रति : दुसरें कैचे ॥ १५ ॥ एकं व्यक्तिशब्दें करुन : भगवंताचें रूप रमण ॥ असो हा यदुवंशभुशण : विग्रह जो काहिं ॥ १६ ॥ नातरि प्रस्तुत व्रजजनाच्या प्रीति : आकारलि हे व्यक्ति ॥ असो हे गोपाळमूर्ति : नयनभाग्य व्रजस्थाचे ॥ १७ ॥ यां कैवल्य विग्रहातें : लक्षुनि जनहितातें ॥ अधिष्ठुनि निजलीळेतें : भगवंते धरिलें ॥ १८ ॥ आतां हा विग्रहो जो काहिं : तो प्राकृताचे पारिं कायि ॥ मानुनि दुःख डोहिं : पडावें कां राया ॥ १९ ॥ आतां जनहितातें लक्षुन : हें जे रुप रमण ॥ येथे प्राकृताचें खंडण : कोणे रिति केलें ॥ २० ॥ ऐसें जरि ह्मणसी येथें : तरि आइक परिहारातें ॥ अव्यय हें तयातें : या हेतु ह्मणतिलें ॥ २१ ॥ हे परमउदारमुर्ति : जया भगवंताचि व्यक्ति ॥ तया कृष्णातें श्रुती : अव्ययत्वें प्रतिपादिति ॥ २२ ॥ अव्ययशब्दें करुन : बोलिलें विचारशून्य ॥ स्वरुपासि विलक्षण : कोणेहिं काळें नव्हे ॥ २३ ॥ ह्मणौनि न होन विलक्षण : या विग्रहाचें विडंबन ॥ स्वरुपीं नसोनि आवरण : दाविला हा विलासु ॥ २४ ॥ हा मूर्त्याभास भासला असतां : नयेचि जो दृश्यपंथा ॥ बुद्ध्यादिकाच्या हाता : न चढे जे वस्तु ॥ २५ ॥ एवं अव्ययत्वहेतु होउन : अप्रमेयत्व विशेषण : या पदेंहिं करुन : अप्राकृतताचि साधिली ॥ २६ ॥ आतां अप्राकृतत्वासि कारण : आणिकही विशेषण ॥ सत्वादिगुणशून्य : निर्गुण जें वस्तु ॥ २७ ॥ सत्वादिगुणाची मूर्ति : तितुकीच मात्र प्रकृती ॥ ते सत्वादिगुणस्फुर्ति : पुरुषाचें दृश्य ॥ २८ ॥ तो पुरुष तवं प्रस्तुत : योजला गुणातीत ॥ आतां जरि राया तुज येथें : होइल आशंका ॥ २९ ॥ जे गुणाहूनि विलक्षण : दृश्याहुनि वस्तु भिन्न ॥ तें न्यायेंकरिं परिच्छिन्न :

बोलिजे असे ॥ ३० ॥ तरि तो गुणात्मा भगवंत : गुणेसि नाहिं पृथग्भूत ॥ नातरि हा गुणाभासही जेथें : गुणत्वें नाहिं उपकरला ॥ ३१ ॥ गुणाहूनि विलक्षण : गुणेसि जें अभिन्न ॥ असो अपरिच्छिन्न : अधिष्ठान गुणांचें ॥ ३२ ॥ नातरि या गुणाभासामाजि काहिं : यावीण अर्थचि नाहिं ॥ हे गुण ज्यांचा ठाईं : अध्यस्तमान ॥ ३३ ॥ तो गुणात्मा भगवंत : भेदत्रयविवर्जित ॥ वेदें जो प्रतिपादिजेत : अनंता विशेषणीं ॥ ३४ ॥ त्या भगवंताचि हे व्यक्ती : मनोनयनाची विश्रांति ॥ अवलंबुनि निजयुक्ति : जनहितार्थ ॥ ३५ ॥ विलासविली हे भगवंतें : सर्वहि स्वसामर्थ्यें ॥ उपकारिली येथें : संदेह काय राया ॥ ३६ ॥ जेथें ब्रह्मत्वासि न योनि उणें : भक्तांचि वाचामनें ॥ सुखाडती येणे मानें : हे योजिली युक्ती ॥ ३७ ॥ म्हणौनि भलतेहि रिति : येथें जे उपजेल आसक्ति ॥ ते परमगती आरौती : फळोंचि नेणें ॥ ३८ ॥ याचि आशयातें धरून : उत्तर श्लोकें करुन ॥ रायाप्रति व्यासनंदन : बोलताति आइका ॥ ३९ ॥

**कामं क्रोधं भयं स्नेहमैक्यं सौहृदमेवच**
**नित्यं हरौ विदधते यांति तन्मयतां हि ते ॥ १५ ॥**

जरि कामासक्त जालें मन : तरि इच्छावा श्रीकृष्ण ॥ यावांचुनि जें आन : तें तृणप्राय मानावें ॥ ४० ॥ असो कामाची उपशांति : कृष्णापासुनि जे प्रार्थिती ॥ ते सर्वथा पावती : मनोरथ पूर्ण ॥ ४१ ॥ पाहोनि श्रीकृष्णवदन : अतिशयें उल्हासे मन ॥ विरहाकुलित चिंतन : कृष्णाचेचि करिती ॥ ४२ ॥ त्यांची होउनि इच्छापूर्ति : श्रीकृष्णाचि होय गति ॥ एवं तन्मयता पावति : कामाचेनिहि मिषें ॥ ४३ ॥ असो प्रत्यक्ष या गोपकांता : कृष्णकामाकलिता ॥ होउनि परम आनंदा : मिळालिया कृष्णिं ॥ ४४ ॥ राया यया गोपगृहिणी : भक्तांमाजि शिरोमणि ॥ असोनियां निर्वाणि : पावलिया कृष्णिं ॥ ४५ ॥ एवं कामाचियाही प्रवृत्ती : साधिला तिहिं श्रीपति ॥ पावलिया परम गति : योगियांसि जे ॥ ४६ ॥ तैसेंचि या श्रीकृष्णा : तीव्रद्वेषें भजले जे कोण्हि ॥ ते पावले निर्वाणि : भक्त जैसे ॥ ४७ ॥ असो

तेणें चैद्यरायें : द्वेषाचेनि उपायें ॥ जोडिले कृष्णपायें : पावला परम गति ॥ ४८ ॥ कां जे जन्मांतराचा ठाईं : कृष्णेंवीण स्मरलेंचि नाहिं ॥ त्यासि राज्यादिक तेहि : कृष्णमये जालें ॥ ४९ ॥ त्या तिव्र ध्यानाचे रिति : द्वेषाची होऊनि निवृत्ति ॥ प्रांति तो परमगति : पावला राया ॥ ५० ॥ तैसेंचि भयें करुनि चित्तिं : कृष्णातें जे सदा स्मरति ॥ ते भयेमिषें पावति : साक्षात् कृष्णि ॥ ५१ ॥ पाहें भयाचेनि मिषें : कंस पावला हें कैसें ॥ कृष्णें वांचुनि मानसें : स्मरलेंचि नाहिं तेणें ॥ ५२ ॥ पदार्थमात्राचा ठाईं : आणिक स्मरलेंचि नाहिं ॥ त्या तीव्र भयें कृष्णपाईं : पावला तो कंस ॥ ५३ ॥ तैसेंचि कृष्णाचा ठाईं : स्नेह संपादिला जिहिं ॥ त्यावीण अन्यत्र नाहिं : प्रीतीसि थार ॥ ५४ ॥ ते स्नेहाचिया तीव्रवृत्ति : साक्षात् पावति भगवंतिं ॥ योगियांची गती : पावती तेहि ॥ ५५ ॥ असो देवकी वसुदेव : प्रमुख सर्व यादव ॥ श्रीकृष्णि त्यांसि स्नेहभाव : अतिशयें होता ॥ ५६ ॥ या त्रैलोक्याचा ठाईं : कृष्णेंवीण आवडलें नाहिं ॥ सर्वस्वें प्रेम तिहिं : अर्पिलें श्रीकृष्णीं ॥ ५ ॥ असो स्नेहाचिया भावना : श्रीकृष्ण वैकुंठराणा ॥ आवडला जीवा मना : करुनि कुरवंडि ॥ ५८ ॥ शेखिं तया स्नेहवृत्ति : निदिध्यासनयुक्ति ॥ पावले ते परम गति : योगियांसि जे योग्ये ॥ ५९ ॥ तैसेंचि नंद जो व्रजपति : तत्पत्नी यशोदासति ॥ आणिकही गोपपांक्ति : स्नेहेंकरिं भजिनले ॥ ६० ॥ असो स्नेहस्वभावेंचिकरिं : साक्षात् आवडला हरि ॥ आतां गति काइ दुसरी : कल्पावी त्यांतें ॥ ६१ ॥ तैसेंचि जे संबंधी जन : ह्मणती सोइरा कृष्ण ॥ कोण्हि ह्मणती हा नंदन : बंधुचा आमच्या ॥६२॥ असो जामातादि भावना : पूजिला वैकुंठराणा ॥ त्यांसि गतिविषईं कल्पना : करणें नलगे ॥ ६३ ॥ जामातादि बुद्धीकरुन : भजले भीमकादि राजन्य ॥ आणि भ्रातृजत्वें मानुन : भजले कुंत्यादिक ॥ ६४ ॥ त्या संबंधभेदाच्या समाप्ति : त्यांसि गति जाला यदुपति ॥ एवं संबंधेंहि भगवंति : भजती जे ॥ ६५ ॥ ते कृष्ण तन्मयतेतें : पावती हे जाण निरुतें ॥ ऐक्यपदें संबंधातें : सूचिलें ऐसें ॥ ६६ ॥ आतां सुहृत् शब्दें करून : हृदयनिवासी कृष्ण ॥ किंवा

मित्रत्वें जाण सुग्रीवादि भजले ॥ ६७ ॥ ऐसिया क्षुद्रप्रकृति : नारदादि पुण्यकीर्ति ॥ भजिनले त्यांसि श्रीपति : आइताचि होता ॥ ६८ ॥ किंवा आत्मभावनेंकरुन : भजले श्रुतदेवादि ब्राह्मण ॥ तैसचि कोण्हि राजन्य : जनकादिक ॥ ६९ ॥ या कृष्णाच्या चरणिं : सुहृद्भावयुक्त जे कोण्हि ॥ असो स्वप्रीतीची वोंवाळनि : सदां जे करिति ॥ ७० ॥ अहंकाराचिया शांति : श्रीकृष्णि आत्ममति ॥ भाउनि ते पावती : तन्मयतेतें ॥ ७१ ॥ येथें सहज संदेह नाहिं : विचारातेंचि नलगे कांहिं ॥ भलते प्रकारें कृष्णपाइं : चित्त जरि जडे ॥ ७२ ॥ तरि कृष्णप्राप्ती आरौतें : अवसान नाहिंचि त्यांतें ॥ भलतयापरि कृष्णातें : पावती ते राया ॥ ७३ ॥ सर्वथा सहाय करुन : त्याचे अविद्येचें निवारण ॥ संपादूनि स्वता श्रीकृष्ण : गति होय त्यांतें ॥ ७४ ॥ एवं कामादि निमित्तें करुनि : जे भजति साक्षात् कृष्णिं ॥ ते पावती निर्वाणिं : तन्मयतेतें ॥ ७५ ॥ नातरि कामादि जे सर्वहि : ते निवेदावे कृष्णपाई ॥ मग तन्मयत्वि नाहिं : संदेह येथें ॥ ७६ ॥

**नचैवं विस्मयः कार्यो भवता भगवत्यजे ॥**
**योगेश्वरेश्वरे कृष्णे यत एतद्विमुच्यते ॥ १६ ॥**

एवं उक्त प्रकारें करुन : श्रीकृष्णाचें माहिमान ॥ केवळ ब्रह्म सनातन : लीळाविग्रही ॥ ७७ ॥ या विग्रहाचा ठाईं : वस्तुत्वासि पालट नाहिं ॥ गुणविकाराचा कांहिं : स्पर्शही नसे ॥ ७८ ॥ असो तो जो मुर्त्याकार : प्रत्यक्ष मोक्षाचें द्वार ॥ जन्मादि विकार : जेथें नाहिं ॥ ७९ ॥ तिये अजन्मे भगवंति : काइसी राया विप्रतिपत्ति ॥ हा विस्मयो तुझा चित्तिं : पूर्वोक्त जाला ॥ ८० ॥ जे कृष्णिं ब्रह्मबुद्धि नसोन : भजला गोपीजन ॥ तो पावला निर्वाण : हें आश्चर्य जालें ॥ ८१ ॥ तरि भगवंतांचा ठाईं : हें आश्चर्या ऐसें नाहिं ॥ तुवां न करावा कांहिं : संदेह राया ॥ ८२ ॥ जन्मसंबंध वांचुन : प्रकटलें हें रुप रमण ॥ हें जरि जालें उपपन्न : भगवंति यिये ॥ ८३ ॥ तरि तत्संबंधी सामर्थ्यें : जे कांहिं अलौकिकाचरितें ॥ तें कायें असंमतें : मानुं येती राया ॥ ८४ ॥ जे कोण्हि योगनिपुण : जे अव-

तर्क्यमहिमान ॥ ऐसे जे योगेश्वर जन : ते हृदयीं वाहाती ॥ ८५ ॥ ह्मणोनि हा नंदकुमार : योगेश्वरांचा ईश्वर ॥ गुण ज्याचे अपार : शेषासही अगम्य ॥ ८६ ॥ तया भगवंताच्या चरणीं : अनुसरोनि गोपगृहणी ॥ निस्तरलिया जन्मश्रेणी : कामप्रसंगें ॥ ८७ ॥ असो चिंतनादिकें करुन : या भवार्णवातें तरोन ॥ पावल्या परम सदन : गोपिका त्या ॥ ८८ ॥ हें आश्चर्य ऐसें नाहिं : विस्मयो न करावा कांहिं ॥ हें भगवंताचा ठाईं : सिद्धचि असे ॥ ८९ ॥ असो त्या गोपकांता : निरंतर कृष्णाचित्ता ॥ त्या पावल्या एतावता : नवल काई ॥ ९० ॥ कां जें स्थावरादि जात : जडहि ज्ञान-रहित ॥ तेंहि जरि कदाचित : पादस्पर्श लाहे ॥ ९१ ॥ संसारबंधा पासुन : तेहिं पावे मोचन ॥ मां गोपी तवं स्वजन : आप्त कृष्णासि ॥ ९२ ॥ एवं प्रसंगें करुन : केलें प्रश्नाचें परिहरण ॥ यावरी तो गोपीजन : कृष्णा-निकट जो आला ॥ ९३ ॥

**ता दृष्ट्वांतिकमायाता भगवान्व्रजयोषितः ॥**
**अवदद्वदतां श्रेष्ठो वाचःपेशैर्विमोहयन् ॥ १७ ॥**

पूर्वोक्त त्या गोपकांता : श्रीकृष्णगायनरता ॥ ज्या तया निकट येतां : निवारिल्या भर्तारिं ॥ ९४ ॥ त्यांत ज्या अंतर्गृहगता : प्रारब्धप्रतिबंध-युक्ता ॥ स्मरोनियां नन्दसूता : राहिल्या गृहिं ॥ ९५ ॥ तिहिं ध्यानमार्गे करुनि : श्रीकृष्णातें आलिंगुनि ॥ स्वदेहातें टाकुनि : कृष्णिं मिळाल्या ॥९६॥ आणि ज्या तीव्रतापें कोण्हि : प्रतिबंधातें निस्तरोनि ॥ तें निवारण न मा-नुनि : कृष्णानिकट आल्या ॥ ९७ ॥ त्यांतें निकट येतां : देखोनि रमा-भर्त्ता ॥ राया जाला बोलता : सुन्दरां वचनिं ॥ ९८ ॥ असो त्या गोप-कांता : सांडुनि पुत्रादि स्वार्था ॥ निजवियोगतप्ता : आलिया जाणोनि ॥ ९९ ॥ त्यांसि मोहवित होत्साता : जाला मंजुळ बोलता ॥ जेणें त्यांचिया चित्ता : प्रेमोद्रेक होये ॥ १०० ॥ नाना परीक्षेतें अनुसरोनी : नावेक मधुरां वचनिं ॥ बोलोनि त्या गोपगृहिणी : सादरा कराविया ॥ १ ॥ या लागिं कृपाकलितचित्तें : मोहकां वचनपंथें ॥ श्रीकृष्ण त्या गोपिकांतें :

बोलता जाला ॥ २ ॥ कां जे शास्त्रादि अभ्यासुनि : चतुर जे या जनि ॥ त्यां मानि वक्तृत्व शिरोमणी : अति प्रेमें गंभीर ॥ ३ ॥ ऐशा भ्रमकरां वचनीं : मोहगता विलासिनी ॥ कराविया हें धरुनि मानीं : बोलिला त्यांसि ॥ ४ ॥ आणिक एक निपुणता : दाउनि अर्थकर्कशता ॥ आणि वचनीं मधुरता : जाणउंनियां ॥ ५ ॥ ज्या वचनामृतें करुनि : शांति उपजे मानीं ॥ आणि विवेकारूढ होउनि : स्वरुपातें पाविजे ॥ ६ ॥ तैशा प्रेमळां वचनीं : तो चतुराशिरोमणी ॥ आलिया ज्या गोपगृहिणी : टाकुनि सर्वस्व ॥ ७ ॥ कैसा बोलिला तयांप्रति : जेवि मुमुक्षुसीं आचार्योक्ति ॥ प्रवर्तोनि होय शोधिती : अधिकारातें तया ॥ ८ ॥ तेवि निश्चयनिर्धारार्थ : गोपी प्रति नंद-सूत ॥ बोलतुसें तें प्रस्तुत : अवधारिजे ॥ ९ ॥

॥श्रीकृष्ण उवाच॥

**स्वागतं वो महाभागाः प्रियं किं करवाणि वः ॥**
**व्रजस्यानामयं कच्चिद्ब्रूतागमन कारणम् ॥ ८ ॥**

अवो तुह्मीं व्रजवासिनी : भाग्यवंता गोपगृहिणी ॥ बरवें प्रकारें करुनि : आल्यात किं येथें ॥ १० ॥ असो स्वागतातें पुसोनि : आश्वासिल्या मृदुवचनीं ॥ ज्या स्वविरहें पीडोनि : निज सांनिध्या आलिया ॥ ११ ॥ जेवि गुरु जें शिष्यार्तिहरण : शिष्यातें करउनि विवेचन ॥ मग स्वस्थांतकरण : अनुष्ठिविती संन्यास ॥ १२ ॥ तेवि कृपाळुवें कमळाकांतें : गोपिकांचि स्वागतें ॥ पुसोनि विरहतप्तें चित्तें : आश्वासिलिं त्यांचि ॥ १३ ॥ नातरि पुसोनि स्वागतें : प्रेरिलें धीरातें ॥ मोहकां वचनि त्यांतें : मोहावी विप्रतिपत्ति ॥ १४ ॥ असो त्या गोपिकांप्रति : पुसता जाला श्रीपती ॥ जे तुह्मी बरवे रीति : आल्यात किं ॥ १५ ॥ आतां आपुलि अभिप्रेते : तुह्मी कां आल्याति येथें ॥ तें निवेदावि मातें : जे इच्छा असेल ॥ १६ ॥ असो तुमचें जें प्रिय : तें अवश्य मज करणीय ॥ तें निवेदावें गुह्य : अवघे वो सती ॥ १७ ॥ महा संभ्रमें करून : लक्षिजेतें आगमन ॥ अति विव्हळ मन : जाणवतें तुमचें ॥ १८ ॥ तरि ते व्रजवासी जन : आहेत किं क्षेमसंपन्न ॥ कांहिं

उपद्रवागमन : नाहीं किं व्रजिं ॥ १९ ॥ असो त्या व्रजाचे स्वास्थ्य : आहे किं पुर्ववत् ॥ या आगमनासि प्रस्तुत : हेतु कवण ॥ २० ॥ कोणे निमित्ते करुन : केलें वो तुह्मी आगमन ॥ तें अवघें निवेदन : करावें मज ॥ २१ ॥ एवं तो सर्वज्ञ सर्वसत्ता : सर्व वृत्तातें जाणता ॥ परि नावेक जाला पुसता : व्यवहारानुसार ॥ २२ ॥ या अभिप्रायातें सुचोन : उत्तरग्रंथें करुन ॥ करावया वृत्तशोधन : लाविला संबंधु ॥ २३ ॥ असो त्या गोपीं लागुन : पुसता जाला श्रीकृष्ण ॥ या अभिप्रायाचें कारण : वदावें मज ॥२४॥ ह्मणाल या वदनशोभेते : नयनचकोरें तृषातें ॥ निवाळें नावेक यातें : असोंदे स्वस्थ ॥ २५ ॥ निहाळूनि हें सुंदर वदन : असोंदे निजस्थ मन ॥ पुसावया हें कारण : त्वरा काये कृष्णा ॥ २६ ॥ सोसुनि अवघड पंथें : बहु भाग्यें आलों येथें ॥ आतां काये आमुतें : जाणे आहे ॥ २७ ॥ हें वृत्त पुसावयाचा ठाईं : एवढी त्वरा काई ॥ राहिलों तुझा पाईं : हें प्रकटाचि असे ॥ २८ ॥ ऐसें कांहिं वो भामिनी : जरि असेल तुमच्या मनि ॥ या रात्रिं तरि ये वनि : राहों नये तुमतें ॥ २९ ॥

**रजन्येषा घोररूपा घोरसत्वनिषेविता ॥**
**प्रतियात व्रजं नेह स्थेयं स्त्रीभिः सुमध्यमाः ॥ १९ ॥**

आइका वो सुमध्यमा : सुकुमारा तुह्मि रामा ॥ असोनि शुद्धकामा : आल्याति ज्या येथे ॥ ३० ॥ सुमध्यमा हें संबोधुन : जें मध्यदेशि सूक्ष्मपण ॥ जेवि अधिकारसंपन्न : सुक्ष्मबुद्धि जे ॥ ३१ ॥ न तरि वर्णुनि सूक्ष्मता : सुचिली निजयोग्यता ॥ तत्परिक्षार्थ आता : बोलिजेतें ऐसें ॥ ३२ ॥ अवो हे घोर रजनी : सेविली घोरीं प्राणि ॥ सेव्य नव्हे तुह्मा लागुनि : जावें व्रजाप्रति ॥ ३३ ॥ असो हे महानिशा : सेव्य नव्हे तुह्मा सहसा ॥ हें सर्व बालिशा : महा भयंकर जे ॥ ३४ ॥ हे निशेची आकृती : परि सेव्य नव्हे अयोग्याप्रति ॥ तेथें महासत्वें जागति : आत्मसौकर्यैकरिं ॥ ३५ ॥ महासत्वांसि हा दिवस : परि तुह्मासि तों निशाभास ॥ आतां सत्वर प्रवेश : करावा व्रजाप्रति ॥ ३६ ॥ असो बहु बोलों किति : पर-

तोनि जावें व्रजाप्रति ॥ क्षणमात्र ही अवस्थिति : करुं नये येथें ॥ ३७ ॥ अवो या काळि ये वनि : मज वांचुनि नाहिं कोण्हिं ॥ किंवा जे असती प्राणी : अलौकिकाचारी ॥ ३८ ॥ तया वांचुनि येथें : अधिकार नसे आणिकांतें ॥ जेवि गृहासक्ति परमपंथे : विचरों नये कदा ॥ ३९ ॥ अंतरि गृहासक्ति : जे परिव्राजन करिति ॥ त्यांसि विघ्ने बाधिती : संदेह नाहिं ॥ ४० ॥ न तुटे संसारबंधन : शुभलोकिं कैचें गमन ॥ न वर्तती जरि जन : अधिकारानुसार ॥ ४१ ॥ तेवि तुह्मांसि येथें प्रस्तुत : न राहणेचि उचित ॥ बोलावें किंबहुत : उपद्रव दिसति ॥ ४२ ॥ अवो हे महां रजनी : आकीर्ण घोरि प्राणिं ॥ वृकादिक इये वनिं : विघ्नकारी बहुत ॥ ४३ ॥ येन्हवीं मि येथें एकांतिं : परि विघ्नाची सदा व्याप्ति ॥ अनधिकारी भ्रंशती : निजहिता पासुनि ॥ ४४ ॥ असो तुह्मी तों स्त्रीजाती : सत्वर जा व्रजाप्रति ॥ उचित कार्यें जें असति : तेंचि संपादावि ॥ ४५ ॥ आतां असो हेंहिं परतें : तुमचा ठाइं ज्यांचि चित्तें ॥ तेनें देखोनि तुमतें : कदर्थिलें बहुं ॥ ४६ ॥ या आशयातें धरुन : उत्तरश्लोकें करुन ॥ तो येशोदानंदनंदन : बोलतुसे राया ॥ ४७ ॥

**मातरः पितरः पुत्रा भ्रातरः पतयश्च वः ॥**
**विचिन्वति ह्यपश्यंतो मा कृध्वं बंधुसाध्वसम् ॥ २० ॥**

अवो तुमचे जननीजनक : आणि पुत्रबंधु सकळिक ॥ पति जे सेव्य अवश्यक : तुह्मां स्त्रियांसि ॥ ४८ ॥ ते तुमतें न देखोन : करितील वो गवेषण ॥ असो ते चिन्तापन्न : धुंडितील इतस्तता ॥ ४९ ॥ तुह्मीं असाल मजपासिं : हें न सुचेल त्यांसि ॥ पडोनि बहुं सायासि : क्रंदतील ते ॥ ५० ॥ तुमचा ठाइं त्यांचें मन : तुह्मांसही तदभिमान ॥ ऐसें आत्मत्वें ग्रहण : परस्परें असें ॥ ५१ ॥ ह्मणौनि हे बंधुसाहस : जे येणं त्यांसि अति क्लेश ॥ ऐसें नसो अवश्य : जावें वो तेथें ॥ ५२ ॥ त्यांसि जे क्लेशप्राप्ति : ते उमटेल तुमच्या चित्ति ॥ या लागि व्रजाप्रति : जावें अवश्य ॥ ५३ ॥ जेवि नसोनि अधिकारसंपन्न : केवळ औत्सुक्यें करुन ॥ केलें

जरि व्राजन : तें सुखातें नेदि ॥ ५४ ॥ तेवि आतां इये ठाईं : तुम्हासि अविकार नाहीं ॥ तरि उचित जे काहिं : स्वगृहासि जागें ॥ ५५ ॥ ऐसिया गूढार्था उक्ति : बोलत असतां श्रीपति ॥ त्या गोपिकांच्या चित्तीं : उपेक्षा जाणवली ॥ ५६ ॥ आम्हि दैवयोगें करुन : याचा ठाईं असोनि मन ॥ गृहादिकिं वर्तमान : जऱ्हि होतों ॥ ५७ ॥ तऱ्हि हा आमुची गति : ऐसा निश्चयो होता चित्तिं ॥ हा उपेक्षीना अन्ति : सर्वज्ञ श्रीकृष्ण ॥ ५८ ॥ तो प्रतिबंध निवारुन : यासि करावें संनिधान ॥ निहाळावें सुंदर वदन : साव-काशें याचें ॥ ५९ ॥ थिया आशाआकाळितमना : होतों कण्ठगतप्राणा ॥ सेवाटिं आह्मी अतिदीना : उपेक्षिलों येणें ॥ ६० ॥ निस्तरोनि हें संकट : आह्मीं आलों या निकट ॥ परि दैव जालें दुर्घट : न फळती साधनें ॥ ६१ ॥ ऐसीं गोपिकांचिं चित्तें : जाणोनि क्षोभाकळितें ॥ तेणें यशोदानंदसुतें : सुजाणें कृष्णें ॥ ६२ ॥ कांहिं एक आश्रयातें : करुनि जालें बोलिजेतें ॥ आइक राया तुतें : तें सांगतो ऐसें ॥ ६३ ॥

**दृष्टं वनं कुसुमितम् राकेशकररंजितम् ॥**
**यमुनानिललीलैजत्तरुपल्लवशोभितम् ॥ २१ ॥**

अवो तुमाचें आचारितें : इतुकेनिचि जालिं सफळितें ॥ जें देखिलें या वनातें : क्रीडास्थान माझें ॥ ६४ ॥ नानापुष्पिं आकीर्ण : पाहा हें सुशोभित वन ॥ आणि कोमळ जे शशाकरण : तयांकारिं मंडित ॥ ६५ ॥ जैसी पौर्णिमेची निशि : कळापूर्ण तैसा शशी ॥ तेणें आजि या वनासि : शोभाविलें बहु ॥ ६६ ॥ आणि यमुनाजळस्पर्शित : शीतळ मंदगति वात ॥ तेणें हे पल्लवनंत : या वनिचे वृक्ष ॥ ६७ ॥ आपुले लीळेकरुन : शोभती दोलायमान ॥ पावविले चलन : मंदोर्मिवातें ॥ ६८ ॥ ऐसे या लक्षणिं युक्त : वन जें शोभावंत ॥ हें देखिलें प्रस्तुत : सफळ यात्रा जाली तुमची ॥ ६९ ॥ अवो तुह्मी सकळ : आल्या ति तें जालें सफळ ॥ जे देखिलें क्रीडास्थळ : शिरसेव्य ॥ ७० ॥ या वनशोभेसहित : माझा ठाईं असो चित्त ॥

सांडोनि भाव प्राकृत : यथाचारें असावें ॥ ७१ ॥ याचि अर्थातें उद्देशुन : पुढेंहि कृष्णाचें वचन ॥ आइकावें सावधान : रहस्यकथेतें ॥ ७२ ॥

**तद्यात मा चिरं गोष्ठम् शुश्रूषध्वं पतीन्सतीः ॥**
**क्रंदंति वत्सा बालाश्च तान्पाययत दुह्यत ॥ २२ ॥**

अवो आइका सती : देखीली वनसंपत्ती ॥ आतां जावें व्रजाप्रति : न करावा विलंब ॥ ७३ ॥ कर्तव्य सरलें नाहिं : तिहिं न राहवें ये ठाइं ॥ ज्याचें विहित जें काहिं : तें केलेंचि पाहिजे ॥ ७४ ॥ प्रस्तुत तुह्मा स्त्रियातें : सेव्य नाहिं पतिपरतें ॥ तस्मात् सेवावें पतीतें : शुश्रूषामार्गें ॥ ७५ ॥ आणि माझे आज्ञाबळें : सांतवावि वत्सें बाळें ॥ तुह्मावांचुनि तें सकळें : क्रंदतें असतील ॥७६॥ करउनि स्तन्यपान : स्वबाळांचें समजावण ॥ आणि गोदोहनें करुन : पाजावि वासुरें ॥ ७७ ॥ असो क्रंदमानें वत्सें बाळें : तें पाजावि सकळें ॥ आणि गोदोहनहिं केलें : पाहिजे अवश्य ॥ ७८ ॥ ऐसें बोलिलें कृष्णनाथें : तेणें मागुती ताचितें ॥ क्षोभलिं जे आमुतें : उपेक्षिलें खरें ॥ ७९ ॥ एवं जाणोनि त्रिकळचित्त : त्यांचया आश्वासनार्थ ॥ बोलतुसे नन्दसुत : तें आइकावें संतिं ॥ ८० ॥

**अथवा मदभिस्नेहाद्भवंत्यो यंत्रिताशयाः ॥**
**आगता ह्युपपन्नं वः प्रीयंते मयि जंतवः ॥ २३ ॥**

अथवा पुत्रादिकिं काहिं : जरि आसक्ति नाहिं ॥ परस्परें वेधु तोहि : लक्षिला आह्मि ॥ ८१ ॥ ऐसें नसो वो आतां : ज्या तुह्मी सर्वाशात्यक्ता ॥ गृहादिकिं अनासक्ता : मत्कामा गोपी ॥ ८२ ॥ त्या ग्राम्य जनाची काहिं : सर्वथा आस्था नाहिं ॥ मज पूर्ण कामाचा ठाइं : अनुसरोनियां ॥ ८३ ॥ असो या स्नेहाची उन्नति : माझा ठाइं चित्तवृत्ति ॥ वश होउनि मजप्रति : आलियाति ज्या ॥ ८४ ॥ हें तुह्मासि उचित जालें : जन्म सार्थक केलें ॥ कृतपुण्य फळासि आलें : भाग्य तुमचें ॥ ८५ ॥ अवो जाणते जे होति : त्यांसि माझीच प्रीति ॥ सर्व सांडुनि भजति : मजाचि एकातें ॥ ८६ ॥ हें अविद्याग्रस्त जन : यामाजि जो कृतपुण्य ॥ हें दुःख अनुभउन : मा/चाचा

ठाईं ॥ ८७ ॥ सांडुनि सर्वस्वातें : जो नें चाले अविद्यापंथें ॥ तया त्यागें जयातें : मिंचि उरें प्रियत्वें ॥ ८८ ॥ ऐसा विरळा कोण्हि : तुह्मि भाग्याच्या भामिनी ॥ येथें मज अनुसरोनि : आलियाति ॥ ८९ ॥ एवं प्रपंचाचा ठाईं : सर्वथा प्रीति नाहिं ॥ जीवितें माझा पाईं : वोपिलिं अवधि ॥ ९० ॥ तथापि वेदविहित : धर्म जो काहिं उचित ॥ त्याज्य नव्हे प्रस्तुत : केला पाहिजे ॥ ९१ ॥ या अर्थि अनुसरोन : आणिकहि श्रीकृष्ण ॥ बोलताति तें सावधान : आइकावें ॥ ९२ ॥

**भर्तुः शुश्रूषणं स्त्रीणां परो धर्मो ह्यमायया ॥**
**तद्बंधूनां च कल्याण्यः प्रजानां चानुपोषणम् ॥ २४ ॥**

अवधारा वो समस्ता : कल्याणरूपा गोपकांता ॥ कल्याणाची अवस्था : आइका सांगतों ॥ ९३ ॥ करितां धर्मविचार : त्यांत हाचि धर्म थोर ॥ तुमचे जे भर्तार : तयांची सेवा ॥ ९४ ॥ असो स्त्रीजातीचा धर्म : हाचि जाणा उत्तम ॥ सुखदुःखीं समानसम : उपासावे भर्तार ॥ ९५ ॥ धर्मतेंच अनुसरोन : करावे भर्तृसेवन ॥ मानादि दोष टाकुन : सेवावें त्यातें ॥ ९६ ॥ ऐसे मानावें निश्चित : किं हेचि आह्मासि उचित ॥ येणेंचि मोक्षाचा पंथ अतिक्रमु भगवंतें ॥ ९७ ॥ चित्तिं भाव धरुन : करावें भर्तृसेवन ॥ आणि तत्संबंधी जन : तद्बंधू जे ॥ ९८ ॥ मातापितादि करुन : त्यासि जे इष्ट जाण ॥ सहोदर सखे स्वजन : अवघे पुज्य ॥ ९९ ॥ तयांचे शुश्रूषण : भर्ताराचि समान ॥ परि यथान्यायें करुन : कर्तव्य जें जानि ॥ १०० ॥ त्याचि प्रसंगें करुन : करावें प्रजापाळन ॥ जैसे भर्तारादि सेवन : तैसेंच तेंहिं ॥ १ ॥ असो भर्तार प्रधान : तद्बंधुसेवा प्रजापाळन ॥ ऐसें आलें बडोन : जे त्याज्य नव्हेत कोण्हि ॥ २ ॥

**दुःशीलो दुर्भगो वृद्धो जडो रोग्यधनोपि वा ।**
**पतिः स्त्रीभिर्न हातव्यो लोकेप्सुभिरपातकी ॥ २५ ॥**

जो न मानुनि स्वधर्मातें : वर्तों लगे जो दुःपंथें ॥ दुराचाराहीं स्त्रियांतें : त्याज्य नव्हे भर्तार वो ॥ ३ ॥ असो न करी वर्णरक्षण : दुराचारि विशेषें

मन ॥ परि तो निजपती ह्मणोन : त्याज्य नव्हे ॥ ४ ॥ अथवा लौकिका माझारि : जर्‍हि तो भिकारी ॥ दैव सहाय न करि : जन्मदरिद्रि ॥ ५ ॥ तर्‍हि तो निजपति : त्याज्य नव्हे वो सति ॥ सांडुनि व्युत्पत्ति : सेव्य तो स्त्रियांसि ॥ ६ ॥ आणि काळाचे गति : जरेचि जालि व्याप्ति ॥ तो वृद्ध तर्‍हि वो सति : त्याज्य नव्हे भर्तार ॥ ७ ॥ वृद्धातेंचि अनुसरोन : करावें त्यांचे पाळन ॥ तद्वारा कल्याण : साधावें आपुलें ॥ ८ ॥ किंवा विवेक-शुन्ये : मूर्ख जैसा पाषाण ॥ त्या जडाचेंहि सेवन : धर्माचें द्वार ॥९॥ किंवा रोगें पीडित : बळवीर्य राहित ॥ निजपोषाणीं आसक्त ( अशक्त ? ) : अप्रयोजक जाला ॥ १० ॥ तथापि तयाचे सेवन : विशेषें मोक्षसाधन ॥ आणि कोण्हि अधन : सांडवला धनें ॥ ११ ॥ काळें कर्माचिया गति : हरोनि गेली संपत्ति ॥ अदृष्टवशें विपात्ति : वरपडा जाला ॥ १२ ॥ तर्‍हि कुळस्त्रियेप्रति : त्याज्य नव्हे निजपति ॥ कल्याणातें इच्छिती : तिया सेवावा तोचि ॥ १३ ॥ असो स्वधर्माचा ठाइं : पतिसेवा त्याज्य नाहिं ॥ योग्यायोग्यता काहिं : विचारुं नये ॥ १४ ॥ जोंवरि तो अपातकी : न बहिष्कारिला लोकीं ॥ निंदिला नाहिं शास्त्रादिकीं : पातित्यकर्मि ॥ १५ ॥ तोंवरि तो निजपति : त्याज्य नव्हे स्त्रियांप्रति ॥ साधारण दुष्कृति : जर्‍हि तो जाला ॥ १६ ॥ पातकीही अ-सोन : भ्रष्ट नाहिं यातीपासुन ॥ तंवरि त्याचें सेवन : अवश्य जालें ॥ १७ ॥ सांडुनि भर्तारातें : अनुसरे आणिकातें ॥ तरि सर्वथा स्त्रियतें : उत्तम गति नाहिं ॥ १८ ॥ याचि अर्थातें धरुन : पुढें श्रीकृष्णाचें वचन ॥ आइकावें सावधान : निवादजे तें ॥ १९ ॥

**अस्वर्ग्यमयशस्यंच फल्गु कृच्छ्रं भयावहम् ॥**
**जुगुप्सितं च सर्वत्र औपपत्यं कुलस्त्रियाः ॥ २६ ॥**

सांडुनि पतिसेवेतें : जरि आचरे औपपत्यातें ॥ ह्मणिजे जार कर्मातें : कुलस्त्री होत्साति ॥ २० ॥ तें जे जारसुख : सर्वस्वार्थाचें विनाशक ॥ नव्हे तें शुभदायक : कुलस्त्रीयेतें ॥ २१ ॥ तें कैसें नाशक : तरि स्वर्गप्रा-प्तीचें ध्वंसक ॥ न साधुनि उत्तम लोक : अधःपात होये ॥ २२ ॥ असो

नासुनि उत्तम गति : पावती नरकाप्रति ॥ आणि सर्वत्र अपकीर्ति : इये लोकीं ॥ २३ ॥ असो तें जारसुख : पुण्यकीर्तीचें नाशक ॥ ह्मणाल आतां तरि सुख : होईल येथें ॥ २४ ॥ तरि त्या सुखाभासिं काहिं : क्षणहि निर्वाह नाहिं ॥ तया सुखासि काइ : सुख ह्मणावें ॥ २५ ॥ त्या तुच्छ सुखासाठीं : पाविजे दुःखकोटि ॥ आरंभिं आणि सेवटिं : भयकारक ॥ २६ ॥ असो तें जारसुख : उभयलोकीं नाशक ॥ या लोकिं निंदिती लोक : आणि परलोकिं दुर्गति ॥ २७ ॥ ऐसें कुळस्त्रियतें : ह्मणोनि दूषिलें येथें ॥ पतित्याग तुमतें : उचिताचि नाहिं ॥ २८ ॥ एवं साक्षात् रमारमण : व्यवहारातें लक्षुन ॥ निर्धारावया गोपींचें मन : बोलिले नावेक ॥ २९ ॥ आतां परमार्थें करुन : करिजेतें व्याख्यान ॥ हें भगवंताचें भजन : इहस्वर्गाविरोधी ॥ ३० ॥ तरि भगवंताचा ठाईं : स्वर्गाचा लेखा काइ ॥ अस्वर्ग्य ऐसें काहिं : यास्तव घडलें ॥ ३१ ॥ भगवंताचिये भक्ति : स्वर्गसुखातें उळंघिति ॥ गति पाविजे भागवती : जे इंद्रादिकांसि अघट ॥ ३२ ॥ आणि प्रपंचाचिया प्राप्ति : ब्रह्मासि अन्यथा ख्याति ॥ देहादि विशिष्टें कीर्ति : जाली जे काहिं ॥ ३३ ॥ आतां जें भजनसुख : तें या कीर्तिचें नाशक ॥ परि याहुनि आणिक : अत्यंत सुखास्पद ॥ ३४ ॥ असो तें जें सुख काहिं : विषयसुखा ऐसें नाहिं ॥ अत्यंतानंद हाहि : निर्देश त्यातें ॥ ३५ ॥ ह्मणोनि कुळाभिमानवती : योग्य नव्हे विपरीत गति ॥ भगवंतिं नाहिं प्रीति : गृहादि लोभें ॥ ३६ ॥ तियेसि ते अंतरलें : सहजाचि त्याज्य घडलें ॥ जरि कृष्णि जारत्व कल्पिलें : तरि वाखाणावें ऐसें ॥ ३७ ॥ येन्हविं आश्रमियांप्रति : उपदेशिली नीति ॥ आणि त्यांची निश्चयमति : परिक्षिली येणें ॥ ३८ ॥ असो हे भावार्थकथन : त्या गोपिकांतें श्रीकृष्ण ॥ ह्मणति अवो हे दूषण : पतित्यागें वोडवलें ॥ ३९ ॥ ह्मणाल हे उपदेशिली नीति : आह्मास तव अघडति : तुझा पाइं जाली प्रीति : इतुकेंचि पुरे ॥ ४० ॥ तुझें न पाहातां वदन : जाउं पाहताति प्राण ॥ सदां तृषित नयन : अवलोकावया ॥ ४१ ॥ ऐसें जरि वो सती : असे तुमचा चित्तिं ॥ तरि निश्चयें मजप्रति : माझा

बेधुचि पुरे ॥ ४२ ॥ या अर्थातें सुचोन : आणिक कृष्णाचें वचन ॥ आइका सावधान : वर्णिजेतें ॥ ४३ ॥

**श्रवणाद्दर्शनाद्ध्यानान्मयि भावोनुकीर्तनात् ॥**
**न तथा सन्निकर्षेण प्रतियात ततो गृहान् ॥ २७ ॥**

माझा गुणश्रवणीं : त्रैलोक्ये तुच्छ मानुनि ॥ माझें स्वरुप मनिं : जैसें काहिं जडे ॥ ४४ ॥ तैसी माझी निकट संगति : उपजों नेंदि मत्प्रीति ॥ माझी मानुनि निश्चिति : इतरांतें स्मरवी ॥४५॥ आगि श्रवणे माझी कीर्ति : आठवे माझी मुर्ति ॥ माझ्या ध्याने पावति : निष्ठाजे कोण्हि ॥ ४६ ॥ त्या ध्यानाहुनि कांहिं : सान्निध्यें लाभ नाहिं ॥ कृतार्थ मानुनि देहिं : उपजेल स्वार्थ ॥ ४७ ॥ हें जें विग्रहधारण : याचें न कळे महिमान ॥ अति परिचयें मनः सांडील प्रेमा ॥ ४८ ॥ असो माझें सन्निधान : साक्षात्काराचें साधन ॥ तें अधिकारें वांचुन : सेव्य नाहिं सर्वांसि ॥ ४९ ॥ पुरतें मन नाहिं मत्पर : तवं त्याज्य नव्हे निजाचार ॥ गृहादि व्यवहार : अवश्य करिजे ॥ ५० ॥ यालागि असोनि गृहिं : उचिताचार जो कांहिं ॥ सम्पादुनि माझा ठाइं : असावें तत्पर ॥ ५१ ॥ माझें गुणाचें श्रवण : मत्कथा नामकीर्तन ॥ माझें स्वरुपध्यान : करुनि असावें ॥ ५२ ॥ असो हे सुन्दर मुर्ति : सदा वसवावी चित्तिं ॥ सुखें असावें वो सती : निजाश्रमाचारें ॥ ५३ ॥ एवं क्रमप्रवाहिं : जैसें चित्त जडे माझ्या ठाइं ॥ तैसा मत्सान्निध्यें नाहिं : विशेष लाभ ॥ ५४ ॥ मजासिं जें व्यवधान : तें मायाविलसित भान ॥ तन्हि मत्सान्निध्याचें साधन : आणिक नाहिं ॥ ५५ ॥ हे जे अन्तरायप्राप्ति : निरसावी याचि रीति ॥ मिं निकट असतां धुण्डिति : अन्यत्र जन ॥ ५६ ॥ सत्य असतें व्यवधान : तरि सोपें मत्संन्निधान ॥ हें अनिरूपित भान : मायाकल्पित ॥ ५७ ॥ ह्मणोनि येथें हेचि युक्ति : वर्णावी गुणकीर्ति ॥ ध्यानादिकिं चित्तवृत्ति : आणावी एकांतिं ॥ ५८ ॥ त्या एकांतवृत्तिभरें : मद्रूप एकाकारें ॥ भोगुनि निरंतरें : करावें शुद्धचित्त ॥ ५९ ॥ मग यांवे मज गुरुप्रति : शोधूनि हृदयग्रंथि ॥ करुनि अविद्यानिवृत्ति : संग करावा मजासिं



॥ ६० ॥ ह्मणोनि कल्पून व्यवधान : मद्वार्थि असावें मन ॥ तेणें मत्सान्नि-धान : पावाल तुह्मि ॥ ६१ ॥ आतां बोलावें हें किति : भाझी हे रमण मूर्ति ॥ येथेंचि असोनि चित्तवृत्ति : गृहाप्रति जावें ॥ ६२ ॥

॥ श्रीशुक उवाच ॥

**इति विप्रियमाकर्ण्य गोप्यो गोविंदभाषितम् ॥**
**विषण्णा भग्नसंकल्पाश्चितामापुर्दुरत्ययाम् ॥ २८ ॥**

आइक राया पूर्वोक्त : कृष्णाचें कलभाषित ॥ आइकोनि तें स्त्रीजात : विप्रिय ऐसें ॥ ६३ ॥ असो निर्धाराचया चित्त : बोलिला तो यथोक्त ॥ तयातें तोचि अर्थ : भासला काठिण ॥ ६४ ॥ त्या गोविंदासक्तहृदया : गोपीं आइकोनि अप्रिया ॥ खिन्न होत्सात्या हताशया : परम चिंता पावल्या ऐशा ॥ ६५ ॥ ह्मणति आपुले मनिं : जे या विरहहुताशनिं ॥ दग्धा आह्मीं कामिनी : संकटें येथें आलों ॥ ६६ ॥ आह्मां मानिलें होतें : जें तरलों संकटातें ॥ प्रशस्तें कृष्णजीतें : देखिलें आजि ॥ ६७ ॥ सर्व विक्षेप परिहरून : देखिलें कृष्णवदन ॥ या वियोगाचें कारण : खुंटलें आतां ॥ ॥ ६८ ॥ येथूनि परावृत्ति : यासि कां सुचली युक्ति ॥ परतलिं नेणों मा-गुति : पूर्वकृते पापें ॥ ६९ ॥ एवं त्या कामिनी : आइकोनि कृष्णवाणी ॥ दचकोनि मानिलें मनिं : जे कोपला हा कृष्ण ॥ ७० ॥ असो मनिं जाला विषाद : जे कोपला कां गोविंद ॥ संकल्प नव्हेचि सिद्ध : उपेक्षिलों खरें ॥ ७१ ॥ ऐशा सविषादचित्ता : जाल्या भग्नमनोरथा ॥ पावलिया अति चिंता : जे तरवेना कांहिं ॥ ७२ ॥ असो त्या कृष्णकिंकरी : बुडाल्या चिंतासागरीं ॥ यावांचुनि कैवारी : आणिक कैंचा ॥ ७३ ॥ तो चिंता-ग्रस्त गोपीजन : कोणा लक्षणिं करुन ॥ तरि तेंहि सावधान : अवधारिं राया ॥ ७४ ॥

**कृत्वा मुखान्यवशुचः श्वसनेन शुष्य-**
**द्बिंबाधराणि चरणेन भुवं लिखंत्यः ॥**

**असैरुपात्तमषिभिः कुचकुंकुमानि**
**तस्थुर्मृजंत्य उरुदुःखभराः स्म तूष्णीम् ॥ २९ ॥**

तिया शोक चिंताग्रस्ता सती : मुखें करुनि खालौतिं ॥ पदांगुष्ठींकरिं क्षिति : लिहित होंत्साल्या ॥ ७५ ॥ चित्त ठेउनि कृष्णपाईं : पडल्या चिंता-डोहिं ॥ न बोलोनि कांहिं : राहिल्या तटस्थ ॥ ७६ ॥ तया मुखाचें लक्षण : तरि असोनि शोकापन्न ॥ तया शोकेंकरिं उत्पन्न : श्वासोश्वास जे ॥ ७७ ॥ तयां श्वासवेगबळें : बिम्बाधर शुष्क झाले ॥ असो श्वसनें सुकोन गेलें : लोहित वोष्ठ ज्यांचे ॥ ७८ ॥ एवं श्वासाधरशोषितें : मुखें करुनि शोकयुक्तें ॥ चरणें-करिं धरणीतें : लिहित्या जाल्या ॥ ७९ ॥ आणि कज्जाळें सहित : नयन-द्वारा अश्रुपात ॥ ढळले ते वोघ प्रस्तुत : कुचांवरी आले ॥ ८० ॥ त्या अश्रुप्रवाहजळें : कुचकुंकुमातें क्षाळिलें ॥ जें होतें विलेपिलें : कुचाचा ठाईं ॥ ८१ ॥ कृष्णविरहाचळापासुनि : आलि जे प्रेममंदाकिनी ॥ ते हृदयदेशिं येउनि : प्रक्षाळिलिं अन्तस्थें ॥ ८२ ॥ जेवि अंतरंगेंहिं साधनें : साक्षात्कारि अप्रयोजनें ॥ तेवि अश्रुपातिं विलपनें : क्षाळिलिं त्यांचिं ॥ ८३ ॥ उद्देशोनि कृष्णसंगातें : हृदये केलि रंजितें ॥ देखोनि कृष्णजीतें : स्वयें निराळि जालि ॥ ८४ ॥ नाना तें पावउनि प्रांतिं : आपण राहिलिं परतिं ॥ श्रीकृष्णसंगा-प्रति : दिधला अवसर ॥ ८५ ॥ एवं सकज्जळें अश्रुपातें : शोधिलें कुचकुं-कुमातें ॥ मुखें करुनि अधःपंथें : शुष्कबिंबाधरें ॥ ८६ ॥ चरणेंकरिं धरणी : लिहित होंत्साल्या भामिनी ॥ मौनातें अवलंबुनि : राहिल्या स्तब्धा ॥ ८७ ॥ नातरि कृष्णकरो अंगिकार : या लागिं केला हा प्रकार ॥ मनोगतहि व्यापार : टाकिला तिहिं ॥ ८८ ॥ कृष्णसंगि आसन्नकाळ : तेथें न सरे वाग्जाळ ॥ मन करावें निश्चळ : विसरावें सर्व ॥ ८९ ॥ ह्मणोनि तो गोपीजन : तूष्णीभा-वातें धरुन ॥ कृष्णसंगातें इच्छुन : उगाचि राहिला ॥ ९० ॥ असो त्याज्य जें होतें : तें त्यजुनि आलो येथें ॥ कृपा कीजे श्रीनाथें : भाग्यानुसार ॥ ९१ ॥ ह्मणोनि त्यक्तचरितें : राहिलीं तूष्णीभुतें ॥ तें गोपिकांचिं शतें : चिंताक्रांत राया ॥ ९२ ॥ ऐशा विरहें भगल्या : त्यां नावेक निवांत राहिल्या ॥ म॰



सावध जाल्या : आपलेचि ठाइं ॥ ९३ ॥ ह्मणती जर्‍ही कृष्ण हृदिस्थ : सर्वही यासि विदित ॥ तथापि आपुलें वृत्त : निवेदावें यातें ॥ ९४ ॥ जाणोनि आमुची शुद्धता : उपेक्षीना हा सर्वथा ॥ परंतु दिनवत्सळता : स्मरवावी यातें ॥ ९५ ॥ अथो हा अभिमानशून्य : नाठवी कां दयाळुपण ॥ आमुतें या- वीण : कवण राखेल ॥ ९६ ॥ या दुःखार्णवीं तारितें : कोण असे यापरतें ॥ कांहिं एकें सुकृतें : आणिलों आह्मी येथें ॥ ९७ ॥ ऐसें जाणवावें यातें : आतां तुजवांचुनि आमुतें ॥ कोण्हिच नाहिं येथें : सर्व सांडुनि आलों ॥९८॥ जे तुजवीण गति नाहिं : हें निवेदों याचा पाईं ॥ आतां लाजोन काज काइ : होईल तें हो ॥ ९९ ॥ ऐसें विचारुनि स्वचित्तें : त्या पावल्या सावधतेतें ॥ तें यथालक्षण तुतें : निवेदिजेतें राया ॥ ७०० ॥

**प्रेष्ठं प्रियेतरमिव प्रतिभाषमाणं**
**कृष्णं तदर्थविनिवर्तितसर्वकामा : ॥**
**नेत्रे विमृज्य रुदितोपहते स्म किंचि-**
**त्संरंभगद्गदगिरोऽब्रुवतानुरक्ताः ॥ ३० ॥**

आइक राजचूडामणी : उक्त लक्षणा त्या भामिनी ॥ उक्तार्थ धरुनि मनिं : बोलती कृष्णाप्रति ॥ १ ॥ असो त्या भाग्याच्या रामा : कृष्णार्थ निवर्तित- कामा ॥ सर्व सांडुनि आत्मा : आवडला कृष्ण ॥ २ ॥ नयनि अश्रुयुक्ता : होत्या ज्या विरहव्याप्ता ॥ कृष्णार्थ चिंताग्रस्ता : खिन्न होंत्सात्या ॥ ३ ॥ तिहिं विसर्जुनि रुदनातें : परिमार्जिलें नेत्रातें ॥ बाष्प दाटले होते : कंठाचा ठाइं ॥ ४ ॥ तयातें विसर्जुनि : त्या बोलिल्या गद्गदवाणिं ॥ असो त्या गद्गद- गिरा भामिनी : कृष्णासक्तचित्ता ॥ ५ ॥ त्या बोलिल्या ज्या कृणातें : तो कैसा भासला त्यांतें ॥ तरि कृष्णाहुनि परतें : प्रियवस्तु नाहिं ॥ ६ ॥ ह्मणो- नि तो परम प्रेष्ठ : सर्वा अवस्थांसि इष्ट ॥ ज्याचे स्मरणमात्रें कष्ट : नासति अनेक ॥ ७ ॥ परि त्या स्त्रियाहिं प्रस्तुत : भाविला जो विपरीत ॥ कांजे त्यातें कृष्णभाषित : कठिण मानलें ॥ ८ ॥ कां जे व्यवहार संरक्षुन : केलें धर्मनिरूपण ॥ तें जालें असह्यमान : अभिप्राय नेणोनि ॥ ९ ॥ त्या सकाम।

चितें करून : न करितीच विवेचन ॥ भाविला तिहिं श्रीकृष्ण : निष्ठुर हा किं ॥ १० ॥ नवेक संतत होउन : दाविलें कोपाविष्करण ॥ कां जे भलते मिषें करुन : प्रसन्न करावा कृष्ण ॥ ११ ॥ कृष्णेंवीण त्यांसि काहिं : कोठेंहिं उरलें नाहिं ॥ आतां कोप तरि कोणे ठाईं : करावा तिहिं ॥ १२ ॥ या विषयवेथेचा हरण : कैंचा आणावा कोण ॥ त्रासोनि आलों शरण : तवं हाचि जाला विपरीत ॥ १३ ॥ त्रासोनि गृहादिसंगातें : शरण आलों यातें ॥ तों येणेंहिं तेंचि मागुतें : उपदेशिलें कां वो ॥ १४ ॥ ऐशा त्या गोपनारी : पडल्या चिंतासागरिं ॥ किंचित् क्रुद्धाचे परि : बोलताति ऐसें ॥ १५ ॥

॥ गोप्य उचुः ॥

**मैवं विभोऽर्हति भवान्गदितुं नृशंसं**
**संत्यज्य सर्वविषयांस्तव पादमूलम् ॥**
**भक्ता भजस्व दुरवग्रह मा त्यजास्मा-**
**न्देवो यथादिपुरुषो भजते मुमुक्षून् ॥ ३१ ॥**

प्रभो आइकावें भगवंतें : हें जें बोलिलें पुर्वोक्तें ॥ ते योग्य नव्हे स्वामीतें : तुह्मांसि काये ह्मणावें ॥ १६ ॥ आह्मीं सांडुनि स्वविषयांतें : शरण आलों तुतें ॥ जे तव पादमुळ भक्तातें : नुपेक्षावें आतां ॥ १७ ॥ असो टाकुनि गृहादि सकळें : तुझे पादमूळ आश्रिले ॥ त्या तुवां उपदेशिलें : प्रतिकुळ आह्मासि ॥ १८ ॥ तरि ऐसें बोलावया काहिं : स्वामीसि तों योग्य नाहिं ॥ आमुचिं हृदतें काई : नेन(ण)सि कृष्णा ॥ १९ ॥ या सर्वांचे हृद्गत : अवघें तुज असे विदित ॥ आह्मीं हें आजिपर्यंत : जाणितले होतें निश्चयें ॥ २० ॥ परि तें कृष्णा इयें काळीं : सर्वज्ञता कां ये जाळि ॥ कैसि आमुचि फळासि आलि : दुरादृष्टें नेणों ॥ २१ ॥ आह्मि सर्वथा अनन्यभक्त : तुज अधिकार नाहिं विदित ॥ हे कोणासि मात : सांगावि आतां ॥ २२ ॥ नाना परिव्राजकांप्रति : उपदेशावी संसारगति ॥ तों उपदेशु किं अनर्थि : पाडिती गुरु त्यांते ॥ २३ ॥ तेवि निजसेवकांप्रति : उपदेशिलि परावृत्ति ॥ हें नेणों तुझि कोण

युक्ति : रचिली कां येथें ॥ २४ ॥ परि विचारितां काहिं : उचित तों योजत नाहिं ॥ आतां शरणागता पाहिं : निष्ठुरता नसो ॥ २५ ॥ ना तुझें पादमुळ : आश्रिती जे योगशीळ : तों तुं येथें स्वलीळा केवळ : क्रीडसी स्वच्छंदें ॥ २६ ॥ त्या तव पादमूळभक्तां : आह्मासि हे अवस्था ॥ उचित नव्हे सर्वथा : ह्मणि टाकिसी आमुतें ॥ २७ ॥ ह्मणसी मज स्वाधीनासिहि : येव्हढा निरोधु काइ ॥ उचितानुचितें नाहिं : प्रयोजन मातें ॥ २८ ॥ कृष्णा देव जो ये जनिं : आदि पुरुष ऐसा कोण्हि ॥ या प्रपंचापासुनि : अत्यंत वेगळा ॥ २९ ॥ असो वेदशास्त्राचा ठाइं : प्रतिपाद्य वस्तु जे काहिं ॥ अणुमात्र नाहिं : उपाधिचा लेश ॥ ३० ॥ अनुसरोनि त्या वस्तुतें : भजती मुमुक्षुचि शतें : तरि त्या देवें काय त्यांतें : उपेक्षिजे कृष्णा ॥ ३१ ॥ तेवि तुं असंगोदासीन : परि आह्मी तुज अधीन ॥ सर्वस्वातें सांडुन : शरण आलों तुतें ॥ ३२ ॥ तुजवांचुनि येथें : ऐसें कोण सांगतें ॥ सर्वस्व शरण आलों त्या आमुतें : हे शीक्षित न घडे ॥ ३३ ॥ स्वच्छंदासि तुज काहिं : कोठेंच निग्रह नाहिं ॥ परि शरण आलों पाहिं : त्याज्य न हों कदां ॥ ३४ ॥ आम्ही तव पादकिंकरी : कदापि उपेक्षा न करिं ॥ या दृष्टांतेकरिं : देव तो तुंचि आमुचा ॥ ३५ ॥ आह्मासि तुझा पाइं : अन्यथा प्रतीति नाहिं ॥ वेदांतवेद्य वस्तु जे काहिं : ते तुंचि कृष्णा ॥ ३६ ॥ हे मनोरमण मूर्ति : सर्वभक्तार्तिहर्ति ॥ देखतां दुरित पंक्ति : विरोनि जाती शीघ्र ॥ ३७ ॥ हें कमळाक्ष सांवळें : त्रिभंगी ठाण देखिलें ॥ आमुचें तरि काज जालें : येणेंचि आतां ॥ ३८ ॥ ऐशा त्या व्रजांगना : सर्वस्व कृष्णशरणा ॥ प्रसन्न होय यदुराणा : ऐसें बोलिल्या ॥ ३९ ॥ आतां पूर्वोक्तें करुन : कृष्णें केलें धर्मनिरुपण ॥ त्यांचे तिया विवेचन : करिताति ऐसें ॥ ४० ॥

यत्पत्यपत्यसुहृदामनुवृत्तिरंग
स्त्रीणां स्वधर्म इति धर्मविदा त्वयोक्तम् ॥
अस्त्वेवमेतदुपदेशपदे त्वयीशे
प्रेष्ठो भवांस्तनुभृतां किल बंधुरात्मा ॥ ३२ ॥

अंग ऐसें संबोधुन : कृष्णातें ह्मणें गोपीगण ॥ अगा हे अंग हे कृष्ण : नंदसुता सखया ॥ ४१ ॥ अवधारिं येक वचन : आह्मी ज्या सर्वसंगशून्य ॥ त्या जालों तुज अधीन : सांडुनि सर्व ॥ ४२ ॥ परि कृष्णा तुवां प्रस्तुत : बोलिलें जें पूर्वोक्त ॥ उपदेशिलें धर्मजात : आह्मासि विदित ॥ ४३ ॥ किं जो जियेचा पति : त्या पतीचिं जें अनुवर्ति ॥ आणि अपत्यें जें संतति : पुत्रकन्यादि ॥ ४४ ॥ तयाचें पाळन : आणि सुहृदाचें सेवन ॥ हाचि धर्म आह्मां लागुन : सांगीतला ॥ ४५ ॥ तो उपदेश पाहिं : असो गा तुझा पाई ॥ आह्मासि करणीय नाहिं : उरलें आतां ॥ ४६ ॥ तुज सर्वज्ञाप्रति : यावरि बोलावें किती ॥ आह्मी त्वच्छरण सती : त्यक्त सर्व कामा ॥ ४७ ॥ उगवोनि सर्वी गोवीतें : प्रत्यक्ष पावलों तुतें ॥ आतां आमुतें : करणीय कैंचे ॥ ४८ ॥ अगा तुजवांचुनि कांहिं : अनुष्ठेयचि नाहिं ॥ आतां उपदेशिलें काई : धर्मविद् तुवां ॥ ४९ ॥ हें सहज बोलिलें : किं आमुचें चित्त पाहिलें ॥ हें तों नाहिं आलें : प्रत्ययासि कृष्णा ॥ ५० ॥ आतां हा क्रम जो काहिं : तो असो तुझोचि पाइं ॥ याविषयि काई : आह्मीच उपदेश्या ॥ ५१॥ अगा प्रसंगें करुन : तुवां जे केलें निरोपण ॥ तें त्या अध(न?)धिकारिं जाण : योग्याचि असे ॥५२॥ आमुचा कर्तव्यार्थ : तुज काय नाहिं विदित ॥ तुं सर्वात्मा समर्थ : लोकशास्ता गुरु ॥ ५३ ॥ तुं सर्व धर्माचें स्थान : या लागिं उचित हें निरूपण ॥ परि हें जें गमन : स्वगृहासि ॥ ५४ ॥ हेंचि विरुद्धा ऐसें : आमुतें भासत असे ॥ समुद्रापासुनि जैसें : गंगेसि फिरणें ॥ ५५ ॥ किंवां हें धर्मनिरूपण : तुजाचि अनुलक्षुन ॥ स्वधर्माचें अवसान : तुझाचि ठाई ॥ ५६ ॥ एवं उपदेशाचें स्थान : नाहिं तुजवांचुन ॥ तुजचि विषय करुन : वेदशास्त्रांसि प्रवृत्ति ॥ ५७ ॥ पातिव्रत्यादि धर्मा : नाना व्रततपोयमा ॥ सर्व नियमासि सीमा : तुंचि एक सकळेश्वर किं ॥ ५८ ॥ ह्मणोनि त्या धर्मपंथें : आराधूनि तुंतें ॥ तेणे बळें आलों येथें : कोठें जाणे न घडे आतां ॥ ५९ ॥ अथवा भाग्यबळें : साक्षात् आराधिलें ॥ तुजहुनि काये उरलें : आराध्य आणिक ॥ ६० ॥ अनुक्रमाचेंनि पंथें : जें उपास्य असे ज्यातें ॥ तें अव:

घेंचि आतां येथें : सांपडलें आह्मा ॥ ६१ ॥ पावलिया अपांपति : तीर्थांतरें काय स्मरति ॥ तेवि सर्वात्मा तुजप्रति ॥ आलों आह्मी ॥ ६२ ॥ अगा जे जे उपास्य काहिं : तें असो तुझाचि पाइं ॥ लाधलों आह्मासि नाहिं : येथुनि जाणें ॥ ६३ ॥ तें जें पतिसुतादि भान : त्याचें तुंचि अधिष्ठान ॥ म्हणोनि पूज्य सुहृज्जन : तुंचि कृष्णा ॥ ६४ ॥ अगा सुर्याच्या राउळिं : काइ दीपाची दिवाळी ॥ तेवि तुज पाहुनि राहिलिं : कृत्यांतरें ॥ ६५ ॥ जरि येउनि येथें : तुज धर्म पुशिले असते ॥ तरि उचित होतें तुतें : उपदेशावया ॥ ६६ ॥ नापृष्ट : कस्यचित्ब्रूयात् : यासि हें असे संमत ॥ ह्मणजे कोणासि न पुसत : न करावा उपदेश ॥ ६७ ॥ आणि उपदेष्टे जे कोण्हि : ते तुझे प्राप्ती लागुनि ॥ उपदेशिती या जनिं : त्वत्प्रापकां धर्मांतें ॥ ६८ ॥ कां जे या जनांत पाहिं : तुजवीण प्रिय नाहिं ॥ सर्वां अवस्थांचा ठाइं : प्रेमास्पद वस्तु तुं गा कृष्णा ॥ ६९ ॥ तनुधारी जे जन : त्यांचे बुद्धिसाक्षित्वें करुन ॥ शास्ता आत्मा जीवन : सर्व व्यवहारें तुंचि त्यांचे ॥ ७० ॥ ऐशा आह्मीं धर्मजिज्ञासित्या : तुं धर्मनिरुपणकर्ता ॥ हा प्रसंग काहिं नसतां : उपदेशिले स्वधर्म ॥ ७१ ॥ तरि या धर्माचें अवसान : साधिले हे श्रीचरण ॥ पाहोनि सुंदर वदन : आतां निवालों कृष्णा ॥ ७२ ॥ तयां गृहकर्मादिपंथे : अंतरें होतिं तप्तें ॥ तें या वदनशोभासरितें : अत्यंत शीतळ जालिं ॥ ७३ ॥ आतां तुवा उपदेशिलें जें काहिं : तें तुज गुरुपदाचा ठाइं ॥ गुरुदक्षिणार्थ तेंहिं : अर्पिले तुतें ॥ ७४ ॥ कर्तव्यार्थ आलियां हातिं : मग तेचि विक्षेपदांति ॥ ह्मणोनि नको मागुति : येथुनि गमन हें ॥ ७५ ॥ असो उपदेशिलें जें काहिं : त्यासि विषयोचि उरला नाहिं ॥ आतां कोणाचि काइ : करावी सेवा ॥ ७६ ॥ शोवितां रविकर : सापडते जरि मृगनीर ॥ तरि सुखें तेणें व्यवहार : संपादता कांहिं ॥ ७७ ॥ तेविं तुज देखोनि आमुतें : गृहादिक अर्थतें स्फुरतें ॥ तरि तेथें जाणें घडतें : आह्मांसि आतां ॥ ७८ ॥ तो उपदेश जयानिमित्त : तो तुं प्रत्यक्ष आद्य दैवत ॥ लाधलों आतां कृत्यजात : सरले सर्व ॥ ७९ ॥ नातरि पाशोनिया संगातें : जरि

अन्य विषय स्फुरते ॥ तरि उपास्य होतें : उपदेशित तुझें ॥ ८० ॥ पा-होनि मनोहर मुर्ति : विषयांतरेच्छा होति ॥ तरि अवस्य आज्ञाप्रति : सेव्य होते धर्म ॥ ८१ ॥ अगा गृहिं वसोन : करावें चर्वित चर्वण ॥ देखतांचि हे कमळनयन : जरि नव्हे विश्रांति ॥ ८२ ॥ एवं उपदेशिलें जें कांहिं : तें असो तुझाचि ठाईं ॥ कृष्णा आह्मी तों तुझा पाईं : कृतकृत्य असों ॥८३॥ ऐसें जाणवों येतें : जे आह्मीं पावलों येथें ॥ जरि बहुतां जान्मि बहुतें : अ-र्जिलिं सुकृतें ॥ ८४ ॥ त्या बहुजन्माचा अंतिं : देखिली हे रमण मूर्ति ॥ आतां येथुनि परावृत्ति : न घडे कृष्णा ॥ ८५ ॥ ह्मणसी हे केलें निश्चित : तें काय तुमचेंचि मत ॥ किंवा प्रमाणादि येथें : संमत असे ॥ ८६ ॥ कृष्णा ऐसें जरि ह्मणसी : तरि हें संमत असे सर्वांसि ॥ नावेक क्षमा क-रिसि : तरि बोलों कांहिं ॥ ८७ ॥

**कुर्वंति हि त्वयि रतिं कुशलाः स्व आत्म-**
**न्नित्यप्रिये पतिसुतादिभिरार्तिदैः किम् ॥**
**तन्नः प्रसीद परमेश्वर मा स्म छिंद्या-**
**दाशां धृतां त्वयि चिरादरविंदनेत्र ॥ ३३ ॥**

आइकें प्रभो इये जनिं : कुशल जे असती कोण्हि ॥ ते सांडुनि चिंतवणी : परमप्रिय जो तुं ॥ ८८ ॥ तया तुझा चराणिं : रति कारिती अनपायिनि ॥ कां जे तुं आत्मा तुजहुनि : परमार्थ वस्तु नाहिं ॥ ८९ ॥ तुजहुनि जें आन : तेंचि जागातें अज्ञान ॥ हें सर्व मिथ्या भान : नेणोनि तुतें ॥ ९० ॥ जेवि दोरीचा ठाईं : प्रत्यया आणिला अहि ॥ तेवि जगदाभासही : विलास तुझा ॥ ९१ ॥ ह्मणोनि सांडोनि सर्वस्वातें : तुं जो सर्वात्मा त्या तुतें ॥ भजीनले कृतसुकृतें : जाणते जे जन ॥ ९२ ॥ असो शोधिता देहमान : अहंप्रत्ययाचे अवसान ॥ तुं आत्मा सनातन : नित्यप्रिय वस्तु ॥ ९३ ॥ ऐसें चोजवलें जयातें : तेचि ये जनिं जानते ॥ त्यागुनि सर्वस्वातें : रति करिती तुझा ठाइं ॥ ९४ ॥ त्या नित्यप्रिय वस्तुतें : कोणे भाग्ये समर्थे ॥ कोण्हि येके निमित्तें : पात्रों ज्या कृष्णा ॥ ९५ ॥ त्या आह्मासि प्रभो पाहिं:

गृहादिकिं काज काइ ॥ त्या संबंधें काळत्रईं : सुख नसे कदां ॥ ९६ ॥ अगा गृहिंच ज्यांसि प्रीति : त्यांसि तें साधनें श्रमदातिं ॥ जे उपदेशिलि होतिं : पूज्यसेवनें ॥ ९७ ॥ तयां साधनपंथें : त्रासले जे गृहादिकांतें ॥ कोण्हि येकें सुकृतें : पावले जे तुतें कृष्णा ॥ ९८ ॥ तयांसि मागुते पाहीं : या दुःख समुद्राचा ठाईं ॥ बळेंचि पाडने काईं : उचित असे ॥ ९९ ॥ असो ज्या गृहानळतप्ता : पावलों आह्मि श्रीकांता ॥ नुपेक्षावें आतां : कदां प्रभो ॥ ८०० ह्मणसी हें सुवदन : माझे जे सुंदर नयन ॥ ऐशा रुपिं भाळोन : कामासक्ता ज्या ॥ १ ॥ टाकुनि आश्रमधर्मातें : आल्याति वो येथें ॥ माझें संगें काय तुमतें : श्रेयकर होइल ॥ २ ॥ ऐसें ह्मणसी काहिं : तरि आह्मि सक्ता तुझा पाईं ॥ येथें संदेह नाहिं : तर्न्हि आइके ॥ ३ ॥ अगा या जगाचा नियंता : परमेश्वर मोक्षदाता ॥ ऐसि जे वृद्धवार्ता : आइकिली होती कृष्णा ॥ ४ ॥ मग देखोनि तुझा रुपातें : विश्रांति पावलिं चित्तें ॥ अनुभवोनि शोभेतें निवान्त जालों ॥ ५ ॥ ह्मणौनि इश्वर जो या जनिं : तो आणीक नसे तुजहुनि ॥ ऐसा आमुच्या मनिं : जाला विश्वासु ॥ ६ ॥ पाहातां या मुख शोभेतें : विरती कंदर्पशतें ॥ या प्राकृतपुरुषातें : तुच्छता मानिलीसे प्रभो ॥ ७ ॥ नातरि या मुखशोभेचा ठाइं : कामाचा लेखा काइ ॥ कर्तव्यार्थुचि काहिं : नुरे येथें ॥ ८ ॥ देखोनि सुंदर मूर्ति : कर्मि नव्हे प्रवृत्ति ॥ पावोनि परम विश्रांति : कृत्यकृत्यता होतसे ॥ ९ ॥ ह्मणोनि तुजपासुन : ईश्वर तो कोण आन ॥ आतां होई कृष्णा प्रसन्न : अंगीकारिं आमुतें ॥ १० ॥ जरि तुं प्रसन्न स्वता : तरि श्रेयाची काय चिंता ॥ जर्न्हि आह्मि कामासक्ता : भाळलें तुज ॥ ११ ॥ ह्मणोनि गा परमेश्वरा : श्रीकृष्णा नंदकुमारा ॥ विटोनियां संसारा : शरण आलों तुज येथें ॥ १२ ॥ त्या आमच्या आशेतें : ह्मणिं भंगिसी गा येथें ॥ बहुंत दिवस कृष्णा तुतें : स्मरतों आह्मि ॥ १३ ॥ केंव्हा या मुखशोभेतें : प्राशिजे नेत्रपंथें ॥ सांडुनि सर्व विक्षेपातें : पाविजे अवकाश ॥ १४ ॥ ऐसी जे आशा काहिं : बहुं काळ तुझा पाइं ॥ धरिली ते आतां काइ : अन्यथा करिसी प्रभो ॥ १५ ॥ प्रसन्न होइं आमुतें : ह्मणि भंगिशी आशेतें ॥ शा-

रण आलों गा तुतें : सर्वस्वें आह्मीं कृष्णा ॥ १६ ॥ नातरि या वेणुगीतें : जरि वेधिलें नसतें ॥ तरि मानितों आज्ञेतें : जातों तेथें अवश्य ॥ १७ ॥ ऐसें गोपी विचारुनि : उत्तर श्लोकें करुनि ॥ बोलती ते तुजलागुनि : निवेदितों राया ॥ १८ ॥

**चित्तं सुखेन भवतापहृतं गृहेषु**
**यन्निर्विशत्युत करावपि गृह्यकृत्ये ॥**
**पादौ पदं न चलतस्तव पादमूला-**
**द्यामः कथं व्रजमथो करवाम किं वा ॥ ३४ ॥**

प्रभो आमुचें चित्त : निरंतर अभिरत ॥ तुज सुंदरातें स्मरत : निजगृहकृत्याचा ठाइं ॥ १९ ॥ या व्यवहारपंथें : नावेक प्रवेशत होते ॥ तें तुवां गाउनि गीतें : मोहिलें अकस्मात कृष्णा ॥ २० ॥ असो गृहकृत्याचा ठाइं : प्रवर्तले जे काहिं ॥ आणि हे हस्तहि पाहिं : वर्तत होते गा तेथें ॥ २१ ॥ एवं तुझा पाइं असोनि चित्तें : गृहधर्मपंथें ॥ यथा कथंचित् स्वकृत्यें : संपादत होतिं ॥ २२ ॥ तवं प्रेरुनियां निजगीत : आह्मा समस्तांचें चित्त ॥ चोरिलें अकस्मात : सुंदरें तुवां ॥ २३ ॥ या तुच्छ सुखाचा ठाइं : सुखावधि तुं जो काहिं ॥ ज्यासि अन्यथा होणे नाहिं : काळत्रइं ॥ २४ ॥ ऐसा जो सुखमूर्ति : त्या तुवां आमुचि चित्तवृत्ति ॥ हरिली जे साधारण होति : गृहकृत्यिं ॥ २५ ॥ ना तरि जन्मांतर सुकृतें : आलिं भाग्यें फळातें ॥ तुवां रमेचेनि नाथें : स्मरिलें तेव्हां ॥ २६ ॥ किंवा हें कलगीत : निजविरहार्णविं पोत ॥ प्रेरुनियां आह्मासि येथें : आणिलें तुवां ॥ २७ ॥ ना तरि हे गीत नव्हे आतां : गृहसागरिं बुडतां ॥ तुवां हात देऊनि स्वता : आणिलें येथें ॥२८॥ जेवि मुमुक्षुचा मनिं : स्मरोनि वेदवाणी ॥ तत्काळ गृहसंगातें टाकुनि : गुरुप्रति येति ॥ २९ ॥ तेवि तुवां प्रेरुनि गीतें : हरिलिं आमुचि चित्तें ॥ आतां मागुती तेथें : प्रवेशावें कैसें ॥ ३० ॥ त्यांतेंचि अनुसरोन : हस्तहि जाले क्रियाशून्य ॥ जे स्वकर्मिं साधारण : वर्तत होते ॥ ३१ ॥ तें मागुतें गृहकर्म : संपादितां कैसें क्षम ॥ होइल गा गृहकाम : सांडिला असता

किं ॥ ३२ ॥ असो तुंवा कळावंते : आमुचे हस्ताक्रियशक्तीतें ॥ हरिलें आतां गृहकत्यें : संपादती कैसि ॥ ३३ ॥ ह्मणसी जऱ्हि मोहितचित्ता : जालियाति क्रियारहिता ॥ तऱ्हि तुह्मि वनिता : गृहिंच योग्या ॥ ३४ ॥ तुह्मी असावें स्वगृहिं : हा वनवास बरा नाहिं ॥ ऐसें कृष्णा जरि काहिं : ह्मणसि येथें ॥ ३५ ॥ तरि बहुजन्माचे अंतिं : आलों तव पादमूळाप्रति ॥ या पदक्रियेची समाप्ति : जाली येथें ॥ ३६ ॥ या पदाब्जापासुन : कैसें घडे पुनर्गमन ॥ मागें फिरावया काहिं चळन : न पावति हे पाये ॥ ३७ ॥ असो या पायांचि प्रवृत्ति : सर्वथा नव्हे गृहाप्रति ॥ हरिली तुवां गमनशक्ति : चालावें कोणें ॥ ३८ ॥ पाहोनि हें सुवदन : मन जालें गतिहीन ॥ खुंटलें यावरि जाण : राहिली सर्व क्रिया ॥ ३९ ॥ आतां आह्मी व्रजाप्रति : जावें कवणिये रीति ॥ किंवा जाउनि तेथें मागुति : करावें तऱ्हि काय कृष्णा ॥४०॥ असो आह्मी त्वन्मोहितमना : गृहकामिं अप्रयोजना ॥ येथुनि आतां गमना : योग्य न हों ॥ ४१ ॥ आह्मी विरहानळतप्ता : गृहकामिं अनासक्ता ॥ तव गीत मोहित चित्ता : आलों येथें ॥ ४२ ॥ देखोनि तुज सुंदरातें : समाधान जालें होतें ॥ तवं अकस्मात गृहकर्मातें : बोलिलें तुंवा ॥ ४३ ॥ वियोगाग्नि शांत होता : येणें प्रदीप्त जाला मागुता ॥ आतां तुजवीण हे व्यथा : निवारील कोण ॥ ४४ ॥ ऐसें धरुनि निजमनिं : श्रीकृष्णाप्रति भामिनी ॥ उत्तर ग्रंथें करुनि : बोलताति ऐसें राया ॥ ४५ ॥

> **सिंचांग नस्त्वदधरामृतपूरकेण**
> **हासावलोककलगीतजहृच्छयाग्निम् ॥**
> **नो चेद्वयं विरहजाग्न्युपयुक्तदेहा**
> **ध्यानेन याम पदयोः पदवीं सखे ते ॥ ३५ ॥**

हे अंगा अगा ये कृष्णा : सखया नंदनंदना ॥ आह्मी विरहतप्तांगना : अनन्यशरणा तुज ॥ ४६ ॥ प्रभो तुझें जें कलगीत : किंचित्हास्यमुखोक्त ॥ लीलावलोकनयुक्त : सेव्य जें योगियांतें ॥ ४७ ॥ त्या श्रवणें आमुतें : केलें विरहाग्नितप्तें ॥ नातरि श्रुतिमार्गें हृदयातें : स्पर्शिलें येउनि तेणें ॥ ४८ ॥

प्रदीप्त जो हृच्छयाग्नि : तेणें आणिलों तव कामिनी ॥ सर्वस्वातें सांडुनि : भा-ळलों गा तुतें ॥ ४९ ॥ त्या आमुचिं शरीरें : तप्तें जालिं कामाग्निभरें ॥ आतां पावलो किं गा तुं त्वरें : शमवि त्या तापातें ॥ ५० ॥ असो साहुनिया व्यथेतें : आचरतांहि गृहकृत्यें ॥ तवं या ललितगीतें : चेतविला कामाग्नि॥ ५१॥ न साहोनि वियोगतापातें : टाकोनि आलों येथें ॥ देखोनियां मुखशोभेतें : निवालों होतों काहिं ॥ ५२ ॥ तवं उपदेशप्रभंजनिं : मागुता हृच्छयाग्नि ॥ खवळोनि अंतःकरणिं : सर्वांग तापविले तेणें ॥ ५३ ॥ त्याहीं वरि गृहादि श्रवण । तो दुसरा हुताशन। एवं उभयाग्नि मिळोन। तापविलों आह्मीं ॥ ५४॥ आतां या तीव्र तापातें : निववि गा अधरामृतें ॥ असो या अधरामृतें : आमुतें तृप्त करिं ॥५५॥ या विरहजा तापातें : शमउनि स्वदासितें ॥ आपुले पाइं सरतें : करावें आमुतें श्रीकृष्णा ॥५६॥ नातरि आह्मी तव किंकरी : ज्या विरहानळ का तरी ॥ तया अधरामृतपुरिं : राखें आमुतें ॥ ५७ ॥ असो हें तप्तें शरीरें : सिंचोनि अधरामृतनीरें ॥ निववावें परिकरें : सत्वर आमुतें कृष्णा ॥ ५८ ॥ आतां आमुचे प्रार्थनेसि : जरि चित्त न देसी ॥ आह्मा दीनातें उपेक्षिसी : कदाचित तुं ॥ ५९ ॥ तरि तव ध्यानयोगपंथें : सांडुनि तप्तां देहातें ॥ तुझे चरणपद्वीतें : पाविजेल आह्मीं ॥ ६० ॥ असो हा विरहाग्नि : तेणें तप्तदेहा ज्या कामिनी ॥ आह्मी ध्यानमार्गें करुनि : योगी जैसे ॥ ६१ ॥ तव पदपद्वी पवित्र : जे प्रतिपादित वेदशास्त्र ॥ तिथतें होउनि पात्र : ध्यानयोगें पाविजे ॥ ६२ ॥ जेविं मुमुक्षु जे कोणिह : सर्व संगातें सांडुनि ॥ प्रवर्तती वेदांतश्रवणी : आचार्याश्रयें ॥ ६३ ॥ मग वेदांततात्पर्यार्थ : नव्हे जरि बुद्धिगत ॥ त्यासि कृपा जरि न करी भगवंत : तेणें मार्गें त्यातें ॥ ६४ ॥ तरि तयां मुमुक्षुंसि पाहिं : पुर्वसंग तो उचित नाहिं ॥ ध्यानादिकि तिहिं : साधावा योग ॥ ६५ ॥ ध्यानयोगाचेनि पंथें : शोधूनियां स्वचित्तें ॥ त्या शुद्धचित्तिं भगवंतें : प्रतिष्ठिजेल वेदार्थीतें ॥ ६६ ॥ नातरि ध्यानयोगयुक्त : तेथें प्रकटोनियां भगवंत ॥ प्रेरितसे निजार्थ : शरणागता तया ॥ ६७ ॥ कृपावंतें भगवंतें : पावविजेल निजपद्वीतें ॥ नाशोनि अविद्येतें : तेयोनि तापा

योगियांच्या ॥ ६८ ॥ नातरि ध्यान योगपंथे : वैकुंठभुवनिं त्यांतें ॥ पावउनि परमपदातें : स्वीकारिजेल स्वांगें ॥ ६९ ॥ तेवींचि अनुसरोनि ध्यानपंथा : पावों गा तुज परम कांता ॥ परि येथुनि सर्वथा : जाणें नाहिं ॥ ७० ॥ तुझा ध्यानिं गुंतलिं मनें : मग शरीरें हे अचेतनें ॥ संतप्तें निवालिं कोणें : जाणावि कृष्णा ॥ ७१ ॥ मनें गुंतालिं तुझा पाई : मग शरीरें काज काई ॥ तुं उपेक्षिसी तरि नाहिं : वांचणें आह्मां ॥ ७२ ॥ परि सोडुनियां पायांतें : प्रवर्तावें गृहपंथें ॥ हें सर्वथा कृष्णा आमुतें : न गमे तुजवांचुन ॥ ७३ ॥ ह्मणसी तुह्मी विरहतप्ता सती : जावें वो निजपतिं प्रति ॥ तेथें तापशांति : पावाल आतां ॥ ७४ ॥ तरि तुझे पायांपासुन : न घडे सर्वथा गमन ॥ असो तुजवांचुनि हें मन : न भजे आणिका ॥ ७५ ॥ या अर्थातें धरुनि मनिं : अग्रश्लोकें करुनि ॥ आईक राया कृष्णकामिनी : बोलती जें ॥ ७६ ॥

**यर्ह्यंबुजाक्ष तव पादतलं रमाया**
**दत्तक्षणं क्वचिदरण्यजनप्रियस्य ॥**
**अस्प्राक्ष्म तत्प्रभृति नान्यसमक्षमंग**
**स्थातुं त्वयाभिरमिता बत पारयामः ॥ ३६ ॥**

अगा ये अंगा कृष्णा : अवधारिं कमळनयना ॥ आमुचें वृत्त अवधारणा : योग( ग्य? )तुंचि ॥७७॥ हें जें तुझें चरणतळ : श्रांतविश्रांति सबळ ॥ देखोनि जाते तळमळ : मुमुक्षु सांडिती ॥ ७८ ॥ या पादतळाचा ठांई : देवांसही अवसर नाहिं ॥ स्वता रमादेवी तेहि : कदाचित् पावतसे ॥ ७९ ॥ त्या परमविश्रांतिस्थानिं : अवसरातें पावोनि ॥ सर्वत्र श्लाघ्य ये जनिं : मिरवे जे किं ॥ ८० ॥ असो जे चरणारविंद : सकळ सौख्यामोद ॥ जें रमादेवीसि आस्पद : कदाचित्प्रभो ॥ ८१ ॥ परि सर्वकाळ तेथें ॥ तेहि न पवे अवसरातें : एवं रमेसही योग्यतेतें : न सरे सर्वदा ॥ ८२ ॥ ऐशा पदसरोजातें : काहिं एकें सुकृतें ॥ आम्हीं जन्मे सोसुनि अनंते : स्पर्शिलें जेव्हां ॥ ८३ ॥ कृष्णा तया काळापासुन : आह्मी त्वच्छरणा असोन ॥ तुझा दासी ह्मणोन : श्लाघ्य जालों ॥ ८४ ॥ असो आह्मी ज्या त्वच्चित्ता : तुझेनि आनंदभरिता ॥

तुझे वदन पाहातां : निवालों प्रभो ॥ ८५ ॥ तैं पासूनि कृष्णा : आह्मी जालों विगततृष्णा ॥ त्वद्वियोगअसहिष्णा : त्वदेकशरणा किं ॥ ८६ ॥ आणिका समक्ष राहणें : हें टाकिलें आमुचे मनें ॥ असो आणिकाचें ह्मणवणें : हेंहिं न सोसे ॥ ८७ ॥ या त्रैलोक्याचा ठाईं : तुजवीण अर्थ नाहिं ॥ तुज परमार्थरूपासि काई : हा प्रपंच अवघा अध्यस्त ॥ ८८ ॥ हें सर्वेही आगमा पाईं : काहिंच निर्वाह नाहिं ॥ आतां कोणास काइ : भजावें कैसें परिं ॥ ८९ ॥ असो बोलावें किती काइ : रती जाली तुझा पाईं ॥ तैं पासुनि नाहिं : आह्मासि सेव्य आणिक ॥ ९० ॥ एवं आह्मी तुझा दासी : असेव्या आणिका पासिं ॥ योग्य न हों हें काय नेणसी : सर्वज्ञ किं तुं ॥९१॥ ह्मणसी माझे सेवेप्रति : लक्ष्मीहि नव्हे सरती ॥ तेथें तुह्मी गोपजाती : राणटा वनिता ॥ ९२ ॥ कोणेही येके रीती : असो भलत्या प्रकारें प्रीति ॥ परि मीं तुह्मा राणटांप्रति : वश होईन कैसा ॥ ९३ ॥ तुह्मीं अंगना मूढजाति : नेणा वो समान प्रतिपत्ति ॥ केवळ माझी प्रीति : फळेल कैसी ॥ ९४ ॥ ए[illegible] असावया येथें : योग्यता नाहिं वो तुमतें ॥ ऐसें जरि रमानाथें : ह्मणिजेल कांहिं ॥ ९५ ॥ तरि तुं अरंण्यजनसखा : तुज काय रमेचा लेखा ॥ तुझेनि पाडे वराका : रमा ते किति ॥ ९६ ॥ पाहाता या महिमाना : लक्ष्मी आणि आह्मी समाना ॥ तथापि स्वामी सुजाणां : तुं अकिंचनप्रिय ॥ ९७ ॥ जेथें उपाधीची निवृत्ति : तेथेंचि तुझी प्रीति ॥ अत्यंत आवडती : त्यक्ताभिमान जे कोण्हि ॥ ९८ ॥ असो जे येथें त्यक्तसंग : तेथें तुज अनुराग ॥ संपन्न जे दुर्भग : ते नावडती सहसा ॥ ९९ ॥ असो सांडुति सर्वासक्ति : तुजचि जे स्मरति ॥ त्यांची प्रीति फळवती : तुझे कृपेने होये ॥ ९०० ॥ एवं विजानिं जे वसति : त्यांचीच तुजला प्रीति ॥ या कारणें तुला ह्मणती : जें अरण्यजनप्रिय ॥ १ ॥ तया तुझे श्रीचरण : जें रमेसही दुराराधन ॥ तें कोण्हियेके भाग्यें करुन : स्पर्शिले आह्मि ॥ २ ॥ असो तव पादतळ जे कांहिं : बिंबले आमुचा हृदयिं ॥ नातरि मन हें तुझा पाईं : रंगलें जेव्हां ॥ ३ ॥ तैं पासुनि हें कृष्णा : आणिकातें भजेना ॥

तुजवांचूनि ह्मणेना : जे आपुले हे आत कोण्हि ॥ ४ ॥ आणिकां समक्ष असावें : आणिकातें अवलोकावें ॥ ह्मणोनि हें न संभवे : येथुनि जाणें ॥ ५ ॥ बहु दिवस आशा केलि : ते जरि व्यर्थ जाली ॥ मग हें धिक् शरीरें ज्यालिं : निःकारणें जें ॥ ६ ॥ एवं बत शब्देंकरुन : खेदाचें केलें उपलक्षण ॥ जें कृष्णें कथिलें गमन : तें आठवलें सखेद ॥ ७ ॥ अथवा तयांसि जे काळीं : कृष्णपदिं प्रीति जाली ॥ तइं पासुनि धरिलिं : तें पदें हृदयिं ॥ ८ ॥ त्या काळातें स्मरोनि : बत येणें उत्साहयुक्त मनिं ॥ विस्मयातें पावोनि : राहिल्या निवांत ॥ ९ ॥ मागुता तो गोपीजन : स्मरोनियां श्रीकृष्णचरण ॥ वर्णितसे महीमान : त्या पदाचें राया ॥ १० ॥

श्रीर्यत्पदांबुजरजश्चकमे तुलस्या
लब्ध्वापि वक्षसि पदं किल भृत्यजुष्टम् ॥
यस्याः स्ववीक्षणकृतेन्यसुरप्रयास-
स्तद्वद्वयं च तव पादरजः प्रपन्नाः ॥ ३७ ॥

आमुचें मन तुझा पाइं : कृष्णा हें आश्चर्य काइ ॥ नवल वाटतसे काहिं : तें आइकावें येक ॥ ११ ॥ अनंता जान्मींकरुनि : अनेक तपें तपोनि ॥ ते पावली सिंधुनंदिनी : वक्षस्थाळीं ठावो ॥ १२ ॥ असो अपारें सुकृतें : पावली तुझा वक्षस्थळातें ॥ नाना वक्षस्थाळीं तीतें : ठेविलें तुवां ॥ १३ ॥ परि येवढे महत्वातें : पावोनहि न माने तितें ॥ तुझा पदांबुज रजातें : वांछिलें तियनें ॥ १४ ॥ लाधोनहि महिमानातें : अंगीकेलें चरणसेवेतें ॥ कां जे पदरज तीयेतें : मानले विशेषें ॥ १५ ॥ पाहातां व्यवहाररीति : ते असपत्न तेथें होती ॥ आणि चरणातें चुम्बिती : तुळसीची माळा ॥ १६ ॥ त्या तुळसी सहवासिमान : ते करिती जाली पदसेवन ॥ सांडोनि महिमान : सोशिलें सापत्न्य ॥ १७ ॥ पाहा पदरजाचि आशा : केव्हडा केला धिवसा ॥ न गणोनि स्वयशा : तव पदरज सेविले ॥ १८ ॥ सोसुनि सापत्न्यभावातें : लाभली पदसेवेतें ॥ श्लाघ्य मानुनि आपनातें : मिरवली जे ॥ १९ ॥ किंवा माळामिषेंकरुनि : तुळसीही हृदयवासिनी ॥ परि जाली पाद(दा)व

लंबिनी : पदरजस्वार्थें ॥ २० ॥ हे देखोनि सिंधुसुता : करिती जाली व्यवस्था ॥ किंवा हाचि लाभ असता : तरि ते कां पद सेविती ॥ २१ ॥ तस्मात् या पदरजाचा ठाई : विशेष लाभ असे काहिं ॥ तो आपणासि कां नाहिं : हें मानिलें उणें ॥ २२ ॥ या हेतुतें सिंधुनंदिनी : सापत्न्यातें अंगीकारुनि ॥ तव पदरजातें सेउनि : पावली श्लाघ्यता ॥ २३ ॥ ह्मणसी लक्ष्मी माझें कळत्र : तेंचि सेवेसि पात्र ॥ एतावता एथें विचित्र : काय जाहलें ॥ २४ ॥ ऐसें ह्मणसी आमुतें : तरि मागें जे शिष्ट होते ॥ ते भजोनि त्या पदपंथें : पावले तुज कृष्णा ॥ २५ ॥ स्वामी तुझे जे भृत्य : ते या पदरजातें सेवित ॥ पावले निर्विक्षिप्तचित्त : सुखरुपा तुला ॥ २६ ॥ ह्मणोनि हे पदःरजःकण : तव भृत्यसेवास्थान भृत्यजुष्ट या लागुन : विशेषण पदाचें ॥२७॥ यास्तव पाहोनि तव पदातें : आणिक नावडगा चित्तें ॥ आतां मागुती जरि येथें : ह्मणिजेल ऐसें ॥२८॥ किं रमा तों स्त्री जाती : येथें तियेचा लेखा तो किति : किंवा भृत्य जे मातें भजती : तें तों अकिंचन ॥२९॥ परि संपन्न जे लोक : त्यांसि तों नाहिं अशक्य ऐसें जरि यदुनायक : ह्मणतील कांहिं ॥ ३० ॥ तरि तुजहुनि जे अन्य : ब्रह्मादिकही सुरगण ॥ ते या रमेचें अवलोकन : अपेक्षिती सदा ॥ ३१ ॥ वांछुनि अवलोकलेश : ते बहु करिती प्रयास ॥ परि ते तयांवरि उदास : अनुमात्रहि न पाहे ॥ ३२ ॥ असो तिहिं जे प्रयास केले : उदंड तपें तपीनले ॥ परि अद्यापिहि पाहिलें : नाहिं अळुमाळ ॥ ३३ ॥ ऐसी जे सींधुनन्दिनी : त्या महत्वातें सांडुनि ॥ ते जाली चरणसंवाहिनी : तुझी दासी ऐसी ॥ ३४ ॥ तेथें आह्मा जाली गति : पाहा त्या वराका किति ॥ परि कोण जाणे उन्नति : कोण्या कर्माची हे ॥ ३५ ॥ ह्मणोनि श्रियेचे परि : आह्मि ज्या व्रजवासिनी नारी ॥ जालों तुझा किंकरी : पावलों पदरजा ॥ ३६ ॥ तिणें इच्छुनियां सुखातें : सांडिलें महिमानातें ॥ तरि आह्मीं कां जावें तेथें : त्यजुनि हे पदरज ॥ ३७ ॥ आह्मा तव पदरजप्राप्तां : गृहसंग नसो आतां ॥ सर्वथा नुपजो आस्था : आणिकांची ॥ ३८ ॥

**तन्नः प्रसीद वृजिनार्दन तेंघ्रिमूलम्**
**प्राप्ता विसृज्य वसतीस्त्वदुपासनाशाः ॥**
**त्वत्सुन्दरस्मितनिरीक्षणतीव्रकाम-**
**तप्तात्मनां पुरुषभूषण देहि दास्यम् ॥ ३८ ॥**

अगा हे वृजिनार्दना : श्रीकृष्णा क्लेशहरणा ॥ आम्ही त्वच्छरणा : त्या आणिकांतें न भजों ॥ ३९ ॥ यालागिं आलों जी येथें : पावलों तव पदातें ॥ त्या उपेक्ष्या नव्हों गा तुतें : निजदास्य देईं आम्हां ॥४०॥ गृह-कृत्यें उर्वरितें : ठेउनि आलो असो न येथें ॥ ऐसें जरि कृष्णा तुतें : असेल गमलें ॥ ४१ ॥ तरि त्या तुच्छ गृहातें : त्यागुनि निश्चयें येथें : आलों आम्ही तव सान्निध्यातें : पद सेवावया ॥ ४२ ॥ त्वदुपासनमनोरथा : जालों ज्या तवांघ्रिप्राप्ता ॥ उपेक्ष्या न हों सर्वथा : दास्य देइं आपुलें ॥४३॥ कां जे हा स्थूळ उपाधि : यासि सेवा करावी अवधि॥ तुझा पाईं ठेउनि बुद्धि : असावें सुखें ॥४४॥ ऐशा धरुनि मनोरथा : आलों येथें आम्ही निश्चिता ॥ यवि-षईं जरि आतां : म्हणसी ऐसें ॥४५॥ जे तुम्ही ज्या व्रचसुन्दरी : होत्याति आपुले घरिं ॥ यथासुखें गृहव्यापारिं : वर्ततिया सर्वा ॥ ४६ ॥ म्या आ-पुले मेळें गाइलें : तें सकळ लोकिं आइकिलें ॥ तें तुमतेंचि कां जालें : गृहत्यागहेतु ॥ ४७ ॥ तरि तुज सुवदनातें : यशोदानन्दानन्दनातें ॥ देखोनि तुजलागि जीवितें : पूर्वींच वोपिलिं ॥ ४८ ॥ जेव्हां तुझें मुख हांसतां : देखोनि जालों कामासक्ता ॥ गृहिं गुंतलेंहिं असतां : उद्विग्न ज्या ॥ ४९ ॥ तयां आम्हां त्वच्चित्तातें : त्वद्वियोगतीव्रतप्तातें ॥ त्या तुझे मधुरगीतें : आणिलें किं येथें ॥ ५० ॥ आम्ही जाणतिया जालों : जें श्रीकृष्णें आप्त केलों ॥ येथुनि आतां सुटलों : बोलाविलें तुवां ॥ ५१ ॥ जेविं गृहवासी जन : जन्हिं सर्वत्र उदासीन ॥ भगवंति तत्पर मन : तत्प्रसादातें इच्छिती जे ॥ ५२ ॥ तथापि स्वाचारेंकरुन : तिहिं करावें प्रसन्न ॥ नाहिं तरि परिव्राजन : उचित नव्हे अपक्वातें ॥ ५३ ॥ स्वधर्में शोधित मन : सर्व क्रिया कृष्णार्पण ॥ करुनि ऐसा प्रसन्न : अधिकारी होंत्साता ॥ ५४ ॥ विधीतें अनुसरोन : करावें

गुरुवाक्येश्रवण ॥ मग मनन निदिध्यासन : या न्यायें साधिजे ॥ ५५ ॥ चुकोनि यथाविधीतें : चतुर्थाश्रमिं प्रवर्ते ॥ तो त्याचि निमित्तें विषयगर्ते : तत्काळ पडे ॥ ५६ ॥ तेवि आलोचुनि अधिकारातें : तुवां प्रेरिलिं जें गीतें ॥ तेणें जाणितलें जें आमुतें : आप्त केलें ॥ ५७ ॥ तुझें करुनि सन्निधान : असावें सर्वतापशून्य ॥ पाहोनि हें वदन : सेवावें तुज सदा ॥ ५८ ॥ ऐसें धरुनि चित्तिं : कृष्णा आम्ही आलों तुजप्रति ॥ सैंवट तुवां परावृत्ति : उपदेशिली हे ॥ ५९ ॥ तेणें जालों अतिसंतप्ता : ते कोण शमवील व्यथा ॥ उपेक्षुं नको आतां : दास्य देईं आपुलें ॥ ६० ॥ असो तुझे प्रसन्नतेतें : जाणोनि गा त्वच्चित्तें ॥ साधारणे गृहकृत्यें संपादित होतां ॥ ६१ ॥ तवं गीतश्रवण जालें : तेणें जाणवो आलें ॥ जें श्रीकृष्णें आमुतें स्मरलें : प्रसन्नमानसें ॥ ६२ ॥ त्या प्रसन्नतेचें आशा : येव्हढा केला धिंवसा ॥ पावलों पदरजोलेशा : धन्येतमा जालों ॥ ६३ ॥ परि मागुते गृहगमना : आइकोनि जालों विमना ॥ या लागिं पुरुषभूषणा : प्रसन्न होईं गा ॥ ६४ ॥ असो तुजवीण आणिकातें : भजणें नाहिं आमुतें ॥ कां जे या जगिं तुजपरतें : गोमटेंचि नाहिं ॥६५॥ अगा या लोकाचा ठांईं : तुज ऐसें कोण्हीच नाहिं ॥ हेंचि म्हणो काइ : परि ब्रह्मेशादि अमरहि ॥ ६६ ॥ त्यांची ही आइकिली कीर्ति : परि ते न माने आमुचा चित्तिं ॥ कां जे तेहि सकाम वांछिती : पदरजातें ॥ ६७ ॥ यास्तव पुरुषभूषण : सकळ शोभेचें सदन ॥ तुझिया शोभा शोभायमान : ब्रम्हेशादि विश्व ॥ ६८ ॥ तुझेनि पाडे पाहतां : आणिकाचि काय कथा ॥ पुरुषोत्तम हे प्रथा : तुजाचि कां घडली ॥ ६९ ॥ तस्मात् आपुलें म्हणतिलें : तरीच सार्थक योजिलें ॥ कदाचित् तुवां उपेक्षिलें : तरि जिणेंचि नाहिं ॥ ७० ॥ कां जें मन लोधलें तुझा पाईं : त्यासि आश्रय तुजवीण नाहिं ॥ यावरि कृष्णा काइ : सांगावें तुज ॥ ७१ ॥ अगा ब्रम्हादि स्थानें : तें गर्जती स्वामित्वपणें ॥ परि तें सर्वप्रकारें उणें : तुझें दास्याचि निकें ॥ ७२ ॥ ऐसें हेतुसहवर्तमान : मागुता तो गोपीजन ॥ बोलतुसे तेथें अवधान : निकें देइं राया ॥ ७३ ॥

वीक्ष्यालकावृतमुखं तव कुण्डलश्री-
गण्डस्थलाधरसुधं हसितावलोकम् ॥
दत्ताभयं च भुजदंडयुगं विलोक्य
वक्षः श्रियैकरमणं च भवाम दास्यः ॥ ३९ ॥

हें अलकावृतानन : म्हणिजे सकेशवदन ॥ जें केशप्रांतिंकरुन : तुझें आवरलें मुख : ॥ ७४ ॥ नाना अत्यंत आवरलें नसे : परि आवरलेंसें भासे ॥ तेणें बहु शोभा दिसे : निरुपम ॥७५॥ त्या मुखशोभेचा रीति : जें कानीं कुण्डलें झळकति ॥ त्या कुण्डलाची दीप्ति : गण्डस्थळीं पडली ॥७६॥ तयां गण्डस्थळीं युक्त : शोभलें जें बहुत ॥ आणि अधरिं सुधा विराजत : त्या मुखाचा ठाई ॥ ७७ ॥ आणि तत्संबंधी जें हास्य : तद्युक्त हें विशेष्य ॥ आणि अवलोकरहस्य : अनुपम्य जेथें ॥ ७८ ॥ तो ही मुखाचा ठाई : शोभतसे बहु कांहिं ॥ ते वर्णावी कोणें किती काई : जेथिची शोभा ॥७९॥ एवं उक्तशोभासंपन्न : तुझें हें सुंदर वदन ॥ सकळसौभाग्यसदन : जगदेकप्रिय जें ॥ ८० ॥ त्या मुखातें देखोनि : आम्ही सकाम ज्या मनिं ॥ आतां न जावों गा येथुनि : होणार तें हो कां ॥ ८१ ॥ केवळ देखोनि मुखातें : नाहिं भाळलों गा तुतें ॥ हे भुजदंडि अभय-दानें : मानलें आह्मा ॥ ८२ ॥ देखोनि भुजदंडयुग्मातें : मानिल ऐसें स्वचित्तें ॥ जें कदाचित् येणें आमुतें : स्पर्शिलें जरि ॥ ८३ ॥ तरि या भयापासुनि : तरों आह्मीं . कृष्णकामिनी ॥ असो विरहहुताशनिं : पडलों उगा किं ॥८४॥ तयां आमुतें आतां : श्रीकृष्ण अभयदाता ॥ पाविजेल कृ-तकृत्यता : स्पर्शमात्रें आह्मीं ॥ ८५ ॥ ह्मणोनि देखतां भुजयुगातें : अंगि-कारिलें दास्यातें ॥ यावरि आणिकातें : अनुसरणें नाहिं ॥ ८६ ॥ नातरि सुमुख हें अनुपम : आणि अभयप्रद भुजयुग्म ॥ इतुकेनी पुर्णकाम : असों आह्मी ॥ ८७ ॥ आणि देखोनि वक्षस्थळातें : विरालिं सकाम चित्तें ॥ आतां न संडो गां तुतें : दास्य करुनि असों ॥ ८८ ॥ ते वक्ष किंलक्षण : तरि जें रमेचें रमणैकस्थान ॥ जे ब्रम्हादिकां न गणुन : विनटली जेथें

॥ ८९ ॥ कां जे तुजहुनि इतरें : तें कामार्चि उद्भवकरें ॥ यालागि सर्व कामसरे : ऐसे हेंचि स्थळ पैं ॥ ९० ॥ अनेकें तपें आचरलीं : मग या स्थळातें पावली ॥ अनेका कामातें तरली : त्रिनटोनि तुतें गा ॥ ९१ ॥ तया वक्षस्थळातें : रमारमणैकदेशातें ॥ देखोनि आम्ही आगिफातें : अनुसरावें कां कृष्णा ॥ ९२ ॥ या भजनाचेनि पंथें : आम्हींहि पावों तेथें ॥ हा निश्चयें करुनि चित्तें : दासी जालों तुझा ॥ ९३ ऐसें पाहोनि वदन : एकांतासि आणावें मन ॥ भुजस्पर्शें करुन : निस्तरावा मनोरथ ॥ ९४ ॥ मग हें वक्षस्थान : पावावें सुखसदन ॥ साक्षात् कामोपशमन : येणें न्यायें साधावें हें गा ॥ ९५ ॥ एवं सुवदनादि युक्त : प्रत्यक्ष जो नन्दसुत ॥ त्या तुज देखोनि निश्चित : दासी जालों कृष्णा ॥ ९६ ॥ असो गृहपुत्रादि प्रवाहिं : स्वामित्व हें जें काहिं ॥ हें नलगे आतां देहीं : दासत्वाचि आपुलें ॥ ९७ ॥ ह्मणसी गृहातें त्रिटोन : माझें करावें सन्निधान ॥ या हेतु मज शरण : आलियाति तुह्मी ॥ ९८ ॥ हे आगुळियाचि मनीं : तुह्मी त्रि ारुनि निज गति ॥ मजसि करावया प्रीति : राहिल्याति ॥ ९९ ॥ तथापि हें परगमन : निंदितील अवघे जन ॥ इये प्रवृत्तासि अप्रमाण : शास्त्रविरुद्ध हें ॥ १००० ॥ ऐसें हे ह्मणसी गा कांहिं : तरि आह्मासि प्रवृति मान्य नाहिं ॥ आणि तत्संबंधी हि : शास्त्रे जें कां ॥१॥ अवघेंचि तें असो आतां : कैंची हे लैकिकी कथा ॥ तुझे पाइं भजतां : विरुद्ध नाहिं सर्वत्रहि ॥ २ ॥ अगा सांडावया तुझे पाये : ऐसी स्त्री कोण पां आहे ॥ पूर्वपुण्य साह्य होये : तरिच पाविजेती ॥ ३ ॥ ऐसें धरुनियां मनिं : त्या कृष्णासक्ता कामिनी ॥ उत्तरश्लोकें करुनि : बोलती ते आइकावें ॥ ४ ॥

> का स्त्र्यंग ते कलपदायतवेणुगीत
> संमोहितार्यचरितान्न चलेत्त्रिलोक्याम् ॥
> त्रैलोक्यसौभगमिदं च निरीक्ष्य रूपं
> यद्गोद्विजद्रुममृगाः पुलकान्यबिभ्रन् ॥ ४० ॥

अंग ऐसे बोलोन : केलें कृष्णाचें संबोधन ॥ अगा ये कृष्णा म्हणोन : सन्मुखीकरण जें काहिं ॥ ५ ॥ कृष्णा तुझें जें वेणुगीत : मधुरपदामृतें

युक्त ॥ श्रवणमात्रें सर्वांगत्रु(तृ)प्त : सकळातें जें करितें ॥६॥ असो हें वेणुवादन : पदोपदिं तेथुनि अमृतकण ॥ स्त्रवती तेणें श्रवण : सर्वांगें तृप्त होति ॥ ७ ॥ सांडुनि सर्व तापातें : तुझा ठाइं निक्षेपती चित्तें ॥ तुझ्या वांचुनि आणिकांतें : चिंतितीना गा ॥ ८ ॥ नाना या वेणुगीतामृतें : निर्दोषें होतां चित्तें ॥ वितृष्णें होत्साति शांतीतें : स्त्रीकरुनि असती ॥ ९ ॥ यावेणुगीतें मोहितमती : त्रैलोक्यांत कोण पां सती ॥ उक्तधर्मातें उल्लंघिती : नसेल कृष्णा ॥ १० ॥ त्या वृद्ध धर्मापासुन : कैसी न पात्रे चळण ॥ असो स्वधर्माचें उल्लंघन : कोण पां न करि ॥ ११ ॥ अगा जे गृहासक्तमति : त्यांतें जे बोलिले असती ॥ यथेष्टाचाराची निवृत्ति : सूचक धर्म ॥ १२ ॥ नातरि तुझापाईं नसोन : विषयतत्पर ज्यांचें मन ॥ सदां करुनि वणवण : भलतेंचि करि ॥ १३ ॥ त्या अविचाराचेनि पंथे : नेउनि पाडी मोहगर्ते ॥ अनेक जन्माचिं शतें : प्राणियातें शीणवी ॥ १४ ॥ त्या विषयासक्तांप्रति : अधर्म निवारणा श्रुति ॥ स्वधर्मातें उपदेशिती : हितकारक ज्या ॥ १५ ॥ मग उक्तधर्मेंकरुन : मन जाल्यां पापशून्य ॥ विषयाभिलाष सरोन : आठवसि तुं गा ॥ १६ ॥ तुझा गुणश्रवणस्मरणि : सदां राहे विनटोनि ॥ न रुचे तुजवांचुनि : आणिक विषयजात ॥ १७ ॥ मग कैंसे तें मागुतें : सांडुनि सुखरुपा तुतें ॥ प्रवर्तोनि प्रवृत्तिपंथें : दुःखार्णवि पडले कां ॥ १८ ॥ ह्मणोनि कोण पां असे सती : जे न्होवली या कल्गीतिं ॥ आणि हे जे रमणमूर्ति : तुझी गा कृष्णा ॥ १९ ॥ असो जें अतिशोभासंपन्न : सर्व सौष्ठव्याचें सदन : रूप हें जें रमण : त्रैलोक्यसुन्दर तुझें ॥ २० ॥ जया रुपातें देखोन : प्रेमप्लुत गोधनगण ॥ पुलकांकित असोन : प्रेमाश्रूतें स्त्रवतसे सदां ॥ २१ ॥ असो देखोनि हे मुर्ति : खगमृग हे मुढजाति ॥ तेहि स्वेदप्लुत होति : विसरोनि निजस्वभावा ॥ २२ ॥ नाना हे तों जंगमजन : असोत हे तत्परायण ॥ परि द्रुम हे अचळण : सदां स्तब्धस्वभाव जे ॥ २३ ॥ तेही या देखोनि रूपातें : धरिती स्वेदकणातें ॥ असो प्रेमप्लुत होत्साते : त्वपरायण असति ॥ २४ ॥ मां

आह्मीं तों स्त्रियाजाति : प्रस्तुत या मनुष्यव्यक्ति ।। दृष्टश्रुत हे सुमुर्ति : आणि वेणुगीतामृत ।। २५ ।। कृष्णा कोण असे ऐसी : जे वश नव्हे दृष्टश्रुतामृतासि ।। नहोनि तुझी दासी : विषयविषानें सेवी ।। २६ ।। असो त्या उक्तधर्मापासुन : कोण न पावे चळन ।। तुझे पाईं लीन जालें मन : तें जाईल कोठें कृष्णा ।।२७।। अगा हे वृक्षपशुप्राणी : निजस्वभावातें सांडुनि ।। राहिलें अनुष्ठुनि : भक्तिधर्मातें कैसें ।। २८ ।। मां आम्ही तों मनुष्यजाति : पावोनि हे संपत्ति ।। तेथें प्राकृत धर्म आवडति : हें काय घडे ।।२९।। एवं संसारातें त्रासोनि : तव गुणासक्त प्राणी ।। श्रवणमननें करुनि : पावले जे अधिकार ।।३०।। त्यांसि जे निजविहित : जऱ्हि जालें शास्त्रोक्त ।। तथापि तेंचि प्रस्तुत : प्रतिकुळत्वें गमलें ।। ३१ ।। न होनि कर्मि सादर : नव्हती ते विधिकिंकर ।। मां साक्षात् तुं शामसुंदर : आंतुडलासि किं ।। ३२ ।। आतां आम्हासि पाहिं : करणीय उरलें कायि ।। रति जाली तुझा पाइं : आनिक काहिं नावडे ।।३३।। सांडुनि निजाचार : अगा आवडते विषयांतर ।। तरि घडतें परद्वार : स्वपतित्यागें करुन ।। ३४ ।। तो त्याग विरुद्ध होता : प्रत्यवायातें उपजविता ।। म्हणोनि आम्ही त्यक्तास्था : शरण तुजला ।। ३५ ।। प्रभो तुजवीण पाहिं : त्या ग्राम्यधर्मि चाड नाहिं ।। आणि तत्संबंधी जे काहिं : कर्तव्य स्वधर्म ।। ३६ ।। आम्ही न होनि तत्परा : तुजचि आराधुं श्रीधरा ।। ऐसें त्या व्रजसुंदरा : सभिप्राय उक्ति ।। ३७ ।। बोलिलिया हृद्गत : तेंचि करावया निश्चित ।। मागुती ते गोपीजात : वदतसे कृष्णेंसि ।। ३८ ।। आणि कृष्णा तुझा पाइं : प्राकृत बुद्धि नाहिं ।। ऐसाही काहिं गोपिकाहिं : दाविला निश्चयो ।। ३९ ।।

> **व्यक्तं भवान्व्रजभयार्तिहरोभिजातो**
> **देवो यथादिपुरुषः सुरलोकगोप्ता ।।**
> **तन्नो निधेहि करपंकजमार्तबंधो**
> **तप्तस्तनेषु च शिरःसु च किंकरीणाम् ।। ४१ ।।**

व्यक्त ऐसें बोलोनी : दाविली निश्चयाची खुण ।। जे तुं नव्हेसि प्राकृत जन : संदेह नाहिं कृष्णा ।। ४० ।। नंदकुमारत्वाकार : साक्षात् व्रजभयार्तिहर ।।

शामसुंदर मनोहर : प्रकटलासि जो येथें ॥ ४१ जेवि तो ब्रह्मेशाचा पति : पुराणें ज्यासि गाति ॥ आदिपुरुष ऐसी ख्याति : सुरसाह्यें कर्ता जो ॥४२॥ मायेतें अधिष्ठुन : जो किलीलावतरण ॥ प्रगटोनि अमरगण : रक्षित असे स्वपक्षपातें ॥ ४३ ॥ लपउनि निर्गुणता : स्वयें होय सुरगोप्ता ॥ तेवि तुं व्रज भयार्तिहर्ता : अवतरलासि येथें ॥४४॥ घेउनि नंदसुतत्वाचि बुंथि : फेडावया स्वजनार्ति ॥ स्वता येथें श्रीपति : अवतरला असे ॥४५॥ हें जाणोन हिं तिहिं : विशेषें प्रकटिलें नाहिं ॥ सवनामात्र काहिं : दाविला संकेत ऐसा ॥ ४६ ॥ न करिती उच्छृंखळता : नोव्हे होउनि शंकिता ॥ जाणितलें जे हा सुरगोप्ता : आदिपुरुष ॥ ४७ ॥ तरिहि व्यवहारपथें : योजिलें दृष्टांतें ॥ तुं आदिपुरुष ऐसि कृष्णातें : जाणवणी केली ॥ ४८ ॥ कृष्णा तुं स्वजनार्तिहंता : सदा जो निगोप्ता ॥ आम्हा दीना अनाथा : नुपेक्षि कृपाळुवा ॥ ४९ ॥ असो अवघी हे कथा : प्रस्तुत व्रजजनार्तिहर्ता ॥ आमुची हरावया व्यथा : अवतरलासि तुं ॥ ५० ॥ अगा तुजवांचुनि येथें : शरण जावें कवणातें ॥ या लागि तुंचि आमुतें : अभये देईं श्रीकृष्णा ॥ ५१ ॥ या वेथेतें शमवितें : ऐसें कोण आहे गा एथें ॥ राखें आह्मा किंकरितें : नुपेक्षि सहसा तुं ॥५२॥ श्रीकृष्णा करुणासिंधु : अगा ये स्वजनार्तबंधु ॥ आह्मी शरणागता वधु : किंकरी तुझ्या ॥५३॥ आमुचा हृदयप्रदेशिं : हात ठेविं गा सुखराशि ॥ असो स्पर्शी या हृदयासि : निज करकमळें ॥ ५४ ॥ या वियोगदावानळिं : हारपतें जें जळिं ॥ तें निजकरस्पर्शजळिं : निमज्जवि आजि कृष्णा ॥५५॥ एवं आम्हीं संतप्तमना : त्वद्विरहपीडितमना ॥ आतां निवविं आर्तिहरणा : करस्पर्शें कारिं ॥ ५६ ॥ हे आमुची विनती : आली जरि तुझ्या चित्तिं ॥ तरि करस्पर्शें विश्रांति : द्यावी आमुतें श्रीकृष्णा ॥ ५७ ॥ असो तुं आर्तिहरण : हें जरि असे साच वचन ॥ तरि या दुःखार्णवापासुन : हात देउनि काढिं ॥ ५८ ॥ आतां तुं या व्रजाचा गोप्ता : जरि दीनाचा आर्तिहर्ता ॥ तरि आमुच माथा : निजकरें धरिं गा ॥ ५९ ॥ असो आमुच्या शिरावरि : स्वहस्त ठेविसी जरि ॥ तरि आम्हासि अंतरिं : उपजेल धीर गा आतां ॥६०॥

अगा या मस्तकाचा ठाईं : हात ठेउनि धीर देईं ॥ अन्यथा आम्हासि कायि : वांचावया उपाय असे ॥ ६१ ॥ एवं यथोक्त निरूपण : रायाप्रति व्यास-नन्दन ॥ करुनि तेंचि उपसंहरण : कीर्तीति तें आइका ॥ ६२ ॥

॥ श्रीशुक उवाच ॥

**इति विक्लवितं तासाम् श्रुत्वा योगेश्वेश्वरः**
**प्रहस्य सदयं गोपीरात्मारामोप्यरीरमत् ॥ ४२ ॥**

त्या ज्या पूर्वोक्ता रीति : गोपकांता कृष्णाप्रति ॥ येउनि नाना उपपत्ति : बोलिल्या ज्या कांहिं ॥ ६३ ॥ असो जया उक्तिकरुन : श्रीकृष्ण होय प्रसन्न ॥ तयाचें दयाळुपण : प्रकटे जेगें ॥ ६४ ॥ ऐसी दाउनि ग्लानि : बोलिल्या त्या व्रजभामिनी ॥ मग त्यांचया आइकोनि : विक्लवितां वाक्यातें ॥६५॥ तो गोपीजनआर्तिहर्ता : श्रीकृष्ण लक्ष्मीभर्ता ॥ नाविक हांसत होत्साता : सदयते करुन ॥ ६६ ॥ साक्षात् आत्माराम : सर्वदा निरस्तकाम ॥ ज्याचा ठाइं हा द्वैतभ्रम : निःशेष असेना ॥ ६७ ॥ म्हणोनि जयाचा ठाइं : विशेष सुखाची वार्ता नाहिं ॥ ज्यासि आत्म्येवीण काहिं : प्रिय नसे दुजें ॥ ६८ ॥ तऱ्हि पावोनि सदयतेतें : निजलीलेचेनि पंथें ॥ गोपींची आर्ति शमार्थें : क्रीडता जाला ॥ ६९ ॥ म्हणाल त्या निष्क्रियाचा ठाइं : क्रियेसि अवसर नाहिं ॥ हे क्रीडा काइ : विरुद्ध नाहिं तयासि ॥ ७० ॥ असो आत्मा-रामहिं जाला : तऱ्हि येणें विकार आला ॥ निष्काम असोनि रतला : त्यांसि कैसा ॥ ७१ ॥ ऐसें शकिंजेल काहिं : तरि हें इश्वरिं विरुद्ध नाहिं ॥ तुम्हासि गमला कायि : प्राकृत कृष्ण हा ॥ ७२ ॥ प्रस्तुत नन्दकुमार : परि योगीश्वराचा इश्वर ॥ येथें जो काहिं प्रचार : योगमायाविलसित ॥ ७३ ॥ येथें साधारण जन : वर्तीति मायानिबंधन ॥ तैसा नव्हे हा श्रीकृष्ण : जो योगीश्वरांचा ईश्वर ॥ ७४ ॥ कृष्णमायाविलासित : अवघें हें प्रपंचजात ॥ त्याहि माजि विशेषार्थ : सूचिला येथें जो काहिं ॥ ७५ ॥ हा षड्गुणैश्वर्य-सम्पन्न : स्वेच्छावतरण ॥ साक्षात् शरणार्तिहरण : सच्चिदानन्दविग्रह ॥७६॥ विशेष शक्ती करुन ; रंजविला तो गोपीजन ॥ स्वता तो क्रियाशून्य ;

सन्निग्रह होतसाता ॥ ७७ ॥ असो शरीरेंकरि पाहि : क्रियापर जाला नाहिं : व्यापारुचि काहिं : सम्भवला नाहिं किं जेथें ॥ ७८ ॥ आतां जें काहिं क्रीडला : तो गोपिकातें अनुभव जाला ॥ ऐसी काहिं कळा : अधिष्ठिली कृष्णें ॥ ७९ ॥ ह्मणोनि जन्हिं हा आकार : तन्हिं योगेश्वरेश्वर ॥ सविग्रहि तन्हि विकार : उपजला नाहिं जेथें ॥ ८० ॥ निरस्तअविद्याबन्धन : जे कोण्हि योगीजन ॥ या विशेष शक्तीचें आपादन : त्याचा ठाईं नसे ॥ ८१ ॥ ह्मणोनि हा नन्दकुमार : योगेश्वरांचा ईश्वर ॥ न होनि क्रियापर : सम्पादिलें रासविहारातें ॥ ८२ ॥ एवं तो निरस्तकाम : स्वता जन्हिं आत्माराम ॥ अधिष्ठुनि मायाधर्म : क्रीडता जाला ॥ ८३ ॥ नातरि तो निरस्तमायाधर्म : सकळसुखैकधाम ॥ तन्हि निजशरणाचा काम : हरणें उचित ॥ ८४ ॥ जेवि कोण्हि योगीजन : असंगोदासीन ॥ कार्यसहवर्तमान : मायानिरस्त जे सर्वदा ॥ ८५ ॥ त्यांसि साधनसम्पन्न : मुमुक्षु जे येती शरण ॥ त्यांचे करुणेस्तव आपण : तिहिंसि वर्तति ॥ ८६ ॥ अविद्येचे निवृत्ति : निवर्तली उपदेशप्रवृत्ति ॥ श्रवणादि उपपत्ति : बोधिल्या जन्हिं कांहिं ॥ ८७ ॥ तन्हि उपदेशादिकें करुन : तारावे मुमुक्षुजन ॥ हा त्यांचा सनातन : स्वभाव उरला ॥ ८८ तेणे स्वभावें करुन : मुमुक्षुसहवर्तमान ॥ शास्त्रादि आलोचन : करिती योगी जेवि ॥ ८९ ॥ तेवि आत्माराम कृष्ण : निजशरणातें लक्षुन ॥ अचिंत्य शक्ती करुन : क्रीडता जाला जो ॥ ९० ॥ आतां त्या क्रीडेचें लक्षण : उत्तरग्रंथें करुन ॥ रायाप्रति व्यासनन्दन : करिती तें आइका ॥ ९१ ॥

**ताभिः समेताभिरुदारचेष्टितः**
**प्रियेक्षणोत्फुल्लमुखीभिरच्युतः ॥**
**उदारहासद्विजकुंददीधिति**
**र्व्यरोचतैणांक इवोडुभिर्वृतः ॥ ४३ ॥**

जो पूर्वोक्त प्रकारा : वर्णिल्या व्रजसुंदरा ॥ अधिष्ठुनि नंदकुमारा : गृहादि त्यागें आलिया ॥ ९२ ॥ ज्या सर्वाही येकचित्ता : असल्या जाल्या समवेता ॥

तुल्यविषया समस्ता : कृष्णपरा ज्या ॥ ९३ ॥ अहो जंवरि विपर्थि विषय-बुद्धि : तंवरि भेदाची सिद्धि ॥ परंतु या विषयांची अवधि : आत्मा कृष्ण ॥ ९४ ॥ असो तिहिं परिवारला : अति शोभता जाला ॥ न तरि वृत्ति-निरोधें प्रगटला : वेदांतवेद्य श्रीकृष्ण ॥ ९५ ॥ जेवि प्रगटतां बोध-स्थिति : श्रवणादि सार्थे होति ॥ किंवा श्रवणादि संपत्ति : बोवासि चढे ॥ ९६ ॥ तेवीचि जालें येथें : सार्थें करुनि गोपीशतें ॥ तिहिंसि आपण तेथें : बहु शोभला श्रीकृष्ण ॥९७॥ नाना त्या निजकळा कामिनी : विरोधातें सांडुनि : सर्वाही येकवटुनि : कृष्णाजवळि आल्या ॥९८॥ मग अनुग्रहुनि त्यांतें : तयांचेनि अनुमतें ॥ शोभत होंत्साता तेथें : रंजविल्या गोपिका ॥ ९९ ॥ तो श्रीकृष्ण किलुक्षण : तरि अति उदाराचरण ॥ ज्या आचरणें स्वगुण : प्रकटिले अपूर्व ॥१ १००॥ एवं तो रमाभर्ता : तिहिंसि रमत होंत्साता ॥ आपुलिया उदारचेष्टिता : प्रकाशिता जाला ॥१॥ या गुणश्रवणा-चेनि पंथें : आकर्षोनि भक्तचित्तें ॥ नाशोनि तद्दुरितें : तारिजेते भक्त ॥ २ ॥ ह्मणोनि उदार चेष्टित : केला श्रीरंगाचा संकेत ॥ गुण ज्याचे अद्भुत : पापताप-हरितें ॥३॥ आणिकहीं विशेषण : अच्युत ऐसी जाली खुण ॥ काळत्रयिं महि-मान : भंगेना ज्याचें ॥ ४ ॥ अनुसरोनि विहारातें : कर्मे करितांहि अत्य-द्भुतें ॥ अणुमात्र जयातें : स्पर्शेना कर्मलेश ॥ ५ ॥ आणि सम्भोगितां गोपीशतें : धरुनि तितुकिया स्वरूपातें ॥ सांते करूनि रेतस्रावितें : स्वता अच्यवितवीर्य जो ॥ ६ ॥ एवं कृष्ण उदारगुण : जो अप्रतिहतमहिमान ॥ अच्युत ऐसें विशेषण : यास्तव घडलें हें ॥ ७ ॥ असो काळत्रयिं अकर्ता : परि विश्वाचा कर्ता हर्ता ॥ न भंगोनि ऐक्यता : विलासमात्र हा ॥ ८ ॥ नातरि प्रस्तुत येथें : गोपिकांचेनि सांगातें ॥ क्रीडतां कंदर्पशतें : जिंकिले येणें अनायासें ॥ ९ ॥ ह्मणोनि श्रीकृष्ण अच्युत : दाविला ऐसा संकेत ॥ तो व्रजवासिनीसमवेत : अति शोभता जाला ॥ १० ॥ तिये क्रीडतिये वेळे : उदार हांस्य जें काहिं केलें ॥ तया हसितें शोभविलें : गोपीमंडळ अवघें ॥ ११ ॥ जें काहिं अपुर्व हांस्यरीति : तेणे प्रकाशली दंतपंक्ति ॥ एक-

वाटले ते दीप्ति : हांस्याचि आणि दंतांचि ॥ १२ ॥ ते दीप्ति कुंदासमान : जैसें शुभ्र सतेज नळिन ॥ तेवि त्रिकासितास्मितानन : अत्यंत शोभला ॥ १३ ॥ श्रीकृष्णतेज बहळ : तेथें उपमा तितुकी विफळ ॥ परि येक-देशें सफळ : काहिं एक जाली ॥ १४ ॥ एवं क्रीडतां उदारस्थिति : सहास्य दंतदिप्ति ॥ विकसली ते कैंसि किति : वर्णावि शोभा ॥ १५ ॥ तो निजशोभाशोभित : त्या व्रजनारिसमवेत ॥ शोभला गोपीनाथ : कळावंत कृष्ण ॥१६॥ आतां व्रजनारी किंलक्षणा : तरि त्या उत्फुल्लवदना ॥ अवलोकितां यदुराणा : विकसितमुखा ॥१७॥ असो तो नंदानंदन : सकळ प्रियाचें अवसान ॥ निजाप्रियमनोरमण : पाहातियां विश्रांति ॥ १८ ॥ त्यातें तिहिं अवलोकुनि : नेत्रद्वारें करुनि ॥ प्राशुनि हृदयभुवनिं : बैसविला सुखाडें ॥ १९ ॥ तेणें वियागतापातें : सांडुनि कृष्णें हृदिस्थें ॥ विसर्जुनि ग्लानितें : विकसितमुखा जाल्या ॥ २० ॥ नातरि निर्धारावया त्यांतें : गमन सूचिलें होतें ॥ पावोनि ग्लानीतें : विमनस्का होत्या ॥ २१ ॥ मग कृष्णें जें हास्य केलें : तेंचि अनुमोदन जालें ॥ तेणें तिहिं लक्षिलें : जे प्रसन्न जाला कृष्ण ॥ २२ तेणें दुर्मनस्कता गेली : वदनें विकसितें जालिं ॥ श्रीकृष्णें कृपा केली : हें जाणितले तिहिं ॥ २३ ॥ तेणे त्या विकसिताननां-सर्वांही गोपांगना ॥ तिहिंसि यदुराणा : शोभता जाला अतिशयें ॥ २४ ॥ जे पूर्विं उपदेशपरें : वाक्यें भासलीं कठोरें ॥ परि तेणें त्यांचिं अंतरें : शोधिलिं श्रीकृष्णें ॥ २५ ॥ जेवि कोण्हि मुमुक्षुजन : परिग्रहातें सांडुन ॥ आले त्यांतें सज्जन : सारवेत्ते आत्मनिष्ठ जे ॥ २६ ॥ ते त्यांची जाणावया मति : कर्मशास्त्रें प्रशंसिती ॥ उत्सुकतेतें शमविती : कर्म होय कां बोलिलें काळिं ॥ २७ ॥ त्यांची मति निर्धारुन : तयांते असोनि प्रसंन्न ॥ तदभिप्रा-यातें अनुसरोन : सिद्धांतिं प्रवर्तति ॥ २८ ॥ तेवि सांडुनि उत्सुकता : गोपी जाल्या समचित्ता ॥ अधिष्ठिला विश्वभर्ता : नंदानंदन जो श्रीकृष्ण ॥ २९ ॥ जाणोनि त्यांची स्थिर मति : तो नंदानंदन श्रीपति ॥ वश होउनि तयांप्रति : शोभताजाला तिहिंसिं ॥ ३० ॥ जेवि तो नक्षत्रमणि : आपुले जोत्स्ने

करुनि ॥ सर्वा नक्षत्रातें शोभउनि : तिहिंसिं स्वयें शोभे ॥ ३१ ॥ असो नक्षत्रिं परिवृत : स्वता शोभे नक्षत्रनाथ ॥ तेविं गोपिकांसमवेत : गोपीपति शोभला ॥३२॥ नाना निजशोभे करुन : शोभउनि गोपीगण ॥ मग तिहिंसिं परिवारुन : आपणहि शोभला ॥३३॥ जेवि निज विलासें करुन : प्रकाशिलें प्रपंचभान ॥ त्याचि संबंधें साधन : शास्त्ररचना ॥३४॥ तया शास्त्रादिमिषें : शोभिजेतें स्वता शास्त्रें ॥ असो शास्त्रादिकिं जो असे : प्रतिपाद्य अर्थ ॥३५॥ तो शास्त्रप्रतिपाद्य अर्थ : मिरवे शास्त्रादिकिं समवेत ॥ तेवि तो गोपीनाथ : तिहिंसि मिरवला ॥ ३६ ॥ तिये शोभेचें लक्षण : विशेषणांतरिं करुन ॥ आइक राया सावधान : वर्णिजेतें तेंहिं ॥ ३७ ॥

**उपगीयमान उद्गायन्वनिताशतयूथपः ॥**
**मालां बिभ्रद्वैजयंतीं व्यचरन्मंडयन्वनम् ॥ ४४ ॥**
**नद्याः पुलिनमाविश्य गोपीभिर्हिमवालुकम् ॥**
**रेमे तत्तरलानंदकुमुदामोदवायुना ॥ ४५ ॥**

तो नंदानंदन श्रीकृष्ण : समस्तसंगीयमान ॥ ब्रह्मादि जे सुरगण : महन्महिमानवंत ॥ ३८ ॥ ते निजकल्याणातें इच्छुन : सदा ज्याचे वर्णिती गुण ॥ वाचा करिती पावन : गुणकथाप्रसंगें ॥ ३९ ॥ असो या जनाचा ठायिं : मुक्त मुमुक्षु आणि विषयी ॥ ऐसे जे असती तिहिं : उपगीयमानगुण जो ॥ ४० ॥ त्यामाजि मुक्त जे कोण्हि होती : ते वर्णुनि जयाची कीर्ति ॥ प्रारब्धातें क्षपिति : अलिप्त होउनि सातें ॥ ४१ ॥ ऐसे जरि न करिते : भगवंतातें न स्मरिते ॥ हा देहाभासु न कळिते : भगवत्सेवेपयोगी ॥ ४२ ॥ तरि होउनि मुक्त मानी : पडती कर्मादि भ्रमणीं ॥ पूज्यमानादि अभिमानि : नाशिती क्रमाश्रमातें ॥४३॥ याकारणें यावद्देहावसान : त्यांसि हा उपगीयमान ॥ असोनि वितृष्णपरायण : काळातें क्षपिती ॥ ४४ ॥ आणि जे मुमुक्षुजन : ज्यांसि संसारिं दोषदर्शन ॥ या भवार्णवा पासुनं : जे तरों इच्छिती ॥ ४५ ॥ त्यसिहि हाचि मुख्य उपाय : सदा भगवंतुचि स्तव्य ॥ सर्व प्रकारें सेवनीय : भगवंतुचि सर्वसत्यांगें ॥ ४६ ॥ आणि संपादि जे जन :





सदा विषयासक्तमन ॥ त्यांसिहि भगवत्गुणकथन : क्रमेंचि तरि ॥ ४६ ॥ अनुक्रमाचिये रीति : तेही दुरितापासुनि तरति ॥ एवं सर्वांसि गेय होति : श्रीकृष्णाचे गुण ॥ ४८ ॥तो हा सर्वोपगीयमान : स्वताही कारितसे गायन : नाना रसातें अधिष्ठुन : विचित्र स्वरभेदें ॥ ४९ ॥ आणि वनिताशतयूथ : ह्मणिजे त्या मिळोनि समस्त ॥ श्रीकृष्णेसिं आवृत : वानिताचि मंडळी तया ॥५० ॥ अनेकशतें वनिताजन : तयातें संरक्षुन ॥ विचरता जाला म्हणोन : वनिताशतयूथप कृष्ण ॥ ५१ ॥ असो तो गोपीशत गणपती : माळा जे वैजयंती ॥ तितें गळां धरुनि स्वगति : वनातें शोभविता ॥ ५२ ॥ मग तो नदीपुलिनातें : प्रवेशोनि गोपीशतें ॥ सहित श्रीकृष्ण तेथें : रमता जाला तो ॥५३॥ आतां यमुनेचें पुलिन : ह्मणसी किंलक्षण ॥ जया तीरातें प्रवेशोन : रमला श्रीकृष्ण ॥ ५४ ॥ तरि जेथिचे वाळुकण : चंद्रकिरणी स्पर्शोन ॥ अति सीतळ असोन : सुखकर जाले ॥ ५५ ॥ अथवा गोपीतें लक्षुन : प्रसन्नामृतदृष्टी करुन ॥ त्या वाळुवंटिं सीतळ गुण : उपजविला जो ॥५६॥ नातरि निजवियोगाग्नि : पीडल्या होंत्सात्या कामिनी ॥ तत्सुखातें विचारुनि : संपादिलें जें ऐसें ॥५७॥ ह्मणोनि हिमवाळुक जाण : यमुनातीराचें विशेषण ॥ त्या वाळुवंटिं श्रीकृष्ण : गोपींसि रमला ॥ ५८ ॥ प्रकटउनि नाना कळा : गोपिकांसि रमता जाला ॥ तो कंजनेत्र घनसावळा : त्या यमुनातीरिं ॥ ५९ ॥ तया क्रीडेचें लक्षण : तरि तेथें जे कुमुदवन ॥ तें कमळें विकसोन : प्रकटला जो सुगंध ॥ ६० ॥ तेणेंसिं युक्त समीर : जो निजस्वभावें सदांचर ॥ नव्हे तीव्र ना अस्थिर : अति मंद जो ॥ ६१ ॥ एवं इत्यादि लक्षण : मंदसुगंध सतिळगुण ॥ जो नदीसंबंधी पवन : आनं-दातें कर्ता ॥ ६२ ॥ त्या सुवायुतें अधिष्ठुन : गोपी सहवर्तमान ॥ रमता जाला रमारमण : पवनसुखें तेथें ॥ ६३ ॥ येणे ऐसें सुचिलें काहिं : जें स्वता कर्तव्य नाहिं ॥ आपणेंवीण काळत्रयिं : दुसरें नसे ॥ ३४ ॥ आतां अनादि आभासें : आपुलेचि आवडिवशें ॥ हे जें विलासले असे : भज्य-भजनरूप ॥ ६५ ॥ तऱ्हीं अचिंत्य शक्तीकरुन : असोनि उदासीन ॥

काहिं एक उपकरण : संपादूनि आपण ॥ ६६ ॥ न लोपोनि निजद्दष्टि : भज्यभजन स्वचेष्टि ॥ वागवीत असे सृष्टि : स्थित्युद्भवलयेंनि ॥ ६७ ॥ तैसेंचि पवनादिलक्षग : मायेतें अविष्टुन ॥ रमता जाला रमारमण : गोपिका वृंदेसिं ॥ ६८ ॥ नातरि त्या गोपीसती : स्वतत्परा समस्ता श्रुती ॥ त्या नानारसें भजती : भगवंती सर्वा ॥ ६९ ॥ म्हणोनि युक्ती करुन : मतांतरातें खंडुन ॥ भजता जाला गोपीजन : भगवंतें अवश्य ॥७०॥ तयातें अनुलक्षिती : भगवंताचे गुण गाती ॥ आपणहि निजकीर्ति : वर्णिता जाला तो ॥ ७१ ॥ कींवा स्वता करी गायन :गोपीतें निजगुण ॥ शीक्षीत होंत्साता पुलिन : नदीचें प्रवेशला ॥७२॥ नातरि तीराचि आकृति : आश्रिलि चतुर्थी भक्ती ॥ ज्या भक्तीनें आश्रिती : देवातें भक्त ॥७३॥ तिये भक्तीतें अधिष्टुन : गोपीकां सहवर्तमान ॥ रमता जाला रमारमण : स्वच्छंदविहारी ॥ ७४ ॥ आतां त्या क्रीडेचें लक्षग : प्रकारांतरेंकरुन ॥ आइक राया सावधान : वर्णिजेतें जें काहिं ॥ ७५ ॥

**बाहुप्रसारपरिरंभकरालकोरु-**
**नीवीस्तनालभननर्मनखाग्रपातैः ॥**
**क्ष्वेल्यावलोकहसितैर्व्रजसुंदरीणा-**
**मुत्तंभयन्रतिपतिं रमयांचकार ॥ ४६ ॥**

पूर्वोक्ता ज्या सुंदरी : कृष्णशरणा व्रजनारी ॥ ज्या सर्व सांडुनि किंकरी : हो उनि निकट आल्या ॥ ७६ ॥ तयांतें रमारमग : प्रस्तुत जो नंदानंदन ॥ रमविता जाला तें सविशेषण : आइकावें संति ॥ ७७ ॥ त्या व्रजसुंदरींचें मन : विषयभूमीपासुन ॥ आवरुनि समाधान : आपुलिया रुपीं पावावें ॥ ७८ ॥ या अर्थातें उद्देशुन : केलें निजबाहुप्रसारण ॥ किंवा स्वबाहुकरुन : बाहुप्रसारण त्याचें ॥ ७९ ॥ आणि तो नित्य हृदयवासी : पारि जाणोनि प्रसंगासि ॥ हृदय लाउनि उरेंसि : आलिंगन जें ॥८०॥ नाना त्याचे तदासक्त मन : हृदये गेलें विरोन ॥ तेंचि महदालिंगन : त्यांसि कृष्णरुपि जालें ॥ ८१॥ आणि प्रेरावया धीर : हस्तें धरुनि त्यांचे कर ॥ केलें त्यां सर्वांचे अंतर :



आपणासवतें किं ॥८२॥ नातरि तें पाणिग्रहण : असंभावनानिवारण ॥ आह्मी कृष्णाच्या हें त्यालागुन : उपजविली निष्ठा ॥ ८३ ॥ एवं आलंभनसंज्ञ : केलें करें करस्पर्शन ॥ सर्वेचि अलक शब्दें करुन : केश जे त्यांचे ॥ ८४ ॥ तयां केशाचा ठाईं : धरिलें त्यांतें जैसें काहिं ॥ आणि उरुयुगलें पाहिं : जघनप्रदेश किं ॥ ८५ ॥ असो तो जो गुह्यप्रदेश : तेथेंहिं केला प्रवेश ॥ जेवि श्रवणारंभि उद्देश : फळाचा कीजे ॥ ८६ ॥असो सत्यानंदादि वाक्यें : वदोनि वेदांतवाचकें ॥ मुमुक्षुतें श्रवणादिकें : उपदेशिती गुरु ॥ ८७ ॥ तेविं जघनातें धरून : आरंभिलें संभोगलक्षण ॥ जाले जे निजशरण : त्यासि सुखार्थ ॥ ८८ ॥ आणि नीवीशब्दें करुन : वस्त्र जें केलें परिधान ॥ तत्प्रांत एकवाटुन : मुद्राबंध जो ॥ ८९ ॥ त्यांतेंहिं सोडुन : गुह्ये केले निरावरण ॥ तोडिजे अविद्या साधरण : स्वरुपनिष्ठें जेविं ॥ ९० ॥ तेवि धरुनि जघनातें : सोडिलें वस्त्रग्रंथीतें ॥ स्वसंभोगिं त्यांतें : उत्कंठा जे होती ॥ ९१ ॥ उत्सुकतेचें निवारण : केलें वस्त्रगंथीतें सोडुन ॥ मग केलें अवलंबन : स्तनाचा ठाईं ॥ ९२ ॥ त्या कुचग्रहणें त्यांतें : सूचिलें अंतःप्रवेशातें ॥ जयानिमितें त्यातें : चिंतत होत्या ॥ ९३ ॥ तें ध्यान व्हावया सफळ : आजि हा प्राप्त काळ ॥ एवं मर्दूनि कुचयुगळ : दाविलें ऐसें ॥ ९४ ॥ निज कराब्जें करुन : जघनस्तनातें धरुन ॥ भोगारंभें तो गोपीजन : निजसुखार्ह केला ॥ ९५ ॥ आणि नर्मशब्दें करुन : केलें विनोदाचरण ॥ मधुर वचनें वदोन : निजप्रेमाप्लुत ठेला ॥ ९६ ॥ करादि इंद्रियें स्पर्शोन : दाविलें प्रसंन्न लक्षण ॥ त्याचेंचि साधन : दंतनखक्षतेंहिं केलें ॥ ९७ ॥ त्यांचिया मुखांस्तनातें : केलें जें दंतनखक्षतें ॥ तेणें तें कामिनीशतें : निजमुद्रांकित दाविलिं ॥ ९८ ॥ येणें जाणविलें त्यांसि : किं यावरि तुह्मी निजदासी ॥ आतां मजवीण तुह्मांसि : भोक्ता नाहिं ॥ ९९ ॥ जेवि कोण्हि भगवद्भक्त : शोभती चक्रशंखांकित ॥ तेवि दंतनखाग्रपात : नियतमुद्रा जाली ॥१२००॥ इराणि नर्मस्थानें सकळें : तेथेंहिं विनोदें स्पर्शिलें ॥ तेणेंहि त्यांसि जालें : कामोद्दीपन ॥ १ ॥ एवं बाहुप्रसारादि केलिं : तेणें स्वाधीनता सूचिलि ॥

आणि वचनें बोलिलिं : विनोदाकारें ॥ २ ॥ त्या विनोदार्थे गोपिकातें : निव-
विलें स्वभोगामृतें ॥ आणि वचनामृतें : अनुग्रहिलें कृष्णें ॥ ३ ॥ या विश्वा-
सासि साधन : शब्दचि असे प्रमाण ॥ कां जे वेदवाक्यें आश्वासन : मुमुक्षु
पावति ॥ ४ ॥येन्हविं कृष्णाप्रति : प्रत्यक्षादि प्रमाणें न सरति ॥ परि महा-
वाक्येंचि पावति : भगवंतिं भक्त ॥ ५ ॥ ह्मणोनि उपहास वचनें : वदोनि
गोपिंचिं मनें ॥ अपुला ठाइं श्रीकृष्णें : विश्वासिलिं पुर्ण ॥ ६ ॥ आणि
क्ष्वेलिशब्दें करुन : अङ्गक्रियाक्रीडन ॥ त्या गोपितें अनुसरोन : इतस्तता
वर्तने ( णें ) जें ॥ ७ ॥ असो नानारसकेली : जे गोपिकांसिं सम्पादिली ॥
सिंचोनि प्रेमाजाळें : खेळविल्या कृष्णें ॥ ८ ॥ आणि नेत्रकटाक्षपातें : अव-
लोकिलें जें त्यांतें ॥ तेणें भुलविलिं चित्तें : विसरल्या सर्वेहि ॥ ९ ॥ पुर्व-
प्रवाहें साधारण : जातिवर्णआश्रमगुण ॥ तें न स्मरोनि निरंजन : कृष्णाचि
आवडला ॥ १० ॥ आणि यथेष्टक्रीडामेळें : ललित हास्य जें केलें ॥ तेणें
सर्व धवळलें : गोपिमण्डळ तें ॥ ११ ॥ नातरि त्या हास्यवेळें : लावण्या-
सिही शोभविलें ॥ आधिंच सुनयन सावळें : मनोहर स्वरुप ॥ १२ ॥
त्याहीवरि केलें हास्यातें : तेणें मोहित सर्वचित्तें ॥ त्या गोपिकांचि शतें :
परमानन्दें श्रीकृष्णस्थें जालिं ॥ १३ ॥ नातरि कृष्णें हास्य केलें :
तेणें ऐसेंहिं जाणवलें ॥ जे निजमाया विलसलें : अवघेंहि विश्वजाळ॥ १४ ॥
त्यामाजि हाहि विलास : केवढा वोडवला क्रीडारस ॥ अभेदिं जो
भेदाभास : या उद्रेकासि मूळ ॥ १५ ॥ माझा ठाइं अर्थशुन्य : असोनि
भासलें शोभन ॥ या निमित्तें रमारमण : हसितमुख जालें ॥ १६ ॥
नातरि नित्यप्राप्ति आपुली : ते अप्राप्तित्वें भासलि ॥ त्या शोभेसीचि आणिली:
विशेषें शोभा किं ॥ १७ ॥ ह्मणोनि हें हसित योजलें : तें गोपींसि योग्य
जालें ॥ विशेषें मन रंगलें : निजानन्दा कृष्णाचा ठायिं ॥ १८ ॥ एवं बाहु-
प्रसारादि युक्ति : रंजउनि व्रजसती ॥ तयाचा जो काहिं रतिपती : कंदर्प
जो मदन किं ॥१९॥ तयाचें उत्तंभन : ह्मणिजे कामोद्दीपन ॥ करि (त) होता
रममाण : कामजनक जो ॥२०॥ वश करुनि कंदर्पातें : त्यापासुनि गोपिकांतें ॥



सोडउनि विश्रांतीतें : पाववितें श्रीकृष्णें ॥ २१ ॥ नातरि गोपीचा रतिपति : पाववया उपशांति ॥ नावेक उत्तंभावाची रीती : दाविली सहज येथें ॥२२॥ त्यासि पाववया पार : नावेक केला गोचर ॥ शेखिं स्वसामर्थ्यें असार : केलें मदनातें ॥२३॥ पाहातां वदनशोभा : लाजती कंदर्पसभा ॥ स्वरूपिं त्या निजत्र-लुभा : रमविल्या पैं ॥ २४ ॥ नातरि हें मिष करुन : मन्मथार्णवा पासुन ॥ उतरउनि गोपीजन : निजवश केला ॥ २५ ॥ नातरि तो नव्हे रतिपती : केवळ भक्तप्रेमामूर्ति ॥ प्रकटोनि त्या सति : कृपापात्र जाल्या ॥२६॥ अथवा उथळोनि प्रेमा : कृष्णिं मिळाल्या त्या रामा ॥ भाग्यें सांडिली सीमा : गोपि-कांच्या ॥ २७ ॥ विचारितां योग्यता : त्या गृहमेधीनी समस्ता ॥ स्वभावें कामरता : अंगना कामिनी ॥ २८ ॥ तो स्वता अमोघवीर्य : मैथुनकाळिं अश्रमधैर्य ॥ न टळोनि ब्रह्मचर्य : रमविल्या गोपी ॥ २९ ॥ होउनि त्यां अधीन : वारंवार करी मैथुन ॥ विलंबें पाववि स्वन : त्यांसि बहुरुपें भिन्नभिन्न ॥ ३० ॥ त्या असोनि भोगतत्परा : जेव्हां इच्छिती यदुवीरा ॥ तेव्हांचि उठोनि त्वरा : प्रतिदिनिं मैथुन करि ॥ ३१ ॥ ऐसा त्यांसि वश होत्साता : रंजविल्या त्या वनिता ॥ त्यांचे तों कर्म विचारितां :कामासक्ता सदां ॥३२॥ याहीमाजि व्रजवासिनी : अनधीता कामचारिणि ॥ जारभावें करुनि : आव-डला कृष्ण ॥३३॥ इतुकिये आवडीसाठिं : श्रीकृष्णिं पडली गांठि ॥ आचरतां साधन कोटि : ब्रह्मादिकां जो अलभ्य ॥ ३४ ॥ त्या श्रीकृष्णें आतमरता : गोपी त्याहुनि केल्या आप्ता ॥ परि नवल जालें आतां : तेंहिं आइका ॥३५॥

**एवं भगवतः कृष्णाल्लब्धमाना महात्मनः ॥**
**आत्मानं मेनिरे स्त्रीणां मानिन्योऽप्यधिकं भुवि ॥ ४७ ॥**

एवं याप्रकारें करुन : तो कृष्णासक्त गोपीगण ॥ गृहसुतादि सांडुन : शरण आला जो॥३६॥तो श्रीकृष्ण (ष्णें) बहुं संभोगुन : केला जो सन्मान ॥ तेणें आपणा लागुन : अतिधन्ये मानिलें ॥ ३७ ॥ कां जे आतां इये जनीं : स्त्रिया असती कोण्हि ॥ त्यांमाजि कृष्णकामिनी : आह्मि अतिधन्या ॥३८॥ अवो कोणीकडे हा स्त्रीगण : आह्मी अरण्यवासी जन ॥ कोणीकडे श्रीकृष्ण

मंगळमूर्ति ॥ ३९ ॥ जयाची गुणसीमा : नेणोनि ठेला ब्रह्मा ॥ हा अलौकिककर्मा : वैकुंठपति ॥ ४० ॥ त्यासि मान्य जालों आता : हे असंभावित वार्ता ॥ आमुच्या भाग्याची कथा : वर्णील कवण ॥ ४१ ॥ हा असोनि कामपूर्ण : आमुतें यथेच्छा संभोगुन ॥ पाहा हो केव्हेंं सन्मानुन : निवविलें किति ॥ ४२ ॥ आमुचे प्राकृत पति : ते मुर्ख नेणती हे युक्ति ॥ आपणांचि मैथुनगति : स्खळती तत्काळ ॥ ४३ ॥ मग ते विकळस्थिति : मृतप्राय पसरति ॥ आह्मीं कामविव्हळ असतां सती : ततचित्ता सदां ॥४४॥ त्या आह्मी ततचित्ता : शरण आलों यासि आतां ॥ बहु काळ गेला स्मरतां : पावलों सकळा येथें ॥ ४५ ॥ मग अंगीकारुनि कृष्णनाथें : भोगरचनायुक्तिपंथे ॥ मैथुनेंकरिं आमुतें : रमविलें सदां ॥ ४६ ॥ पहा याचें शौर्य : स्वता अमोघवीर्य ॥ मैथुनसमरिं अति धैर्य : कामशत्रु पराभव करितां ॥ ४७ ॥ आमुसि करितां मैथुन : स्वयें असोनि वीर्यसंपन्न ॥ विलंबें होतां स्खळण : सुख वाटे बहु ॥४८॥ जन्म शतार्जित पाप : स्मरोनि जालों निःसंकल्प ॥ सांसारिक संताप : सरोनि गेला तत्काळ ॥ ४९ ॥ योगी जे कोण्हि होति : ते दुष्करें तपें आचरती ॥ तया योगियांसहि गति : दुःसाध्याचि असे ॥५०॥ ऐसें तो सुंदरीगण : आपणामाजि आपण ॥ पावोनि संभोगसन्मान : धन्यता पावला जगीं ॥५१॥ मानिती जें या जगिं विशेषें : आह्मा ऐसें कोण्हि नसे ॥ धन्यतमा सुरतसौरसें : कोण पां आहे ॥ ५२ ॥ येथें शब्द जो स्त्रीवाचक : तो सर्वजनसूचक ॥ एवं मानित्या सर्वाधिक : आपणातें गोपिका ॥५३॥ आतां जया कृष्णापासुन : गोपी पावलिया सन्मान ॥ तो कृष्ण किंविशेषण : तरि महात्मा हरि ॥५४॥ ह्मणिजे जो विमुक्तचित्त : सर्वचित्तस्वभावरहित ॥ असो हे क्षुद्र भाव वर्तत : जेथें नसताति ॥ ५५ ॥ असो हा मनोभावजन्य : संसार जो अर्थशून्य ॥ हें मायाकल्पितजघन्य : जेथें स्पर्शलेहि नसे ॥ ५६ ॥ तो श्रीकृष्णविगताचित्त : प्रपंचधर्मविरहित ॥ त्यापासुनि गोपीजात : नित्य रमतां पावले सन्मान ॥ ५७ ॥ ह्मणाल प्रपंचधर्मवीन(ण) : कृष्ण जो असंगोदासीन ॥ त्यापासुनि सन्मान : पावल्या कैस्या गोपी ॥ ५८ ॥ त्या गोपि-



कांसि रमतां : कैसी पां हे असे असंगता ॥ ऐसें जरि येथें आतां : ह्मणाल काहिं ॥ ५९ ॥ तरि तो अचिंत्यशक्ति : षड्गुणैश्वर्यसम्पात्ति ॥ भगवंतशब्दें वर्णिति : वेद जयाचें महिमान सदां ॥ ६० ॥ तया भगवंताचा ठाईं : अशक्यता हे काइ ॥ याचा मायाविलास पाहि : ब्रम्हादिक नेणति ॥ ६१ ॥ स्वता असोनि निर्गुण : गुणमयी मायेतें अधिष्ठुन ॥ हें गुणविसित(?) भान : केव्हडें भासत असे ॥ ६२ ॥ तया गुणकार्याचा काहिं : येणेंसि सम्बन्ध नाहिं ॥ यालागिं कृष्णांचा ठायिं : विषमता नसे ॥ ६३ ॥ येणें काहिं साध्य सम्पात्ति : न साधिली जविन्मुक्ति ॥ हा सच्चिदानन्दमूर्ति : अकर्मनिबंधन ॥ ६४ ॥ इतर जे कोण्हि ज्ञानी : ते जविदशेतें भोगुनि ॥ गुरुशास्त्रोक्त-विधी करुनि : वैराग्यादि द्वारेंकरिं ॥ ६५ ॥ ते अविद्येपासुनि मुक्त : होति जन्मादिअतीत ॥ परि त्यांचा ठाईं हें अघटित : कृष्णा ऐसिं कृत्यें ॥ ६६ ॥ देह रक्षुनि कर्म जें अधीक : तें त्यांसि असे बाधक ॥ आणि हा गोपीकामपुरक ॥ तैसा नव्हे ॥ ६७ ॥ सर्वांतें येकला भोगितां : स्वयें जे किं अच्युतरेता ॥ त्या एकसरें होती वीर्यच्युता : अति मैथुनेंकरिं ॥६८॥ ऐसिं अचिंत्य कृत्यें करितां : आयास नलगे भगवंता ॥ त्या कृष्णें गोपी मानिता : विस्मय काये येथें ॥ ६९ ॥ ह्मणसी त्या गोपवनिता : चातु-र्यलावण्यरहिता ॥ अयोग्या जारकर्मरता : मानिलिया कृष्णें ॥ ७० ॥ हें त्यांसि अतिश्लाघ्य जालें : नीचासि धन्यत्व गमलें ॥ जें आम्हासि मानिलें : श्रीकृष्णें या जगिं ॥ ७१ ॥ ऐसें तिहिं जें मानिलें : तेणें नीचत्व प्रगटलें ॥ त्या विनोदातें नाहिं जाणितलें : मानाभिमानें ॥ ७२ ॥ ऐसें ह्मणसी राया कांहिं : तरि या व्यवहाराचा ठाईं ॥ असोनि आपुले गृहिं : गृहामेधी जे किं ॥ ७३ उचित वित्ताची पर्याप्ति : तेचि त्यांचि संपत्ति ॥ तितुकेनिच ते असति : अति श्लाघ्य लोकं ॥ ७४ ॥ यास्तव त्या गोपगृहिणी : निजसंपत्तीकरुनि ॥ होत्या सदा बहु मानिनी : स्वजातिसंपूज्या ॥ ७५ ॥ असो भर्तारादिक त्यांतें : अतिशयें मानित होते ॥ आणि व्रजवा सींही नित्ये : अलंकृत होते ॥ ७६ ॥ परंतु त्या कृष्णकामिनी : त्या बहु

मानातें सांडुनि ॥ कामार्ता कृष्णचरणीं : रंकप्राय सकळा ॥ ७७ ॥ स्वगृहिं संपत्तिवंता : होत्या जहिं साळंकृता ॥ तथापि तें सर्व वृथा : जाणितिलें तत्काळ ॥ ७८ ॥ सांडुनि सर्व संपत्तीतें : धिक्कारुनि सौंदर्यातें ॥ देखतांचि कृष्णातें : अतिदीना जाल्या ॥ ७८ ॥ मग स्वशरणकृपाघन : संभोगितां देखोनि प्रसन्न ॥ नाना युक्ति समाधान : सन्मान तोचि ॥ ८० ॥ बिनटलें कृष्णपाइं : आतां या लोकत्रयिं ॥ आह्माऐसें कोण्हिच नाहिं : कृष्णमान्या आह्मी ॥ ८१ ॥ जेवि भणगासि मिळे सदन : किं राज्यातें पावे दीन ॥ तेवि कृष्ण होतां प्रसन्न : गोपींसि जालें ॥ ८२ ॥ असो या कृष्णसंगाचा ठाइं : दृष्टांतचि नसे काहिं ॥ सर्व काळग्रस्त ते काइं : उपमेसि योग्य ॥८३॥ पावोनि कृष्णसंगातें : मान्यता जाली गोपीतें ॥ तें न साहोनि कृष्णातें: विषमताचि पावलें ॥ ८४ ॥ स्वप्राप्तीसि अभिमान : तोचि येथें सदूषण ॥ हें जाणोनि श्रीकृष्ण : कारिता जाला तें आइका ॥ ८५ ॥

**तासां तत्सौभगमदं वीक्ष्यमानं च केशवः**
**प्रशमाय प्रसादाय तत्रैवांतरधीयत ॥ ४८ ॥**

त्या उक्तलक्षणा वनिता : कृष्णें केल्या आप्ता ॥ ज्या अतिशयें भाग्यवंता : शोभनशीळा ॥ ८६ ॥ कृष्णें यथेच्छ रमविलें : तेंचि त्यांसि भाग्य जालें ॥ नावेक घडोनि आलें : सदस्वानिं तें ॥ ८७ ॥ साधनचतुष्टयसम्पन्न : जेवि मुमुक्षुजन ॥ पावोनि गुरुसंन्निधान : श्रवणमननद्वारें जें ॥८८॥ असंभावनेचें निवृत्ति : जाली आत्मप्रतिपत्ति ॥ परि आभासें पूर्ववृत्ति : उपशमली नाहिं ॥ ८९ ॥ तेथें जाली जे ब्रम्हात्मप्राप्ति : तेचि अहंकारउन्नति ॥ मग अविद्यानिवृत्ति ॥ नव्होचि सर्वथा ॥ ९० ॥ तेंचि जालें मानास्पद : वोडवला ज्ञानमद ॥ निरसला होता भेद : तो प्रगटला फिरोन तेणें ॥ ९१ ॥ परि पूर्वाराधनेंकरुन : भगवंत जो केला प्रसन्न ॥ तो स्वभक्तांचें विघ्न : निवारीताचि असे ॥ ९२ ॥ तैसेंचि जालें येथें : संभोगाचे प्रीतिनिमित्तें ॥ त्या गोपी श्रीकृष्णातें : आवडलिया अत्यंत ॥ ९३ ॥ ह्मणौनि कृष्णापासुन : त्या पावलिया सन्मान ॥ संभोगिं वश जाणोन : मद जाला

गोपीतें ॥ ९४ ॥ श्रीकृष्णाचा महिमा : नेणोनि त्या असाध्यकर्मा ॥ आपण जालों तृप्तकामा : हें मानलें त्यांतें ॥ ९५ ॥ असो आह्मासि हा वश जाला : या बुद्धिनें दंभ आला ॥ कृष्ण नाहिं जाणातिला : पुरता तिहिं ॥ ९६ ॥ हा वश होउनि आमुतें : मान्ये करुनि वचनातें ॥ संभोगितां युक्तिपंथे : रमवितो सर्वदां ॥ ८७ परि या कृष्णाचा ठाईं : आह्मासि हा पाडु काइ ॥ हें नेणोनि तिहिं : मानिलें महत्वातें ॥ ९८ ॥ अहो श्रीकृष्ण सर्वांतस्थ : त्यासि नसे आप्त अनाप्त ॥ जैसे चित्रकारलिखित : यति आणि गृहस्थ ॥ ९९ ॥ परि त्या व्रजसुंदरी : नेणोनि सौभाग्यमानेंकरिं ॥ पडलिया मदसागरिं : अति गर्वसंभ्रमें ॥ १३०० ॥ मग त्या सौभगमानातें : पावोनि जाला मद त्यांतें ॥ हें जाणोनि गोपीनाथें : विचारिलें ऐसें ॥ १ ॥ असो शास्त्रें आणि वेदें : गाइलें केशव या पदें ॥ तारक येणें अनुवादें : ब्रह्मयांचें अभिधान ॥ २ ॥ आणि ईश शब्दें करुन : शंकर जो त्रिनयन ॥ हे वश ह्मणिजे अधीन : कृष्णाचिया दोघ ॥ ३ ॥ ह्मणोनि केशव हे ख्याति : तो नंदानंदन गोपी-पति : हा स्ववश ऐसें मानिती : गोपीका त्या ॥ ४ ॥ तो केशव नामें श्रीकृष्ण : त्यांचिया मदातें जाणोन ॥ गुप्त जाला आपण : तेथेंचि असतां किं ॥५॥ अंतस्थाचि दुरि गेला : ऐसें भासलें गोपिकांला ॥ जेविं मुक्त मानी अंत-रला : स्वबोधातें ॥ ६॥ नाना गुप्त ना प्रकट काहिं : कृष्णासि होणेंचि नाहिं : परि गर्व करिते ठाईं ॥ देखिजेचि ना ॥ ७ ॥ ह्मणाल सर्वहि सांडुन : त्या आल्या शरण होउन ॥ तरि कृष्ण त्याचें विघ्न : नाशिना कां ॥ ८ ॥ ऐसें ह्मणाल आतां : तरि तो श्रीकृष्ण विघ्नहर्ता ॥ निजशरणातें सर्वथा : उपेक्षीना भक्तातें ॥ ९ ॥ प्रेमोत्सौक्यें करुन : जाला जरि अभिमान ॥ तथापि जे कृष्णपरायण : तेथें अभिमान न राहे ॥१०॥ मन असतां कृष्ण-पाईं : आह्मासि कर्तव्य नसे काहिं ॥ ऐसा जरि या देहिं : होईल अभिमान ॥ ११ ॥ तरि श्रीकृष्णिं जे शरण : तें सर्वदा कृष्णपरायण ॥ नव्हती विषयां अधीन : न पावती पतन ॥ १२ ॥ असो त्या व्रजवासिनीं : नित्यसम्भोगें सुखावोनि ॥ निजधन्यता मानोनि : पावल्या गर्व ॥ १३ ॥ परि

श्रीकृष्ण गर्वहर्ता : सकाम आराधिला होता ॥ तथापि त्यांची अहंता : नाशातें पाववील ॥ १४ ॥ असो तो गोपीरमण : प्रस्तुत यशोदानन्दन ॥ करावया मदहरण : त्या गोपिकांचें ॥ १५ ॥ असतां विलोपशुन्य : त्यांचि चित्तें चोरुन ॥ पावला अन्तर्धान : प्रकटउनि माया ॥ १६ ॥ असो आकर्षोनि गोपीचित्तें : अधिष्ठुनि मायेते ॥ पावला अन्तर्धानातें : दिसेना कृष्ण ॥१७॥ अन्तर्धानाचें करुनि मिष : त्यांचा गर्व हारिला निःशेष ॥ आपुला प्रेमाचि विशेष : प्रेरिला त्यांतें ॥१८॥ एवं हे हरिगुणकीर्ति : अतिपवित्र कथा भागवती ॥ राया परीक्षिती प्रति : मुनि बादरायणी शुक ॥१९॥ कीर्तन करित कारितां : येथवरि आली कथा ॥ संपला हाचि आतां : एकोनत्रिंशतितमोध्याय : ॥२०॥ तेणें श्रीकृष्णें नंदसुतें : अनुसरोनि रासक्रीडेतें ॥ प्रवेशोनि वृंदावनातें : मुरलीवादन जें केलें ॥ २१ ॥ तया मधुरस्वरें करिं : मोहउनि त्या व्रजसुंदरि ॥ गृहाशा सांडउनि दुरिः निज सान्निध्या आणुनि ॥२२॥ वश होउनि तियांतें : नाशिलें वियोगज्या(जा)तापातें ॥ निजनयनकटाक्षपातें : हास्यादिकें उत्साह केला अत्यंत ॥ २३ ॥ पारि तया उत्साहवशें : झळंबिलें मानगर्वलेशें ॥ तत्पारिहारार्थ र[illegible]: रचुनि अंतर्धानाची हे युक्ति ॥२४॥ नावेक अप्रकट होउनि : निज वियोग भासउनी ॥ तन्निमित्तेंचि त्या भामिनी : निजव्यसनशीळा केल्या॥२५॥ ऐसी शुकोक्त कथा जे काहिं : संपली इयेचि अध्याइं ॥ तेचिं यथामति मियांहिं : वर्णिली हे महाराष्ट्र ॥ २६ ॥ नातरि होंचि करुनि मिष : हारिलें वाचेचें कल्मष ॥ पवित्र केलें निजमानस : कृष्णगुणगंगाजळिं ॥ २७ ॥ यावरि त्या गोपवनिता : श्रीकृष्णदर्शनिं अति आर्ता ॥ देहगेहादि भावरहिता : त्या यमुनातीरिं बैसल्या ज्या ॥ २८ ॥ मग कृष्णगवेशणातें : विचारुनि सर्वांहि येकचित्तें ॥ उठल्या जाल्या वनवनांत्तरातें : शोधावया गोपी ॥२९॥ ऐसी हे हरिकीर्ति : उत्तम कथा जे भागवति ॥ राया परीक्षितीप्रति : निवेदिजेल शुकें जें ॥ ३० ॥ ते म्याहि निजमतीकरुन : कृष्णगुणाचें कीर्तन ॥ नित्यानंदिं ठेउनि मन : वर्णिजेल ते आइका ॥ ३१ ॥ पारि नित्यानंदें समर्थें : कृपा करावीं मातें ॥ वर्णितां हरिगुणातें : असावें म्या निर्विघ्न ॥ ३२

वार्णितां भगवतत्कीर्ति : अवतरावी रसवृत्ती ॥ चित्त जडावें भगवंतीं : अंत-रायरहित जें ॥३३॥ वाचा न पावावी सिन (शीण) : मन असावें प्रेमसंपन्न ॥ न यावा अभिमान : नसावी महंती मजला ॥ ३४ ॥ आणि कटिस्थहस्ताकृतिः जे मनोहर मुर्ती ॥ विठ्ठलवेषवती : असावी मनि माझया सदा ॥ ३५ ॥ एवं गुरुपदिं प्रार्थुन ॥ करीतसें गुणवर्णन ॥ कृपा करूत सज्जन : निरसाविं सर्व विघ्ने ॥ ३६ ॥ कारितां हरिगुणवर्णन : असावें म्यां सदा कल्याण ॥ नित्यानंदिं मन : असो माझें ॥ १३३७ ॥ इतिश्रीभागवते महापुराणे दशमस्कंधे रासक्रीडावर्णनं नामैकोनत्रिंशतितमोध्याय: ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु

ॐ

श्रीमद्भागवतांतर्गत

# रासपंचाध्यायी.

## अध्याय २.

श्रीगणेशाय नमः॥ श्रीमच्चिदानन्दाय नमः॥ श्रीविठ्ठलादिगुरवे नमः॥ आतां रासरंगविहारि : यशोदानन्दन हरि ॥ जो नित्य आनन्दकारी : शरणागतवत्सळ ॥ १ ॥ वानावी तयाची गुणकीर्ति : अखंड स्मरावें चित्तीं ॥ कटीतें धरुनि हास्तिं : भक्तिमीमातीरस्थ जो ॥ २ ॥ त्याचा गुणकीर्तनिं : प्रवर्तली माझी वाणी ॥ ते नित्यानन्दावसानिं : असोनि सर्वदा ॥ ३ ॥ करिजेल तद्गुणकीर्तन : ते अवधारुत सज्जन ॥ श्रीकृष्ण क्रीडापरायण : रासारंभिं असतां ॥ ४ ॥ गाउनियां मधुर गीत : स्वनिकट गोपीजात ॥ आणोनि त्यांसमवेत : क्रीडत होत्साता ॥ ५ ॥ असो संभोगसमइं : त्यांचिया चित्तानुरुप जें काहिं ॥ वर्ततां अकस्मात् पाहिं : अहंकार जाला ॥ ६ ॥ अहो गोपिकांचा अन्तरिं : आली जे प्रेमलहरी ॥ प्रेमोद्रेकें सुन्दरी : आर्द्रता पावल्या ॥ ७ ॥ असो आप्त केलें रमानाथें : विसरलिया विरहातें ॥ त्या सुखें नावेक त्यांतें : गर्व आला ॥ ८ ॥ कृष्णप्रीतीचा निष्कर्ष : तो किंचित् जाला दुरास ॥ संगमात्रोंचें तो रस : आकारासि आला ॥ ९ ॥ रसचि होउनि आपण : चढला त्यांतें अभिमान ॥ परि कृष्णेंसिं संगाराधन : तें वृथा नव्हे ॥ १० ॥ अन्तरिं जाला अभिमान : तेथेंचि राहावें आपण ॥ या हेतु केलें अन्तर्धान : सर्वांतस्थें कृष्णें ॥ ११ ॥ तत्काळ त्या वनिता : असोनि गर्वरहिता ॥ स्मरत्या जाल्या नन्दसुता : दीनाचे परिं तेथें ॥ १२ ॥ ऐसें स्मरोनि गतकथेतें : पुढेंहिं जें वर्णिजेतें ॥ त्यांत या अध्यायिं रायातें : सांगिजेतें ऐसें ॥ १३ ॥ न देखोनि नन्दकुमारा : त्या गोपी विरहकातरा ॥ असोनि गवेषणपरा : उन्मत्ताचे परिं ॥ १४ ॥ असो देहभावातें विसरोन : इच्छोनि कृष्णगवेषण ॥ भ्रमती इतस्तता वन : गोपिका त्या ॥ १५ ॥ नाना पडोनि गर्वबुंथि ॥ तेथेंचि लोपली ते मूर्ति ॥ नेणती काहिंच त्या सती - तत्वार्थातें ॥ १६ ॥ तेणें अन्तरला श्रीकान्त : दैवें जाला जो प्राप्त ॥ परि संस्कारें मागुतें चित्त :

विषयावरि न येचि ॥ १७ ॥ ह्मणोनि त्या गोपनारी : कृष्णें धरुनि अंतरिं ॥ असोनि विरहकातरी : शोधीं प्रवर्तलिया ॥ १८ ॥ तेंचि काहिं प्रस्तुत : या अध्याइं व्याससूत : त्या गोपिकांचे आचरित ॥ रायाप्रति निवेदिति ॥ १९ ॥

**श्री शुक उवाच.**

**अन्तर्हिते भगवति सहसैव व्रजांगनाः ॥**
**अतप्यंस्तमचक्षाणाः करिण्य इव यूथपम् ॥ १ ॥**

भागवत् शब्दें करुन ॥ षड्गुणैश्वर्यसंपन्न ॥ श्रीकृष्ण वैकुंठरमण ॥ वृंदावनविहारी ॥ २० ॥ तो पूर्वोक्ति लक्षणें करुन : पावला असतां अंतर्धान ॥ ह्मणिजे त्यांचिं चित्तें चोरुन ॥ गुप्त जाला अकस्मात् ॥ २१ ॥ म्हणौनि त्या व्रजांगना : शोधोनि सर्वाही वना ॥ होत्या जाल्या तप्तमना : न देखोनि कृष्णातें ॥ २२ ॥ असो अकस्मात् पाहिलें : तवं कृष्णातें न देखिलें ॥ किंचित् मन गर्वित जालें : तेणें भ्रमल्या होत्या ॥ २३ ॥ नाना त्यांसि भाव होता : जें जवळीचि आहे स्वभोक्ता ॥ पारि गर्वेंच गुप्त होतां : न विचारिलें तिहिं ॥ २४ ॥ परंतु गर्वाही माझारि : संस्कार होता अंतरिं ॥ त्या संस्कारास्तव सुंदरी : पाहात्या जालिया ॥ २५ ॥ तवं न देखोनि निजभर्ता : असत्या जाल्या संतप्ता ॥ भ्रमत होंत्साऱ्या इतस्तता : धुंडित्या जाल्या ॥ २६ ॥ जेवि कोण्ही योगी जन : ज्ञानोद्रेकामाजि मग्न ॥ असोनि स्वरुपनिष्ठे पासुन : ऐलाड येति ॥ २७ ॥ पारि आपण पूर्ण ज्ञानी : हें वाहत होतें मनिं ॥ मग विचारावारि येउनि : पाहिलें जवं ॥२८॥ तवं दुऱ्हावली स्वनिष्ठा : म्हणती नाडलों कटाकटा ॥ व्यर्थ शास्त्रीय खटपटा : गेल्या वायां ॥ २९ ॥ मग शास्त्रसंस्कारबळें : आपणाचि सावध जाले ॥ निदिध्यासनिं प्रवर्तले : विक्षेपनाशार्थ ॥ ३० ॥ तेवि त्या गोपवनिता : कृष्णवियोगतप्तचित्ता ॥ गवेषण कारित असतां : स्वभोक्त्या कृष्णांचें ॥ ३१ ॥ जेवि कोण्हि त्या हस्तिनी : निजयतिसंगें असोनि ॥ विचरत असतां वनिं : यथा सुखेंकारिं ॥३२॥ तवं अकस्मात दैवगती : चुकोनि जाय त्यांचा पति ॥ निजस्वामीतें धुंडिती : त्या गजिनी जैशा ॥ ३३ ॥ तेवि त्या व्रजवनिता : असोनि विरहतप्ता ॥ न देखोनि निजभर्त्ता : भ्रमत्या जालिया ॥ ३४ ॥ हस्ति-

नी उपमा येथें : सूचिलें अति विरहातें ॥ निजकांतें वीण त्यांतें : त्रैलोक्य शुन्य जालें ॥ ३५ ॥ स्वप्राणाहूनि अधिक : आवडला कृष्ण येक ॥ त्यावांचूनि आणिक : तृणप्राय मानिलें ॥ ३६ ॥ मग स्वस्थ करूनि मन : आरंभिलें कृष्णचिंतन ॥ त्या चिंतनाचें लक्षण : आइक राया ॥ ३७ ॥

गत्यानुरागस्मितविभ्रमेक्षितै-
र्मनोरमालापविहारविभ्रमैः॥
आक्षिप्तचित्ताः प्रमदा रमापते-
स्तास्ता विचेष्टा जगृहुस्तदात्मिकाः ॥ २ ॥

नंदानंदन श्रीकृष्ण : जगत्पति रमारमण ॥ जो वैकुंठीचें भूषण : विश्रांतिप्रापक ॥३८॥ तयाचि चालती गति : पदोपदिं विश्रांतिदाति ॥ नाना शोभा उमटति : चालते वेळे ॥३९॥ स्मरोनि त्या पदगतीतें : त्या प्रमदांचिं चित्तें ॥ क्षोभलिं जेवि देहतप्त तें : कृष्णस्थ जालिं ॥ ४० ॥ असो कृष्णविरहतप्ता : त्या होत्या प्रेमप्लुता ॥ तवं स्मरला अवचिता : पदप्रचार कृष्णाचा ॥४१॥ मग क्षोभलेंनि चित्तें : आठविलें अनुरागातें ॥ आणि त्या स्मितातें स्मरलें तिहिं ॥ ४२ ॥ असो अनुराग हे ख्याति : त्या गोपिकांप्रति : श्रीकृष्णें केलि जे प्रीति : प्रेमाचिया भुलि ॥ ४३ ॥ आणि स्मित शब्दें करुन : त्यां गोपीं तें उद्देशुन ॥ किंचित् हास्यवदन : असतां जाला जो ॥ ४४ ॥ स्मरोनि प्रीति हास्यातें : त्यांचि जालिं क्षुभितें चित्तें ॥ तेणें विशेषें त्यांतें : आठवला श्रीकृष्ण ॥ ४५ ॥ आणि तो कमळलोचन : विलासविभ्रमें करुन ॥ करितां अवलोकन : त्या प्रमदांप्रति ॥ ४६ ॥ तें जें विलासें ईक्षणें : केलि जे रमारमणें ॥ तेणें गोपिकांचि मनें : स्मरत होंत्सातिं जें ॥ ४७ ॥ त्या कृष्णपर अंगना : जालिया विक्षिप्तमना ॥ सांडुनि देहभावना : विरहतप्ता ज्या ॥ ४८ ॥ तैसिंच मनासि रंजकें : कृष्णाचि मधुर वाक्यें ॥ कृष्णकामउद्बोधकें : अ (आ?)नेच्छारहित ॥ ४९ ॥ किंवा मनोहरें गीतें : आठवलि गोपिकांतें ॥ तणें चित्तें होउनि विक्षिप्तें ॥ उतावीळें जालिं ॥ ५० ॥ तैसेचि त्यांतें मनोहर : आठवले कृष्णविहार ॥ असोनि गोपी-

तत्पर : क्रीडा ज्या केल्या ॥ ९१ ॥ तयांतेंहिं कृष्णकांता : स्मरोनें जाल्या क्षुभिता ॥ आणिकही इतस्तता : केले जे विलास ॥ ९२ ॥ त्याही कृष्णाविलासातें : स्मरोनि प्रमदाशतें ॥ खिन्न होत्सातिं चित्तें : विकळें हिं जालिं ॥ ९३ ॥ एवं त्या कृष्णकामिनी : प्रमदा रतिविलासिनी ॥ गमनादिकें करुनि : खिन्न होंत्सात्या ॥ ९४ ॥ त्या कृष्णाच्या विलासें : खोंचिलिं त्यांचि मानसें ॥ मग विलाससौरसें : तन्मय जाल्या ॥ ९५ ॥ त्या स्मरल्या ज्या कर्मातें : त्याचि अनुकारातें ॥ आपणहिं त्या कृत्यातें : तैसेचि करिती ॥९६॥ असो गोपीत्व स्फुरत होतें : तें स्मरतां तद्विहारातें : कृष्णमय होउनि चित्तें ॥ ते विलास स्फुरले ॥ ९७ ॥ तें जें त्याचें विहरण : उत्तरश्लोकें करुन ॥ आइक राया सावधान : निवेदिजेतें तेंहिं ॥ ९८ ॥

**गतिस्मितप्रेक्षणभाषणादिषु**
**प्रियाः प्रियस्य प्रतिरूढमूर्तयः ॥**
**असावहं त्वित्यबलास्तदात्मिका**
**न्यवेदिषुः कृष्णविहारविभ्रमाः ॥ ३ ॥**

सर्वे प्रियां अत्राधिभूत : अतिप्रिय जो मूर्तिमंत ॥ तोचि हा यशोदासुत : गोपिंचे प्रिय किं ॥ ५९ ॥ त्या कृष्णाची चालती गति : आणि स्मितमुखाकृति ॥ प्रेक्षणशब्दख्याति : अवलोकन जें ॥ ६० ॥ अधिष्ठुनि विलासातें : पाहाणें कटाक्षपातें ॥ आणि भाषणें जे यथोक्तें : मधुरवचनें जें ॥ ६१ ॥ एवं विलास हें रमण : गतिभाषणादि गुण ॥ ज्या कृष्णगुणाचें कीर्तन : पुर्वश्लोकिं केलें ॥ ६२ ॥ स्मरोनि गत्यादिकांतें : कृष्णात्मिकें जालिं चित्तें ॥ यालागिं बोलिलें सातें : प्रतिरूढमूर्ति ॥ ६३ ॥ असो त्या गोपिकासती : अतिशयें पुण्यमूर्ती ॥ सविग्रहा भगवंतिं : जडलिया राया ॥ ६४ ॥ म्हणोनि त्या सर्वाहि : त्या कृष्णचरिताचां ठाईं ॥ आविष्ट जालिया काहिं : न स्फुरे आन ॥ ६५ ॥ याचि लागि त्या रामा : कृष्णविहारविभ्रमा ॥ श्रीकृष्णा प्रियोत्तमा : अत्यंत ज्या प्रिया ॥ ६६ ॥ त्या अबळा समस्ता : श्रीकृष्णिं आविष्टचित्ता ॥ कृष्णविहाराविभ्रमिता : नेणती काहिं ॥ ६७ ॥

विसरोनि जीवाहंतेतें : कृष्ण अहं हें स्फुरलें त्यांतें ।। असो कृष्ण ब्रह्म ऐशातें : पुराणें गाति ।। ६८ ।। हे प्राकृत अहंकृति : तें कृष्णिं केली समाप्ति ।। त्यांसि जाली स्फुर्ति : जें अहं कृष्ण ऐसी ।। ६९ ।। जेवि माहांवाक्यें ब्रह्माहं स्मृति : योगी पावती तन्मय गति ।। तेवि त्या कृष्णोहमिति : निवेदिति अबळा ।। ७० ।। कृष्णें व्यापिली चित्तवृत्ति : तेथें जाली अहंस्फुर्ति ।। परस्परें ते आपुलालां प्रति : निवेदित्या जाल्या ।। ७१ ।। एवं त्या अबलांगना : कृष्णध्यानपरायणा ।। कामाच्याही भावना : आराधित्या जाल्या कृष्णातें ।। ७२ ।। त्या आराधनसामर्थ्यें : पावालिया कृष्णातें ।। जेवि तत्त्वं पदार्थैक्यत्वातें : पावताति योगी ।। ७३ ।। ते आपुलालि अनुभूति : परस्परें निवेदिति ।। तेवि त्या कृष्णपरा सती : निवेदिती वृत्त ।। ७४ ।। अहं कृष्ण अहं कृष्ण : ऐसें करिती निवेदन ।। कृष्णविहारातें स्मरोन : तदात्मिका जाल्या ।।७५।। परि देहाश्रयनिमित्तें : स्मरोनि अनुभूतार्थातें ।। आलें जें प्रेमभरितें : तें नावरे राया ।। ७६ ।। दृढ संस्कारें करुन : तें सुंदर रूप रमण ।। कमळनयन सुवदन : आवडले पाहावयातें ।।७७।। असो जर्‍हि कृष्णहृदिस्थ : सदा अनुभवप्राप्त ।। तर्‍हि तत्साधनाचें द्वारभूत : मनोरमण मूर्ति हे ।।७८।। तें रूप स्वजनरंजन : भक्तांचें विश्रांतिस्थान ।। सर्व तापोपशमन : शरणागतसुखकर ।। ७९ ।। ऐशातें पाहों म्हणोन : उतावेिळ गोपीगण ।। तृषार्त त्यांचे जाले नयन : अठवोनि कृष्ण ।। ८० ।। मग त्या अबळा सुंदरा : कृष्णगुणवर्णनपरा ।। असोनि विरहकातरा : शोधिती वन ।। ८१ ।। असो जे मुमुक्षुजन : एकांता आणावया मन ।। आठवितां रूप सगुण : घनश्याममूर्ति ।। ८२ ।। तेणें मन येतां येकांता : लाहोनि तत्प्रसंनता ।। साक्षात् श्रीभगवंता : पावती ते योगी ।। ८३ ।। तर्‍हि त्यांची चित्तवृत्ति : सगुणिंच धरी प्रीति ।। यावत् उपाधि निवृत्ति : सेविती तेंचि रूप ।। ८४ ।। ऐसें ते न कारिते : तरि उपाधिरोषनिमित्तें ।। देहिंच भान राहतें : अभिमान असतां कीं ।। ८५ ।। मग देहाभिमानमूळ : सुखे न क्रमता काळ ।। तरि प्राप्त कैंचें पुष्कळ : जीवन्मुक्तिसुख ।।८६।।

तेवि त्या गोपसुंदरा : स्वता जाल्या कृष्णाकारा ।। तर्‍हि असोनि तत्परा : चिंतितो(ती ?)कृष्णातें ।। ८७ ।। त्या भजनाचें लक्षण : उत्तर ग्रंथेंकरुन ।। रायातें व्यासनंदन : सांगतिजे ऐसें ।। ८८ ।।

> गायंत्य उच्चैरमुमेव संगता
> विचिक्युरुन्मत्तकवद्वनाद्वनम् ।
> पप्रच्छुराकाशवदंतरं बहि
> र्भूतेषु संतं पुरुषं वनस्पतीन् ।। ४ ।।

राया त्या व्रजवनिता : सर्वाहि असोनि संगता ।। श्रीकृष्णविरहाकाळिता : कृष्णातें पाहात असतां ।। ८९ ।। अति उच्चस्वरें करुनि : गात गात त्या कामिनी ।। श्रीकृष्णगुणवर्णनि : प्रवर्तलिया तेथें ।। ९० ।। असो श्रीकृष्ण-गुणकीर्ति : वर्णित होंत्साल्या गाती ।। वनामाजि शोधित सती : श्रीकृष्णातें ।। ९१ ।। एका वनतें अधिष्ठुन : विचारितां न भेटे कृष्ण ।। दुसरें वन प्रवेशोन : पाहाती सर्वत्र ।। ९२ ।। सहज कृष्णाकलिता : नेणती देहादि व्यवस्था ।। आतां तों तद्विरहें भ्रांता : उन्मत्ताचे परि ।। ९३ ।। आतां उन्मत्ता कोणेपरिं : लक्षिल्या त्या सुंदरी ।। त्यांचें एक नवल तरि : आइकावें राजया ।। ९४ ।। प्रवेशतां वना वना प्रति : तेथें भेटती वन्पति (वनस्पति) ।। म्हणिजे मार्गिचे तरुजाति : वृक्ष जे वनिं ।। ९५ ।। देखोनि त्या वनस्पतितें : जाउनि पुसती कृष्ण तेथें ।। तो कृष्ण कोण हो येथें : पुसाल ऐसें ।। ९६ ।। म्हणाल आम्ही मूढ जन : नित्यानित्यविचारहीन ।। श्रीकृष्ण कीलक्षण : नेणों कैंचा ।।९७।। हें जरि गमेल तुम्हासि : तरि कृष्ण काये एकदेशी ।। तो सर्वांतर्निवासि : गगनाचे परि ।। ९८ ।। आकाश जैसें पांहि: सर्व मूर्ति अंतर्बहि ।। तेवि तो सनातन पुरुष काइ : नवा आला ।। ९९ ।। सर्वांतें तो निकट : परि तन्मायेचें हें संकट ।। तेणेंसि नसों विकट : आमुची जीवनकळा ।। १०० ।। एवं पुरुष जो पुरातन : सर्वा मूर्ति सम जीवन ।। प्रस्तुत नंदानंदन : सर्वांतर्बहिःकृष्ण ।। १ ।।त्या सर्वात्मया कृष्णातें : उद्देशूनि पुसती त्यातें ।। निजकांतवेधें गोपींतें : न स्फुरे वृक्षत्व ।। २ ।। अंतरिं वस्तु

जें कांहिं : तें स्फुरलें सर्वां ठाइं ॥ पारि या विलासविग्रहिं : जडले किं चित्त ॥ ३ ॥ त्या कृष्णरत चितें : कंजनयन पुरुषातें ॥ उद्देशूनि पुसती वृक्षांतें : जें देखिला कृष्ण तुह्मी ॥ ४ ॥ किंवा तत्साक्षात्कार जाला : तेणें तो गर्व हरला ॥ परि कृष्णवेध उरला : ह्मणोनि पुसती ॥ ५ ॥ तवं ते जडत्व न बोलति : मग नेतिपंथें मागुति ॥ त्या शोधिती कृष्णमूर्ति : तद्वेधेंकरिं ॥६॥ परी त्या शोधनाचे मिशें : शोधिती निजमानसें ॥ उपाधीचेनि वशें : अंतरला कृष्ण ॥७॥ असो त्या कृष्णकामा सती : इतस्तता निजपति ॥ पात्रावया पुसती : व्यक्तिमात्रातें ॥८॥ तो भूतामाजि समान : पारि मायाकृत हें भान ॥ यास्तव तो वनिताजन : पुसतसे सर्वांसि ॥ ९ ॥ त्यांचें पुसतें लक्षण : व्यक्तिविशेषें करुन आइक राया सावधान : निवेदिजेतें तेहिं ॥ १० ॥

**दृष्टो वः कच्चिदश्वत्थ प्लक्ष न्यग्रोध नो मन : ॥**
**नंदसूनुर्गतो हृत्वा प्रेमहासावलोकनै : ॥ ५ ॥**

पूर्वोक्ता ज्या व्रजकांता : त्या वनामाजि भ्रमतां ॥ भेटला त्यांतें अवचिता : अश्वत्थ जो पिंपळ ॥ ११ ॥ तया पिंपळातें म्हणती : अगा ये अश्वस्था (त्था) वनस्पती ॥ हरुनि गेला चित्तवृत्ति : नंदकुमार आमुची ॥१२॥ येणें मार्गें पाहिं : गेला तो देखिला काइ ॥ लागतों गा तुझे पाईं : सांगे कृष्णाची शुद्धि ॥ १३ ॥ म्हणसी जे चित्तवृत्ति : हरिली तेणें कोणे रीति ॥ तारि तो प्रेमळांचा पति : शरणागतवत्सळ ॥ १४ ॥ आपुलिया महिमानातें : नावेक ठेउनि परतें ॥ वश जाला आमुतें : आमुचिये कणवा ॥१५॥ क्रीडेतें अनुसरोन : सर्वदा रममान(ण) ॥ प्रेमहास्यावलोकन : जें काहिं केलें ॥१६॥ हरावया आमुचिं चित्तें : दाविलें प्रेमाधिक्यातें ॥ त्यावीण नात्रडे आमुतें : ऐसें केलें कृष्णें ॥ १७ ॥ असो तेथें चित्तवृत्ति : गुंतली ते न फिरे मागौति ॥ ऐसी काहिं तेणें प्रीति : वाढविली आमुसि ॥ १८ ॥ त्या प्रीतीचे सौरसें : दाविलें हास्या ऐसें ॥ तेणें प्रीतिहास्येंकरिं मानसें : हरिलिं आमुचिं ॥ १९ ॥ असो प्रीतीकरिं हास्यमान : तद्युक्त जें शोभासंपन्न ॥ देखोनि कृष्णवदन : मोहिलिं चित्तें ॥ २० ॥ आणि नयनकटाक्षेंतें : अवलोकितां

आमुतें ॥ तेथेंचि गुंतलीं चित्तें : मोहित होंत्सातिं ॥ २१ ॥ त्या प्रेमहासाव-लोकें : आसक्तचित्त अषकें ॥ प्राशावया रुपांमृत नेटकें : सादर जालों आह्मीं ॥ २२ ॥ तवं चित्तें तेथेंचि राहिलिं : ते मुर्ति तों हारपोनि गेली ॥ ऐसी गति आमुची केली : तया कृष्णें ॥ २३ ॥ एवं प्रेमादिकिं करुन : आमुचिं मनें हरुन ॥ तो काय नन्दानन्दन : गेला यिये वाटा ॥ २४ ॥ तया श्री-कृष्णजीतें : देखिलें काये तुवां येथें ॥ ऐसें त्या वृक्षराजातें : पुसोनि तिहिं ॥ २५ ॥ मग कोण्हि येक प्लक्ष : पलाशनामा वृक्ष ॥ त्या प्लक्षातें प्रत्यक्ष : पुसत्या जाल्या गोपी ॥ २६ ॥ किंवा प्लक्षपदें पिंपरीजाति : त्या जाउनि पिंपरीप्रति ॥ तियेतें पूर्वोक्ता रीति : पुशिला कृष्ण ॥ २७ ॥ आणि न्य-ग्रोध हें जाण : त्या वटवृक्षाची खुण ॥ वटातेंहिं गोपीजन : पूर्वोक्त प्रकारें तेथें ॥२८॥ उद्देशोनि श्रीकृष्णातें : ह्मणति अगा वटा येथें ॥ देखिलें काये कृष्णातें : जो आमुचा चित्तचोर ॥ २९ ॥ तो आजि तुवां काई ॥ देखिला किंवा नाहिं ॥ ऐशा त्या पडोनि प्रेमडोहिं : पुसती सर्वत्र ॥ ३० ॥ एवं त्या व्रजवनिता : श्रीकृष्णदर्शनिं उत्कंठिता ॥ अदेहभान समस्ता : भ्रमतां वनिं ॥ ३१ ॥ त्या अश्वत्थादिकांतें : पुसोनि कृष्णशोधातें ॥ नानापदार्थ शोधन-पंथें : जाती पुढें ॥ ३२ ॥ किंवा अश्वत्थादिकातें : जेणानि केशवां ऐशातें॥ ह्मणोनि निजवृत्तांतातें : पुसिलें त्यांसि ॥ ३३ ॥ सज्जनांचें सन्निधान : तेंचि कृष्णप्राप्तिचें साधन ॥ हें जाणोनि गोपीजन : शरण आला त्यांतें ॥ ३४ ॥ आतां येणेंचि उक्तपंथें : तरों गर्वार्णवातें ॥ यालगि तें गोपि-कारातें : चालिलिं पुढें ॥ ३५ ॥ असो पुनः गोपीजन : उत्कलक्षणेंचि करुन ॥ कृष्णप्राप्तिचें साधन : कारितुसे ऐसें ॥ ३६ ॥ तया वनामाझारि : देखोनि सर्वस्वें उपकारि ॥ त्यां वृक्षातें त्या सुंदरि : जाउनि पुसति ॥ ३७ ॥

**कच्चित्कुरबकाशोकनागपुन्नागचम्पकाः**
**रामानुजो मानिनीनांयातो दर्पहरास्मितः ॥ ६ ॥**

कुरबक ऐसा कोण्हि : कोरांटा जो इये जानि ॥ तो वृक्ष तिहिं भामिनिं : बहुपुष्पित देखिला ॥ ३८ ॥ आणि अशोक जो ख्यात : आरक्त पुष्पवंत ॥

आणि पुन्नाग एणें संज्ञित : नागचांपा वृक्ष ॥ ३९ ॥ तैसाचि चंपक विशेष: अति सुगंध पुष्पें ज्यास ॥ तो चांपाही सुमनस : वृक्ष तेथें होता ॥ ४० ॥ एवं कुरबकादि वृक्ष जाण : परार्थ ज्यांचें जीवन ॥ त्या औदार्यातें लक्षुन : गोपिका पुसती त्यांतें ॥ ४१ ॥ वेगळाले संबोधुनि : प्रार्थनायुक्त असोनि ॥ ह्मणति आर्ता ये वनिं : विश्रांतिकर तुह्मी ॥ ४२ ॥ तरि तो रामानुज श्रीकृष्ण : यशोदानंदानंदन ॥ आमुचिं चित्तें चोरुन : येणें मार्गें गेला काइ ॥ ४३ ॥ तो तुह्मी सभाग्यिं जनिं : देखिला काय स्वनयनिं ॥ ह्मणाल तो कोणां चिन्हिं : वोळखावा आह्मी ॥ ४४ ॥ किंवा तुमच्या चित्तवृत्ति : हरिल्या कोणे रीति ॥ तरी तो स्वता श्रीपति : आह्मी त्या किति ॥४५॥ पाहातां जगन्मोहनमूर्ति : आमुचा पाड तो किति ॥ मानिनी ज्या असती : रमेचिया समान ॥४६॥ असो रमा आदिकरुनि : ज्या किं बहु मानिनी ॥ ज्या गुणाढ्या या जनि : अति विख्याता सदां ॥४७॥ त्यांचिया दर्पातें : स्मितमात्रें हरिजेतें ॥ एवं मानिनीदर्पहास्मितातें : देखिलें काइ तुह्मीं ॥४८॥ ऐसें प्रसंगें करुन : निवेदिलें कृष्णचिन्ह ॥ आणि चित्तापहरणाचें कारण : सूचिलें तिहिं ॥४९॥ आणि रामानुजत्वें जाण : सुचिला वैकुंठरमण ॥ केवळ लीळावतरण : भूमिचा ठाइं ॥ ५० ॥ आणि मानिनीदर्पहर : येणें सुचिला स्वविचार ॥ जें आमुचेहि अहंकार : नाशिले तेणे ॥ ५१ ॥ असो हें निजवृत्त : अनेक प्रष्टव्यार्थ ॥ जें पुनरपीं नंदसुत : स्वीकारील काई आह्मा ॥ ५२ ॥ एवं त्या वृक्षांप्रति : स्ववृत्त निवेदुनि त्या सती ॥ चालिल्या तवं पुडति : देखिली तुळसी ॥ ५३॥ त्या कृष्णप्रिय तुळसीतें : पुसती कृष्णगतीतें ॥ तेहि आतां राया तुतें : निवेदिजेल ॥ ५४ ॥

**कच्चित्तुलसि कल्याणि गोविंदचरणप्रिये ॥**
**सह त्वालिकुलैर्बिभ्रद्दृष्टस्तेतिप्रियोच्युतः ॥ ७ ॥**

अवो तुळसि कल्याणि : आमुचिं चित्तें चोरुनि ॥ कृष्ण गेला तो काय नयनिं : देखिला तुवां ॥ ५५ ॥ ह्मणसी मिं मूढजाति : सदा अरंण्यामाजि वसति ॥ मज पुसावयाची प्रसक्ति : घडेल कैसि ॥ ५६ ॥ ऐसें असेल

काहिं : तरि तुं सदा गोवींदपाइं ॥ लोळसी आणि त्यासि नाहिं : दुजें तुजहुनि प्रिये ॥ ५७ ॥ ह्मणोनि गोविंदचरणप्रिये : सांग वो तयाचि सोये ॥ शिणालें आमुचिं ह्रदयें : आठवितां कृष्णातें ॥५८॥ ह्मणसी कृष्णालागुनि : मिं कोण्हा चिन्हिं करुनी ॥ गोविंदप्रिया कैसेनि : जाणतिलें तुह्मीं ॥ ५९ ॥ तरि तो रमारमण : भ्रमरिसहवर्तमान ॥ तुझें करुनि भूषण : वाहातुसे सदा आंगिं ॥ ६० ॥ रमेतें करुनि परतें : आदरें वाहातो तुतें ॥ ह्मणोनि तुजहुनि त्यातें : विषय नाहिं आणिक ॥ ६१ ॥ याचि निमित्तें पाहिं : तुजहिं त्यावीण प्रिय नाहिं ॥ यालागिं पुसतसों तुज वाइ : कृष्णाचि सोये ॥ ६२ ॥ असो जो किं नंदसुत : तुज प्रिय जो अच्युत ॥ आमुसिं होता रमत : तो काये देखिला तुवां ॥ ६३ ॥ एवं पुसोनि तुळसीतें : शोधितां कृष्णजितें ॥ तत्र अ ( आ ) मोद अवचितें : आले सुपुष्पाचे ॥ ६४ ॥ तें करितां अवघ्राण : आठवले श्रीचरण ॥ असो तो रासरंगरमण : आमुचा भोक्ता किं ॥ ६५ ॥ हे जे कांहिं पुष्पजाति : हे श्रीचरणसंपत्ति ॥ आतां पुसोनि पाहों यांप्रति : श्रीकृष्णशुद्धि ॥ ६६ ॥ असो या कुसुमांचा ठाइं : कृष्णस्पर्श आहे किं नाहिं ॥ किं आह्मा ऐस्या ( शा ) याहि : विरहार्ता असति ॥६७॥ अहो या मालत्यादि लता : अत्यंत गुणवंता ॥ तिहिं पावोनि नम्रता : शांतरूपा दिसति ॥ ६८ ॥ तस्मात् या भाग्यवंता : सर्वथा कृष्णस्पर्शिता ॥ तरी यांचिपासिं कांता : न विचारूं कां ॥ ६९ ॥ ऐसें धरुनि मनिं : त्या पुष्पलता लागुनि ॥ जाउनि व्रजभामिनीं : पुसताति ऐसें ॥ ७० ॥

**मालत्यदर्शि वः कच्चिन्मल्लिके जातियूथिके ॥**
**प्रीतिं वो जनयन्यातः करस्पर्शेन माधवः ॥ ८ ॥**

अवो ये मालती जाति : अवो मल्लिके पुष्पयाति ॥ यूथिके वो भाग्यवती : सादर असा इकडे ॥ ७१ ॥ तो मायाविलासधर्त्ता : आणि तियेचा नियंता ॥ माधव जो रमाभर्ता : तो आमुतें सांडुनि गेला ॥ ७२ ॥ अवो नकळत आमुतें : तो गेला चोरुनि चित्तें ॥ तो कृष्ण काये तुमते : येथें आडळला असे ॥ ७३ ॥ असो तो नन्दानन्दनजी : तुह्मी देखिला काय

आजि ॥ जो समुदायामाजि : क्रीडत होता आतां ॥ ७४ ॥ तो सूलोचन सावळा : काय याचि मार्गे गेला ॥ तो तुह्मी काय देखिला : निववीलें कीं तुमतें ॥ ७५ ॥ ह्मणाल आह्मि मुढजाति : तेणेंसि कैसि संगति ॥ ज्या कृष्णसंगे विश्रांति : पावावी येथें ॥ ७६ ॥ आणि तयाची गति : आह्मिं काइ जाणों मन्दमति ॥ ऐसें जरि काहिं सति : ह्मणाल वो तुह्मि ॥ ७७ ॥ तरि हे बाह्य विषमता : तेथें नाहिं सर्वथा ॥ श्रीकृष्ण सारभोक्ता : रसज्ञ जो सुजान(ण) किं ॥ ७८ ॥ आणि तुह्मी गुणाढ्यता : टाकूनि धरिलि नम्रता ॥ हें मानलें रमानाथा : तेणें तो सन्तुष्ट वो ॥ ७९ ॥ याचि लागि वो सति : पुसतसों तुह्माप्रति ॥ तुम्हासि काय तेणें सम्प्रति : स्पर्शिलें निज-करें ॥ ८० ॥ प्रीति करित होंत्साता : गेला तुह्मां देखतां ॥ असो तुम्ही आमुचा भर्ता : देखीला काइ जातां ॥ ८१ ॥ सम्बोधोनि सुमनवल्लीतें : ऐसें जालें पुशिजेतें ॥ मग देखिलें अवचितें : आम्रादिकांतें ॥ ८२ ॥ असो ते वृक्षजात : जाणोनि सर्वोपकारवन्त ॥ यांचा ठाईं नन्दसुत : विचरला असेल ॥ ८३ ॥ जे कोण्हि पदार्थ जिति : देहादिकिं ज्यासि विरक्ति ॥ ते विशेषें आवडति : नन्दानन्दन कृष्णजीतें ॥ ८४ ॥ त्या भगवत्प्रीतिकरांतें : अनु-सरोनि गोपीशतें ॥ सम्बोधोनि त्या वृक्षातें : कृष्णार्थ पुसती ऐसें ॥ ८५ ॥

> **चूतप्रियालपनसासनकोविदार-**
> **जंब्वर्कबिल्वबकुलाम्रकदम्बनीपाः ॥**
> **येन्ये परार्थभवका यमुनोपकूलाः**
> **शंसन्तु कृष्णपदवीं रहितात्मनां नः ॥ ९ ॥**

येथें चूत येणें संकेतें : संबोधिलें आम्रवृक्षातें ॥ आणि प्रियाळ संज्ञितें : चार वृक्ष जो ॥ ८६ ॥ आणि फणस जो ते वनि : तोहि देखिला नयनि ॥ त्या फनसातें भामिनीं : पुसों आदरिलें ॥ ८७ ॥ आणि आसन या संकेतें : खिरणीवृक्ष जो तेथें ॥ आणि कोविदार तरुतें : संबोधिलें तिहिं ॥ ८८ ॥ आणि जंबु जो यजनि : जांबूळ या अभिधानि ॥ बिल्व जो प्रसिद्ध वनि ; अक्ष जो बिहाडा ॥ ८९ ॥ तयांतेंहि संबोधिलें : तवं बकुळातें देखिलें ॥

त्यातें तिहिं ह्मणतिलें : किं अगा ये बकुळा ॥ ९० ॥ आम्रशब्दें करुनि : आंबसोल ख्यात जनि ॥ त्यातेंहिं भामिनी : पुसत्या जालिया ॥ ९१ ॥ आणि नीप कदंब दोन्हि : कळंबभेद या जनि ॥ त्यांतेंहिं त्या भामिनी : ह्मणती अगा कळंब हों ॥ ९२ ॥ एवं त्या गोपिकासती : तया वृक्षातें ह्मणति ॥ अगा ये वनतरुजाति : विनति आइका तुह्मी ॥ ९३ ॥ आणिकही वृक्षि एथें : परार्थ धरिलें देहातें ॥ साहोनि सीतवातोष्णातें : सर्वोपकारि तुह्मी जे ॥ ९४ ॥ असो सर्वेही शरीर : फळपत्रपुष्पादि संभार ॥ देउनि जनासि विश्रांतिकर : छायादि निमित्तें ॥ ९५ ॥ त्याहि वरि विशेषेंसिं : जें तुह्मी यमुनातीरवासी ॥ शैत्यगुणें देशस्थांसि : उपकारकर्ते ॥ ९६ ॥ आधिंच उपकारी जन : आणि केलें तीर्थसेवन ॥ त्याहीवरी सन्निधान : श्रीकृष्णजिचें ॥ ९७ ॥ ते तुह्मी धन्य जीवी जन : आइका येक वचन ॥ आह्मासि श्रीकृष्णेंविण : त्रैलोक्ये शून्य जालें ॥ ९८ ॥ असो ज्या आमुचिं चित्तें : हरिलिं तेणें नन्दसुतें ॥ त्या विगतचित्ता तुमतें : आलों हो शरण ॥ ९९ ॥ त्या निजशरणा आमुतें : सांगावें कृष्णगतीतें ॥ कोणे मार्गें कृष्णजीतें : पावोन आह्मीं ॥ २०० ॥ ज्या आह्मी विगतचित्ता : कृष्णविरहाकळिता ॥ त्या आह्मासि व्यवस्था : कृष्णाचि सांगा ॥ १ ॥ असो आह्मी कृष्णाप्रति : पावोन कवने (णें) रिती ॥ तुह्मी ऐसि काहिं युक्ति : सिकवा आमुतें ॥ २ ॥ जेवि कोण्ही सज्जन : तीर्थादिकातें सेउन ॥ असती हरिपरायण : परमगतीतें जाणते ॥ ३ ॥ तया सज्जना जनातें : जे मुमुक्षु ते स्वहितातें ॥ पुसती निजगतीतें : शरण जाउनि अत्यंत ॥ ४ ॥ तेवि तो गोपिकागण : वृक्षादि जे भगवज्जन ॥ त्यांसि जाउनि शरण : कृष्णातें पुसतुसे ॥ ५ ॥ नातरि विरहाचे उन्नति : सर्वत्र जालि कृष्णस्फुर्ति ॥ तेणें शरण जाति : सर्वत्र तद्बुद्धि ॥ ६ ॥ असो कृष्णचित्ता भामिनी : उपाधीतें न गणूनि ॥ करिती त्या चिंतवणी : सर्वत्र कृष्णाचि ॥ ७ ॥ एवं करितां चिंतवणी : कृष्ण पदांकित मेदिनी ॥ अकस्मात देखोनि : स्तविती तीतें ॥ ८ ॥

**किं ते कृतं क्षिति तपो बत केशवांघ्रि**
**स्पर्शोत्सवोत्पुलकितांगरुहैर्विभासि ॥**

**अप्यंघ्रिसम्भव उरुक्रमविक्रमाद्वा**
**आहो वराहवपुषः परिरंभणेन ॥ १० ॥**

अहो ये महीतळी : तुवां काय सुकृतें केलीं ॥ तपें कोण तपीनलीं : तेणें तुं शोभलोसि ऐसी ॥ ९ ॥ केशवशब्देंकरुन : पुरुष जो आदि-नारायण ॥ ज्याचें नाम निर्वचन : केलें असे पूर्वी ॥ १० ॥ जो घनशाम शरीरी : प्रस्तुत नंदाचे घरीं ॥ निजभक्तांचा कैवारी : व्रजजनार्तिहर्त्ता ॥ ११ ॥ ॥ ११ ॥ त्याचिया चरणस्पर्शें : उत्सव जो जाला दिसे ॥ त्या महोत्सव विशेषें : अंकुरलें अंग ॥ १२ ॥ त्या हृष्टरोमांचित पंक्ति : तृणांकुर जे शोभती ॥ सोत्सव अति मिरवति : तेणें शोभलीसि ॥ १३ ॥एवं केशवांघ्रि-युग : स्पर्शोनि जे पुलकितांग ॥ त्या अंगप्रभा सुभग ॥ शोभलीसि वो बहु ॥ १५ ॥ ऐशा उक्तलक्षणें क्षितीतें : देखोनि विरह जाला त्यांतें ॥ तो बत या संकेतें : प्रकट केला तिहीं ॥ १५ ॥ मागुती त्या क्षितीप्रति : विशेषें गोपी पुसती ॥ तुज येवढी संपत्ति : कैंपासूनि आली ॥ १६ ॥ हा अंघ्रिस्पर्श जो काहिं : तो आजिचा असे काइ ॥ एके देशीं कृष्णें पाईं : स्पर्शीलें जेव्हां ॥ १७ ॥ अमुर्पिं वितें चोरुन : तो यशोदानंदनंदन गेला त्या प्रसंगें करुन : स्पर्शीलि पदें ॥ १८ ॥ येवढी संपत्ति तवें : आली काय या निमित्तें ॥ किंवा वामनावतारीं तुतें : आक्रमिलें स्वपदें जें ॥१९॥ त्या उत्सावाचेनि गुणें : तुं शोभलीसि येणें मानें ॥ किंवा वाराहरूपें तेणें : आदिगु-रुषें जें तुज ॥२०॥ निजशरीरेंकरुन : दिधलें वो आलिंगन ॥ तया आलिंग-नें जाण : शोभलीसि काय ऐसी ॥ २१ ॥ एवं पदांकितें भूमीतें : देखोनि ते गोपीशतें ॥ जाणति जालिं जें येथें : सांपडला श्रीकृष्ण ॥ २२ ॥ म्हण-ती कृष्णाची शुद्धि : पावों न आतां त्रिशुद्धि ॥ उचंबळला प्रेमाब्धि : तो सांवरेना ॥ २३ ॥ यास्तव त्रिप्रकारें करुन : केलें भुमिचें स्तवन ॥ नाना तारे यानिमें निदिध्यासन : केलें कृष्णाचें ॥ २४ ॥ जेवि गुरुशास्त्रें करुन : सकृत् जालें वस्तुज्ञान ॥ तें निदिध्यासनें विण : परोक्ष होतसे ॥ २५ ॥ ते-वीच त्या व्रजसती : किंचित् प्राप्त कृष्णाप्रति ॥ परि तेंचि जालें मागुती :

गर्वासि मूळ ॥ २६ ॥ निदिध्यासनें वांचुन : नेणती पुरतें महिमान ॥ याला-गि देखताचि कृष्ण : परोक्ष जाला ॥ २७ ॥ परि त्या सुखाचेनि चवीं : त्या खोंचलिया जीविं ॥ विचारिती कृष्णपदवी : निदिध्यासनें ॥ २८ ॥ तेंचि करितां चिंतन : भूमीचें केलें स्तवन ॥ तवं नेत्रशोभासंपन्न : देखिलिया हरि-णी ॥ २९ ॥ असो त्या नेत्रांचा ठाइं : हे शोभा जैसी काहिं ॥ ते अन्यत्र कोठें नाहिं : ह्मणोनि तर्क जाला ॥३०॥ जें यांच्या नयनशोभेतें : विस्ता-रिलें नंदसुतें ॥ सार्थक केलिं जीवितें : आजि या हरिणींचिं ॥ ३१ ॥ नयनशोभा धरिली : ते आजि सार्थक जाली ॥ श्रीकृष्ण वनमाळी : निहा-ळिला इहिं ॥३२॥ ऐसें देखोनि तयांतें : विरह होउनि गोपी तेथें ॥ आइक राया हरिणीतें ॥ पुसताति ऐसें ॥ ३३ ॥

> अप्येणपत्न्युपगतः प्रिययेह गात्रै-
> स्तन्वन्दृशां सखि सुनिर्वृतिमच्युतो वः ।
> कांतांगसंगकुचकुंकुमरंजितायाः
> कुंदस्रजः कुलपतेरिह वाति गंधः ॥ ११ ॥

अवो ये मृगपत्नि : सुनयने सखिये हरिणी ॥ अवधारिं तुजलागुनि : पु-सिजेतें ऐसें ॥ ३४ ॥ तो यशोदानंदसुत : जगदात्मा जगन्नाथ ॥ साक्षात् जो अच्युत : सदां आनंदस्वरूप ॥ ३५ ॥ तो चोरुनि आमुचिं चित्तें : गेला काय येणें पंथें ॥ तुझिया सुनयनातें : सार्थ करुनि ॥ ३६ ॥ असो तो सुं-दरवदन : शामतनु रुपरमण ॥ आजानुबाहु सुभूषण : कंदर्पदर्पहर्ता जो ॥ ३७ ॥ अत्यंत शोभाशोभित : या नयनांसि तृप्त करित ॥ या मार्गें काये नंदसुत : गेला किं नाहिं ॥ ३८ ॥ हे जे तुझे सुनयन : देखतसों स्थिर विस्तीर्ण ॥ निमिषोन्मेषहीन : टवंकारले दिसति ॥ ३९ ॥ ह्मणसी नंदानंदन : तो काय येकाकी संगशून्य ॥ प्रायशा त्यासि विहरण : एकाकीच असे ॥४०॥ ऐसें ह्मणसी पाहिं : तरि तुझी युक्ति जे काहिं ॥ येणे ऐसें पडतसे ठाइ : जें सखीसवें गेला ॥ ४१ ॥ घेउनि येखादे सखीतें : गमन केलें नंदसुतें ॥ तरि त्या प्रियेचे सांगातें : गेला काइ ॥ ४२ ॥ आह्मासही गमतें काहिं :

त्यासि एकाकी जाणें नाहिं ॥ तरि तो प्रियेसवें काइ : देखिला तुवां ॥ ४३ ॥ ह्मणसी या मार्गें करुन : गेला तो नंदानंदन ॥ हे कासयावरुन : तुह्मी पुसतसा मातें ॥ ४४ ॥ तरि सुखावले दृष्टीतें : देखोनि तर्कलें आमुतें ॥ हें तों पूर्वींचि तुतें : निरोपिलें आह्मि ॥ ४५ ॥ आणि अन्य चिन्हावरून : विश्वासलें आमुचें मन ॥ जे आतां या मार्गें गमन : श्रीकृष्णें केलें ॥ ४६ ॥ कां जें आह्मी व्रजकांता : सदा श्रीकृष्णिं रता ॥ त्या आमसि सुखें विचरतां : क्रमिला जें काळ ॥ ४७ ॥ ते साक्षात् श्रीचरण : सकळ शोभेचें सदन ॥ अधिष्ठुनि आमुचें हृद्वन : विचरतेवेळे ॥ ४८ ॥ तें जें हृद्यें प्रशस्तें : जें कृष्णानुरागें रंजितें ॥ श्रीकृष्णसंगनिमित्तें : संस्कारिलिं जें आह्मी ॥ ४९ ॥ असो कुंकुम जें काहिं : तें मर्दिलें निजहृदइं ॥ जेथें अन्य चिंतन नाहिं : श्रीकृष्णेंविण ॥५०॥ एवं हृदय जें कुचयुग : कुंकुमरंजित कांतांग ॥ त्या अंगि कृष्णसंयोग : संभोगकाळिं होतां ॥ ५१ ॥ असो कांतांगसंगकाळिं : श्रीकृष्णाचा वक्षस्थाळिं ॥ विलंबित समनावळी : विराजत होति ॥ ५२ ॥ ते कुंकुमरागयुक्त : जाली पीत सुलोहित ॥ आणि सौगंध्येंहिं ऊर्जित : विस्फारली जे ॥ ५३ ॥ असो ते सुगंधाढ्य माळा : होती कृष्णाचे गळां ॥ तिचा अति आगळा : येतुसे सुगंध ॥ ५४ ॥ यास्तव आह्मासि गमलें : जें कृष्णें आतां गमन केलें ॥ आणि नेत्राहे देखिलें : अति प्रसन्न ॥ ५५ ॥ एवं तो गोकुळपति : भक्तजनचक्रवर्ति ॥ त्याचिया गळांची रुळती : कुंदकुसुममाळा जे ॥ ५६ ॥ त्या माळेच्या गंधोत्कर्षें : आम्हासि गमलें जें ऐसें ॥ तुझ्या नेत्रासि रमेशें : दिधला अवसर ॥ ५७ ॥ या नेत्रांची प्रसन्नता : देखोनि गमलें चित्ता ॥ जें कृष्ण येथुनि आतां : गेला असेल निश्चयें ॥ ५८ ॥ ऐसे त्या व्रजवासिनी : कृष्ण सुमरोनि मनिं ॥ त्या हरिणीतें अविवुनि : पुसत्या जालेया ॥ ५९ ॥ नातरि हरिणीचे आकृती : त्या गोपींची अंतर्वृति ॥ वियोगविरहार्ति : रुपासि आली ते ॥६०॥ त्या वृत्तीतें अविवुन : कृष्णाचें गवेषण ॥ करिताजाला गोपीजन : निजगर्वपरिहारार्थ ॥ ६१ ॥ जेवि काहि मुमुक्षुजन : विद्यावृत्तीतें अधिष्ठुन ॥ करुनि अविद्याहरण : पावती भगवंतिं ॥ ६२ ॥

तेवींचि तो गोपीजन : हरिणीतें अधिष्ठुन ॥ करिता जाला गवेषण ॥ गर्वरहित श्रीकृष्णाचें ॥ ६३ ॥ पुडती तेणेंचि पंथें : विचारितां श्रीकृष्णातें ॥ तंव फळसम्पन्ना वृक्षांतें : देखतिया जालिया ॥६४॥ ते फळसम्पन्न होत्साते : अवलंबिलें नम्रतें ॥ देखोनि गमलें त्यातें : जें कृष्णदर्शन स्पर्शित हे ॥ ६५ ॥ इहिं शाखानम्रीभूतें : कृष्णातें केलिं दंडवतें ॥ ऐसें मानलें तयातें : जें हे परमभाग्यवंत किं ॥ ६६ ॥ म्हणती पाहा वृक्षिं इहिं : जडत्वातें गणिलें नाहिं ॥ कैसे लागले कृष्णपाई : विगताभिमान हे ॥६७॥ तस्मात् ज्यासि कृष्णदर्शन : तेचि अभिमानहीन ॥ हे तरु जन्मे असोन : भाग्याचे जाणवे ॥ ६८ ॥ असो येथें प्रस्तुत : चोजवेल किं नंदसुत ॥ शौरिं पां यांचे आचरित : हे कोणे स्थितीनें असति ॥ ६९ ॥ ऐसें धरुनि चित्ति : कृष्णाची विलासगति ॥ पुसत्या जाल्या वृक्षांप्रति : तें आइकें राया ॥ ७० ॥

बाहुं प्रियांस उपधाय गृहीतपद्मो
रामानुजस्तुलसिकालिकुलैर्मदांधैः ॥
अन्वीयमान इह वस्तरवः प्रणामं
किंवाभिनंदति चरन्प्रणयावलोकैः ॥ १२ ॥

अहो ये तरुवरजाति : देखोनि तुमची नम्रस्थिति ॥ आम्हीं कृष्णदर्शनार्थि : विश्वासलों येथें ॥ ७१ ॥ करुनि तुमची सार्थकता : येणेंचि मार्गे आतां ॥ गेला काइ रमाभर्ता ॥ चित्तें चोरुनि आमुचिं ॥ ७२ ॥ असो तो रमारमण : प्रस्तुत यशोदानंदन ॥ जो किं आश्रोनि वृंदावन : क्रीडत होत्साता ॥ ७३ ॥ गमन करितां येणें पंथें : तुम्ही सांडुनि उद्धतें ॥ वारण जाउनि त्यातें : नमस्कार जो केला ॥ ७४ ॥ त्या तुमच्या नमस्कारातें : तेणें पाहोनि संतोषातें ॥ आनंदविलें तुम्हांतें : प्रणयावलोकें काई ॥ ७५ ॥ अहो स्वीकरुनि नमनातें : संतोषोनि नंदसुतें ॥ अवलोकिलें काइ तुम्हांतें : प्रीतिकरुनि ॥ ७६ ॥ हांगाल तेणें रमाळीलें : या मार्गें गमन केलें ॥ हें कैसें जाणतां आलें : परोक्षे करि तुम्हांतें किं ॥ ७७ ॥

तरि सुगंधा तुळसीमाळा : वाथि ( हि ) त्या प्रीतीनें गळां ॥ त्या सुगंधि लोवळा : भ्रमरगण जो ॥७८॥ तें सौगंध्यरजभुक्त : भ्रमरकुळ जें उन्मत ॥ सांडोनि अन्यकृत जात : अंधप्राय आसक्त ॥ ७९ ॥ तेजें गंधसक्त षट्पद : मत्तविव्हळ मदांध ॥ त्या षट्पदि तो नंदानंद : अन्वीयमान सर्वदा ॥ ८० ॥ असो अनुलक्षूनि ज्यातें : भ्रमरकुळें मदन्वितें ॥ गोठि तेणें काय तुमतें : अवलोकिलें प्रीतीकरिं ॥ ८१ ॥ एवं पुरःसरुनि कृष्णातें : प्रवर्तति भ्रमरगीतें ॥ ते येउनि श्रवणपंथें : तर्कविलें आह्मासि तेणें ॥ ८२ ॥ जें चोरुनि आमुचि चित्तें : प्रिति पावउनि तुमतें ॥ या मार्गे नंदसुतें : आतां गमन केलें ऐसें ॥ ८३ ॥ जर्‍हि तो अव्यक्तगति : तर्‍हि मन भ्रमरपंक्ति ॥ स्वच्छंदानंदें गुण गाति : वर्णिती त्यातें प्रकट ॥ ८४ ॥ तोंचि होउनि आतां द्वार : त्याचे गवेषणीं अवसर ॥ पावोनि आह्मि तत्पर : तत् शोधार्नि जालों ॥ ८५ ॥ अहो ये पादपजाति : शरण आलों तुह्माप्रति ॥ तो श्रीकृष्ण सुखमूर्ति : भेटेल काइ आतां ॥ ८६ ॥ ह्मणाल तुह्मी गोपगृहिणी : असावें नीजभुवनीं ॥ त्या नंदनंदना शोधनि : प्रयोजन काई ॥ ८७ ॥ ऐसें असेल मनोगत : तरि तो नव्हे नंदसुत ॥ साक्षात् वैकुंठनाथ : रामानुज या पदें॥८८॥ जो प्रसिद्ध असे पुराणीं : कृष्णत्वाची अवगणी ॥ बळिरामातें पुरःसरुनि : अवतरला येथें ॥ ८९ ॥ एवं रामानुजत्वें जाणोनि : कृष्ण सूचिला यमुनागि ॥ जो वसुदेवभुवनि : सुरसाह्यार्थ प्रकटला ॥ ९० ॥ सांडुनि परमभिमनातें : ब्रह्मादि भजती ज्यातें ॥ तो श्रीकृष्ण आमुतें : भाग्येंकरिं जोडला ॥ ९१ ॥ तेथें दुष्कर्म आड आलें : श्रीकृष्णें प्रस्थान केलें ॥ परि मन तेथें संस्कारलें : तेणें धुंडितों ॥९२॥ एवं मन हें कृष्णपाइं : तरि संसारिं चाड काई ॥ गति आणिक नाहिं : कृष्णेवीण आमुतें ॥ ९३ ॥ ह्मणाल तो नव्हे नंदसुत : साक्षात् वैकुंठनाथ ॥ तरि तो सर्वांतस्थ : सदा असावा निश्चळ ॥ ९४ ॥ आणि सांडुनि गृहशेतें : तुह्मी पावल्यात कृष्णातें ॥ तरि सांडुनि तो तुमतें : कैसा गेला कोठें ॥९५॥ ऐसें ह्मणाल येथें : तरि अविद्युनि कोण्ही येके सखीतें ॥ सर्वांतस्याही त्यातें : प्रस्थान घडलें ॥ ९६ ॥ किंवा तियेच्या आकृति : आमुच्या गर्वाची मूर्ति ॥ तीच्या

स्कंधि तो श्रीपति : ठेउनि स्वबाहु ॥९७॥ चित्तें चोरुनि गेला : तो कृष्ण काये देखिला ॥ तुमच्या नमस्कारासि रिझला : सुखी केलें काइ ॥ ९८ ॥ येथें न गमो तुमतें : जें पराधीनता आली त्यातें ॥ तरि तो स्वक्रीडापंथें : प्रवर्तता श्रीकृष्ण ॥ ९९ ॥ त्या क्रीडेसी उपकरण : प्रिया केली निर्माण ॥ ते नीजपतीतें अनुसरोन : वर्तु असे सदां ॥ २०० ॥ तीसि मोहावया कारण : हातिं केलें पद्मग्रहण ॥ दाविलें रूप रमण : सौष्ठव्य श्रियेचें ॥ १ ॥ नातरी आमुचा गर्वपरिहारार्थ ॥ प्रियेचा स्कंधि हात : ठेउनि रमानाथ ॥ परोक्ष जाला ॥ २ ॥ परी आमुचा असोनि हिति : कमळ धरिलें स्वहस्तिं ॥ तेणें मिषें चित्तवृत्ति : निजस्था केल्या ॥ ३ ॥ तिरोधानाचा आसन्नकाळिं : तो कृष्ण कमळ माळी ॥ घेउनि तें करतळिं : प्रकटिली शोभा ॥ ४ ॥ अनुसरोनि त्या शोभे : आलें जें आनंदभरितें ॥ आनंदार्णवि चित्तें : भिजलीं अमुचिं ॥ ५ ॥ त्याचि संस्कारें करुन : आम्ही आदरिलें गवेशण ॥ एवं गृहीतपद्म श्रीकृष्ण : पुसत असो ॥ ६ ॥ ऐसें तिया भामिनी : त्या वृक्षांतें अधिष्ठुनि ॥ पुसती तों तेचि क्षणि : वृक्षाश्रिता लता होत्या ॥ ७ ॥ देखोनि जाल्या हर्षपरा : त्यामाजि येकि सुंदरा ॥ अनुसरोनि नंदकुमारा : गवेषित असे ॥८॥ असो त्या समुदायामाझारि : कोण्हि येकि सुंदरी ॥ तो कंदर्पदर्पहारी : कमळनयण(न) कृष्ण ॥ ९ ॥ त्या कृष्णस्पर्शिता लता : देखोनि पुलकांकिता ॥ मानिनी जाली जें आतां : भेटैल कृष्ण ॥ १० ॥ म्हणोनि ते सखियांतें : संबोधेनि शोभी कृष्णातें ॥ आइक राया सुचित्तें ॥ वार्णिजेतें तेंहिं ॥ ११ ॥

**पृच्छतेमा लता बाहूनप्याश्लिष्टा वनस्पतेः ॥**
**नूनं तत्करजस्पृष्टा बिभ्रत्युत्पुलकान्यहो ॥ १३ ॥**

त्या सख्यातें येक सखी : म्हणे हें नवल देखिलें कि ॥ इया लता या लोकिं : भाग्याच्या कैशा ॥१२॥ या जातिविभागें लता : परी प्राप्तकृष्णस्पर्शा ॥ आणां यातें आमुचा भर्ता : पुसावा वो अवस्य (श्य) ॥१३॥ असो मानातें करुनि परतें : शरण जावें यां लतातें ॥ पुसावें यो कृष्णातें : या वाटे गेला काय ॥१४॥ म्हणाल चोरुनि चित्तें : गमन केलें नंदसुतें ॥ आम्हा अभाग्या गर्वि-

ष्टातें : सांडिलें कृष्णें ॥१५॥ तरि प्रणयावलोकलेशें : संस्कारिलें जें मानसें ॥ त्या संस्कारविशेषें : कृष्णिंच प्रीति जाली ॥१६॥ तेणें तत्संगी जे जन : त्यांसि जाउनि शरण ॥ तत्प्राप्तीचा पुसावा यत्न : निःसंशय असोनि ॥१७॥ ह्मणोनि कृष्णप्राप्तीची वाट : हे होय किं नव्हे नीट ॥ हें पुसा वो यांतें प्रकट : कृष्ण- स्पृष्टांतें ॥१८॥ ह्मणाल या भर्तारसंगति : निजाश्रमिं वसति ॥ यांसि कृष्णसंग- प्राप्ति : हें केसेंनि घडे ॥१९॥ आलिंगूनि स्वपतितें : संतुष्ट दिसती चित्तें ॥ आतां कृष्णसंगति वल्लितें : लक्षिलि कोणे रीति ॥२०॥ ऐसें ह्मणाल वो सति : यांचे पति जे वनस्पति ॥ त्या वृक्षांचे हे दिसति : शाखालक्षण बाहु जे काहिं ॥ २१ ॥ त्या निजपति बाहुतें : जरी हे आलिंगिलें दिसतें ॥ परि सुखोद्रेक जो यांतें : संपादला किं प्रत्यक्ष ॥ २२ ॥असो हर्षाचिया उन्नति : पुलकांकिता दिसति ॥ आनंदबिंदु स्रवति : सर्वांगि जे यांचिया ॥ २३ ॥ या सुखासि हेतु वो सति : नव्हे भर्तारांची संगति ॥ त्या अति सुखाची जाति : सर्वथा हे नव्हे किं ॥ २४ ॥ पतिधर्म जो काहिं : या व्यवहाराचाचि ठाइं ॥ तो या ग्राम्य पतिधर्मिं काइ : सत्वोद्रेक इतुका असे ॥ २५ ॥ निजपतिचा संगति : बेव्हढी कैंचि सुखप्राप्ति ॥ पाहा या भाग्याचा किती : कृष्णस्पर्शिता ॥ २६ ॥ करज संज्ञेकरिं : नखें जें अति साजिरिं ॥ त्या नखिं वल्लीसुंदरी : साक्षात् कृष्णें स्पर्शिल्या किं ॥ २७ ॥ असो पुष्पकृं- तनवेळे : नखस्पर्श जे यातें जाले ॥ तेणे सर्वांगिं यासि आले : आनंदस्वेदकण ॥ २८ ॥ यांच्या भाग्याची नवाई : आतां वर्णावी किती काइ ॥ कैसें पां धरिलें इहिं : कृष्णस्पर्शसुखस्वेद ॥ २९ ॥ ह्मणोनि जाउनि शरण : यांसि करावें वृत्तशोधन ॥ ऐसें परस्परें गोपीजन : बोलता जाला ॥ ३० ॥ नातरि त्या गोपकांता : कृष्णिं प्राता आपादता ॥ तत्र कर्नगती गवश्याता : उत्सुकतेकरिं जाल्या ॥ ३१ ॥ मग तो नंदानंदन कृष्ण : निजवेषें आभारोन ॥ त्या नि- जवत्सळासि तिरोधान : आदरिता जाला ॥ ३२ ॥ दाउनि निज वियोगातें : अवस्था होआवी त्यांतें ॥ विसरोनि देहादिकातें : आपणातें स्मरावें ॥ ३३ ॥ या हेतु करुनि युक्ति : घेउनि योगमायेची बुधि ॥ प्रकट असतांचि त्यांप्रति :

गुग जाला नावेक ॥ ३४ ॥ मग तें वनिताशतें : अधिष्ठुनि वृक्षादिकातें ॥ असो मित्र करुनि भळतें : स्मरत्या जाल्या ॥ ३५ ॥ नातरि वेधलेनि चित्तें : व्यक्तिमात्रि कृष्णजीतें ॥ मानुनि जेथें तेथें : आटविती कृष्णातें ॥ ३६ ॥ आतां त्या स्मरणदार्ढ्यें करुन : सर्वांगि सुभरला कृष्ण ॥ तार्तम्यापासुन : परतलें चित्त ॥ ३७ ॥ अधिष्ठुनि वृक्षादिकातें : कृष्णशोधासक्त होतें ॥ तें टाकुनि गोपीशतें : आपुलालाचि ठाईं ॥ ३८ ॥ रूपगुणे कर्मयुक्त : स्मरतिं जरि नंदसुत ॥ श्रीकृष्ण प्रेमाप्लुतचित्त : विसरोनि इतर ॥ ३९ ॥ असो त्या गोपकांता : गुणकर्मतेंचि स्मरतां ॥ असत्या जाल्या उन्मत्ता : अनुकरत्या तैशा ॥ ४० ॥ नाना विषयांतें विसरोन : उन्मत्ताचे परि मन ॥ होउनि श्रीकृष्णस्मरण : गुणकर्मयुक्त हें ॥ ४१ ॥ होउनि त्यांसि स्वशरीरें : अनुगमनि कृष्णाकारें ॥ त्या गुणकर्मांचा अनुकारें : वर्तत्या जाल्या ॥ ४२ ॥ तेंचि विस्तरें करुन : रायातें व्यासनंदन ॥ निरोपिताति तेथें अवधान : सज्जनाचें असावें ॥ ४३ ॥

**इत्युन्मत्तवचो गोप्यः कृष्णान्वेषणकातराः ॥**
**लीला भगवतस्तास्ता ह्यनुचक्रुस्तदात्मिकाः ॥ १४ ॥**

पूर्वोक्तिं त्या गोपकांता : श्रीकृष्णगवेषणरता ॥ असोनि विकळचित्ता : उन्मत्ताचिया परि ॥४४॥ असोनि कृष्णस्थें चित्तें : बोलिलिया वृक्षादिकातें ॥ म्हणोनि उन्मत्तवचना हें त्यांतें : विशेषण घडलें ॥ ४५ ॥ ज्या कहिं पूर्वानुभूता : कृष्णलीळा अत्यद्भुता ॥ अलौकिका ज्या प्रशस्ता : पापक्षयकरा ॥ ४६ ॥ त्या ज्या अपूर्वा लीला : असोनि विरहविव्हळा ॥ आपुलाला ठाईं सकळा : अनुकरित्या जाल्या ॥ ४७ ॥ असो त्या व्रजसुंदरी : उन्मत्ताचिया परि ॥ कृष्णक्रीडा स्वशरीरिं : दावित्या जालिया ॥ ४८ ॥ गोपी येकि येकिं प्रति : त्या क्रीडांचे अनुकार करिती ॥ चित्तें सुभरोनि कृष्णमूर्ति : विरहकातरा ज्या ॥ ४९ ॥ तदात्मिका होत्सात्या : आपणहिं जाल्या क्रीडत्या ॥ आम्हीचि कृष्ण ऐसें मानित्या : जाल्या गोपी ॥ ५० ॥ तेजें काहिं क्रीडन : उत्तरग्रंथें करुन ॥ आइक राया सावधान : वर्णिजेतें तें ॥ ५१ ॥

**कस्याश्चित्पूतनायंत्याः कृष्णायंत्यपिबस्तनम् ॥**
**तोकायित्वा रुदंत्यन्या पदाहंच्छकटायतीम् ॥ १५ ॥**

कोण्ही येकी विलासिनी : जाली पुतनावेषधारिणी ॥ आणि येक भामिनीः बाळकृष्ण जाली ॥ ५२ ॥ ते धरुनि कृष्णनटातें : पूतनारूपीचे स्तनातें ॥ प्राशितां नेणो तियेतें : कृष्णरूपा प्राशील काइ ॥ ५३ ॥ आणिकि येकि सती : आपणा बाळत्वें कल्पिती ॥ आणि येकि जाली भाविती : शकटरूपें ॥ ५४ ॥ त्या शकटभाविनीतें : बाळरूपा पदघातें ॥ हाणोनि विपर्यासें तीतें : पाडिती जाली गोपी ॥ ५५ ॥ त्या गोपीनें बाळलीळे : किंचित् रुदन केलें ॥ रडतियेणें पाडिलें : शकटायती गोपिकेतें ॥ ५६ ॥

**दैत्यायित्वा जहारान्यामेका कृष्णार्भभावनाम् ॥**
**रिंगयामास काप्यंघ्री कर्षंती घोषनिःस्वनैः ॥ १६ ॥**

कोण्ही येकि व्रजांगना : करुनि दैत्यकल्पना ॥ आणि येकि कृष्णभावना : बाळरुप जाली ॥ ५७ असो तृणावर्तें येउन : पूर्वि केलें कृष्णग्रहण ॥ तो तृणावर्त आपण : कल्पिती जाली ॥ ५८ ॥ आणि येकीचें मन : भाविलें जालें कृष्णपण ॥ अधिष्ठुनि नंदभुवन : बाळत्वें असतां ॥ ५९ ॥ त्या बाळायती गोपीतें : हरिलें दैत्यवेषें तेथें ॥ असो तृणावर्त्त हे जियेतें: भावना होति ॥ ६० ॥ ते बाळवेतें हरिती जाली : किंचित् गगनिं गति दाविली ॥ आणि येकि अनुकरली : रिंगमाण कृष्णरूपें ॥ ६१ ॥ असो पायांतें आकर्षुन : होती जाली रिंगमाण ॥ तेणें प्रसंगें करुन : नूपुरें जें पाइंचि ॥ ६२ ॥ तया नूपुरांचे ध्वनि : उपटलें जें काहिं गगनिं ॥ त्या ध्वनिगजरें करुनि : रंजविती व्रजस्थांतें ॥ ६३ ॥ असो विसरोनि गोपीत्वातें : अंगीकरुनि कृष्णत्वातें ॥ मि गोकुळामाजि रांगतें : हें चिंतिती जाली ॥ ६४ ॥

**कृष्णरामायिते द्वे तु गोपायंत्यश्च काश्चन ॥**
**वत्सायतीं हंति चान्या तत्रैका तु बकायतीम् ॥ १७ ॥**

कोण्ही येका दोघी जनी (णी) : कृष्णचित्ता व्रजवासिनी ॥ आपण रामकृष्ण हाणोनि : अनुकरल्या जाल्या ॥ ६५ ॥ कितियेका व्रजसती : जा-

लिया गोपवेषवती ॥ आणि येकी कल्पिती : जें आपण गाइचिं वत्सें ॥६६॥ कोण्ही येकि गोपबाळि : वत्सासुरत्वें अनुकरली ॥ वत्सग्रहणासि आली : तवं देखिली कृष्णायतीनें ॥ ६७ ॥ त्या वत्सासुरभावितेते : मारिलें ऐसें मानिलें चित्तें ॥ तवं वाटलें एकीतें : जें मिं बकासुर आलिं ॥ ६८ ॥ त्या बकरूपेंतें मारिलें : ऐसें कृष्णवेषीनें दाविलें ॥ एवं परस्परें आदरिलें : कृष्णाकार विहरण ॥ ६९ ॥

**आहूय दूरगा यद्वत्कृष्णस्तमनुवर्ततीम् :**
**वेणुं क्वणंतीं क्रीडंतीमन्याः शंसंति साध्विति ॥ १८ ॥**

तो नंदानंदन कृष्ण : अधिष्ठुनि वृंदावन ॥ करित असतां गोरक्षण : आपुलेनि लीलाछंदें ॥ ७० ॥ तवं ते गाइची पंक्ति : गेली असतां दूर प्रदेशाप्रति ॥ तरि स्वता तो श्रीपति : वैकुंठाधिप कृष्ण ॥ ७१ ॥ मधुरवेणुस्वरें करुन : त्या गाइंचें करी आवाहन ॥ तेवींच तो गोपीजन : स्मरोनि त्या कर्मातें ॥ ७२ ॥ कोण्ही येकि गोपबाळि : कृष्णकर्मातें अनुकरली ॥ स्वशरीरिं दाविती जाली : कृष्णत्वाचा आकार ॥ ७३ ॥ वेणुस्वरातें अनुकरोन : गाइंचें केलें आवाहन ॥ क्रीडती जाली आपण : कृष्णाचे परिं ॥ ७४ ॥ त्या क्रीडतिये गोपीतें : इतरें गोपिकांचिं शतें ॥ आइकोनि वेणुस्वराकारातें : प्रशंसिति जालिं ॥ ७५ ॥ जेवि गोपाळांचा गण : आइकोनि कृष्णवेणुवादन ॥ भला भला ऐसें म्हणोन : प्रशंसिती कृष्णतें ॥ ७६ ॥ तेवि कृष्णाकारवतीतें : प्रशंसिती गोपीशतें ॥ कृष्णमय असोनि चित्तें : भला भला म्हणति ॥ ७७ ॥ आपण गोपांगना : हे बुडाली अवघी भावना ॥ अंतरिं सुभरला राणा : वैकुंठिचा श्रीकृष्ण ॥ ७८ ॥ यालागि कृष्णकृतितें स्मरोन : तदाकारें गोपीजन ॥ अनुकरोनि आपण : क्रीडतुसे राया॥ ७९ ॥

**कस्यांचित्स्वभुजं न्यस्य चलंत्याहापरानुन ।**
**कृष्णोहं पश्यत गतिं ललितामिति तन्मना : ॥ १९ ॥**

तेचि गोपवेल्हाळी : जे इतरांहिं प्रशंसिली ॥ श्रीकृष्णाकारें जे नटली : जीनें आचमदिलें गोधनें ॥ ८० ॥ तेचि येके गोपीस्कंधातें : धरुनि निजहस्तें ॥

कृष्णाचे परिं चळनातें : करित होत्साति ॥ ८१ ॥ इतरां गोपिकांप्रति : दाविति जाली निजगति ॥ ह्मणे पाहा वो समस्ती : मी कृष्ण जालिं कैसी ॥ ८२ ॥ मिं नंदानंदन वो सति : पाहा माझी चलनगति ॥ पदिं पदिं उघडती : मंगळाचिया खाणी ॥८३॥ नाना पाहा तुह्मी हे गति : हे जे कृष्णाची चालती रीति ॥ जे पुर्वी देखिली होति : ते होये किं वो सखि ॥ ८४ ॥ ऐसी ते गोपवनिता : जे विरहमदोन्मत्ता ॥ पावोनि कृष्णमयता : विसरली आपणयांतें ॥८५॥ त्या विरहाची उन्नती : कृष्णकर्मातें आचरती ॥ तो अनुकार गोपिंप्रति : दाविते ऐसा ॥ ८६ ॥

**मा भैष्ट वातवर्षाभ्यां तत्त्राणं विहितं मया ॥**
**इत्युक्त्वैकेन हस्तेन यतंत्युन्निदधेंबरम् ॥ ५० ॥**

इंद्रयागभंग निमित्तें : कोपोनि अदितीसुतें ॥ पीडों आदरिलें गोकुळातें : वातवर्षेंकारिं ॥ ८७ ॥ तैं श्रीकृष्णें नंदसुतें : पर्वत उचलोनि एके हातें ॥ सपरिकरें गोकुळातें : रक्षिलें जें काहिं ॥ ८८ ॥ याही कर्मातें स्मरोनि : ते कृष्णायिता भामिनी ॥ आपण कृष्ण हें जियेचा मनिं : संचार जाला ॥८९॥ ते इतरां गोपींप्रति : म्हणे अवधारा वो समस्ती : या वायुवृष्टीची चित्तिं : न धरावी शंका ॥ ९० ॥ या भयापासाव रक्षण : म्यां विचारिलें जें संपुर्ण ॥ असो ये विषईं निवारण : तें करिन मिं प्रस्तुत ॥ ९१ ॥ ऐसें बोलोनि ते सती : गोवर्धनाचिया आकृति ॥ जाली येके हातें उचलिती : स्वपरिधाना वस्त्रानें ॥ ९२ ॥ असो सोडोनि वसन नेसतें : तें घडी करुनि येके हातें ॥ उचलुनि म्हणें म्या तुमते : रक्षिलें आजि ॥ ९३ ॥ तवं आणीक एक सती : कृष्णकर्मातें जाली स्मरती ॥ काळयानामें सर्पपति : दंडिला जो श्रीकृष्णें ॥ ९४ ॥ तें स्मरोनि निज चित्तिं : तैसेंचि जाली आचरती ॥ आइक राया तुजप्रति : निरोपीजेतें ऐसें ॥ ९५ ॥

**आरुह्यैका पदाक्रम्य शिरस्याहापरां नृप ॥**
**दुष्टाहे गच्छ जातोहं खलानां ननु दंडधृक् ॥ २१ ॥**

कोण्ही येकि गोपगृहिणी : विरहाकुळा कामिनी ॥ श्रीकृष्णत्वें अनुकरोनि : अन्ये गोपीतें ॥ ९६ ॥ शिराचा ठाइं जाण : करुनि आरोहण ॥ पदेंकरिं

आक्रमुन : काळियासर्पवेषें गोपीतें ॥ ९७ ॥ कृष्णत्वाचें आवेषें : बोलती जाली ते ऐसें ॥ पूर्वि काशियातें रमेशें : बोलिले होतें कृष्णें ॥ ९८ ॥ म्हणे अगा दुष्टा अहि : येथुनि अतां त्वरा जाई ॥ आजि या कालिंदीच्या डोहिं : क्षणहिं नसावें ॥ ९९ ॥ प्रस्तुत मिं नंदकुमर : परि खळांचा दंडधर ॥ अव-तरलों येथुनि सत्वर : जाई काळिया ॥ ४०० ॥ ते कृष्णाइता भामिनी : सर्पाइतेतें आक्रमोनि ॥ शिराचा ठाई पीडोनि : बोलति जाली ऐसें ॥ १ ॥

**तत्रैकोवाच हे गोपा दावाग्निं पश्यतोल्बणम् ॥**
**चक्षूंष्याश्वपिदध्वं वो विधास्ये क्षेममंजसा ॥ २२ ॥**

तवं कोण्ही येकि सती : जाली आणिका कर्मातें स्मरति ॥ पुर्वि दावा-ग्नीनें गोपपंक्ति : पीडली होति ॥ २ ॥ तया दाव नळातें प्राशुन : सोडविले निजशरण ॥ त्या कर्माचें अनुकरण : करुनि ते गोपिका ॥ ३ ॥ संबोधोनि गोपाळांतें : ह्मणे पाहा या अति उल्बणातें ॥ दावाग्नि हा तुमतें : पीडावया आला ॥ ४ ॥ तरि तुह्मीं समस्तिं जनिं : मज कृष्णानिकट असोनि ॥ अति त्वरें करुनि : नेत्र झांका आपुलाले ॥ ५ ॥ या उल्बणनाशें तुमतें : देईन उत्तमा क्षेमातें ॥ सुखेंचिकरिं सर्वांतें : राखेन यापासुन ॥ ६ ॥ एवं एक जाली कृष्णाकृती : इतर जालिया गोपपंक्ति ॥ आचरती जाली ये रीति : दावाग्निआख्यानातें ॥ ७ ॥

**बद्धान्यया स्रजा काचित्तन्वी तत्र उलूखले ॥**
**भीता सुदृक्पिधायास्यं भेजे भीतिविडंबनम् ॥ २३ ॥**

पूर्वि जें श्रीकृष्णजीतें : यशोदेनें बांधलें होतें ॥ दधिभांडभंगनिमित्तें : दामबंधनें जैं ॥ ८ ॥ त्या दामबंधातें स्मरोनी : कोण्ही येकि कामिनी ॥ आपण यशोदा मानोनि : मंथाभंगकोपें ॥ ९ ॥ तीणें काढुनि सुमनमाळा : बांधली दुजी येकि वेल्हाळा ॥ उखळिं घनसांवळा : बांधला जैसा ॥ १० ॥ ते जे माळाबद्धा भामिनी : श्रीकृष्णत्वें अनुकरोनि ॥ सुंदरा सुलोचनि : भीताचे परि ॥ ११ ॥ मुखातें आच्छादुनि हस्तें : दाविती जाली भयाकारातें ॥ नाना-वेक विडंबनातें : कृष्णासारिखें ॥ १२ ॥

**एवं कृष्णं पृच्छमाना वृंदावनलतास्तरून् ॥**
**व्यचक्षत वनोद्देशे पदानि परमात्मनः ॥ २४ ॥**

एवं उक्तप्रकारें करुन : कृष्ण पावतां अंतर्धान ॥ मग त्या गोपी गवेषण : कृष्णाचें करितां सर्वत्र ॥ १३ ॥ कृष्णस्थें असोनि चित्तें : विसरोनि देहभानातें ॥ कृष्णकर्मे अत्यद्भुतें : तैशाचि अनुकरल्या गोपिका ॥ १४ ॥ मागुती ते ह्रदिस्थ मूर्ति : मनोनयनातें निवविति ॥ तियेचा दर्शनिं तृषार्थि : नयनसरोजे जाळिं ॥ १५ ॥ म्हणोनि पुनः त्या सुंदरी : तया वृंदावना माझारि : पूर्वोक्ताचि परि ॥ तरुलतादिकां प्रति ॥ १६ ॥ कृष्णातें शोधित होत्साल्या : त्या वृंदावनामाजि भ्रमत्या ॥ त्यांतें जाल्या पुसत्या : जें कृष्णजी कोठें ॥ १७ ॥ चोरुनि आमुचिं चित्तें : गमन केलें नंदसुतें ॥ गेला जो येणें पंथें : तो देखिला काइ तुम्ही ॥ १८ ॥ ऐशा त्या व्रजनारी : तया वृंदावना माझारी ॥ फिरत होत्या तवं साजिरि : कृष्णपदें देखिलिं ॥ १९ ॥ त्या वृंदावनप्रदेशिं : देखत्या जाल्या कृष्णपदांसि ॥ जें दुर्लभें ब्रह्मादिकांसिं : योगीमान[illegible] ॥ २० ॥ त्या कृष्णाचें विशेषण काइ : प्रतिपाद्य जो वेदांचा ठाइं ॥ या प्रकृतीचा नाहिं : संबंध जेथें ॥ २१ ॥ ह्मणोनि परमात्मा ऐसें ज्यातें : उपनिषदिं गाइजेतें ॥ हा विश्वाभासु सर्व जेथें : असोनि नसे ॥२२॥ तोचि अधिष्ठुनि मायेतें : पावला नंदसुतत्वातें ॥ त्या परमात्मयाचि तेथें : देखिलिं पदें ॥२३॥ सुकुमारां पदांतें : त्या देखत्या जाल्या प्रशस्तें ॥ जें ध्यात होत्या स्वचित्तें : तें देखिलिं डोळां ॥२४॥ असो कृष्ण फिरतां वनिं : पदांकित केली अवनि ॥ त्या पाउलां भामिनी : देखत्या जालिया ॥२५॥ नातरि कृष्णध्यानाचें फळ : तत्प्राप्तीचा आसन्नकाळ ॥ त्या काळिं भूतळ : मुद्रांकित देखिलें ॥ २६ ॥ नाना पदमुद्रांतें नयनिं : देखिलें कुसुमस्थानिं ॥ तो ध्यानतरु तिये वनिं : फळपुष्पित जाला ॥ २७ ॥ किंवा क्रमुनि च्चिताटवी : पावल्या कृष्णपदवी ॥ मुमुक्षु पावती जेवि : श्रवणाधिकारातें ॥ २८ ॥ तेवि त्या व्रजवासिनी : कृष्णातें गवेषितां वनिं ॥ त्या पदलक्षणें करुनि : तत्प्राप्तीची वाट ॥ २९ ॥ आतां कृष्णाचि तें पाउलें : हें कैसें



त्यांसि कळलें ॥ ज्या चिन्हेंकरिं तर्किलें : कृष्णपदातें ॥ ३० ॥ ये विषइं निरुपण : उत्तर श्लोकेंकरुन ॥ राया परीक्षिती लागुन : निवेदिजेतें श्री-शुकें ॥ ३१ ॥

**पदानि व्यक्तमेतानि नंदसूनोर्महात्मनः ॥**
**लक्ष्यंते हि ध्वजांभोजवज्रांकुशयवादिभिः ॥ २५ ॥**

त्या पाउलांतें देखोनि : ऐसें लाक्षिलें गोपीजनिं ॥ म्हणती हें पदें भर्वसेनि : नंदसुता कृष्णजीचीं ॥३२॥ यासि हेतु म्हणाल काइ : तरि यां सुंदरा पदांचा ठाइं ॥ देखिलें राया तिहिं : रेखामय ध्वजादिकांतें ॥ ३३ ॥ तो रेखामय ध्वज : भक्तशत्रुजैताची पैज ॥ तैसेंचि रेखांकित पंकज : आणि चक्र अंकुश यव ॥ ३४ ॥ या चिन्हें त्यांसि लाक्षिलें : जें हें नंदसुताचिं पाउलें ॥ त्यांतें देखोनि मन निवालें : त्या गोपिकांचें ॥ ३५ ॥ ह्मणाल त्या पदांचा ठाइं : यां चिन्हांसि हेतु काइ ॥ ऐसें सर्वत्र कां नाहिं : या साधारणिं जनिं ॥३६॥ तरि हा नंदात्मज कृष्ण : हें दाविलें विडंबन ॥ परि तो जीवधर्मविहीन : परमात्मा व्यापक किं ॥ ३७ ॥ त्या परमात्मयांचिं पाउले : एसें प्रकट त्यांसि कळों आलें ॥ तें चिन्हें देखोनि गमलें : जें हें कृष्णाचिं पदें ॥ ३८ ॥ एवं असाधारणां चिन्हिं : हे कृष्णाचिं पदें म्हणोनि ॥ वोळखोनि भामिनी ॥ पावल्या आश्रयो ॥ ३९ ॥ जेवि उपपत्तीचेनि पंथें : असंभावनेतें परतें ॥ करोनि मुमुक्षुचिं चित्तें : निदिध्यासन करिति ॥४०॥ मग त्या अभ्यासप्रवृत्ति : साक्षात्कारातें पावति ॥ तेवी त्या गोपिका सती : गवेषणमिषें ॥ ४१ ॥ शोधितां कृष्णजीतें : तवं देखिलें पदमुद्रेतें ॥ मग विचारिती जें कृष्णातें : पाविजेल आतां ॥ ४२ ॥ जेथें साक्षात् कोण्ही न सरति : परि आभासद्वारें पावती ॥ ते क्षापद आकृति : कृष्णाभास जाला ॥ ४३ ॥ आतां याचि द्वारें करुन : पावोन आह्मी श्रीकृष्ण ॥ या हेतु तो गोपीगण : पुढें जाता ऐसें जालें ॥ ४४ ॥

**तैस्तैः पदैस्तत्पदवीमन्विच्छंत्योग्रतो बलाः ॥**
**वध्वाः पदैः सपृक्तानि विलोक्यार्ताः समब्रुवन् ॥ २६ ॥**

त्या त्या पाउलें करुन : कृष्णप्राप्तितें अनुलक्षुन ॥ त्या मार्गातें अनुसरोन : त्या समस्ता अबला ॥ ४५ ॥ स्मरोनि रूप सांवळें : तिहिं पुढें गमन केलें ॥ तों येक नवल देखिलें : आईक राया अत्यद्भुत ॥ ४६ ॥ सुक्ष्म करुनि अंतःकरण : निवाडें केलें अवलोकन ॥ तवं त्या पदामाजि आन : देखिलिं पदें विलक्षण ॥४७॥ जेवि उपनिषदाचा संभार : तेथें शास्त्राचा संचार ॥ त्या वाक्याचा निर्धार : करावया प्रवर्ते ॥४८॥ तेवि वधूशब्दें करुनि : कोण्ही येकी विलासिनी ॥ जे सर्वांची दृष्टि चोरुनि : कृष्णासवें होति ॥४९॥ तियेतें घेउनि कृष्ण : असोनि जाला अदर्शग(न) ॥ किंवा वृत्ती येकवाटुन : त्यां गोपिकांचिया ॥५०॥ ते वळली एकि मूर्ति : कृष्णा सांगातें जे होति ॥ नाना कोण्हीं अचिंत्यशक्ति : या क्रीडेचें निमित्त ॥ ५१ ॥ असो कृष्णाचि हेचि शक्ति ॥ त्या सवें जे कीं होती ॥ तर्णीचि आणिली व्यक्ति : उक्त जे वधु ॥५२॥ त्या स्त्रियच्या पादिं करुनी : मिश्रित कृष्णपदश्रेणी ॥ तीतें देखोनि भामिनी : त्या सर्वांहि ॥५३॥ कृष्णप्रेमाचेनि पडिभरें : बोलतीं त्या परस्परें ॥ आईक राया मनोहरें : गोपीचि वाक्यें ॥ ५४ ॥

**कस्याः पदानि चैतानि याताया नंदसूनुना ॥**
**अंसन्यस्तप्रकोष्ठायाः करेणोः करिणा यथा ॥ २७ ॥**

अवो हें नवल पाहिलें : या कृष्णपदामाजि सकळें ॥ कोणाचिं दिसती पाउलें : विलक्षणे स्त्रियेचिं जें किं ॥ ५५ ॥ चोरुनि आमुचिं चित्तें : कोण हे कृष्णा सांगातें ॥ गेली हें तीयेचि निश्चितें : पाउलें पाहावीं ॥ ५६ ॥ असो जीचे स्कधीं प्रस्तुतः हात ठेउनि रमानाथ ॥ विचरत गेला निश्चित : तियेचि हें पदें ॥ ५७ ॥ एवं प्रकोष्ठ शब्दें करुन : हस्त प्रदेशाची खुण ॥ त्या हातातें स्कंधि ठेउन : तियेचा समागमें ॥ ५८ ॥ या वनिं जाला विचरता : आह्मासि गुप्त होत्साता ॥ तो नंदसुत जीचा रक्षिता : तियेचिं हें पदें निश्चित ॥ ५९ ॥ जेवि करितां वाक्येविवेचन : हें मायाकार्य जगद्भान ॥ ब्रह्मेंसिं अति विलक्षण : सर्वप्रमाणांतरिं ॥ ६० ॥ तेवि पाहातां सूक्ष्मावृत्ति : हें कृष्णपदें नव्हति ॥ तत्संगें तद्रक्षिता जे सती : त्या कांतेचिं हें पदें ॥ ६१ ॥

त्या वधुतें सर्वें रक्षून : नंदसुतें केलें गमन ॥ कोणें दृष्टांतें करुन : तारि तेंहिं आइकावें ॥ ६२ ॥ करी पदाचें व्याख्यान : हस्ती ऐसें अभिधान ॥ त्या मत्त गजें रक्ष्यमाण : गजिनी जेवी ॥ ६३ ॥ तियेचा खांदिं शूंडेतें : ठेउनि तेणें विचरिजेतें ॥ तेवि येणें नंदसूतें : विचरतां वनामाजि ॥ ६४ ॥ कांतेच्या खांदीं स्वकर : ठेउनि करिजे तो विहार ॥ तेणें गुप्त केली जे सत्वर : त्या प्रियेचिं हें पदें ॥६२॥

**अनयाराधितो नूनं भगवान् हरिरीश्वरः ।**
**यन्नो विहाय गोविंदः प्रीतो यामनयद्रहः ॥ २८ ॥**

ह्मणोनि हे भाग्यवती : इया निश्चयेंसि श्रीपति ॥ आराधिला ज्यातें गातिः वेदशास्त्रें सदां ॥ ६६ ॥ अवो प्रस्तुत तो नंदसुत : परि साक्षात् भगवंत ॥ षड्गुणैश्वर्ययुक्त : जगदीश्वर जो ॥ ६७ ॥ ज्याचे स्मरणमात्रें करुनि नाशती दुरितश्रेणी ॥ जो सज्जनाचे अंतःकरणीं : वर्ततु असे ॥ ६८ ॥ तो यिया आराधिला : तेणें ईश्वर पावला ॥ साक्षात् हरी फळला : कृतार्थ जाली ॥ ६९ ॥ कांजें सांडुनि आमुतें : इयेतें वो नंदसुतें ॥ पावोनि अति प्रीतीतें : एकांति नेलें गुप्त कि ॥७०॥ जो गोविंद संज्ञे करुन : सर्वांचें एक जीवन ॥ वर्ततसे जयाचेन : चराचर जग अवघेंहिं ॥ ७१ ॥ असो चक्षुरादिकांचा नियेंता : बुद्ध्यादिकें जिया सत्ता ॥ वर्तती आणि समता : पावती जेथें ॥ ७२ ॥ एवं दुराराध्य सर्वातें: तोवश जाला वो यियतें ॥ सांडोनि आम्हा समस्तांतें : एकांतासि नेली ॥ ७३ अवो सर्व विक्षेपशून्यः यिया भोगिला श्रीकृष्ण ॥ नेणों कैसें आराधन : इला घडलें किति ॥ ७४ ॥ बहुंतक याचा भजनिं : भजती संख्या अक्षोहिणी ॥ त्यां माजि एकाधा कोण्हि : संग लाहे याचा ॥ ७५ ॥ हा जो कांहिं शास्त्रार्थ : तो प्रस्तुत जाला सार्थ ॥ आम्हा गोपिकांचें युथ : सांडोनि सकळ ॥ ७६ ॥ अखंडाकारचित्तें : अम्हि बहु आराधिलें यातें ॥ सेखिं येणें नंदसुतें : ते मानिलें नाहिं ॥ ७७ ॥ त्यांत कांहिं असेल चकि : ते आम्ही काय जाणो मुर्खी ॥ तो ह्रद्गतपारखीः चतुरांचा रावो ॥ ७८ ॥ या लागि सांडुनि आमुतें : चोरोनि सर्वांचिं चित्तें ॥

वश जाला ते येकीतें : परोपरिं श्रीकृष्ण ॥ ८० ॥ ह्मणाल ते व्रजकांता : कृष्णें जे नेली येकांता ॥ ते पावली कोण्या अर्था : ते विचारुं आह्मी ॥ ८१ ॥ अवो वनिं फिरते वेळे : तिसि काय फळ जालें ॥ काइ तियेनें जोडिलें : एकांत पावोनिया ॥ ८२ विचारीत होंत्साल्या मनि : ऐसें परस्परें मिळोनि ॥ बोलताती भामिनी : तें आईक राया ॥ ८३ ॥

**धन्या अहो अमी आल्यो गोविंदांघ्र्यब्जरेणवः ।**
**यान्ब्रह्मेशो रमा देवी दधुर्मूर्ध्न्यघनुत्तये ॥ २९ ॥**

अवो सखियांहो ये वनिं : विचरतां चक्रपाणी ॥ तत्पदयुगळापासुनि : उधळती जे रजकण ॥८४॥ ते अत्यंत वो धन्यतम : पूज्यांसि पुज्य परम ॥ असो तो महिमा निःसीम : वर्णील कवण पां ॥८५॥ ह्मणाल येवढी महंती : जाणतिली कोणे युक्ति ॥ तरि ब्रह्मा जो प्रजापति : सकळलोकगुरु ॥ ८६ ॥ आणि इश शब्दें करुन : शीव जो पार्वतीरमण ॥ ऐसे जे ब्रह्मा ईशान : त्रैलोक्याधिप होंत्साते ॥ ८७ ॥ आणि सर्व सौभाग्य खाणी : रमादेवी सिंधुनंदिनी ॥ सर्व गुणीं जे शाहाणी : लोकेशमान्या ॥ ८८ ॥ ते येवढी सांडोनि थोरी : त्या पदरजातें वाहाती शिरीं ॥ ते कोणे हेतु म्हणाल जरि : तरि दुरितक्षयार्थ ॥८९॥ तें दुरित किंलक्षण : तरि जो महत्वाभिमान ॥ तोचि दुःखाचें कारण : विक्षपकारी सर्वदां किं ॥ ९० ॥ ऐसें धरुनि ते पोटीं : ब्रह्मा कमळा धूर्जेटी ॥ त्या पदरजःकणाची वृष्टी : सदैव वाहाती आपुलाले माथां ॥९१॥ ऐसें ज्यातें महिमान : ते कृष्णपदरजःकण ॥ त्यांतें पावली ते आपणः चोरुनि आमुतें ॥ ९२ ॥ त्या सवें विचरते वेळे : ते रेणु प्राप्त जाले ॥ सर्व सुखाचे सोहळे : पावली ते कृष्णसंगें ॥ ९३ ॥ आतां असो त्या सवतीची कथा : आह्मीहिं ते रेणु धरुं माथां ॥ श्रीकृष्ण वनिं विचरतां : उमटलीं जें पदें ॥९४॥ त्यां कृष्णपदरेणू करुन : आपणातें अभिषेचुन ॥ सकळ दुरितें सारुन : पावोन कृष्णातें ॥ ९५ ॥ अवो या युक्ती आपण : पाविजेल श्रीकृष्ण ॥ परि आणिक एक विघ्न : वोडवलें येथें ॥ ९६ ॥ ऐसें धरुनि चित्तिं : त्या व्रजवनिता मागुति ॥ परस्परें ऐसें जें वदति : तें अवधारिं राया ॥ ९७ ॥

तस्या अमूनि नः क्षोभं कुर्वंत्युच्चैः पदानि यत् ।
येकापहृत्य गोपीनां रहो भुंक्तेच्युताधरम् ॥ ३० ॥

ते कृष्णासवें विचरति : जे किं आमुची सवति ॥ जियेतें घेउनि येकांति : रमतसे श्रीकृष्ण ॥ ९८ ॥ तियेचिं किं पदें हे येथें : उमटलिं कृष्णपदमिश्रितें ॥ तें अत्यंत वो आमुतें : क्षोभातें करिति ॥ ९९ ॥ असो कृष्णपदा माझारि : तियेचा पदाची हारी ॥ ते बहुं आमुचे अंतरिं : असह्य जाली ॥१००॥ यासि निमित्त ह्मणाल काइ : तरि आह्मी तो सर्वांहि ॥ अनुसरलों कृष्णपाइं : निःसंदेह येथें ॥ १ ॥ शेखि सांडुनि वंचिलें आमुतें : त्या येकीसीचि नंदसुतें ॥ निजअधरांमृतासवातें : देउनि भोगिलें एकांतिं ॥ २ ॥ ह्मणोनि तियेचा पाउलिं : आमुचिं चित्तें क्षोभविलिं ॥ जिया एकांतिं भोगिली : कृष्णाधरसुधा ॥३॥ असो दुर्दैवनिमित्तें : आह्मासि सांडिलें नंदसुतें ॥ पारि तियेनें हि येथें : साह्य केलें नावेक ॥४॥ अवो तो भगवंत : सदा भक्तांचा वेळाघीत ॥ विचरावया निमित्त : भक्तसंगाचि तयासि ॥५॥ यालागि तिया वेल्हाळा : एकांतिं कृष्ण आराधिला ॥ तितुकेनिचि केला : चलितार्थ तेणें ॥६॥ ते न जाती जरि एकांता : तरि कां वो आम्हासि सांडिता ॥ पावतों अधरामृता : सर्वांहि आह्मी ॥ ७ ॥ एवं आमुचें जविन : तेचि यकांतिं आपण ॥ सर्वांसि विभाग नेंदुन : सेविती जाली येकली ॥ ८ ॥ नातरि ते पुण्यवती : आह्मासि निजसंग देति ॥ तेणे गोपी समस्ति : पावतों अधरसुखातें ॥ ९ ॥ पारि ते करुनि षठता : येकली जाउनि एकांता ॥ प्रसंन्न करुनि स्वकांता : अधरातें सेविलें ॥ १० ॥ ह्मणोनि तें पदें येथें : जें कृष्णपदेसिं मिश्रितें ॥ त्यातें देखोनि आमुतें : क्षोभ होतो भारि ॥ ११ ॥ तोंचि होउनि आवरण : न घडे तद्रेणुवंदन ॥ अवो चित्तस्वास्थें करुन : साधने फळति ॥ १२ ॥ असो ते कैंचि सवति : केवळ दुरादृष्टाची मूर्ति ॥ घडोनि आह्मा ये रीति : दुःखकारी जाली ॥ १३ ॥ अवो जोंवरि चित्तिं आवरण : तंवरि प्राप्त नव्हे कृष्ण ॥ अति निकट असोन : दुर्‍हावला बहुं ॥ १४ ॥ आतां विचारु एकि युक्ति : तें पदें असोतु परति ॥ त्यांकडे न पाहोन चित्तिं : कृष्णपदेंचि असोत ॥ १५ ॥ श्रीकृष्णातें स्मरो-

न : तत्पदराजि ठेउं मन ॥ सर्वथा पापविहीन : आह्मी पावों कृष्णातें ॥ १६॥ जेवि योगी जे असति : ते विजातीयातें त्यजिति ॥ केवळ वस्तु चिंतिती : निदिध्यासनें ॥ १७ ॥ तेवि सांडु वधुपदातें : पाहों कृष्णपदांकातें ॥ ऐसें चिंतुनि गोपीव्रतें : चालिलि पुढें पुढें ॥ १८ ॥ तवं क्षोभाचें कारण : आणिक वोडवलें दारुण ॥ कारितां पदविवेचन : ऐसें जें कांहिं जाहलें ॥१९॥

नलक्ष्यंते पदान्यत्र तस्या नूनं तृणांकुरैः ॥
खिद्यत्सुजातांघ्रितलामुन्निन्ये प्रेयसीं प्रियः ॥ ३१ ॥

ते जे कृष्णासवें होति : जियचा पदांची व्यावृत्ति ॥ करुनि त्या गोपी सती : चिंतिती कृष्णपदातें ॥ २० ॥ तत्पादिं ठेउनि दृष्टीतें : चालिल्या विवेचनपंथें ॥ तवं त्या वधुपदातें : न देखती पुढें त्या ॥ २१ ॥ न देखोनि तें इतरें : बोलत्या जाल्या परस्परें ॥ ह्मणती पाहातें क्षोभकरें : न दिसति पदें तियेचिं ॥ २२ ॥ विचारा वो तुह्मी समस्ती : येथें पदें दिसत होतिं ॥ तें आतांचि कां वो सती : न लक्षती आमुतें ॥ २३ ॥ ह्मणाल यासि हेतु काइ : तरि ऐसें तर्कतसे काहिं ॥ जें तीचा सुकुमारां पाइं : हे तृणांकुर रु-तले ॥ २४ ॥ त्या तृणस्पर्शे काठिण्ये : तें पदतळें जालि खिन्ने ॥ चालतां न ये तेणें गुणें : गति कुंठित जालि ॥२५॥ ऐसें जाणोनि नंदसुतें : निज-प्रेमळाचेनि कांतें ॥ उचलोनि त्या प्रियेतें : निजखांदां बैसविलें ॥ २६ ॥ अवो या वेगळें कांहिं : आणिक तों तर्क नाहिं ॥ आह्मीं अभाग्याच्या बाइ : अंतरलों त्यातें ॥ २७ ॥ पाहा वो आह्मीं समस्ता : गोपिव्रत(?) श्रीकृष्ण-भक्ता ॥ त्यांमाजि येकीचि कांता : प्रिया जाली त्यातें ॥ २८ ॥ एवं पा-होनि पदांकातें : चिंतित होत्या कृष्णातें ॥ तवं ऐसें लक्षुनि वधूतें : विरह जाला ॥ २९ ॥ जेवि कोण्ही मुमुक्षुजन : शांता जनातें देखोन ॥ आपणातें मानिती हीन : जें धिग्जीवी आह्मी ॥ ३० ॥ अद्यापि कां भगवंतें : नांगी-करिजे आमुतें ॥ हें चंचळ चित्तें शांतें : नव्हेति कां आमुचिं ॥ ३१ ॥ तेवि जालें गोपिकांतें : स्मरोनि कृष्णप्रियेतें ॥ त्या कामिनींचि चित्तें : वि-रहखिन्ने जालिं ॥ ३२ ॥ आठवित चरणयुगळ : चित्त जालें उतावेिळ ॥

विशेष तळमळ : जालिया त्या अधीरा ॥ ३३ ॥ मागुता तो गोपीजन : याचि अभिप्रायें करुन ॥ श्लोकत्रयें विवेचन : करितुसे राया ॥ ३४ ॥

**इमान्यधिकमग्नानि पदानि वहतो वधूम् ।**
**गोप्यः पश्यत कृष्णस्य भाराक्रांतस्य कामिनः ॥ ३२ ॥**

हे कृष्णाची पदरजश्रेणी : जे सर्व मंगळाचि खाणी ॥ सर्वतापोपशमनी : पापहर्ति जे ॥ ३५ ॥ असो इये भूमीचा ठाई ; पदें उमटलि जें काहिं ॥ त्यातें आह्मीं सर्वांहि : अवलोकित आलों ॥ ३६ ॥ जें आलिं येथपर्यंत : ते पुढें दिसती विपरीत ॥ पाहा नवल हें भूमी आंत : अधिकाचि बुडालि ॥ ३७ ॥ असो इये भूतळिं : अधिके दिसती रुतलिं ॥ विचारितां वो ये काळिं : यासि येक हेतु असे ॥ ३८ ॥ तरि तो नंदसुत ; त्या वधूचा ठाइं आसक्त ॥ जाला हें नेमस्त : वडोनि आलें ॥ ३९ ॥ तत्पदिं जे अनुसरति : त्यांची त्यासि बहुं प्रीति ॥ यालागि त्याची ख्याति : कामी ऐसी जाली ॥ ४० ॥ अत्रो विशेषें यासि भजति : तेथें ऐसीचि याची गति ॥ सदां तो असोनि समस्थिति : वस्तुगत्या विषमता दाविते ॥ ४१ ॥ असो वाहातां त्या वधुतें : तेणें भाराक्रांत होंत्सातें ॥ बळें चालतां हें समस्तें : रुतालिं पदें दिसति ॥ ४२ ॥ असो तो नंदसुत : कामी जाला निश्चित ॥ त्या कामिनी समवेत : अत्यंत रमतो प्रीतीकरिं ॥ ४३ ॥ ह्मणाल हा तर्क तुमतें : कैसा जाला स्वचित्तें ॥ तरि या अनुमानासि येथें : कारणांतर आइका ॥ ४४ ॥

**अत्र प्रसूनावचयः प्रियार्थे प्रेयसा कृतः ।**
**प्रपदाक्रमणे एते पश्यतासकले पदे ॥ ३३ ॥**

पाहा येथें त्या गोपीकांतें : त्या प्रियेचा प्रीतिवंतें ॥ पुष्पावचय केला तुमतें : दिसतो किं हा ॥ ४५ ॥ असो तिये प्रिये कारणें : वेंचिलिं येथें प्रसूमनें ॥ ह्मणाल हें कोणें लक्षणें : अनुमान घडलें ॥ ४६ ॥ तरि पाहा या उंचा सुमनजाति : तेथें न पुरे हस्तगति ॥ ह्मणोनि तो गोपीपति : उंच जाला ॥ ४७ ॥ मग उंचावते वेळे : पार्ष्णी दोन्ही उचलिले ॥ तेणे करिं दडपिलें : प्रपदाग्र अर्धपदातें ॥ ४८ ॥ असो टांचुवांतें उचलोनि : चवडे

द्डपिले दोन्हि ॥ त्या निमित्तें येथें मेदिनी : अर्धपदांकिता जाली ॥ ४९ ॥ ह्मणोनि असकळें पदें : हें पाउलें अर्धांधें ॥ उमटालिं नंदानंदें : हें नवल कैसें केलें ॥ ५० ॥ नाना तें अपरिच्छिन्नें : परि वधुसंगें भासती न्युनें ॥ नेणो आमुचिचि मनें : अपूर्णें जालिं ॥ ५१ ॥ एवं ते धीट सवति : भुलविला किं आमुचा पति ॥ सांगावा विशेष किति : अवधारा वो आणिकहि ॥ ५२ ॥

**केशप्रसाधनं त्वत्र कामिन्याः कामिना कृतम् ॥**
**तानि चूडयता कांतामुपविष्टमिह ध्रुवम् ॥ ३४ ॥**

अवो सती होंये टाइं : नवल वितलें पाहा काइ ॥ जिये कामिनीचा ठाईं : कामीं होंत्साता श्रीकृष्ण ॥ ५३ ॥ तीचे केशप्रसाधन तेणें : केलें वो स्वहस्तें कृष्णें ॥ केशप्रसाधनवचनें : केंस सुमनें गुफिलें ॥ ५४ ॥ ते कोणें लक्षणें करुन : तरि आधिं केंस विंचरुन ॥ पुष्पें जें घेतालिं वेंचुन : पुर्वोक्त प्रकारें करिं ॥ ५५ ॥ तियचा शिरिं पुष्पात्राळि : तेणें कैसी वो गुंफिली ॥ एवं ते रंजविली : केशप्रसाधनें करुन ॥ ५६ ॥ ह्मणाल हें तुमतें : कैसें जाणवलें निरुतें ॥ तरि धरुनि त्या कामिनीतें : पुढें बैसविलें ऐसें ॥५७ ॥ अवो निजजानुचा अंतरिं : बैसविली तेणें सुन्दरी ॥ पाहा त्याचिया पदा भितरि : तियेचिं पदें दिसती ॥ ५८ ॥ तीस घेउनि बैसला येथें : तुह्मी पाहा वो हें निश्चितें ॥ त्या दोघांचि पदें हें मिश्रितें : बैसलिं दिसती ॥ ५९ ॥ जेवि श्रवणमननें करुन : भेदातें मनिं नुरउन ॥ कारिती निदिध्यासन : गुरुपादिष्टशास्त्रैकमतें ॥ ६० ॥ त्यांचि हें विशेषणें : ब्रह्मेसि घडती समानें ॥ तन्हि सूक्ष्म संकल्पाचेनि गुणें : वेगळिंसिं निवडति ॥ ६१ ॥ तेवि सखियां वो येथें : तें उभयपदें निश्चितें ॥ दिसती पाहा हें तुमतें : मानवलें कि नाहिं ॥ ६२ ॥ एवं लक्षुनि तदाभिमान : कृष्णें केलें अंतर्धान ॥ तेणें गोपिकांचे मन : विशेषें आकर्षिलें ॥ ६३ ॥ आकर्षोनि त्यांचि चित्तें : प्रेरिलें गवेषणातें ॥ गवेषण कारितां त्यांतें : स्फुरली यकि सति ॥ ६४ ॥ नाना स्फुरली जे सती : ते कृष्णाची अनादि शक्ति ॥ जे किं भक्तांची भक्ति :

अभक्तांसि माया ॥ ६५ ॥ कांहिं होतां दृश्यस्फुरण : तांचें होय आवरण ॥ आनि येथुनि परततां मन : ते भक्ति होउनि ठाके ॥ ६६ ॥ ह्मणोनि ते कृष्णशक्ति : तिया आकार्षिला हस्तिं ॥ अंतरिं ते कृष्णमूर्ति : सुभरोनि त्या गोपी ॥ ६७ ॥ त्या क्रीडेतें अनुकरोनि : क्रीडलिया तिये वानीं ॥ सुभरोनि कृष्णमनीं : अनुवादल्या परस्परें ॥ ६८ ॥ आतां जे कांहिं भामिनी : एकांतिं अनुसरोनि ॥ जियेसि रमला वानीं : भाळोनि श्रीकृष्ण ॥६९॥ जिया प्रसंगें करुन : वर्णिले कामासक्तपण ॥ तरि तो कामपूर्ण : तेथें आसक्ति कैंचि ॥ ७० ॥ लंपटाचिया रीति : कृष्णासिही स्त्रीआसक्ति ॥ ऐसी कदाचित् रायाचा चित्तिं : आशंका होइल ॥ ७१ ॥ ह्मणोनि शंकापरिहरण : श्रीशुकाचें अग्रें वचन ॥ तें यथामति व्याख्यान : करिजेल आईका ॥ ७२ ॥

**रेमे तया चात्मरत आत्मारामोप्यखंडितः**
**कामिनां दर्शयन्दैन्यं स्त्रीणां चैव दुरात्मताम् ॥ ३५ ॥**

ते जे पूर्वोक्त सती : जन्हि कृष्णतंत्र विचरत होति ॥ तन्हि तिचा ठाइं आसक्ति : दाविली कृष्णें ॥७३॥ असो तिये सहवर्तमान : रमता जाला जे कांहिं श्रीकृष्ण ॥ स्कंधारोहण केशप्रसाधन : संभोगादिकिं जो ॥ ७४ ॥ तो आत्माराम अखंडित : जन्हि अस्खलितरेत ॥ प्रमेयप्रमाणातीत : सुखस्वरुप जो किं वस्तु ॥ ७५ ॥ हें जें सद्वितीय भान : ज्याचिया माया विलसमान ॥ हें ज्याचा ठाइं नसोन : आभासत असे ॥ ७६ ॥ त्यासि हें उक्ताचरित : परमार्थे अघटित ॥ तथापि कामी जे विषयासक्त : त्यांचें दैन्य दाखविता होत्साता ॥ ७७ ॥ जे किं कामलंपट जन : होती स्त्रियांचे अतिदीन ॥ वर्तती जे तयां अधीन : क्रीडामृग जैसे ॥ ७८ ॥ आणि स्त्रिया ज्या दुर्मती : दुर्गतीतें ज्या योग्य होती ॥ त्यांची ही स्थिति गति : दाखवीत होत्साता ॥७९॥ वास्तवें त्याचा ठाइं : ते स्त्रीव्यक्तीचि विशेषें नाहिं ॥ मा आसक्ति कैंचि काइ : सर्वसत्तास्वरुपातें ॥८०॥ नविक व्यक्तितें अधिष्ठुन : खवळुनि गोपींचें मन ॥ त्यांचे गर्वपरिहरण : आरंभिलें पुरतें ॥ ८१ ॥ एवं प्रसंगें करुन : रायाचें शंकापरिहरण ॥ करिता जाला व्यासनंदन : तें वर्णिलें म्या

यथामति ॥ ८२ ॥ मागुती कथान्वयातें : अनुसरोनि मुनिनाथें ॥ काइ जाले बोलिजेतें : वर्णिजेल तेंहि ॥ ८३ ॥

**इत्येवं दर्शयंत्यस्ताश्चेरुर्गोप्यो विचेतसः ।**
**यां गोपीमनयत्कृष्णो विहायान्याःस्त्रियो वने ॥३६ ॥**

एवं पूर्वोक्तें करुन : विरहाकळित गोपीजन ॥ करितां कृष्ण गवेषण : तदनकार दाविले ॥ ८४ ॥ आणि एकांतीं नेउन : त्या प्रियेसि अनुसरोन ॥ असोनि तिये अधीन : वर्तला कामियांचे परीं ॥ ८५ ॥ त्याही कृष्णविहारातें : दावित्या जाल्या येकियेकीतें ॥ पुष्पचर्यादि संभोगातें : परस्परें गोपिका ॥ ८६ ॥ गलितचित्ता असोनी : फिरत्या जाल्या ते वनीं ॥ श्रीकृष्ण सुमरोनि मनिं : उद्विग्न होत्सात्या ॥ ८७ ॥ आतां सांडोनि समुदायातें : आधिष्ठुनि येकांतातें ॥ ज्या गोपीचे सांगातें : रमला कृष्ण उक्तलक्षणें ॥८८॥ तियची जे काहिं कथा : तेही अनुवादिजेल आतां ॥ त्या प्रसंगें दुर्भगता : प्रकटेल स्त्रियांचि ॥ ८९ ॥

**साच मेने तदात्मानं वरिष्ठं सर्व योषिताम् ।**
**हित्वा गोपी : कामयाना मामसौ भजते प्रिय : ॥ ३७ ॥**

ते विचरतां कृष्णासांगातें : मानिती जालि धन्यतेतें ॥ जें नाहिं आपणापरतें : स्त्रियांमाजि वरिष्ठ ॥ ९० ॥ भोगानुकुळा सुंदरा : नाहिं मजहुनि इतरा ॥ अतिशयें नंदकुमारा : प्रिया मिं धन्य या जगिं ॥ ९१ ॥ कां जे सर्वाही गोपांगना : अत्यंत कामसदना ॥ सर्वस्वें कामासक्तामना : रमणीया कृष्णाचा ठाइं ॥ ९२ ॥ असो आम्हि या समस्ता : सर्वथा श्रीकृष्णासक्ता ॥ अति प्रेमे आकळिता : सरिशावि आलों ॥ ९३ ॥ तऱ्हीं सांडोनियां गोपीतें : निजविरहाकाळितांतें ॥ अनुसरला मज प्रियेतें : सर्वप्रिये जो कृष्ण ॥ ९४ ॥ तस्मात् हेंचि जालें निश्चित : जें मि आढ्य सर्वसंमत ॥ चातुर्यसौंदर्यमंडित : मजसारखि नाहिं ॥ ९५ ॥ ऐसी त्यासवें विचरति : आपणातें धन्य मानिती ॥ बुडोनि गेली ते सती : अभिमानसागरिं ॥ ९६ ॥ असो ते अति दसा भामिनी : कृष्णासवें रमतां वनि ॥



चालत पुढें जाउनि : उभी राहिली उत्तरवानें ॥ ९७ ॥ नाना श्रीकृष्णें आप्त केली : तेणें महत्व पावली ॥ परि त्या गर्वें आकळिली : आणिली जातिस्वभावा ॥ ९८ ॥

**ततो गत्वा वनोद्देशं दृप्ता केशवमब्रवीत् ॥**
**न पारयेहं चलितुं नय मां यत्र ते मनः ॥ ३८ ॥**

मग गर्वमत्त होंत्साती : कृष्णेंसिं जाली बोलती ॥ पुराणें जयातें गाति : केशव इये आख्यें कारि ॥ ९९ ॥ ह्मणे माझे पाय दुखति : पुढें चालतां नव्हे प्रवृत्ति ॥ मिं अति सुकुमारा सती : अस(श)क्त ये विषइं ॥ १०० ॥ कृष्णा तुजसवें गमन : करावया नव्हे चळन ॥ जैसें जाणेल तुझें मनः तेथें घेउनि जाईं मज ॥ १ ॥ असो मानेल जैसें तुतें : तैसें घेउनि जाईं मातें ॥ परि चालावया मिं येथें : योग्ये नव्हें कदा आतां ॥ २ ॥ एवं हे जे बोलिली भामिनी : तेथें ऐसें आलें घडोनि ॥ जें कोण्ही येक ये जनि : कदाचितू काकतालिन्यायें ॥ ३ ॥ अनुसरोनि शास्त्रादिकिं : स्वरुपेंसि कारि येक वंकि ॥ तेणे प्रसंगें या लोकिं : प्रतिष्ठा पावे ॥ ४ ॥ सदाभ्यासाचेनि योगे : भगवत्प्रसादप्रसंगे ॥ लाहोनि युक्तसौभाग्यें : आंथिला होय तो ॥ ५ ॥ तेणें तो अभ्यासी : तत्काळ पावे गर्वासि ॥ फळ पर्यंत पावणें जें त्यासि : तें राहिलें येणें सर्वेहि ॥ ६ ॥ अभिमान जालियां त्यातें : प्रवृत्तीचि नव्हे चित्तातें ॥ पावालियावारिहि थितें : दुऱ्हावलें सुख ॥ ७ ॥ योग्यतेचे सामर्थें : जाणतों स्वाधिकारातें ॥ परि पडोनि प्रतिष्ठागर्ते : न प्रवर्ते साधनिं ॥ ८ ॥ प्रतिष्ठेतें अनुसरोनि : बाहीर कारि जोगावणी ॥ बोलें कपटां वचनि : जें भगवंत तारिता ॥ ९ ॥ प्रतिष्ठेहुनि न ढळे : आणि ईश्वरातें प्रार्थि बळे ॥ ह्मणे आह्मासि रमालीळें : करावी कृपा ॥ १० ॥ तैसीच ते मुर्ख सति : गर्वेंकरीं हारविली मति ॥ जे प्रार्थिलें कृष्णाप्रति : मान इच्छुनियां ॥ ११ ॥ कृपाळुवें रमाकांतें : जाणोनि सत्वशुद्धितें ॥ एकदां उचलिलें होतें: तवं गर्वें सोंकली ते ॥ १२ ॥ तैसीचि पडकली तेथें : इछिती जालि मागुतें ॥ जें पूर्ववत् भगवंतें : उचलुनि घ्यावें खांदां ॥ १३ ॥ ते स्वाधिकारें भ्रष्टली :

पूर्वस्थिति विसरली ॥ गर्वेंकरिं जे चेवली : कृष्ण नेवे तियेतें ॥ १४ ॥ नातरि हें असो येथें : युक्ति रचिली भगवंतें ॥ जें मजलागि गोपीशतें विकळें फिरती जे ॥ १५ ॥ असो विरहार्ता त्या कामिनी : इतस्तती भ्रमती वनिं ॥ यांसि धीर विचारुनि : उपेक्षिली ते गोपी ॥ १६ ॥ त्या साभिप्राया उक्ती : गोपीतें बोलिला कृष्ण प्रिति ॥ तें अवधारिं सावधमति : परीक्षिता राया ॥ १७ ॥

**एवमुक्त : प्रियामाह स्कंधमारुह्यतामिति ।**
**ततश्चांतर्दधे कृष्णः सावधूरन्वतप्यत ॥ ३९ ॥**

उक्त प्रकारें करुन : आइकोनि वधूवचन ॥ तिया बोलिला होंत्साता कृष्णः तियतें बोलिला ऐसें ॥ १८ ॥ जें माझिया स्कंधाप्रति : तुवां बैसावें वो प्रियेसति ॥ एसें मंजुळ श्रीपति : बोलिला असतां ॥१९॥ आइकोनि कृष्ण-वचना : सरिसावली ते अंगना ॥ करावें जों आरोहणा : तवं अकस्मात ॥ २० ॥ ठकुनि तियतें कृष्ण : पावला तो अंतर्धान ॥ नाना प्रकटचि असोन : ते गर्वांध जाली ॥ २१ ॥ तो निकट असोनि श्रीपति : दूरि जाला तियेप्रति ॥ मग तद्वियोगें सती : खिन्न जाली ते ॥ २२ ॥ ते वधू श्रीकृष्णे वीण : सकळ देखोनि शून्य ॥ तप्त होंत्साती अति दीन : आक्रोशिती जाली ॥ २३ ॥

**हा नाथ रमण प्रेष्ठ कासि कासि महाभुज ॥**
**दास्यास्ते कृपणाया मे सखे दर्शय सन्निधिम् ॥ ४० ॥**

अगा ये स्वामी नाथा : श्रीकृष्णा नन्दसुता ॥ प्रियोत्तमा प्रेष्ठा कांता : रमणस्वरूपा श्रीहरी ॥ २४ ॥ सौंदर्यश्रिया सदना : महांभूजा मनोरमणा ॥ अगा ये क्लेशहरणा : कोठें पाहावें म्या तुज ॥ २५ ॥ मज कृपण दीनेसि : सांडोनि कां गा गेलासि ॥ खोंचिले माझिया प्राणासि : कोठें आहेसि तुं ॥ २६ ॥ सखया देईं दर्शन : सत्वर करिं सन्निधान ॥ अन्यथा गा माझे प्राण : वांचतीना कृष्णा आतां ॥ २७ ॥ एवं प्रसंगें करुन : स्त्रियांचें दावेंले दौर्जन्य ॥ आणि पतनासि कारण : साधकातें हा गर्व ॥ २८ ॥

परि प्रस्तुत गोपीगण : निजवियोगें तापोन ।। इकडे तिकडे वणवण : फिरत होता उद्विग्न ।। २९ ।। त्यासि निजप्राप्तीचें द्वार : हे वधू पाठविली समोर ।। नावेक करुनि धीर : शुद्धि दाविलि आपुलि ।। ३० ।। त्यांच्या गर्वाची निवृत्ति : जाणोनि केली हे युक्ति ।। आपणा जवळ होती : ते मेळविलि तयांतें ।। ३१ ।। नातरि कोण्ही येकि शक्ति : भक्तां तें भजविति ।। तेणें रुपें गोपी सती : ते पाठविली सांप्रति ।। ३२ ।। येणें लक्षणें करुन : ऐसें घडलें निरुपण ।। जें श्रीकृष्णा पासुन : अंतरली जे गोपी ।। ३३ ।। ते त्या समुदायाप्रति : प्रविष्ट जाली कोणे रीती ।। कैसी जाली संगति : परस्परें तीहिं ।। ३४ ।।

**अन्विच्छंत्यो भगवतो मार्गं गोप्योविदूरतः ।।**
**ददृशुः प्रियविश्लेषमोहितां दुःखितां सतीम् ।। ४१ ।।**

त्या ज्या सर्वा गोपांगना : कृष्णचिंतापरायणा ।। भगवन्मार्गाचि विवेचना : करित ज्या होत्या गोपी ।। ३५ ।। तवं अकस्मात् त्या सतीतें : प्रियविश्लेषमोहितेतें ।। दुरूनि अति दुःखितें : देखिलें तिहिं त्या वनिं ।।३६।। असो कृष्णवियोगनिमित्तें : मोहगर्तें पतितेतें ।। तिय दुखिते सतीतें : समीप देखत्या जाल्या त्या गोपी ।। ३७ ।। ।।

**तया कथितमाकर्ण्य मानप्राप्तिं च माधवात् ।।**
**अवमानं च दौरात्म्याद्विस्मयं परमं ययुः ।। ४२ ।।**

मग जाउनि समीप : देखोनि खिन्नस्वरुप ।। पुशिलें तियेतें अनुरुप : वर्तमान गोपीहिं ।। ३८ ।। मग तिया केलें कथन : त्या वृत्तातें आइकोन ।। राया आइक तो गोपीगण : पावला अति विस्मयो ।। ३९ ।। तें कथित किं-लक्षण : तरि कृष्णपासुनि मान ।। सवेंचि अपमान : निजगुणेंकरिं पावलीं ।। ४० ।। असो स्वदुर्बुद्धिमुळें : कृष्णें जें अवमानिलें ।। गुप्त होउनि सां-डिलें : वनामाजि येकलें ।। ४१ ।। नाना वियोगानुतापें : प्रकटलिं निजपापें ।। मानाभिमानविक्षेपें : दुऱ्हावला कृष्ण ।। ४२ ।। ऐसें अवघे वर्त्तमान : तिया केलें निवेदन ।। तें आइकोनि गोपीजन : निराभिमान जाला ।।४३।। नाना न

कळे कृष्णमाहिमा : ऐसें जाणोनि त्या रामा ॥ विशेषें कार्ष्णि सकामा : वि-स्मित जाल्या ॥ ४४ ॥ किवां वधूचेनि मूळें : कृष्णें कवसाल केलें ॥ तेणें गर्वातें स्मरविलें : गोपिकां कारणें ॥ ४५ ॥ कां जे कोण्हि गर्व-ग्रस्तें : होती आरूढ पतितें ॥ ऐसा अभिप्राय सर्वातें : दाविला या प्रसंगें येथें ॥ ४६ ॥ अभिमानाचे निवृत्ति : देवातें भक्त प्रिय होति ॥ आणि भक्तियोगें वशवर्ति : देव होय भक्तातें ॥ ४७ ॥ दाविलें याही अर्थातें : सूचिलें स्वनिःकामतेतें ॥ असो सती तें समुदायातें : मिळाली जे कीं ॥४८॥ आइकोनि तियेचि कथा : अत्रवियाचि विस्मिता ॥ विचरल्या इतस्तता : त्या निश्चळा जालिया ॥ ४९ ॥

**ततो विशन्वनं चंद्रज्योत्स्ना यावद्विभाव्यते ॥**
**तमः प्रविष्टमालक्ष्य ततो निववृतुर्हरेः ॥ ४३ ॥**

यावरि तो गोपीजन : कृष्णगवेषणालागुन ॥ चंद्र होता प्रकाशमान : तंवरि प्रवेशला हरिवनातें ॥ ५० ॥ असो त्या वनिं असोन : तें आइकोनि कथन ॥ कृष्णिं प्रवेशलें मन : ह्मणोनि एकत्र निश्चळ होत्या ॥ ५१ ॥ मग इच्छा जाली चित्तिं : जे पाहावी रमण मुर्ति ॥ ह्मणोनि त्या गोपीसती : चालिलिया पुढें ॥ ५२ ॥ नातरि कृष्ण निवृत्तिकांता : ते जाल्हि आली हाता ॥ कृष्ण भेटेल आतां : हा निश्चयो जाला ॥ ५३ ॥ तर्हि यावद्दर्शन : न संडावें कृष्णगवेशण ॥ सरलें नाहिं प्रयोजन : मनाचें जंवरि हें ॥ ५४ ॥ असो मनप्रवेशद्वारा : भोगावें नंदकुमारा ॥ इतुकियाही अंतरा : न साहती त्या ॥ ५५ ॥ त्या सखीद्वारें करुन : कृष्णें केलें आश्वासन ॥ जें केलें कृष्णध्यान : तें फळासि आलें ॥ ५६ ॥ त्या प्रसादाचेनि बळें : या गवेषणा पुट जालें ॥ चित्तें नसेनि विकळें : प्रवेशल्या वनातें ॥५७॥ जेवि ते मुमुक्षु जन : करितां शास्त्रवि-वेचन ॥ सूक्ष्मदशे येउनि मन : समाधान पावति ॥ ५८ ॥ त्या सुखाचेनि उत्कर्षे : मन शास्त्रविशे प्रवेशे ॥ तेवि गोपीचिं मानसें : प्रवर्तलिं कृष्ण-शोधिं ॥ ५९ ॥ त्या विचरल्या जें वन : तेथें काळामर्यादा जाण ॥

जंवरि चंद्र सजोत्स्न : गगनिं हि तो ॥ ६० ॥ असो चंद्राचिया जोत्स्ना : प्रकाश असतां अंगना ॥ त्या प्रवेशोनि वृंदावना : शोधितां कृष्णातें ॥ ६१ ॥ तवं तो ज्योत्स्ने सहित : चंद्र जाला अस्तंगत ॥ रजनी जाली तमोवृत्त : राहिला व्यवहार ॥ ६२ ॥ किंवा प्रत्यक्दर्शे येतां मन : चंद्रि नसे अभिमान ॥ विरोनि प्रमाणगण : न चळे वाक्प्रवृत्ति ॥ ६३ ॥ असो त्या प्रत्यक्पंथें : चिंतित होत्या कृष्णातें ॥ त्या चिंतनप्रभावें त्यांतें : अपुर्व मार्ग सांपडाला ॥ ६४ ॥ प्रवृत्तिभूमीपासून : प्रत्यक्पंथा आलें मन ॥ चंद्र जाला अप्रयोजन : त्या एकांतशीळातें ॥ ६५ ॥ असो हे रहस्य कथा : प्रसंगुचि वदिजे आतां ॥ ज्योत्स्नेसिं चंद्रास्त होतां : प्रविष्ट जालें जें तम ॥ ६६॥ त्या अंधकारातें लक्षुन : कृष्णगवेषणा पासुन ॥ निवर्तला गोपीगण : एकनिष्ठ होत्साता तो ॥ ६७ ॥ असो प्रत्यक्रुपा कृष्णातें : गवेपिलें प्रवृत्तिपंथें ॥ मग सांडुनि त्या मार्गातें : पावल्या निवृत्ति ॥ ६८ ॥ सांडोनि बाह्य साधनातें : त्या गोपी कृष्णस्थचित्तें ॥ अंतरंग उपायातें : आचरत्या जालिया ॥ ६९ ॥ अंतरोपायाचें लक्षण : उत्तर ग्रंथें करुन ॥ आईक राया सावधान : निवेदिजेल अवघें ॥ ७० ॥

**तन्मनस्कास्तदालापास्तद्विचेष्टास्तदात्मिकाः ॥**
**तद्गुणान्येव गायंत्यो नात्मागाराणि सस्मरुः ॥ ४४ ॥**

राया त्या गोपांगना : अवघिया कृष्णमना ॥ सांडुनि अन्य कल्पना : स्मरत्या कृष्णातें ॥ ७१ ॥ त्यांचिये वाचेचा ठाई : कृष्णवीण वार्त्ता नाहिं ॥ आलापु जितुका कांहिं : तो तद्विषइक ज्यांचा ॥ ७२ ॥ व्यवहारेंहिं वर्ततां : कृष्णाचिचि करिती वार्ता ॥ आणि चेष्टाही समस्ता : कृष्णपराचि त्यांच्या ॥ ७३ ॥ कृष्णसंग अनुलक्षुन : तिहिं धरिले प्राण ॥ जीणें श्रीकृष्णा अधीन : सर्वथा गोपिकांचें ॥ ७४ ॥ ह्मणोनि त्या तदात्मिका : तदालाप तद्विचेष्टिका ॥ एवं गोपी तन्मनस्का : तद्गुणगायनपरा ज्या ॥ ७५ ॥ तयांचें पूर्विंपासुन : वृत्ताचें केलें कथन ॥ दाविला अधिकार संपुर्ण : सर्वस्वें निरंतर ऐसा ॥ ७६॥ एवं त्या एतत् लक्षणा : वाखाणिल्या गोपांगना ॥ सांडोनि बाह्य साधना:

शांता होत्साव्या ॥७७॥ कृष्णिं ठेउनि मनः तद्गुणाचें वर्णन ॥ करुनि त्या कृष्णाचें आगमन : प्रतीक्षित्या जालिया ॥७८॥ असो यकाग्रें चित्तें : पुरःसरोनि प्रार्थनेतें ॥ श्रीकृष्णाचिया गुणातें : वाखाणिलें गोपींहिं ॥७९॥ देखोनि ते व्यवधान : देहावरि नयेचि मन ॥ गृहादिसंबंधी जन : न स्मरतीच गोपिकांतें ॥ ८० ॥ गृहादिकिं मन जातें : तरि कृष्ण उपेक्षिता त्यांतें ॥ ह्मणोनि भाग्याचिं गोपीशतें : पावलिं कृष्णि ॥ ८१ ॥ एवं प्रसंगें करुन : कृष्णप्राप्तीचें साधन ॥ देहादिकातें विसरोन : गुण वर्णावे श्रीकृष्णाचे ॥ ८२ ॥ सांडोनि मान सकळ : गुण वर्णावे प्रांजळ ॥ मग सर्वथा रमालीळ : कृपा करलि तयातें ८३ आतां कृष्णमनास्कि तिहिं : गुण वर्णिले जे काहिं ॥ बैसोनि कोणे ठाइं : तेहि राया आइक ॥ ८४ ॥

**पुनः पुलिनमाविश्य कालिंद्याः कृष्णभावनाः**
**समवेता जगुः कृष्णं तदागमनकातराः ॥ ४९ ॥**

तें जें कालिंदीपुलिन : ज्याचें पुर्विं केलें वर्णन ॥ जेथें गोपींसहवर्तमान : क्रीडला कृष्णजि ॥ ८५ ॥ ज्याचा गर्वहरणार्थ : गुप्त जाला भगवंत ॥ जेथूनि तें गोपीजात : कृष्णशोधासि निघालें ॥ ८६ ॥ मागुति पुलिनाप्रति : फिरोनि आल्या त्या सती ॥ मग तेथें कृष्णगीतिं : त्या गात्या जाल्या ॥ ८७ ॥ भेटावया गोपदारा : कृष्णागमनकातरा ॥ पाहावया यदुवीरा : आगमनोत्सुका त्या ॥ ८८ ॥ कृष्णागमार्तिसागरिं : मग्न होत्साव्या सुंदरी ॥ सर्वाही यमुना तीरिं : गाती कृष्णजीतें ॥ ८९ ॥ नाना तद्वियोगजाळें : ते गुणकथा नाव केली ॥ नातरि तद्विरहानाळें : संजीविनी मात्रा ॥ ९० ॥ असो अविकार पाहोन : केलें प्रत्यग्विवेचन ॥ नाना उपपत्ती करुन : तिहिं विचारिलें कृष्णातें ॥ ९१ ॥ तेणे एकांता आली वृत्ति : कृष्णें पाठविली भक्ति ॥ तियेसहित त्या सती : प्रत्यक्पंथा आल्या ॥९२॥ अधिष्ठुनि त्या मार्गातें : पावल्या पुर्व स्थळातें ॥ पूर्वी कृष्ण होता तेथें : भ्रष्टल्या जेथुनि ॥९३॥ त्याचि पुर्वस्थळातें : तिहिं अधिष्ठिजेतें जालें मागुतें ॥ गर्वजनित दुरितें : निस्तरोनि अवघें ॥ ९४ ॥ तेथें अंतरंग उपायभूतें : आरं-

भिलिं छन्दगीतें ।। गाइलें कृष्णजीतें : नानास्वररसकल्लोळें ।। ९५ ।। ते जे गाइले कृष्णगुण : ते विशद उत्तराध्यायें करुन ।। वार्णितील व्यासनन्दन : राया परीक्षितीप्रति ।।९६।। इतुकी संपादिली कथा : जे त्या गोपी विरहतप्ता ।। कृष्णातें शोधित होत्सात्या : यमुनातीरासि आल्या ।। ९७ ।। ते मुनिभाषित आइती : कृष्णकथा भागवती ।। श्रीशुकें परीक्षितीप्रति : उपदेशिली जे ।।९८।। तेचि शौनकादिकांतें : निवेदिली तेणें सूतें ।। आतां तेचि उपदेशिली मातें : नित्यानंदें दयाळुवें ।। ९९ ।। निजमतीतें लक्षुन : म्या करिजेतें अनुवर्णन ।। कां जें करुनि वाक्शोधन : निस्तरावीं पापें ।। ७०० ।। आणि नित्यानंदमयमूर्ति : श्रीकृष्णाची विलासस्थिति ।। कटी कवळूनि हस्तिं : भीमातीरें निवासिनी जे ।।१।। जे सर्वतापोपशमनी : उवड मंगळाचि खाणि ।। जे कैवल्यप्रदानी : निजभक्तातें सर्वदा ।।२।। म्हणोनि या प्रसंगें करुनि : अवगुणातें न मनुनि ।। माझिया हृदयभुवनिं : सदा तिष्ठत असो ।।३।। इतुकेनि मिं हृष्टमति : पावों शकेन विश्रांति ।। जोडलिं जें जन्मशतिं : निस्तरेन तें कर्में ।।४।। अहो कोण्हीयेके पुण्यबळें : भगवंतातें म्या स्मरिलें ।। तेणें आतां जडविलें : गुणवर्णनिं चित्त ।। ५ ।। हें असो पाल्हाळ : म्यां अति मुखें हा काळ ।। क्रमावा कैसा सुशीळ : कृपा करी कैसा भगवंत ।। ६ ।। ऐसें विचारूनि निजचित्तिं : या गुणवर्णनि मिं मंदमति ।। प्रवर्तें तेथें आतां संतिं : क्षमा करुनि अवधारावें ।। ७ ।। एवं नित्यानंदि ठेउनि मन : वर्णिलें यावत् अध्यायावसान ।। पुढें श्रीकृष्णजीचे गुण : गातील गोपिका ।। ८ ।। तेंहिं निजमतीतें अनुसरोन : कीजेल जें काहिं व्याख्यान ।। तेणें प्रीति पावो रमारमण : कृपा करो मजवरि ।। ९ ।। इति श्रीभागवते महापुराणे दशमस्कंधे रासक्रीडावर्णनं नाम त्रिंशतितमोऽध्याय: ।। ३० ।।

श्रीकृष्णार्पणमस्तु

ॐ

श्रीमद्भागवतांतर्गत

# रासपंचाध्यायी.

---

## अध्याय ३.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीमन्नित्यानंदाय नमः ॥ श्रीमद्विठ्ठलाय नमः ॥ आतां स्मरोनि गुरुचरण : तो रासक्रीडापरायण ॥ श्रीकृष्ण यशोदानंदन : लीलाविग्रहधारी ॥ १ ॥ तयाचे गुण वर्णुन : करुं वाचेतें पावन ॥ चपळ हें माझें जें मन : तें चांचल्यातें सांडुनि ॥ २ ॥ असो नित्यांनंदिं निर्भर : सांडु विषय निःसार ॥ पावऊ मज्जकरविं पार : भवनदीचा ॥ ३ ॥ विठ्ठलवेषाची बुंथि : घेउनि श्रीकृष्णमूर्ति ॥ कटीतें धरुनि हास्तिं : भीमातीरस्थ जे किं ॥४॥ ते प्रसन्न असो मातें : सार्थ करु मनोनयनातें ॥ या प्रपंचोर्मींचे आवातें : ना प्लाव उमजला ॥५॥ हे विषयीक कदर्थना : मागुती न देउ मना ॥ इये गुणवर्णनिं नाना : न प्रेरु विघ्ने कदाहि ॥६॥ आंगा आणोनि महंति : न विध्वंसु रसवृत्ति ॥ निर्व्यलीक निजकीर्ति : वर्णउ मज करवीं ॥७॥ भगवद्भक्तांचा संग : सदां प्रेरुनियां अभंग ॥ निजचरणिं अनुराग : प्रेरु माझिया मनातें ॥ ८ ॥ आतां असो प्रार्थना बहुं : कृष्णजीचे गुण गाउं ॥ या रसें रसना राउं : सांडुनि वाग्जाळ सर्व ॥ ९ ॥ आइका कथाहे भागवती : पुरातन श्रीव्यासोक्ति ॥ जे श्रीशुकेंद्रें रायाप्रति : निवेदिली संक्षेपें ॥ १० ॥ जें मरणार्णविंचे प्लव : सौष्ठव्याचें सार सर्व ॥ जें मोक्षाचें किं गौरव : शांतीचें सदन जें किं ॥ ११ ॥ जें श्रीकृष्णजीजे गुण : करीत असतां वर्णन ॥ पावला अवसान : त्रिंशतितमोध्याय ॥ १२ ॥ रासक्रीडेचा प्रसंगीं : ठाण मांडुनि त्रिभंगि ॥ त्या अंतरंगा तन्वंगी : व्रजवासिनी गोपी सकळाहि ॥ १३ ॥ अवसर देउनि तियांतें : कृष्णें जालें क्रीडिजेतें ॥ तवं निजकौतुकार्थ तेथें : प्रेरुनि मानगर्वासि ॥१४॥ तया गर्वपरिहारार्थ : नवेक्त अर्पोनि गुप्त ॥ तें [illegible] गोपीजात : निज

गवेषणें प्रवर्तविलें ॥ १५ ॥ त्या गवेषणाचिया अनुवृत्ति : तया प्रत्यक् पंथा मागुति ॥ आणोनि त्या सती : यमुनातीरातें पावल्या ॥ १६ ॥ जेथुनि ते गोपीशतें : चुकलिं होतिं कृष्णजोतें ॥ त्या यमुना पुलिनातें : अधिष्ठिति जालिं मागुतिं ॥ १७ ॥ जेवि सांडुनि पूर्ववृत्ति : बुद्धियोगातें अधिष्ठिति ॥ योगी त्या योगें पावति : स्वरूपसाक्षात्कारातें ॥ १८ ॥ असो प्रत्यक्प्रवणपंथें : तोडोनि व्यवधानातें ॥ अधिष्ठुनि निर्विषयबुद्धीतें : स्वरूपातें वरिती ॥ १९ ॥ कां जें आत्मोपलब्धीचें स्थान : आणि प्रपंचाचेंहिं अधिकरण ॥ दोहिं लक्षणिं करुण (न) : वर्तते बुद्धि ॥ २० ॥ यालागि प्रत्यक्प्रवणपंथें : योगी अधिष्ठिती बुद्धीतें ॥ या योगें स्वस्थितीतें : पावती ते ॥ २१ ॥ तेवि कृष्णवियोगस्थान : आवि हें यमुना पुलिन ॥ आणि कृष्णप्राप्ति साधन : योजलें हेंचि ॥ २२ ॥ तया पुलिनाप्रति : त्या गोपी येउनि मागुति ॥ श्रीकृष्णाचे गुण गाती : पुरःसरुनि प्रार्थनेतें ॥ २३ ॥ तें जे काहिं मुनिनाथें : सांगीतलें हें रायातें ॥ तेंचि निवेदिलें सूतें : शौनकादि प्रति ॥ २४ ॥ तें जें काहिं निरूपण : नित्यानंदिं ठेउनि मन ॥निजमतीतें अनुसरोन : वाखाणिजेतें ॥ २५ ॥

**जयति तेधिकं जन्मना व्रजः**
**श्रयत इंदिरा शश्वदत्र हि ॥**
**दयित दृश्यतां दिक्षु तावका-**
**स्त्वयि धृतासवस्त्वां विचिन्वते ॥ १ ॥**

अहो कृष्णा प्रीतिसदना : अगा ये नंदानंदना ॥ आइक गा व्रजभूषणा : आम्हा दीनाची विनवणी ॥ २६ ॥ कृष्णा या नंदगृहाचा ठाईं : तुझें जन्म जें काहिं ॥ असो हा विळासविग्रह पाहिं : मंगळमय जो ॥ २७ ॥ या तुझेनि जन्में करुन : हें व्रज तव क्रीडास्थान ॥ पावलें बहु महिमान : तिहिं लोकिं ॥२८॥ हे जे साधारण जन : सर्वही जाले मोदमान ॥ कां जें त्वत्पदातें आश्रून : लक्ष्मी राहिली ॥ २९ ॥ एवं तव पदाश्रित : लक्ष्मी राहिली शाश्वत ॥ येथें तिया साळंकृत : शोभविलें व्रज सर्वहि ॥ ३० ॥ ह्मणोनि सा-

धारण जन : येथें राहिले अनुसरोन ॥ मां तुज जे किं शरण : ते वर्णावे किति ॥ ३१ ॥ या वृंदावनाची वस्ति : इच्छिता जाला प्रजापति ॥ ह्मणे द्रुमलता तृणजाति : होउनि राहावें ॥ ३२ ॥ एवं तव जन्मनिमित्त : व्रज हें महिमानवंत ॥ अति उत्कर्षें प्रस्तुत : वर्तत असे या त्रिभुवनिं ॥ ३३ ॥ आह्मी ज्या व्रजवासिनी : तव किंकरी ह्मणोनि ॥ श्लाघ्य जालों त्रिभुवनिं : तें काय व्यर्थ जालें ॥ ३४ ॥ हे समस्त व्रजौकस : नांदती जे स्वसंतोष ॥ आमुतेंचि कां उदास : जालासि गा प्रभो आतां ॥ ३५ ॥ आह्मी तों निकट दासी : भ्रमतसों दिशोपादिशिं ॥ जिहिं आह्मी सायासिं : प्राण धरिले ॥ ३६ ॥ असो तुझा पाइं मन : ठेउनि धरिले प्राण ॥ त्या आह्मी करीतसों भ्रमण : दशदिशांचा ठाइं ॥ ३७ ॥ ह्मणसी यासि काय कारण : तरि करितों किं चिंतन ॥ जें केव्हां तुझें वदन : निहाळुं आह्मी आतां ॥ ३८ ॥ या आशाकळिताचित्ता : भ्रमतसों गा इतस्तता ॥ नुपेक्षिं श्रीकृष्ण अतां : निजदर्शनातें प्रेरिं ॥३९॥ आमुचिं राखसी जीवितें : तरि दाविं आपणातें ॥ अन्यथा या प्राणातें : सांडुन गा निश्चयें ॥ ४० ॥ आपणातें प्रकट कारिं : किंवा आमुतें शक्ति प्रेरिं ॥ जें हें आंध्य निवारिं : निहाळुं तुला ॥ ४१ ॥ प्रभो ऐसें जाणवतें : जें आड येउनि दुरितें ॥ निकटाचि असतां तुतें : अंतरलों श्रीकृष्णा ॥४२॥ देहिं जाला अहंमान : भ्रंशलें बुद्धीचें ज्ञान ॥ त्वदिस्थ जो सनातन : त्या तुला चुकलों गा ॥ ४३ ॥ आह्मी आवडलों तुतें : हें धन्यें मानिलें चित्तें ॥ येणें फिरविलें आमुतें : सांडिलें तुवा तत्काळ ॥ ४४ ॥ तऱ्हि तुजवांचूनि काहिं : स्मर्तव्य उरलें नाहिं ॥ येणे गुणें तुझा पाइं : प्रार्थनेसि योग्यता पावलों गा ॥ ४५ ॥ एवं निजगुणेंचि करुनि : भ्रंशलों आह्मि भामिनी ॥ कृपाकटाक्षें करुनि : सावध करिं आतां ॥ ४६ ॥ आह्मी तुजला देखावें : ऐसें शक्तीतें प्रेरावें ॥ किंवा निजगुणेंचि प्रकटावें : दर्शन देईं आमुतें गा ॥ ४७ ॥ ऐशा त्या कृष्णमना : कोण्ही येकी गोपांगना ॥ तिहिं प्रार्थिला यदुराणा : आतां आणिका कोण्हि ॥ ४८ ॥ ह्मणती कृष्णा जरि ह्मणसी : जें सुखें हिंडा दशदिशिं ॥ मजसिं आणि तुमसिं : संबंध तो काइ ॥ ४९ ॥

ऐसें ह्मणसी पाहिं : तरि तुझें हास्यमुख जें काहिं ॥ खोंचलें कां त्वदइं : नयनकटाक्षेपुपातें ॥ ९० ॥ आतां तुपेक्षुनि आमुतें : जरि न देसी दर्शनातें ॥ तरि आमुचा तुझे हातें : वधु जाला जाणें ॥ ९१ ॥ या अर्थातें धरुनि मनिं : प्रार्थना पुरःसरोनि ॥ अपरा गोपगृहिणी : त्या बोलताति ऐसें ॥ ९२ ॥

**शरदुदाशये साधुजातस-**
**त्सरसिजोदरश्रीमुषा दृशा ॥**
**सुरतनाथ ते शुल्कदासिका**
**वरद निघ्नतो नेह किं वधः ॥ २ ॥**

अगा ये सुरतनाथा : श्रीकृष्णजी नंदसुता ॥ इष्टदातया सर्वथा : आमुचिया संभोगपते ॥ ९३ ॥ असो संभोगावसान : नाहीं कृष्णेंवीण आन ॥ या लागि केलें संबोधन : जें अगा ये सुरतनाथा ॥ ९४ ॥ तैसेंचि कृष्णेंवीण काहिं : प्रेमास्पद वस्तु नाहिं ॥ ह्मणोनि तियेचि ठाईं : वरदातृत्वही योजलें ॥ ९५ ॥ ह्मणौनि वरद हें जाण : सुखप्रदाची खुण ॥ या उभयपदें संबोधुन : बोलताति गोपी ऐसें ॥ ९६ ॥ प्रभो तवाधीना प्राणेंसिं : यालागि अमूल्या दासी ॥ आह्मीं तुज निश्चयेंसिं : मोलेंवीण विकिलों ॥ ९७ ॥ तुजचि अवधि करुन : ठेविले असती प्राण ॥ न देखतां तुझें वदन : वांचने (णे) नाहिं सर्वथा ॥ ९८ ॥ लक्षुनि गृहादिकातें : वर्त्तणें नाहिं आमुतें ॥ आरंभापासूनि जीवितें : वोपिलिं गा तुझे पाइं ॥ ९९ ॥ नाना विषयांतरातें इच्छुन : केलें नाहिं तुझें भजन ॥ तुजवांचुनि आन : तें तृणप्राय मानिलें ॥६०॥ यालागि मोलें वांचुन : अंगीकारिलें दासीव(प?)ण ॥ त्या आमुतें नेत्रें करुन : मारिता कटाक्षशरप्रहारें ॥ ६१ ॥ तुझे हातें आमुचा पाहिं : वध काय घडला नाहिं ॥ तुवां खोचिलें जें काहिं : अवलोकनशरपातें ॥ ६२ ॥ अनन्यासक्ता कामिनी : तियेचा त्याग करितां ये जनिं ॥ तो वध शस्त्रेंवांचुनि : पतीसि घडे तियेचा ॥ ६३ ॥ तस्मात् शस्त्रें वांचुन : आमुचा वध हा जाण ॥ तुवां न दाउनि वदन : केला असे प्रभो ॥ ६४ ॥ जेवि कोण्ही जे साधक : तव साक्षात्कारें अधिक ॥ ते मानगर्वें निःशंक : अंतरती सर्वस्वें गा तुतें

॥ ६५ ॥ निस्तरोनि संकटातें : तेवि पावलों गा तुतें ॥ तवं गर्व होतां आ मुतें : अप्रकट जासि तत्काळ ॥ ६६ ॥ तुं कृपाकटाक्षपातें : नावलोकि-तासि आमुतें ॥ तरि साधारण चित्तें : आह्मीहीं असतों ॥ ३७ ॥ नेणोनि तुझी व्यवस्था : गृहींच होती ममता ॥ न करुनि कांहिं वार्ता : पशुप्राये राहातों गा ॥ ६८ ॥ तस्मात् अवलोकोनि आमुतें : तोडोनिया मुर्खतेतें ॥ गृहापासुनि चित्तें : काढिलिं आमुचिं ॥ ६९ ॥ दाविली आपुली चवि : उघडिली सुकृत ठेवी ॥ शेखिं कार्पण्यें धरुनि जिवि : वंचिले आमुतें ॥७०॥ आतां तुजवीण जीणें : याहुनि मरण काय उणे ॥ खोंचिलें दृष्टिबाणें : ऐसें जालें गा कृष्णा ॥ ७१ ॥ जेवि भणंगासि अन्न : देउनि घेइजे हिरोन ॥ तरि वध काय त्याहून : आणिक त्याचा ॥ ७२ ॥ तेवि तुवां कटाक्षपातें : अवलोकिलें आमुतें ॥ तें आह्मासि शरशतें : वोडवलिं गा आतां ॥ ७३ ॥ ह्मणसी कोण्हासि कोण्हि : पाहाती जरि ये जनि ॥ ते काय तेणें वधस्थानि : मानावें तरि ॥ ७४ ॥ ऐसें ह्मणसि जरि काहिं : तरि हें येथें योग्य नाहिं ॥ हे नेत्रशोभा काई : अन्यत्र वर्तत असे कृष्णा ॥ ७५ ॥ तुवां नेत्रशरपातें : खोचिलिं आमुचिं जीवितें ॥ सविशेषण त्या नेत्रातें : वर्णितें आईक तेंहिं ॥७६॥ तरि शरत्काळाचा ठाईं : उदकांश जो काहिं ॥ तया सरोवारिं जें पाहिं : विकसलिं सरोजें किं ॥ ७७ ॥ असो त्या सरोवरिं उत्पन्न: त्यांसि सरसिज केली खुण ॥ त्यांहुनि असाधारण : उत्फुल्ल कमळें ॥ ७८ ॥ त्यांमाजिही पद्मजाति : कोण्हि एक विशेषगति ॥ सर्व शोभाची संपत्ती : पाविली गा जेणें कीं ॥ ७९ ॥ त्याचाही अंतःप्रदेश : कोमळ शोभेची मुस ॥ सुकुमार आणि सुवेश : अति सौंदर्याढ्य जो ॥ ८० ॥ तेणें जाणितलें पाहिं: जें आपणासि मान नाहिं ॥ इये जडतेचा ठाईं : आपणासि बहुं अयोग्य ॥ ८१ ॥ ह्मणोनि प्रस्थान केलें : या नेत्रांसि शरण आलें ॥ कींत्रा तुझे नेत्रें हरिलें : तिये शोभेतें ॥ ८२ ॥ असो त्या ठाया पासुन : आणोनि स्वनेत्रिं ठेउन ॥ दिधला अति सन्मान सरोजसौंदर्यातें ॥८३॥ तया शोभेचि संपति : प्रकटिली नेत्रप्रांतिं ॥ ते नेत्र-शोभा आह्माप्रति : प्रेरिली जे तुवां ॥ ८४ ॥ ते तव वियोगानंतर : भेदितें

आमुचें जिव्हार ॥ नाना तोंचि होउनि शर : खडतरे हृदयिं ॥ ८५ ॥ एवं शरच्छोभासंपन्नः सरोवरिं जालें उत्पन्न ॥ त्या कमळाचा जाण : उदरप्रदेश जो किं ॥ ८६ ॥ ते पद्मोदरश्री जेणें : चोरोनि आणिली नयनें ॥ त्या नयन-कटाक्षबाणें : विंधिलें किं आमुतें ॥ ८७ ॥ असो अमूल्यां दासीतें : विंधिले नेत्र शरपातें ॥ तो काये आमुचा तुतें : वध नाहिं घडला ॥ ८८ ॥हें चुकवावया दूषण : दाविं गा निजवदन ॥ वांचविं आमुचें प्राण : उपेक्षुं नको कृष्णा आतां ॥ ८९ ॥ ऐसें जरि मनि होतें : तरि वेधिलिं कां हें चित्तें ॥ पडलों होतों मोहगर्ते : यथासंभव सुखें किं ॥९०॥ अवतरोनि गोकुळिं : चित्तें कां निजस्थें केलिं ॥ गृहादि आशा सांडविली : निजत्व दिधलें ॥ ९१ ॥ प्रवर्तता तव चिंतनिं : झडपिलें बहुता विघ्निं ॥ तितुकिं तुवां निर्दाळुनि : रक्षिलें आमुतें ॥ ९२ ॥ असो तुझा वेधु नसावा : त्वद्वियोग होआवा ॥ ह्मणोनि विघ्नाचा यावा : जाला असतां जो ॥ ९३ ॥ तो तुवां न लगतां क्षण : नाशिला किं विघ्नगण ॥ आतां जालासि कां कृपण : उपेक्षिसी कां ॥ ९४ ॥ ऐसें धरुनि चित्तिं : बोलती त्या व्रजसती ॥ तें विघ्नें नाशिलिं किति : किंलक्षणें कोणे परिं ॥ ९५ ॥

**विषजलाप्ययाद्व्यालराक्षसा-**
**द्वर्षमारुताद्वैद्युतानलात् ॥**
**वृषमयात्मजाद्विश्वतो भया-**
**दृषभ ते वयं रक्षिता मुहुः ॥ ३ ॥**

तिये यमुनेचा डोहिं : विषमया जळाचा ठाईं ॥ ते गोपाळ आणि गाइ : अनुवर्ति जे तुझे प्रभो ॥ ९६ ॥ तिहिं करुनि विषजळपान : पावतां मृत्यु-सदन ॥ त्यांतें उठउनि आपण : प्रवेशोनि त्या डोहामाझारिं ॥ ९७ ॥ मथूनि यमुना ह्रदातें : मर्दुनि महां सर्पातें ॥ तें यमुनाजळसर तें : व्रजोपकारी केलें तुवां सर्वत्रहि ॥ ९८ ॥ एवं विषनाशापासुन : राखिले आमुचे प्राण ॥ त्या महां सर्पा पासुन : जय पावलासि तुं जो ॥ ९९ ॥ त्या तुज आह्मीं न देखिजेतें : तरि तत्काळ प्राण जाते ॥ किंवा व्रजसंगें आमुतें : विक्षेप होता

॥ १०० ॥ प्रारब्धप्रतिबंधन : तुझा वेधिं होइल विघ्न ॥ यालागि ते बिनाशोन : रक्षिले प्राण आमुचे ॥ १ ॥ असो त्या विश(ष)नाशा पासुन : तुवां रक्षिले निजजन ॥ तरि आतां कां उदासीन : जालासि कृष्णा ॥ २ ॥ तैसाचि येक सर्पवेष : आला किं महाराक्षस ॥ जेणे गोपाळाचा ग्रास : वत्छा(त्सा) सहित केला ॥ ३ ॥ तुवां प्रवेशोनि तन्मुखातें : विदारुनि उल्बणातें ॥ त्यां सवत्सां गोपाळांतें : रक्षिलें गा प्रभो ॥ ४ ॥ तेथुनि तुवां न यइजेतें : तरि आमुचे प्राण जाते ॥ किंवा निजवत्सळांते : न काढिजेतें जरि ॥ ५ ॥ तर्‍हि तव भजनाचा ठाइं : विघ्न वोडवतें काहिं ॥ असो हें परि तुझा पाइं : शरण आह्मी सर्वहि गा ॥ ६ ॥ त्या तुवां त्या विघ्नापासुन : राखिले ते निजशरण ॥ आणि आह्मासि कां उदासीन : जालासि गा ॥ ७ ॥ आणि ते समइं त्यांतें : तुझें सान्निध्य होतें ॥ निहाळुनि मुखचंद्रातें : तृप्त होति तें चकोरें ॥ ८ ॥ तें विघ्न त्यांतें काहिं : आह्मा ऐसें बाधिलें नाहिं ॥ तरि आतां येव्हडा काइ : क्षोभलासि कृष्णा ॥ ९ ॥ तैसाचि तो सुरपति : पीडा-[illegible] गोकुळाप्रति ॥ अतिशिळाधारासंपाति : वर्षता जाला किं ॥ १० ॥ तेणोंचि प्रसंगेंकरिं : वातोर्मियाचि हारि ॥ वर्षोनियां गोकुळावरि : घातु मांडिला सकळांचा ॥ ११ ॥ आणि विद्युतानळपात : प्रेरिले सहस्रशत ॥ तैसेचि वज्रपातोत्पात : सोडिले व्रजनाशातें ॥ १२ ॥ मग तुवां एकेचि करिं : उचलोनि गोवर्धन गिरि ॥ उभारुनि व्रजावरि : रक्षिलें त्या पासुन ॥ १३ ॥ असो त्या विघ्ना पासुन : ते वेळे रक्षि स्वजन ॥ त्या प्रसंगे आंमुचे प्राण : राखिले गा तुवां ॥ १४ ॥ तुवां न करितां आप्ता : वृथा जातों विरहतप्ता ॥ अंतरतासि तुं थिता : जोडलासि जो कृष्णा ॥ १५ ॥ पुरता गा तुझा प्रेमा : न पावोनि आह्मि रामा ॥ अंतरतों अतृप्तकामा : सुखरूपा तुतें ॥१६॥ एवं तेणे प्रसंगे करुन : राखिले आमुचे प्राण ॥ आजि कां कृष्ण निर्वाण : मांडिले तुवां ॥१७॥ तैसाचि वृषासुर दैत्य : आमुचा करावया घात ॥ आला त्याचा निपात : क्षणार्धे केला तुवां ॥ १८ ॥ तयाहि प्रसंगवशें : रक्षिलों आह्मी व्रजौकसें ॥

तुवां वैकुंठाचे अधीशें : कृपाळुवें श्रीकृष्णे ॥ १९ ॥ आणि प्रलंबासुर दैत्य : मयासुराचा जो सुत ॥ व्रजौकसाचा निपात : करावया आला दारुण ॥२०॥ असो विचारुनि तो चित्तिं : तुज हरावें या दुर्मति ॥ आला त्यातें तुवां येमाप्रति : पाठविलें तत्काळ ॥२१॥ तेणें तुज हरिजेतें : तरि आमुचे प्राण जाते ॥ नाना प्रत्यक्ष प्राणा तुतें : नेइजेतें जरि गा तेणें ॥ २२ ॥ तरि आह्मी विरहतप्ता : तैशाचि जातों अतृप्ता ॥ अंतरतो सुरतनाथा : तुतें गा श्रीकृष्णा सर्वस्वें ॥ २३ ॥ तस्मात् त्यातें निवटुन : राखिले आमुचे प्राण ॥ श्रीकृष्णा कां उदासीन : जालासि ये वेळे ॥२४॥ असो विघ्नशतां पासुन : रक्षिलों आह्मी स्वजन ॥ ते एक एक निवडुन : किति बोलावें गा आतां ॥ २५ ॥ एवं वारंवार आमुतें : रक्षिलें तुवां कृपावंतें ॥ नाशिलिं जें विघ्नशतें : तें गणावि कवणें ॥२॥ प्रभो आतां तुजलागुन : कंठि धरुनियां प्राण ॥ बहु केलें किं भ्रमण : आह्मि दशदिशांप्रति ॥२७॥ परि निज दरुशनामृतें : सिंचिसिना कां आमुतें ॥ व्यर्थ कां गा हें जीवितें : अप्रयोजकें करिसी कां कृष्णा ॥ २८ ॥ बहुंता जन्माचा अंतिं : उपजली तुझा पाइं प्रीति ॥ तियची जरि समाप्ति : तुझा ठाइं नव्हे प्रस्तुत ॥ २९ ॥ तरि ह्मणों गा कर्मगति : मागुती या संसारावर्ति ॥ पडोनि सोसणे पडती : दुःखाचिया शतकोटि ॥ ३० ॥ ह्मणोनि करिं कृपाळुपण : प्रकटोनि नीज दर्शन ॥ दाविं गा आतां वदन : वांचवि कीं आमुतें ॥ ३१॥ ह्मणसी या सुमुखातें : तुह्मी भाळोनिया मातें ॥ सदा कामासक्तचित्तें : भजलियाति सकळाहि ॥ ३२ ॥ त्या तुह्मी मज पासुन : कैसें पावाल भवमोचन ॥ मिं तो प्रत्यक्ष जो नंदन : यशोदेनंदाचा कृष्ण किं ॥ ३३ ॥ ऐसें असेल जरि काहिं : तरि आह्मी भजलों ज्या पाहिं ॥ त्या आमुचा तुझे ठाइं : भाव जो किं कृष्णा ॥ ३४ ॥ तो केवळ प्राकृत जन : येथ यशोदेचा नंदन ॥ तुं व्रजवासी ह्मणोन : भाव जाला नाहिं गा प्रभो ॥ ३५ ग्राम्य काम धरुनि मनि : भजलों नाहीं तव चरणी ॥ तुज दुःखहर्ता हे जाणोनि : भजिनलों किं ॥ ३६ ॥ ऐसें धरुनि स्वचित्ति : त्या गोपांगना कृष्णाप्रति ॥ विनविल्या जाल्या मागुती : तें अवधारिं राया ॥ ३७ ॥

न खलु गोपिकानंदनो भवा-
नखिलदेहिनामंतरात्मदृक् ॥
विखनसार्थितो विश्वगुप्तये
सख उदेयिवान्सात्वतां कुले ॥ ४ ॥

अगा ये सखया श्रीकृष्णा : परमप्रीतीचिया सदना ॥ आह्मी ज्या व्रजांगना : अनन्यदासि तुझिया ॥३८॥ तिया गा तुज पाळकातें : सर्व दुःखापहरणातें ॥ केवळ तुं प्राकृत या मतें : भजीनलों नाहिं सर्वथा ॥ ३९ ॥ हे यशोदा नामें करुनि : गोपिका जे व्रजवासिनी ॥ अगा हे जे तुझी जननी : तुं नंदन जियचा प्रभो ॥ ४० ॥ ऐसें प्रतीयमान जें काहिं : हें निश्चयेंसि सत्य नाहिं ॥ अखिळपदें संपूर्णाहिं : चराचरात्मक जग जें ॥ ४१ ॥ हें अध्यस्त जगद्भान : तुझा ठाईं दृश्यमान ॥ त्याचे बुद्धिसाक्षित्वें करुन : सकळांतरिं वर्तसी गा तुं ॥ ४२ ॥ असो हे देही जे जीव समस्त : यांचा अंतरात्मा द्रष्टा निश्चित ॥ परि या यशोदेचा सुत : नव्हसि गा कृष्णा ॥४३॥ ह्मणसी मी अंतःसाक्षित्वें करुन : सर्वां भूतिं जो वर्तमान ॥ तरि त्या माझें दर्शन : दृश्यत्वें कैसें ॥ ४४ ॥ बुद्धिसाक्षि वस्तु जे काहिं : जेथें इंद्रियांची गति नाहिं ॥ ते या नेत्रांसि काई : विषय होउं शकेल ॥ ४५ ॥ ऐसें मानेल गा तुतें : तरि या पीडल्या जगातें ॥ जाणोनि सत्यलोकनाथें : प्रार्थिलें तुज जगरक्षणार्थि ॥ ४६ ॥ असो पाळावया महीतळी : नंदानंदन वनमाळी ॥ तुं यादवांचे कुळिं : उदैलासि किं प्रभो ॥ ४७ ॥ ब्रह्माप्रार्थनेचेंनि मूळें : तुवां हें विडंबन केलें ॥ पाळावया साधुसुरकुळें : नाशावया दैत्य ॥ ४८ ॥ तुं यदुकुळभूषण : वसुदेवाचा नंदन ॥ त्याहीमाजि विडंबन : यशोदानंदानंदन त्वाचें केलें ४९ ॥ एवं तु गोपिकानंदन : हे सर्वथा सत्य नव्हे जाण ॥ आह्मी प्राकृतत्वें शरण : आलों नाहिं गा तुज ॥ ५० ॥ आह्मी जर्‍हि कामासक्ता : परि तुं कामशांतिकर्ता ॥ संसारदुःखहर्ता : हें काय अन्यथा होईल ॥ ५१ ॥ यासि प्रमाण ह्मणसी काइ : तरि भजले जे तव पाइं ॥ हा संसारार्णव तिहिं : उलंघिला अनेकिं ॥५२॥ ऐसें त्या धरुनि मनीं :

उत्तर चतुःश्लोकें करुनि ॥ श्रीकृष्णजीतें प्रार्थुनिः इच्छितातें जें काहिं ॥५३॥ असो शरण जाउनि कृष्णाप्रति : ईच्छित वरचतुष्टयातें प्रार्थिति ॥ तें राया तुजप्रति : निवेदितों ऐसें ॥ ५४ ॥

**विरचिताभयं वृष्णिधुर्य ते**
**चरणमीयुषां संसृतेर्भयात् ॥**
**करसरोरुहं कांत कामदं**
**शिरसि धेहि नः श्रीकरग्रहम् ॥ ५ ॥**

अगा ये श्रीकृष्णा : यादवजनकुळमंडना ॥ हें संसारभयहरणा : अभय देइं गा आमुतें ॥ ५५ ॥ हे तुझे करपद्म जे काहिं : ते आमुचा शिराचा ठाईं ॥ ठेविं गा आह्मासि तुं देइं : अभयवरदान पुरतें ॥ ५६ ॥ आह्मी शरण ज्या तुतें : त्या तरों न विरहदुःखातें ॥ तुं प्रकटोनि ऐसा आमुतें : वर देइं कृष्णा एकु ॥ ५७ ॥ असो आह्मी तव किंकरीः मागुत्या वियोगसागरिं ॥ न पडों एसा आमुचा शिरिं : हात ठेविं आपुला ॥५८॥ तो तुझा हस्त किंलक्षण : तरि या संसारभया पासुन ॥ अत्यंत भीत जे शरण : तव चरणा प्रति आले ॥ ५९ ॥ तयांचिया भवभयातें : निवारिलें गा जेणें हस्तें ॥ शिरिं कर ठेउनि त्यांतें : अभय दिधलें तुवां किं ॥ ६० ॥ आणि श्री जे सिंधुनंदिनी : ते जया हस्तें करुनि ॥ तव अनुग्रहातें पावोनि : पावली तुतें गा ॥ ६१ ॥ असो जेणें हस्तें करुन : श्रीयेचें केले पाणिग्रहण ॥ तिया करुनि प्रसन्न : हृदयिं राहिली ॥ ६२ ॥ त्या निजकरसरोरुहातें : सर्वकामशमनातें ॥ कामाभयार्थप्रदातें : आमुचा शिरिं ठेविं ॥ ६३ ॥ अगा ये मनोहरा कांता : सुंदरा गा नंदसुता ॥ हे तव वियोगविरहव्यथा : शमविं आमुची ॥ ६४ ॥ आधिं प्रभो ठेउनि हात शिरिं : या विरहव्यथेतें हारिं ॥ आणि द्वितीयावतारातें हि करिं : मागतों तुज आह्मी हें ॥ ६५ ॥

**व्रजजनार्तिहन्वीर योषितां**
**निजजनस्मयध्वंसनस्मित ॥**
**भज सखे भवत्किंकरीः स्म नो**
**जलरुहाननं चारु दर्शय ॥ ६ ॥**

प्रभो व्रजदुःखहरणा : आइकें सखया श्रीकृष्णा ॥ अगा वीरा आह्मीं अंगना : शरण आलों किं तुज ॥ ६६ ॥ कां जें तव हास्यातें देखोन : कोण्ही भक्त जे तुझे जन ॥ ते गर्वार्णवा पासुन : ताकाळ तरति ॥ ६७ ॥ ह्मणोनि तुज हा संकेत : हे निजजनस्मयध्वंसन स्मित ॥ तुज देखोनि गर्वराहित : तुझे दास होति ॥ ६८ ॥ एवं तो गोपिकागण : संबोधनचतुष्टयें करुन ॥ संबोधिता जाला तें कारण : विचारिजेतें ऐसें ॥ ६९ ॥ प्रथम व्रजजनानार्तिहरण : बोलिल्या त्या यालागुन ॥ जें कृष्णा आम्हीहिं स्वजन : व्रजवासिनी गोपिका ॥ ७० ॥ त्या आम्ही ज्या विरहतप्ता : तुजलागि भ्रमतों वृथा ॥ तरि तुं व्रजजनार्तिहर्त्ता : कैसा पां कृष्णा ॥ ७१ ॥ आतां वीरशब्दें करुनि : शूरामाजि तुं अग्रणी ॥ तरि दुःखग्रस्ता जाणोनि : न सोडविसी कां आम्हां ॥ ७२ ॥ असो वियोगग्रहग्रस्ता : आम्ही तव समस्ता ॥ तरि आमुतें वीरनाथा : सोडवनासि कां ॥७३॥ निजजनस्मयध्वंसनस्मित : हें घडलें या निमित्त ॥ जें आह्मी ज्या गर्वग्रस्त : त्यांतें सांडिलें तुवां ॥ ७४ ॥ तरि नाशावया गर्वातें : तुज काय सामर्थ्य नव्हतें ॥ परि कोण जाणें किंनिमित्तें : गेलासि तुं गा ॥ ७५ ॥ परंतु तव स्मरणें करुन : त्या गर्वार्णवा पासुन ॥ तरलों ऐसें जाणोन : तुं भजपदें अंगीकारिं सखया ॥ ७६ ॥ असो सखा येणें संकेतें : दाविलें अनन्य गतीतें ॥ कृष्णा तुजवीण आमुतें : रक्षणार नाहिं कोण्हि ॥ ७७ ॥ आह्मीं निश्चयें तव किंकरी : गती नाहिं गा दुसरी ॥ उपेक्षुं नको झडकरि : संभोगिं आमुतें सखया ॥ ७८ ॥ प्रवेशोनि आमुचा हृतिं : आमुचा तुं गा प्राणपती ॥ मैथुन करुन एकांतिं : निवविं आमुतें ॥ ७९ ॥ आतां प्रकटोनि श्रीपति : आमुसिं करि गा सुरतरति ॥ असो आमुतें संभोगरीति : भज सखया तुं ॥ ८० ॥ तें कैसें ह्मणसी भजन : तरि दावि जळरुहानन ॥ म्हणिजे सुंदर वदन : कमळासारिखें जें ॥ ८१ ॥ देखोनि मुखशोभालेश : कमळ केलें उपमेस ॥ जयातें पाहोनि विध्वंस : कंदर्प पावे ॥ ८२ ॥ ऐशा निजवदनातें : दावि आम्हां तव योषितातें ॥ देउनि भोगसुखातें : निवविं कृष्णा

॥ ८३ ॥ असो त्या वरचतुष्टयातें : तुजलागि प्रार्थिलें होतें ॥ त्याही माजि प्रथम तुतें : विनविती आम्हीं इतुकें गा ॥ ८४ ॥ जें आम्हां तव योषितांसि : तृषाक्रांता चकोरांसि ॥ तृप्त करावया मुखशशी : प्रकटि गा तुं आधिं ॥८५॥ पाहोनि वदनशोभितें : निवतीऊ संततें चित्तें ॥ मग उर्वरिता वरत्रयातें : भोगिजेल सावकाश आम्हें ॥ ८६ ॥ म्हणोनि कृपाळुवें श्रीकांतें : अधिष्ठुनि स्वकरुणेतें ॥ दावावें मुखसरोजातें: आम्हा निजयोषितां प्रति ॥ ८७ ॥ जेवि संसारतप्तां प्रति : आधि शास्त्रें फळातें दाविति ॥ मग उपदेशुनि निवृति : स्वरूपनिष्ठा साधविति ॥ ८८ ॥ असो आधि श्रवणपंथें : दाविती स्वरूपलक्षणातें ॥ पावावया आत्मनिष्ठेतें : मग सांगती ध्यानयोग गुरु ॥ ८९ ॥ तेवि तव मुखशोभेतें : पाहोनि होति शांतें चित्तें ॥ मग शिरिं ठेउनि स्वहस्तें : अभयवरातें देइं गा ॥९०॥ असो पुर्वि पावोनि शांति : योग्य होउं न संगाप्रति ॥ मग यथाक्रमें अति प्रीति : तुं संभोगिं आमुतें ॥ ९१ ॥ एवं वरद्वयें करुन : श्लोकयुग्में केलें प्रार्थन ॥ आतां तृतीयातें गोपीजन : प्रार्थितुसे ऐसें ॥ ९२ ॥

**प्रणतदेहिनां पापकर्शनं**
**तृणचरानुगं श्रीनिकेतनम् ॥**
**फणिफणार्पितं ते पदांबुजं**
**कृणु कुचेषु नः कृंधि हृच्छयम् ॥ ७ ॥**

सर्व मंगळाचें मुळ : कृष्णा तुझें पदकमळ ॥ तें आमुचा हृदइं निश्चळ : नावेक ठेविं आतां ॥ ९३ ॥ तें ह्मणसी किंविशेषण : तरि जे कि देहधारि जन ॥ त्यांमाजि जे कोण्ही सज्जन : तुझे भजनासि अधिकारी ॥ ९४ ॥ सांडोनि सर्व विषयातें : तुझया पदसरोजातें ॥ श्रवणकीर्तनादि पंथें : शरण येती जे किं अनन्यभावें ॥ ९५ तयांचें दुरितकर्षण : ह्मणिजे पापसमुद्रा पासुन ॥ तरोनि ते तुझे भजन : सुखाडें पावति प्रभो ॥ ९६ ॥ एवं एतत् लक्षणिकासि : आपलिया पदसरोजासि ॥ आमुचिया स्तनहृदयेदेशीं : समर्पि गा कृष्णा ॥ ९७ ॥ आणिक तें किंविशेषण : तरि तृणचरानुग जाण ॥ जें

गोधना मागें करी गमन : ऐसें तुझें पदांबुज किं ॥ ९८ ॥ हें जें आपुलें पदकमळ : तें मर्दुनि कुचयुगळ ॥ समर्पि गा हृदइं अढळ : आमुचे कृपेस्तव ॥ ९९ ॥ आणि श्री जे सिंधुतनया : पावली पदाब्जनिलया ॥ तें पदपद्म या इच्छया : नाशावया ठेवि स्तनिं ॥ २०० ॥ आणि जे यमुनें माझारि : ठेउनि सर्पफणावारि ॥ त्या महां सर्पाचे शिरिं : नृत्य जेणें केलें ॥ १ ॥ तया पदांबुजातें : विशेषणें वर्णावें किती येथें ॥ ते सिंधुजा जेणे स्वार्थे : वश जाली तुज ॥ २ ॥ मनिं धरुनि पादसंवाहन : तिया जोडिलें स्वनिकेतन ॥ पावली समाधान : त्यक्ताभिमान जे ॥ ३ ॥ ह्मणोनि पदाचें विशेषण : केलें श्रियचें निकेतन ॥ ते सांडोनि सर्व मान : राहिली गा जेथें ॥ ४ ॥ एवं एतन्महिमानवंत : तुझें पदांबुज जें प्रशस्त ॥ तें समर्पि कृष्णा निश्चित : कुचांवरि गा ॥ ५ ॥ ऐसें तो गोपिकाजन : विशेषणच्यतुष्टयेंकरुन ॥ श्रीकृष्णजीचे चरण : इच्छिता निजहृदयिं ॥ ६ ॥ तें चतुर्विशेषणवशें : प्रार्थिलें त्याचा भाव ऐसा असे ॥ जें आमुचिं सपापें मानसें : असतील जारि ॥ ७ ॥ तारि पापाचें कर्पितें : प्रार्थिलें जें पदांबुज तुतें ॥ कृष्णा तें जरि कृपावंतें : स्तनहृदयीं आमुचा ॥ ८ ॥ तें करिजेल समर्पण : तारि या दुरितार्णवा पासुन ॥ तरोनि तुझें संनिधान : पावों गा सत्वर ॥ ९ ॥ म्हणसी तुम्ही मुढजाति : योग्य नव्हा मत्पदांबुजा प्रति ॥ ऐसें जारि श्रीपति : म्हणसी गा आतां ॥ १० ॥ तारि सुजाना ( णा ) श्रीकृष्णा : आम्ही काय पशूहुनि हीना ॥ सदा गाइ नेउनि राणा ( ना ) : त्यां मागें फिरसि ॥ ११ ॥ त्या मागें चालते वेळे : तव पदसंगाचे सोहळे ॥ भोगुनि तिहिं नाशिले : दुरिताचे पर्वत किं ॥ १२ ॥ म्हणोनि दुरितक्षयानिमित्तें : प्रार्थिलें तव पदातें ॥ जें दुरितें आतां आमुतें : प्रतिबंध जालिं ॥ १३ ॥ म्हणसी तुम्ही नव्हा जन्हि हीना : परि सक्रोधा अंगना ॥ जातीच्या साभिमाना : शरण जन्ही मातें ॥ १४ ॥ ऐसें जारि जगन्नाथें : कल्पिजेल काहिं येथें ॥ तारि आम्ही वनिताशतें : सर्पाहुन काय सक्रोधा ॥ १५ ॥ या यमुनाजळा माझारि : काळियाचे फणावारि ॥ नाचोनि

केलि बोहरी : त्या सर्पाचिया दर्पाचि ।। १६ ।। तें जरि गा श्रीचरण : लाधेल हें हृदयभुवन ।। नातरि आमुचा दर्प कोण : किमात्मका आम्ही ।। १७ ।। म्हणोनि दर्पहरा पदातें : इच्छिताति आमुचिं चित्तें ।। तया चराणि गा आमुतें : अवसरु देइं कृष्णा ।। १८ ।। म्हणसी पापातें कर्षिति : मुढत्वातें नाशिति ।। महां दर्पातें हरिति : असोत माझि पदकमळें ।। १९ ।। पारि या पदांचा ठाइं : दृष्ट सुख तों नसे काहिं ।। तरि ते रमादेवी काइ : व्यर्थचि भजिनलि येथें ।।२०।। ते सकुमारासिरोमणि : सकळ सौष्ठव्याची खाणि।। जियेचा अवलोकनि : इंद्रही सलालस ।। २१ ।। पारि त्या इंद्रादिकांसि काहिं : तो लेशहि लाभत नाहीं ।। ऐसी जे रमादेवी ते काई : उगीच राहिली तेथें ।।२२।। अगा ते सिंधुनंदिनी : स्वता तुझी पदसंवाहिनी ।। केलें भजनालागुनि : तिया समाधि सदन ।। २३ ।। एवं जें पापहर्तें : तापाचे उपशमवितें ।। तें पदांबुज गा कृष्णा तुतें : प्रार्थितों स्वकुचावरि ।।२४।। त्या तव पदसरोजासि : या स्तनहृदयप्रदेशीं ।। ठेउनि आमुचा नाशिं : हृच्छय जो मदन हा ।। २५ ।। असो या पदप्रभावें करुन : करिं कामाचें विच्छेदन ।। आमुतें गा समाधान : आपुले पाईं द्यावें ।। २६ ।। करावया कामनिवृत्ति : तव पदिं असे गा शक्ति ।। हें जाणोनि आह्मी समस्ति : शरण आलों तुज ।। २७ ।। आतां कृपेतें अविष्ठुन : या स्तनावरि चरण ।। ठेउनि करिं गा विच्छेदन ।। दर्पाचें आमुचिया ।।२८।। असो कारणेसि जो मदन : त्याचें करिं विच्छेदन आह्माप्रति उदासीन : नसावें तुवां कृष्णा ।। २९ ।। एवं येणें श्लोकें करुन : प्रार्थिलें पदांबुजप्रदान ।। आतां पुढें गोपीजन : चौथा वर मागतो ।। ३० ।।

**मधुरया गिरा वल्गुवाक्यया**
**बुधमनोज्ञया पुष्करेक्षण ।।**
**विधिकरीरिमा वीर मुह्यतीं-**
**रधरसीधुनाप्याययस्व नः ।। ८ ।।**

अगा ये यशोदानंदनाः श्रीकृष्णा कमलनयना ।। आणिक एकि प्रार्थना : अवधारिं आमुची ।।३१।। ह्मणसी तुम्ही अंगना : सदा गृहवासिनी स्वाधीना ।।

मज पर पुरुषातें प्रार्थना : येवढी कां करिता ॥ ३२ ॥ दृष्टोत्पत्त्या तों येथें कांहिं : मज तुमसिं संबंधु नाहिं ॥ वाउगीच तरि हे काई: इतुकी हे कदर्थना ॥ ३३ ॥ ऐसें जारि काहिं वीरा : म्हणसी गा नंदकुमारा ॥ तरि तुझी जे किं मधुर गिरा : बुधमनातें रंजविती ॥ ३४ ॥ असो सुंदरा वचनि प्रशस्त : बुध जे विवेकी विरक्त ॥ अति चतुर गंभीर युक्त : बोलों जाणती जे ॥३५॥ त्या सज्जनमनातें हर्ति : अतिशयें सुखातें कर्ति ॥ तया वाचे करिं श्रीपति : : विधिकरी ज्या आम्ही ॥ ३६ ॥ मोहिलों असत होंतसाया : फिरविलों गा इतस्तता ॥ तरि तुवां कृष्णा आता : उपेक्षिले कां आमुतें ॥ ३७ ॥ असो मधुरा वाणीं करुनि : तुवां मोहिलों आम्हि भामिनी ॥ सर्वस्वातें सांडुनि : विधिकरी जालों ॥ ३८ ॥ तियां तव दासितें आम्हासि : तुझा पाइं असा-वयासि ॥ आधिकारु निश्चयेंसिं : जाला गा आतां ॥३९॥ आम्ही जे धरिले प्राण : ते तुझाचि आश्रयें करुन ॥ आम्हासि तुजवांचुन : गति नाहिं कृष्णा ॥४०॥ न देखोनि तव वदना : वोडवलों गा गतप्राणा ॥ अतां आमुतें नंदा-नंदना : अधरांमृतें वांचविं ॥ ४१ ॥ असो आपुलें अधरांमृतें : जीवविं आम्हां किंकरींतें ॥ म्हणसी म्या सांडिलें तुमतें : तारि वांचल्याति कैशा ॥ ४२ ॥ मजवांचुनि नाहिं गति : हा निश्चयो जारि असे चित्तिं ॥ तरि आतां कोणे रीति : राहिल्याति तुह्मी ॥ ४३ ॥ प्रभो ऐसें जारि गा म्हणसी : तरि यथार्थ हें आम्हासि ॥ तुझा वियोगें निश्चयेंसि : वांचने ( णें ) चि न घडे ॥ ४४ ॥ परि आम्हीं वांचलों येथें : तुझिया गुणकथामृतें ॥ जाणवोनि ऐशा अर्थातें : बोलताती त्या गोपी ॥ ४५ ॥

**तव कथामृतं तप्तजीवनं**
**कविभिरीडितं कल्मषापहम् ॥**
**श्रवणमंगलं श्रीमदाततं**
**भुवि गृणंति ते भूरिदा जनाः ॥ ९ ॥**

प्रभो तुझें कर्म अद्भुत : तेंचि जें तव कथांमृत ॥ त्या कथांमृतातें प्रस्तुत : वर्णिती जे या जनि ॥ ४६ ॥ असो जे सारभागी जन : तव गुणकथेचें

कीर्तन ॥ करिताति ते कृष्णा जाण : बहु दाते या लोकि ॥ ४७ ॥ ह्मणसी हें जें गुणकीर्त्तन : यासि अमृतत्विं काय कारण ॥ तारे जे कीं संतप्त जन : त्यातें जीवविते ॥ ४८ ॥ असो मरणाहुनि विशेष : या संसारें महाक्लेश ॥ जे मेलियांहिं बहु त्रास : अनुजन्मीं होति ॥ ४९ ॥ जे मेलियातें जन्मविति : मागुती जन्मोनि मारिति ॥ एवं ते दुःख पांक्ति : कल्पावधि भोगिजे ॥५०॥ त्या दुःखभयें जे संतप्त : त्यां तप्तांचें हें जीवनभूत ॥ ऐसें जें तव गुणांमृत : तया गुणातें जे गाति ॥ ५१ ॥ ह्मणसी हें तों अदृष्टसुख : आतां ते कैसें सुखात्मक ॥ ऐसें ह्मणसी तरि आइक : ब्रह्मनिष्ठ जे ॥ ५२ ॥ तेही ब्रह्मज्ञानें करुन : जन्हि तुटलें जन्मकारण ॥ तिहिं गुणकीर्तन : करिजेताचि आहे ॥ ५३ ॥ असो जे गुरुशास्त्ररीति : पावले जन्हि आत्मस्थिति ॥ तेही तुझे गुण गाति : प्रेमळ होत्साते किं ॥ ५४ ॥ तस्मात् ब्रह्मज्ञानें करुन : तोडिलें दुःखाचे कारण ॥ तथापि प्रारब्धैक उत्पन्न : देहिं जो संताप ॥ ५५ ॥ त्या संतापाचें शमन : तें तव गुणाचें कीर्त्तन ॥ करुनि ते विवेकी जन : सदां आत्मसुखें असती ॥ ५६ ॥ असो तेही तवगुणकीर्त्ति : गाउनि पावती वि- श्रांति ॥ तेयें विक्षेपाची प्रवृत्ति : होउंचि नशके कदापि ॥ ५७ ॥ आतां हेंचिं असो परते : प्रारब्धहि न स्पर्शो त्यांतें ॥ परि विश्रांतिहि वरौते : अ- त्यंत सुख भोगिती ते ॥ ५८ ॥ तस्मात् तुझें गुणकीर्तन : अमृतत्वाचें सा- धन ॥ तथापि येणें योगीजन : परमानंदातें पावती गा प्रभो ॥ ५९ ॥ मां आह्मीं तो तुझिया आप्ता : परि दैवें वियोगप्राप्ता ॥ त्या आमुतें तव गुण गातां : वांचतां आश्चर्य काये ॥ ६० ॥ त्या तव गुणकथेतें : वर्णिती तोचि सर्वांचे प्राणदाते ॥ किंबहुना तिहिंचि आमुतें : वांचविलें प्रस्तुत ॥ ६१ ॥ ह्मणोनि इये जनि : योजले ते संत बहुंदानि ॥ जे तुझे गुणकीर्तनें करुनि : क्रमिताति काळ ॥ ६२ ॥ ह्मन(ण)सि माझे गुणकीर्त्तन : दृष्टादृष्ट सुख- कारण ॥ ह्मणिजे आतां सुख करुण (न) : परत्रही सुखातें देते ॥ ६३ ॥ परि पापनिवृत्ती वांचुन : न तुटे संसारबंधन ॥ नुपजोनि शुद्ध ज्ञान : नीर- सेल कैसि अविद्या आतां ॥ ६४ ॥ अविद्यानिवृत्ति वांचुन : नव्हेचि कामो.

पशमन ॥ कामाचे निवृत्तीवीण : मोक्षप्राप्ति कैसी होय ॥६५॥ ऐसें जरि प्रभो ह्मणती : तरि आइकतां गुणकीर्त्ति ॥ अनेकां कल्मषांची पंक्ति : तत्काळ नाशते ॥ ६६ ॥ असो तवगुणकथारसें : नाश पावती किल्बिषें ॥ होउनि शुद्ध मानसें : ज्ञानाधिकार संपादे श्रवणें ॥६७॥ आणि गुणकथेचा ठाइं : साधनांतरें काज नाहिं ॥ श्रवणमात्रेंचि सर्वहि : पातकें नाशोनि जाति गा ॥६८॥ ह्मणोनि सांडोनि वाग्जाळ : गुणकथा जे श्रवणमंगळ ॥ तियेतें भावें करितां प्रांजळ : वर्णिती जे कोण्हि ॥ ६९ ॥ ते सन्त स्वता आपण : असोनि मंगळायतन ॥ करिति मंगळप्रदान : श्रवणार्थिया सकळांतेंहीं ॥७०॥ श्रीमंत जे व्यासादिक : तिहिं वार्णिलें कथानक ॥ त्या गुणकथेतें अधिक : विस्तारिती तेचि संत्त ॥ ७१ ॥ यालागि ते कैवल्या दानी : बोलिजती बहुतां जनि ॥ तव गुणकथेतें वर्णोनि : निववित्ती सर्वांतें ॥ ७२ ॥ असो देवभोग्य जे अमृत : तें बहुतां संकटें प्राप्त ॥ आणि तुझे गुण कथित : श्रवणकीर्तनेंचिसुखप्रद ॥ ७३ ॥ आणि हे दुरितहरण : कैवल्यप्राप्तिचें कारण ॥ कींबहुना हे तुझे गा गुण : कैवल्यरुपाचि सकळांतें ॥ ७४ ॥ म्हणसी हे कैवल्यप्रदानी : ऐसें जाणिजे कैसेनि ॥ तरि मनातें उपशमउनि : शातीतें करिते जे ॥ ७५ ॥ असो हे तव कथामृत : बोलिले जें श्रीमत् सुशांत ॥ जैसें उन्मादक अंमृत : तैसे हें नव्हे सर्वथा ॥ ७६ ॥ तव कथामृतलहरी : नव्हे गा उन्मादकारी ॥ या परमशांतीचिये सेजारिं : श्रवणमात्रें पहुडवि ॥ ७७ ॥ म्हणसी सारभागी जे जन : माझया गुणगणाचे गायन ॥ करुनियां ते शांत मन : निवांत होति ॥ ७८ ॥ ते कोणे लक्षणे करुनि : योजले बहुतेक शांतदानी ॥ ऐसें म्हणसी तरि या जनिं : प्रकटचि ते गुण गाति ॥७९॥ अधिगतप्रेमरसवृत्ति : वर्णिती तुझी गुणकीर्ति ॥ असो विस्तारें गुण गाति : जेणें लोकोपकार वाढे ॥ ८० ॥ तें जें देवभोग अमृत : कथामृताहुनि प्राकृत ॥ अति तुच्छ तें आणि बहुत : दुःसाध्यही असे ॥८१॥ यागादिकातें अधिष्ठुन : स्वर्गवासी होते असोनि जन ॥ तन्हि त्यांसि तें पान : बिंदुमात्र लाभतें ॥ ८२ ॥ हें कदाचित् कोण्हि अखंडित : यथेच्छ

जइं होती संतृप्त ॥ तइं ते चिरंजीवित : अभंग अक्षय होती ॥ ८३ ॥ ऐसें तें स्वर्गामृत दुर्लभ : आणि हे तों सर्वासि सुलभ ॥ उत्तम कनिष्ठ स्वयंभ : समान सेविति ॥ ८४ ॥ आणि तवकथामृतपान : पावनाचेंहि पावन ॥ परम शांतीचें सदन : कैवल्याचें साधक जें ॥ ८५ ॥ या अमृतातें अपेक्षुन : करिती जे कथा श्रवण ॥ ते बहुं सुरवाडें करुन : निमज्जती आनंदडोहिं ॥ ८६ ॥ तयां प्रेमळांसि गा काहिं : या कथामृताचि वाणि नाहिं ॥ विनटले तुझा पाईं : ते सौकर्यें वर्णिती ॥ ८७ ॥ व्यासवाल्मिकादि ये जानें : कवि जे थोर थोर कोण्हि ॥ तिहिं हें गाइलें ह्मणोनि : तेचि दाते येथें ॥ ८८ ॥ ते आपण पावोनि शांति : इतरांचि दुःखें नाशिती ॥ संतप्तातें निववितो : गुणवर्णनप्रसादें सदां ॥ ८९ ॥ ह्मणोनि ते सुखदाते : परमांमृताचे वर्षते ॥ असो प्रस्तुत तिहिं आमुतें : वांचविलें गा कृष्णा ॥ ९० ॥ किंवा उक्तलक्षणयुक्त : तुझे जे गुणकथामृत ॥ त्यातें कवि जे कोण्ही संत : वर्णिती गा ये लोकिं ॥ ९१ ॥ तेचि जाणावे बहुं दानि : जे जन्मांतरिं तपोनि ॥ अनंत सुकृतें अर्जुनि : अधिकारी जे होती ॥ ९२ ॥ असो वर्णावया तव कीर्त्ति : ते अधिकारातें पावती ॥ सुकृताची हे संपत्ति : भोगिती ते आपुली ॥ ९३ ॥ तयाचि प्रसंगें करुन : आमुचेहि वांचले प्राण ॥ आतां दावि आपुलें वदन : प्रगटोनि गा सत्वर ॥ ९४ ॥ नातरि गुणवर्णनेंकरिं : त येवढी पावती थोरि ॥ आह्मी तों तव किंकरी : देखों जरि गा तुतें ॥९५॥ तरि या भाग्याची नवाई : वर्णावी गा किति काइ ॥ यालागिं प्रपन्ना तुझे पाइं : दर्शन देइं श्रीकृष्णा ॥ ९६ ॥ ह्मणसी माझें कथामृत : येवढें महिमानवंत ॥ तरि तेंचि सादरचित्त : प्राशोनि असावें सर्वदा ॥ ९७ ॥ अपेक्षूनि दर्शनातें : व्यर्थ कां कदर्थिता आपणातें ॥ ऐसें जरि यदुनाथें : कल्पिजेल काहिं ॥ ९८ ॥ तरि आधिं विलासपंथें : क्षोभविलिं कां आमुचिं चित्तें ॥ ये विषइं गा कृष्णा तुतें : विनवितों ऐसें ॥ ९९ ॥

**प्रहसितं प्रिय प्रेमवीक्षणं**
**विहरणं च ते ध्यानमंगलम् ॥**

**रहसि संविदो यो हृदि स्पृशः**
**कुहक नो मनः क्षोभयन्ति हि ॥ १० ॥**

अगा ये प्रिया प्रीतिसदना : श्रीकृष्णा नन्दानन्दना ॥ सुंदरारविंदवदना : अवधारिं गा आमुची विनति ॥ ३०० ॥ प्रभो तुझे जें प्रहसित : हांस्य जें किं शुचिस्मित ॥ जेणें विश्व हें समस्त : धवळिलें अंति शुद्धतेकरिं ॥ १ ॥ असो जया स्फुरणें करुन : रचलें हें गा जगद्भान ॥ जेणें मिषें विग्रहधारण : तें जें तुझें विलासहास्य ॥ २ ॥ तैसोंचि तुझें प्रेमवीक्षण : जें कृपाकटाक्षावलोकण (न) ॥ असो जें केलें प्रेमप्रदान : नयनकटाक्षद्वारा ॥ ३ ॥ आणि तुझा जो किं विहार : जे चालता पदप्रचार ॥ विलासेंकरिं मनोहर : या वृंदावनाचा ठायिं ॥ ४ ॥ आणि तुझी जे मंगळमूर्ति : शोभा हे जे विलासवती ॥ जे किं सौष्ठव्याचि सम्पति : कैवल्याचि मुस ॥ ५ ॥ जे योगीजन हृत्कुहरिं : वसोनि सदां सुखकारी ॥ असो जे चित्तहारि मंगळमयीचि अवधि ॥ ६ ॥ त्या मुर्तिद्वारा तुझें ध्यान : जें मंगळांचे निकेतन ॥ मनोविश्रांतीचि हें स्थान : प्रेमाचें वर्धक ॥ ७ ॥ आणि एकांताचा ठाइं : संकेतनर्मे जें जें काहिं ॥ असो एकांति तुवां जें काहिं : विनोदारंभ दाविले ॥ ८ ॥ प्रभो आह्मि ज्या गोपांगना : त्वद्विलासमोहितमना ॥ त्या आप्त केलों ऐशा सूचना : एकांति ज्या दाविल्या ॥ ९ ॥ नातरि जाणउनि संकेतातें : स्तनहृदयें केलिं नखमुद्रितें ॥ असो जिहिं हृदयातें : स्पर्शिलें आमुचिया ॥ १० ॥ असो विनोदाचें निमित्तें : धरिलें आमुचिया स्तनातें ॥ करोनि नखसंस्कारातें : मुद्रांकिता केलों ॥ ११ ॥ जेवि शरणागतां मुमुक्षूतें : गुरु असोनि प्रसन्नचित्तें ॥ पाहोनि कटाक्षपातें : अभयातें प्रेरिति ॥ १२ ॥ मग ते शास्त्रप्रक्रियेतें : दाउनि आपातता अर्थे ॥ बोधउनि महांवाक्यें त्यांते : उपदेशिती हृदयस्पर्शें ॥ १३ ॥ तेवि तुवां गा आमुतें : कृष्णा चतुराचेनि नाथें ॥ दाउनि हसितें क्षणातें : नखदंतसंस्कार केले ॥ १४ ॥ एवं ते हास्यावलोकें : आतां जालिं मनःक्षोभकें ॥ जें तुवां कपटनायकें : प्रेरिलीं गा आम्हासि ॥ १५ ॥ तोंचि आमुचिया मनातें : क्षोभविताति मा समस्तें ॥ कां

जें तुं ठकुनि आमुतें : गेलासि येथुनि ॥ १६ ॥ किंवा हें दोषनिबंधन : आम्हा दाविलें तिरोधान ॥ पावलों आरूढ पतन : अंतरोनि तुज आतां ॥ १७ ॥ स्मरोनि हास्यादिकांतें : क्षोभती गा आमुचि चित्तें ॥ यालागि तव कथेतें : गावोनि वांचलों नावेक ॥ १८ ॥ परि न देखोनि हे मूर्ति : आम्हि न पवों गा विश्रांति ॥ जेवि परोक्षवादें स्थिति : निष्टंक नव्हे स्वरुपीं ॥ १९ ॥ म्हणोनि अगा ये कुहका : कपटिया मनमोहका ॥ आह्मीं त्याज्य न हों दासिका : अंगी कारिं आतां ॥ २० ॥ लाउनि आपुली प्रीति : चोरिली आमुची चित्तवृत्ति ॥ नेणों गा कपटयुक्ति : भोळिया आम्ही ॥ २१ ॥ प्रीतिवेधें चोरिलिं चित्तें : हें कापट्य योजलें तुतें ॥ परि कोण जाणें तुझी येथें : अतर्क्य लीला हे ॥ २२ ॥ आतां प्रकटिं आपणातें : राक्षिं गा आमुचि जीवितें ॥ सर्वथा आम्हा प्रपन्नातें : उपेक्षु नको ॥ २३ ॥ सांडुनि सर्वस्वातें : सर्वाही भजीनलों तुतें ॥ आतां जरि गा आमुतें : उपेक्षिसी तुं कृष्णा ॥ २४ ॥ ऐसें उचित तुला होये : हें तुंचि विचारुनि पाहे ॥ हा न्याय किंवा अन्याये : अपराध हा कोणाचा ॥ ९९.॥ वोळखोनि आमुचिं चित्तें : तुवां कपट करावें होतें ॥ पाहे आरंभापासूनि गा तुतें : वश जालों कैशा पां ॥ २६ ॥ तुवां जे जे केलें गा जैसें : तें आम्हासही इष्ट तैसें ॥ हें आपुलें लाउनि पीसें : आतां वंचिलें कां कृष्णा ॥ २७ ॥ राया ऐसें तें गोपीजात : आपुलें सर्वहि ह्रुद्गत ॥ प्रगटोनि ऐसें प्रस्तुत : बोलतुसें तें अवधारिं आतां ॥ २८ ॥

**चलसि यद्व्रजाचारयन्पशू-**
**न्नलिनसुंदरं नाथ ते पदम् ।**
**शिलतृणांकुरैः सीदतीति नः**
**कलिलतां मनः कांत गच्छति ॥ ११ ॥**

प्रभो जेव्हां तुं क्रीडापरायण : कारितोसि पशुपालन ॥ या व्रजाहुनि गमन : वनाप्रति कारिसी गा कृष्णा ॥ २९ ॥ तेव्हां आमुचिया चित्ता : होत असे बहु विकळता ॥ असो तें गमन सर्वथा : क्षोभवीतसे या मनातें ॥ ३० ॥त्यासि निमित्त ह्मणसी काइ : तरि वनिं चारितां गाई ॥ त्यां मागें

फिरतां पाईं : तेथें शिळें तृणांकुरें असती ॥ ३१ ॥ असो शिळे जें कुसळें तीक्ष्णें : अंकुरें जें तृणमूळें कठिणें ॥ आणि तुझीं पदें सुलक्षणें : त्यांतें तें रुतती झणि ॥ ३२ ॥ नाना जैसें कमळदळ : सुनीळ आणि सुकोमळ ॥ त्याहुनि तुझे पदतळ : सुकुमार आणि साजिरें ॥ ३३ ॥ त्या तुझिया पदातें झणि : ते कुसळें तृणमुळें दोन्हि ॥ श्रमविती हे चिंतवणी : आमुतें बहु लागे ॥ ३४ ॥ तिये चिंतवणी निमित्तें : आमुचि मनें विकळतेतें ॥ पावती तेणें आमुतें : व्यवहार न सुचे गा काहिं कृष्णा ॥ ३५ ॥ तुज व्रजापासुनि जातां : आमुची ऐसी अवस्था ॥ जन्हि मनिं होती गा आस्था : जें आतां येईल श्रीकृष्ण ॥ ३६ ॥ जेवि कोण्हि जे योगी जन : ते करितां निदिध्यासन ॥ नविक होतां देहभान: देहस्थितीचि पुरतें कि गा ॥३७॥ मग तितुकियाचि काळें : आत्मानु-संधान जें खंडलें ॥ तेणेंचि त्यांचि चित्तें विकळें : होती तत्काळ ॥ ३८ ॥ मां दुरादृष्टाचेनि निमित्तें : प्रपंचावरि आलिं चित्तें ॥ स्वरूपस्थिति जरि त्यांतें : सांडोनि जाये ॥ ३९ ॥ मग त्या मुमुक्षुचें दैन्य : कोण करि गा निवारण ॥ तेवींचि आह्मी तुझे जन : वोडवलों आजि ॥ ४० ॥ तरि ते आरुढ पतित : एसे जाणावें निश्चित ॥ तरि तें विघ्ननिरासार्थ : प्रकटावें लागे तुज ॥ ४१ ॥ म्हणोनि आम्ही विनविलें : जें तुवां वनिं गमन केलें ॥ तेंचि आम्हा दुःसह जालें : मां आतां तो विशेष ॥४२॥ नाना पशुलक्षणें करुन : आमुचा इंद्रि-यगण ॥ त्यातें तुं अनुसरोन : प्रवृत्तिमार्गें जेव्हां वर्तसि ॥ ४३ ॥ तैं आमुचिं गा चित्तें : पावती किं कलिलतेतें ॥ मां आतां तरि तुवां आमुतें : सांडिलें किं गा कृष्णा विशेष ॥ ४४ ॥ असो हे भावार्थकथा : प्रसंगुचि चालउं आतां ॥ या श्लोकें त्या व्रजवनिता : बोलताति ऐसें जें ॥ ४५ ॥ पशुपाळ नाचे निमित्तें : व्रजापासुनि कृष्णा तुंतें ॥ गमन करितांहिं आमुतें : न साहावे वियोगु ॥ ४६ ॥ तुझा सकुमारा पाइं : झणिं श्रम होतील काहिं ॥ ऐसी आमुचा हृदइं : विकळता उपजतसे ॥ ४७ ॥ तस्मात् तेणें हिं निमित्तें : श्रमविलिं आमुचिं चित्तें ॥ आणि आतांहि तुवां येथें : कापट्य केलें कैसें ॥ ४८ ॥ हें तुज उचित जालें काई : तुं न जाणसी काय सर्वेहि ॥ येथें कृष्णा तुं

जरि काहिं : ह्मणसी गा एसें ॥ ४९ ॥ जें म्यां करितां पशुपाळन : व्रजापासुनि केलें गमन ॥ तान्हि होतां दिनावसान : व्रजासि आलों ॥ ५० ॥ तों मि असतांहि कां तेथें : सुख नाहिं जालें तुमतें ॥ पाहोनियां मुखशोभेतें : निवाल्या नाहिंत काई ॥ ५१ ॥ ऐसें जरि कांहि येथें : भाविजेल रमानाथें ॥ तरि तेणेंहि प्रसंगें चित्तें : क्षोभविलिं गा आमुचि ॥ ५५ ॥ धरुनि ऐसें निजमनिं : त्या उत्तरश्लोकें करुनि ॥ बोलत्याति व्रजवासिनी : तें अवधारिं राया ॥ ५३ ॥

**दिनपरिक्षये नीलकुंतलैर्वनरुहाननं बिभ्रदावृतम् ॥**
**घनरजस्वलं दर्शयन्मुहुर्मनसि नः स्मरं वीर यच्छसि ॥ १२ ॥**

त्या वनापासुनि दिनांति : तुज येतां गा वृ(व्र)जाप्रति ॥ तेव्हांहि हें मनें मागुति : क्षोभातेंचि पात्रांति ॥ ५४ ॥ ते ह्मणसी कोणे निमित्तें : तरि दाउनि मुखाब्जातें ॥ चेतविसी गा कंदर्पातें : मनाचा ठायिं आमुचिया ॥ ५५ ॥ तें तुझें जळरुहानन : आइक कृष्णा किंविशेषण ॥ जें कंदर्पाचें उत्पात्तिकारण : बहुं शोभलें जें ॥ ५६ ॥ तरि नीळ कुंतळाकृती : जें शामवर्ण केशपांक्ति ॥ असो मुखावरि जे रुळती : कुरळ केश ॥ ५७ ॥ त्या कुरळ केशिं आवरलें : आणि वनगोरजिं डवरलें ॥ असो बहुं गोरज बैसले : ज्या मुखावरि ॥ ५८ ॥ जैशा भ्रमरांचिया पांक्ति : पद्मपत्रातें आच्छादिति ॥ तैशा मुखावरि रुळति : केशाच्या हारी ॥ ५९ ॥ आणि पद्मपरागस्थानि : गोरजांचिया दाट श्रेणि ॥ एवं लक्षणद्वयें करुनि : वनरुहानन तें जें ॥ ६० ॥ ऐशा मुखपद्मातें आह्मांसि : प्रवर्तत खेव निशि ॥ दावित होत्साता समर्पिसी : कंदर्पशतें निजदर्शनें ॥ ६१ ॥ एवं निशामुखि येउन : दावित होत्साता सुवदन ॥ विरहवृद्धीतें प्रेरुन : आपुला लाविसी वेधु ॥ ६२ ॥ परि तोडोनि व्यवधानातें : नेंदिसी गा संनिधानातें ॥ असो वारुनि प्रतिबंधातें : संभोग न करिसी ॥ ६३ ॥ तस्मात् तुला तेणेंहि काळें : कपटचि घडोनि आलें ॥ नेणों तेथेंहि हेतु जालें : आमुचें पुर्वसंचित ॥ ६४ ॥ असो आमुचेनि चितें : गृहासक्तिते सांडिलें नव्हतें ॥ त्या प्रतिबंधनिमित्तें : दूर होतों

गा तुजसिं ॥ ६५ ॥ आतां सांडोनि सर्वाशेतें : सार्वस्वें शरण आलों तुतें ॥ शेखिं शरणागतातें : सांडिलें गा कृष्णा ॥ ६६ ॥ हें कापव्य घडलें किं नाहिं : तुंचि विचारुनि पाहिं ॥ नातरि आमुचाचि काहिं : आड आला दोष ॥ ६७ ॥ तुझया अतर्क्य वृत्तातें : ब्रह्माहि नेणेचि पुरतें ॥ मां हे विवंचना आमुतें : योग्य होये काई ॥ ६८ ॥ आह्मी वैगुण्याच्या राशि : पारि तुझ्या अमुल्या दासी ॥ आतां किती गा पाहासि : गुणागुण आमुचे ॥ ६९ ॥ न विचारिं गा दोषातें : तुं पतितपावन हें तुतें ॥ रक्षणें असे तरि आमुतें : पावावें आतां ॥ ७० ॥ विचारुनि यया भावातें : कृष्णाप्रति गोपीशतें ॥ प्रार्थितातित तें राया तुतें : सांगतों आइक ॥ ७१ ॥

**प्रणत कामदं पद्मजार्चितं**
**धरणिमंडनं ध्येयमापदि ॥**
**चरणपंकजं शंतमं च ते**
**रमण नः स्तनेष्वर्पयाधिहन् ॥ १३ ॥**

अगा ये आधिहरणा : चिंतानाशना मनोरमणा ॥ श्रीकृष्णा आम्हि तव शरणा : उपेक्ष्या न हों गा ॥ ७२ ॥ क्षमा करुनि दोषांतें : प्रसन्न होई गा आमुतें ॥ सपर्पि निजपदांबुजातें : कुचावरि आमुच्यिया ॥ ७३ ॥ कां जें सांडुनि गृहादि प्रीति : तुज जे शरण येति ॥ त्यांसि सर्वथा नाहिं गति : तुझा पदपद्मावीण अन्य ॥ ७४ ॥ ऐसें तुझें पदपंकज : अनन्यशरण जे गा तुज ॥ त्यांचें कामप्रद सहज : कामदेतें जें आधिचें हरितें ॥ ७५ ॥ असो या पदि होतां प्रीती : उपशम पावे मनोवृत्ति ॥ सर्वहि सुखाची संपत्ति : अनकुळ होत असे ॥ ७६ ॥ मग काम काहिं इच्छावे : हें सरोनि जाय स्वभावें ॥ साम्राज्याचिये राणिवे : रंकुहि अधिकारी होये ॥ ७७ ॥ या लागि या पदांबुजातें : प्रपन्नकामप्रदातें ॥ सकळ आधि हरणातें : कुचहृद-यांवरि समर्पि ॥ ७८ ॥ ह्मणसी या पदप्रभावातें : कोणें उपदेशिलें तुमतें ॥ हें जें बोलिलियाति येथें : प्रमाण काये असे ॥ ७९ ॥ तरि पद्मज शब्दें करून : बम्हा जो चतुरानन ॥ जो जगाचें जन्मस्थान : त्रैलोक्याचा गुरु

॥ ८० ॥ तेणें ब्रह्मेनि जें अर्चित : यालागि या पदाचा संकेत ॥ केला असे पद्मज्यार्चित : पुराणीं सर्वत्रहि ॥ ८१ ॥ असो जेणें पदकमळें : त्रिविक्रमावतार वेळे ॥ ब्रह्मकटाह भेदिलें : आक्रमुनि त्रैलोक्य ॥ ८२ ॥ तइं तेणें लोकनाथें : निजकल्याणाचेनि स्वार्थें ॥ पूजिलें ज्या तव पदातें ; तें पद्मजार्चित पदतळ ॥ ८३ ॥ एवं जऱ्हि तो लोकनाथ : असोनि महिमानवंत ॥ जाणोनि आपुला स्वार्थ : पूजिलें त्या पदासि ॥ ८४ ॥ आतां तुझ्या पायांचा ठाइं : प्रमाणाची अपेक्षा नाहीं ॥ तो सर्वलोकगुरु काइं : नेणता होता प्रभो ॥ ८५ ॥ हेंहि असो गा परतें : पाहाणें नलगे प्रमाणातें ॥ प्रत्यक्ष पाहा या धरणीतें : शोभविलें ज्या चरणें ॥ ८६ ॥ तुझे पदपद्ममुद्रेकरिं : शोभली कैसी वसुंधरि ॥ असो सर्व शोभेचा शिरिं : शोभतसे हे पृथ्वी ॥ ८७ ॥ या पदमुद्रिते भूमीतें : देखोनि सांडिजे आधीतें ॥ विरालें आमुचिं चित्तें : निवालों गा आतां ॥ ८८ ॥ ह्मणोनि तुझें श्रीचरण : इये धरणीचे भूषण ॥ कदाचित् आमुचे स्तन : व्यापुनि जरि राहे ॥ ८९ ॥ तरि सर्व आधीतें शमउन : पावत्रील गा समाधान ॥ यास्तव तें पद पावन : ठेविं गा कुचावरि ॥ ९० ॥ अगा धरणीचेनि सांगातें : परोक्षें तुझिया पदातें ॥ पाहोनि कृष्णा आमुतें : येवढें सुख ॥ ९१ ॥ मां या स्तनहृदयदेशीं : साक्षात् पद जरि ठेविसि ॥ तरि आमुचिया भाग्यासि : पाराचि नाहिं ॥ ९२ ॥ अगा यावि कारणें पाहिं : हें पदपंकज जें काहिं ॥ तें अती आपत्तीचा ठाइं : सर्वांसि ध्येय कि ॥ ९३ ॥ प्रस्तुत आम्ही गोपकांता : तव विरहें गा पीडिता ॥ गवेषणपरा होत्सात्या : करित असतां भ्रमणातें ॥ ९४ ॥ तुझें हें जें चरणचिन्ह : देखिलें धरणिमंडन ॥ अकस्मात् विरालें मन : विसरले सकळ आधि ॥ ९५ ॥ ह्मणोनि आपत्तीचे वेळे : सर्वांसही हें ध्येय जालें ॥ कृष्णा ऐसें जाणवों आलें : आमुतें अनुभवें आजि ॥ ९६ ॥ त्या तुझ्या पदपंकजातें : आपदि ध्यानास्पदातें ॥ सर्वतापोपशमनातें : प्रार्थित असों आम्हि गा तुज ॥ ९७ ॥ आणि या हेतु लक्षिजेतें : जें ध्यानमात्रें आपत्तिहर्तें ॥ सुखदुःखाहुनि परतें : सुखतम

ज किं ॥ ९८ ॥ अगा ये रमणमूर्ति : ते जे हे तुझी पदव्यक्ति ॥ भगवत्पातें निवविति : स्मरणमात्रें सुखतर जे गा ॥ ९९ ॥ ऐसिया पदपंकजातें : साक्षात् सुखतम रूपातें ॥ ठेउनि ह्रदई आमुतें : निववीं गा कृपाळुवा ॥ ४०० ॥ आम्हि उपेक्ष्या न हों किंकरी : या कामव्यथेतें हरीं ॥ आणीक येक श्रीहरि : करावें प्रार्थितों जें तुज ॥ १ ॥

**सुरतवर्धनं शोकनाशनं स्वरितवेणुना सुष्ठु चुंबितम् ॥**
**इतररागविस्मारणं नृणां वितर वीर नस्तेधरामृतम् ॥ १४ ॥**

अगा ये अमोघवीर्या वीरा : श्रीकृष्णा नंदकुमारा ॥ आह्मी ज्या विरहकातरा : अनन्यशरणागता गा तुज ॥ २ ॥ आह्मीं ज्या गोपिका प्रस्तुत : सर्वाही काममृत्युग्रस्त ॥ तिया आमुतें अधरामृत : सिंचोनि वांचवीं गा ॥ ३ ॥ तें अमृत किंविशेषण : तरि जें सुरताचें वर्धन ॥ अगा प्रेमोत्पत्तीचें स्थान : तें तुझें अधरामृत किं ॥ ४ ॥ असो जयाचे लेशमात्रें : जळती गा कर्में चित्रें ॥ हेंचि तें तव प्रीतिपात्रें : होती गा विशेषें कृष्णा ॥ ५ ॥ जेवि आइकतां गुरुवाणी : मुमुक्षु निःसंदेह होउनि ॥ त्यांचि चित्तें दृश्यापासुनि : मुरडोनि मागें ॥ ६ ॥ वेदप्रातिपाद्या अर्थातें : झोंबती मुमुक्षुंचि चित्तें ॥ श्रवणादिकिं विशेषें त्यांतें : प्रेमोद्रेक होये ॥ ७ ॥ तेवींचि या अधररसें : भिजलिं ज्यांचिं मानसें ॥ ते नित्य तुझेनि संतोषें : अत्यंत संपन्न होती गा ॥ ८ ॥ ह्मणोनि शोकविनाशक : हें विशेषण वडलें एक ॥ त्या रसरतासि तिन्हि लोक : अति तुच्छ होति ॥ ९ ॥ मग शोकोत्पत्तीचें कारण : राहेल कोठुनि आन ॥ म्हणोनि वडलें विशेषण : शोकनाशन ऐसें ॥ १० म्हणसी या रसाचा ठाईं : विशेषें गुण असे काई ॥ साधारण जानिं काय नाहीं : अधररसप्राप्ति ॥ ११ ॥ ऐसें जरि गा काहिं येथें : भाविजेल किं रमानाथें ॥ तरि प्रभो त्या अधररसातें : ऐसी गोडी असे काई ॥ १२ ॥ त्या प्राकृतें अधररसें : विशेषें होय कामपिसें ॥ आणि या अमृतलेशें : कामशांति पाविजे तत्काळ ॥ १३ ॥ म्हणसी प्राकृता रसेंसिं : विलक्षणता येथें कैसी ॥ तरि कृष्णा तुं सुखराशि : परमप्रेमास्पद जो किं ॥ १४ ॥ तया तुझें अध-

रामृत : तुझा वेणु जो सुस्वरित ।। तें तया वेणुनें चुंबित : जें बरवें प्रकारें वाजवितां ।। १५ ।। असो तो वेणूवेषधारी : कोण्ही महंत सदाचारी ।। तेणें वसोनि तुझ्या अधरिं : चुंबिलें उत्तम रिति ।। १६ ।। तया तवाधरामृतातें : वेणुनादें सुरसितातें ।। देउनि आमुचिं जीवितें : रक्षाविंगा वीरा कृष्णा ।। १७ ।। येथें वीर हें संबोधुन : दाविलें कामोद्दीपन ।। अगा हें कापव्य सांडुन : सत्वर आमुतें संभोग देईं ।। १८ ।। जेवि गुरुवचनेंसि युक्त : मुमुक्षुनें सत्शास्त्रार्थ ।। अभ्यासेंकरिं पुरुषार्थ : साधिजे अनुक्रमें ।। १९ ।। तेवि तुझा तो वेणुध्वनि : आमुते होउनि गुरुस्थानि ।। या अधरामृताचि खाणि : उघडिली तेणें ।। २० ।। तया वेणुनिनादलुब्धा : पात्र जाला अधरस्वादा ।। आतां श्रीकृष्णानंदानंदा : नुपेक्षिं आमुतें ।। २१ ।। तुजहि हेंचि उचित : आह्मी ज्या तव शरणागत ।। यासि देइं गा अधरांमृत : वेणुस्वरें सुवासित जें ।। २२ ।। ह्मणसी हें प्रतीयमान : प्रत्यक्ष जें प्रपंचभान ।। गृहपतिसुतादि जन : देहधर्मासि उपयोगि ।। २३ ।। ऐसें असतां या अमृतिं : कैसी राहेल चित्तवृत्ति ।। न फावे तुह्मासि पुरति : हे अमृताची गोडि ।। २४ ।। कृष्णा ऐसें जरि ह्मणसि : तरि जे लोधले या सुखासि ।। तिहिं तपोनि पुण्यदेशीं : बहु पुण्य केलें ।। २५ त्या सुकृतबळें करुन : होउनि अधिकारसंपन्न ।। यांतही कोण्ही येक जन : कदाचित् पावती ।।२६ ।। मग तयांचिये दृष्टि : कैंचि पतिसुतादि शृ( सृ )ष्टि ।। भोक्ता भोग्य भोगादि त्रिपुटि : तेथें कदापि नुरे गा ।। २७ ।। असो तुझा वेधें करुन : या पदपाश्वि जडे मन ।। मग केवढेंहिं प्रतिबंधन : विरोनि जाय त्यांचें ।। २८ ।। या प्रतिबंधाचिये निवृत्ति : या अधरसुखाचि प्राप्ति ।। जाली तरि हे त्रिजगति : अर्थता कैंचि गा ।। २९ ।। हे पतिसुतादि भान : कैसें उरेल तुजहुनि आन ।। शोधितां गा रविकिरण : मृगांभ जैसें कीं ।।३०।। तुजहूनि नसे गा आन : तरि विक्षेप कैचा कोण ।। आणिक जें तुजवीण : तेथें प्रीतीचि नुरे ।। ३१ ।। म्हणोनि हें अधरसुख : अन्य रागाचें विस्मारक ।। विशेष जे सार्वभौमादिक : तेहि येथें विरति ।। ३२ ।। एवं ज्या

अमृताचे प्राप्ति : आणिके ठाईं नव्हे प्रीति ॥ इतर रागाचि विस्मृति : तत्काळ होये गा ॥ ३३ ॥ तें इतररागविस्मारण : देइं अधरांमृतपान ॥ जया पानें-कारिं सज्जन : पुर्णकाम होती गा ॥ ३४ ॥ असो हे अधरामृतप्राप्ति : जयांसि होये गा पुरति ॥ ते तुझा ठाइं रमति : अन्यकाम विसरोनि ॥ ३५ ॥ तें जे कृष्णा उक्तलक्षण : तुझें अधरामृतपान ॥ देउनि आमुचा हा मदन : शमविं गा त्वकारिं ॥ ३६ ॥ आतां असो हे बहु कथा : तुंचि विचारिं गा पुरता ॥ काइ तुझा ठाईं हे आस्था : आमुची आहे किं नाहिं ॥ ३७ ॥ असो तुवां सर्वांतरथें : नेणिजेति काय ह्रुदतें ॥ तुझिया योगवियोगें आमुतें : सुखदुःख जें काहिं होति ॥ ३८ ॥ ऐसें दाउनि त्या सती : विनवितालि कृष्णाप्रति ॥ तें आइक गा परीक्षिति : गोपिकांचिं वचनें प्रस्तुत ॥ ३९ ॥

**अटति यद्भवानन्हि काननं**
**त्रुटिर्युगायते त्वामपश्यताम् :**
**कुटिलकुंतलं श्रीमुखं च ते**
**जड उदीक्षतां पक्ष्मकृद्दशाम् ॥ १५ ॥**

अगा तुं दिवसाचा ठाईं : पुरःसरुनि वत्सें गाइ ॥ विचरसी उघडे पाईं : अधिष्ठुनि वनातें ॥ ४० ॥ तेव्हां न देखोनि गा तुतें : आह्मीं अवधि गोपीशतें ॥ तयां आम्हा क्षणार्धचि होतें : युगासमान कृष्णा ॥ ४१ ॥ असो तुं विचरतां वन : न देखतां तुझें वदन ॥ तृ (त्रु) टि होय युगासमान : दुःखार्णविं पडतसों ॥ ४२ ॥ मग वनाहुनि दिनांतिं : येती वेळे गृहाप्रति ॥ देखोनि तें वदनाकृति : कुटिलकुंतळयुक्त जे ॥ ४३ ॥ तें वदन अवलोकितां : नेत्रनिमिष आड येतां ॥ जडपदें मुर्ख विधाता : जेणें हे निमिषोन्मेष केले ॥ ४४ ॥ असो या नेत्राचा ठाइं : हें पांति लवती जें काहिं ॥ तेणें हें निकें केलें नाहीं : अति मंदमतित्वेंकरिं ॥ ४५ ॥ ज्या अनेक जन्मसुकृतिं : आह्मी देखिली हे कृष्णमूर्ति ॥ त्या सुकृतातें हा प्रजापति : जाने(णे)चिना कैसा ॥ ४६ ॥ असो भावी हे कृष्णदर्शग (न) : नेणेचि

कां चतुरानन ॥ हे सपक्ष कां नयन : आमुचें केलें तेणें ॥ ४७ ॥ अवलोकितां हे कृष्णमूर्ति : हें नेत्रपातिं आड येति ॥ कटाकटा तो प्रजापति : चुकला कां इतुकेंचि ॥ ४८ ॥ जेवि पर्जन्यधारापांक्ति : आकाशा पासाव सुटति ॥ तयासि पावतां भूमीप्रति : अखंडाकारा जैशा ॥४९॥ अवो येणे न्यायें करुन : निरंतर हें कृष्णवदन ॥ पाहावें तव आड येउन : नेत्रपांति निरोधीती अकस्मात ॥९०॥ आहा वो तो नेत्र करितां : भ्रांत कां जाहाला विधाता ॥ हे मेषोन्मेष न योजिता : तरि काये उणेपण येतें ॥ ९१ ॥ एवं पाहातां तुझे मुख : होतुसे जो किं सुखोद्रेक ॥ आम्हासि ये प्रसंगिं हा मुर्ख : ऐसा जाणवला ब्रम्हा ॥ ९२ ॥ जेवि प्रतिबंधातें सारुन : जे स्वरूपीं पावति संस्थान ॥ त्यासि जें दैवनिबंधन : तें देहरक्षणार्थ ॥ ९३ ॥ तेहिं त्यासि असह्यमान : कां जे स्वरूपिं जडलें मन ॥ तेवि तुझे ठायिं नयन : खुंतले त्यासि हाचि निरोधु ॥ ९४ ॥ तस्मात् आम्हि तव शरणा : या वियोगातें असह्यमाना ॥ यालागि उतावेळमना : देखावया गा तुज ॥ ९५ ॥ एवं आमुतें अंगिकारिं : सर्वथा उपेक्षा न करिं ॥ आधि हा न्याय विचारिं : मग मानेल तें करावें गा ॥ ९६ ॥ हा अभिप्राय विचारुनि : कृष्णाप्रति त्या कामिनी ॥ उत्तरश्लोकें करुनि : बोलताति ऐसें गा राया ॥ ९७ ॥

> पतिसुतान्वयभ्रातृबांधवा-
> नतिविलंघ्य तेंत्यच्युतागताः ॥
> गतिविदस्तवोद्गीतमोहिताः
> कितव योषितः कस्त्यजेन्निशि ॥ १६ ॥

कृष्णा आमुचे जे पति : सुत जे पुत्रादि संतति ॥ आणि अन्वयो इया त्याति : वंश जो किं आमुचा ॥ ९८ ॥ आणि भ्रातृपदें करुन : बंधु जे सहोदर जन ॥ आणि बांधव ऐसि खुण : सुहृत्संबंधी जनासि ॥ ९९ ॥ इत्यादिका समस्तातें: उल्लंघोनि आह्मी आलों येथें ॥ जयाचेनि संगे जन्म-शतें : उगंडुचि नव्हे गा ॥ ६० ॥ परि कोण्हि यका सुकृतें : सांडुनि त्या

प्रतिबंधातें ॥ आलो तव सान्निध्यातें : अच्युता श्रीकृष्णा ॥६१॥ जडती गा जे तुझ्या पाईं : त्यासि सर्वथा च्यवन नाहिं ॥ ऐसे जाणोनियां सकळाहि : आह्मी आलों येथें ॥ ६२ ॥ ह्मणसी स्वगृहीं असतां : सुखें निजाश्रमीं वर्ततां ॥ तुह्मी त्यागुनि वो स्वार्था : आल्याति कां येथें ॥ ६३ ॥ ऐसें ह्मणसी गा आमुतें : तरि मोहिलें या उद्गीतें ॥ असो तुवां उच्चस्वरें वेणुतें : वाजविले जें ॥ ६४ ॥ तया उच्चस्वरें तव गीतें : मोहिलें तेणें या आमुतें ॥ यालागि टाकुनि येथें : येणें घडलें किं ॥ ६५ ॥ सांडुनि गा देहभाना : स्वगृहिं अनासक्तमना ॥ नाविक होतों स्मृतिहीना : त्या गृहादिसंगें ॥ ६६ ॥ तुझा पाईं होतें गा मन : परि प्रारब्धैकप्रतिबंधन ॥ तया गृहकार्यि गुंतोन : होतों ज्या आह्मी सर्वा ॥ ६७ ॥ तवं कोन्हि एकें भाग्यें समर्थें : तुवां गाइलिं वेणुगीतें ॥ तेणें आमुचिं चित्तें : उठवुनि तेथुनि, गा ॥ ६८ ॥ कोण्ही येक दैववशाता : प्रतिबंध जाला होता ॥ परि तुझा गीतें मोहिता : आह्मी आलों तुजनिकट ॥६९॥ आम्ही सावधा तुझे पाईं : तो मोहो मानावा काइ ॥ परि गृहासक्ति विषईं : तो मोहचि होये अहंममतात्मक ॥ ७० ॥ जेवि भुजंगदंशितातें : कटुत्वचि गोड भासतें ॥ मग विष उतरोनि त्यातें : कडु गोड हे व्यवस्था जाणवे ॥ ७१ ॥ तेवि आह्मी गृहीं आसक्ता : नाविक होतों मोहसर्पग्रस्ता ॥ तवं तुवां हा अवचिता : प्रेरिला वेणुगीतमंत्र ॥ ७२ ॥ तेणें जालें विषोत्तारण : जाणवलें हें मिथ्या भान ॥ ते पतिसुतादि स्वजन : वोवडवलें विकळलें सर्व ॥ ७३ तेणें मिथ्या प्रतीतिबळें : तुजसिं व्यवधान जालें ॥ तें या वेणुगीतें तोडिलें । आणिलों गा तुजनिकट ॥ ७४ ॥ जेवि तत्त्वमस्यादि वचन : तोडुनि अविद्याबंधन ॥ जीवेश्वरभेदविहीन : ब्रह्मत्व-प्रतिपादन करीतसे ॥ ७५ ॥ तेवीचि गा कृष्णा अच्युता : आह्मी तवो-द्गीतमोहिता ॥ गृहादिप्रतिबंधनिरस्ता : आलों तुज निकट ॥ ७६ ॥ ह्मणसी माझिया गीतातें : सर्व जन जाले आइकते ॥ त्यांत तुमचिंच कां चित्तें : क्षोभातें पावतिं जालिं ॥ ७७ ॥ ऐसें ह्मणसि गा आतां: तरि तुं सर्वांतर्गतिवेत्ता ॥ आह्मी काय तुझिया भक्ता : किंवा अन्य जना ऐशा ॥७८॥

असो तु सर्वांतरद्रष्टा : जाणसी कीं आमुची निष्ठा ।। आणि या वियोगकष्टा : जाणसि ना काइ ।। ७९ ।। त्या गतिवेत्तयाचे गीतें : मोहिलिं आमुचिं चित्तें ।। स्मरोनि गा सुंदरा तुतें : स्वगृहवासिनी ज्या होतों ।। ८० ।। तितुकि पाही संबंधातें : सांडिलें अविद्याबंधातें ।। ते गृहधर्मोचि आमुतें : भासले अधर्मरुप ।। ८१ ।। अगा विषयासक्ति मूळ : स्वधर्म बोलिले सकळ ।। जरि विषयिं मन विकळ : तरि ते निरर्थक ।। ८२ ।। संत्यक्तपरिग्रहचित्त : तुझा ठाइं जालें निवांत ।। तरि तेंचि गा धर्मजात : अविक्षेपकरी होत असे ।। ८३ ।। ह्मणोनि अनुसरोनि तुतें : किंचित् गृहादिकिं चित्त होतें ।। तें प्रस्तुत तुझेनि गीतें : हरिलें आमुचें मन ।। ८४ ।। एवं गतिविदा तुझे गीतें : मोहिलें होंत्सातें आमुतें ।। टाकोनि आलों गा तुतें : येवढे निशीचा ठाई ।। ८५ ।। त्यां आमुतें तुवां सांडिलें : हें काई तुज उचित झालें ।। ऐसें तों नाहिं गा देखिलें : कोठेंहिं अन्यत्र कृष्णा ।। ८६ ।। केव्हढें आश्चर्य घडलें : काय आमुसिं षठत्व केलें ।। निजशरणासि ठकिलें : कैसें कपटिया तुवां येथें ।। ८७ ।। कृष्णा ऐसी रिति जे काहिं : ते नाहिंचि आणिके ठाई ।। येवढें रात्रीचा ठाई : स्त्रियतें कोण पां त्यजिल ।। ८८ ।। ऐसियां आमुतें त्यजावें : हें कोण्हासही न संभवे ।। येवढा धीरु न धरवे : कामिनीतें सांडितां गा ।। ८९ ।। रात्रि आलियां योषितांतें : कोण पां त्यजिल गा येथें ।। हें तुजवीण आणिकातें : कदापि न टके या त्रिलोकिं ।। ९० ।। तुवां षठत्व संपादिलें : हें उचित नाहिं योजलें ।। आम्हासि निजगीतें मोहिलें : आणावया स्वनिकट ।। ९१ ।। शेवट चोरुनि हें चित्तें : अधिष्ठुनि अप्रकटतेतें ।। आपणालागि गा आमुतें : भ्रमविलें तुवां कृष्णा ।। ९२ ।। देउनि निजसांनिध्यातें : संपादिलें व्यवधानातें ।। हे निजवेधाचि पुरते : किंवा निकर केला काइ ।। ९३ ।। कृष्णा हे जे गा तुझी युक्ति : काइ जाणो आह्मी प्राकृती ।। त्यजिलें ह्मणों तरि चित्तिं : अधिकाचि प्रेमा होतो ।। ९४ ।। या देहस्थितीहि पुरतें : मन नव्हे तुज परतें ।। आम्ही न देखोंचि आणिकातें : तुज वांचूनि गा श्रीकृष्णा ।। ९५ ।। ऐसियां आम्हासि सांडिलें : हें विरुद्ध दिसोनि आलें ।।

पारे कोण जाणे हा न कळे : अभिप्राय तुझा आम्हा ।। ९६ ।। किंवा आमुचि चाड नाहिं : ऐसेंहिं जाणवतें काहिं ।। कां जे या निशेचा ठाईं : आम्हि योषिता निकट आलों ।। ९७ ।। त्यां आमुतें तुवां त्यागिलें : हें तुज कायें योग्य झालें ।। आणि आपुले ठाइं गोंविलें : निजप्रेमें सर्वांतें ।। ९८ ।। ऐसा कोण असे या जगिं : जें निकट येतांचि तन्वंगी ।। पुरतें भोगितां त्यागी : तुजवीण कृष्णा ।। ९९ ।। एवं निर्धारु नयेचि हाता : याला-गि षठ होसी पुरता ।। त्यागुनि आमुतें गा रत्ता : गोंविलें निजप्रेमें ।।१००।। येथें निशा पदें करुन : सूचिलें ध्यानकाळलक्षण ।। कां जे योगी करुनि ध्यान : प्रसंन्नता पावति ।। १ ।। जाणोनि त्या अधिकारातें : योजुनि आ-त्मनिष्ठेतें ।। निदिध्यासनि गोपिकांतें : केला अवसरु ।। २ ।। व्यवधानाचेनि मिषें : आपुला ठाईं तन्मानसें ।। लाउोने तयातें विशेषें : उत्सुकता प्रेरिली ।। ३ ।। उत्सुक होंत्सात्या सुंदरी : प्रार्थना वचनोत्तरिं ।। श्रीकृष्णातें स्मरोनि अंतरिं : स्तवित्या जालिया ।। ४ ।। असो कृष्णकृपेचिं उत्पादकें : बोलिल्या करुणासुचकें ।। ज्या वचनें यदुनायकें : अत्यंत संतोषावें ।।५।। आतां एका दों उत्तरि : तो नंदानंदन कृष्ण हारि ।। अल्पेंचि काळें अंगिकारि : शरणां आ-पणातें ।। ६ ।। ऐसें तो गोपिका जन : आतां श्लोकद्वयें करुन ।। श्रीकृष्णिं असोनि मन : बोलतुसें तें आईका ।। ७ ।।

**रहसि संविदं हृच्छयोदयं**
**प्रहसिताननं प्रेमवीक्षणम् :**
**बृहदुरः श्रियो वीक्ष्य धाम ते**
**मुहुरतिस्पृहा मुह्यते मन : ।। १७ ।।**

तुवां ऐकांतिं गा आमुतें : संकेतनर्म दाविलें होतें ।। असो संभोग सूचना निमित्तें : विनोद जे केले ।। ८ ।। विनोदसमुच्चय लक्षुन : येथें बोलिलें एक वचन ।। एवं त्या विनोदातें स्मरोन : तव दर्शनेच्छा होते ।। ९ ।। ते विनोद किंलक्षणः तरि ज्यांचे स्मरणें पंचबाण ।। उपजउनि हें मन : त्वदाकार करिती शीघ्र ।।१०।। जेवि श्रवणमननात्मका वृत्ति : असंभावनेतें परति ।। मग

स्वरुपानंदावाप्ति : अकस्मात् होय ॥ ११ ॥ परि अनभ्यासाचिया निमित्तें : विपरीत भावना तेथें ॥ होउनि उपजवी संतापातें : मुमुक्षुचा मनिं ॥ १२ ॥ मग ते गा आर्त्त होंत्साते : स्मरती निजात्मसुखातें ॥ त्यांचि अधीरें होती चित्तें : जें केव्हा ते वस्तु पाविजेल ॥ १३ ॥ पुनः ते दृढाभ्यासरीति : निदिध्यासनिं प्रवर्तति ॥ तेवि त्या गोपिकांची गति : येणे प्रसंगें योजली॥ १४॥ त्या वेणुनादें आकर्षुन : पावल्या कृष्णसंन्निधान ॥ ते प्रसंगिं विनोदाचरण : कृष्णें केलें जें काहिं ॥ १५ ॥ तेणें सुखावोनि गोपीगण : गर्व पावला हें जाणोन ॥ कृष्णें तत्काळ तिरोधान : केलें अचिंत्य लिलेकरिं ॥ १६ ॥ तेणें तिया व्रजसुन्दरी : पडोनियां आर्तिसागरिं ॥ निदिंध्यासनाचिया परिं : आरंभिलें विवेचन तेथें ॥ १७ ॥ त्या संकेतनर्मातें स्मरतां : जालिया विरहतप्ता ॥ तोचि अनुवाद कारितां : तेथें विशेषण योजलें ऐसें ॥ १८ ॥ असो जें संकेतनर्मसंज्ञ : तें संविदाचें पदलक्षण ॥ आणि ह्च्छयोदय ह्मणोन : कामोत्पादक ऐसें ॥ १९ ॥ तैसेंचि प्रहसितानन : ह्मणिजे तुझें हें हास्यवदन ॥ त्या विनोदहास्यातें स्मरोन : तुझी सकाम इच्छा होते ॥ २० ॥ तेवींचि प्रेमवीक्षण : जें तुझें कृपावलोकन ॥ पाहिलें जें दये करुन : तुवां निजशरणागता आमुतें ॥ २१ ॥ कृष्णा तें आमुचें चित्त : तुझा ठाइं अति प्रेमासक्त ॥ असोनि सदा निवांत : गृहादिकातें विसरलें ॥ २२ ॥ त्या तव प्रेमवीक्षणातें : स्मरोनि सकाम इच्छा होतें ॥ तुझिये दर्शननिमित्तें : तळमळितो आम्ही गा ॥ २३ ॥ आणि तुझा उरःप्रदेश : वक्षस्थळ जें गा सुवेष ॥ जेथें रमादेवीचा निवास : सुखास्पद जें तियेतें ॥ २४ ॥ त्या विशाळ वक्षस्थळातें : रमादेवीच्या सदनातें ॥ आह्मिहिं अनुभविलें ज्यातें : त्यातें स्मरत होंत्सात्या ॥ २५ ॥ आम्ही तव दर्शनासक्ता : तेणें भ्रमलों गा इतस्तता ॥ प्रस्तुत कामोद्भवपीडिताः इच्छितों गा तुजला ॥ २६ ॥ एवं विनोदादि स्मरोन : होउनि गा कामोद्दीपन ॥ इच्छा होते तुजलागुन : त्वदाकार चितें कृष्णा ॥ २७ ॥ अगा तुझी स्पृहा जे जाली : तिया आमुचि मनें मोह्रिलिं ॥ तारतम्यातें विसरलिं : न स्मरती आणिक ॥ २८ ॥ एवं

येणें श्लोकें करुण ( न ) : इतुका अर्थ उत्पन्न ॥ कृष्णकामासक्त गोपीजन : बोलिला ऐसें राया ॥ २९ ॥ कृष्णा पूर्व सुकृतें करुन : लाधलें तुझें सन्निधान ॥ देखोनि सुंदर वदन : निवालिं सर्वांचिं मनें ॥ ३० ॥ दाउनि विनोदसंकेत : उत्कंठाही प्रेरिली बहुत ॥ आणि नयनकटाक्षपात : समर्पिला जो काहिं ॥ ३१ ॥ आणि वक्षस्थाळिं विशाळता : अनुभविली आपातता ॥ आह्मी कामासक्तचित्ता : भजलों तुज ॥ ३२ ॥ किंचित् स्वस्थ जालिं चित्तें : तवं सांडिलें तुवां आमुतें ॥ जेवि सांडिजे मुक्त मानियातें : स्वरूपानुभवें ॥३३॥ तेवींचि आमुतें योजलें : गर्वें तुज दुऱ्हाविलें ॥ परि निजगुणिं संस्कारिलें : निजशरणागता आमुतें ॥३४॥ त्या गुणकथनें करुन : आठवलें तुझें विहरण ॥ जें विनोदहास्यवदन : प्रेमवीक्षण वक्षस्थळादि ॥३५॥ तें कैसें विनोदादि क्रीडन : तरि हृच्छय जो मदन ॥ त्याचें करी जें किं उद्दीपन : तोचि जाणावा हृद्रोग हा ॥ ३६ ॥ त्या कामहृद्रोगें पीडिता : आम्हि तुज शरणागता ॥ त्या आमुचा हृद्रोगहर्ता : तुजवींण कैचा आणिक ॥ ३७ ॥ नाना सर्वत्र साधारण : सर्वथा तुं रोगहरण ॥ तथापि आम्ही व्रजजन : अनन्यशरण गा तुज ॥ ३८ ॥ तुजवांचुनि कृष्णा पाहिं : आम्हासि गत्यंतर नाहिं ॥ आमुचा हा रोग जो काहिं : तो तव वियोगजन्य ॥ ३९ ॥ तस्मात् कामरोगवेदना : ते आणिकेंकरिं शमेना ॥ हे व्रजनार्तिहरणा : आइकें गा येकि मातु आमुचि ॥ ४० ॥

**व्रजवनौकसां व्यक्तिरंग ते**
**वृजिनहंत्र्यलं विश्वमंगलम् ॥**
**त्यज मनाक्चनस्त्वत्स्पृहात्मनां**
**स्वजनहृद्रुजां यन्निषूदनम् ॥ १८ ॥**

येथें अंगपदें करुन : कृष्णाचें केलें विशेषण ॥ हे अंग ऐसें संबोधुन : त्या बोलताति कृष्णाप्रति ॥ ४१ ॥ हे सखया आइकें विनंति : आइकें गा तात्पर्योक्ति ॥ तुझि हे जे काहिं व्यक्ति : ते मंगळमयी अवघी ॥४२॥ हे व्यक्ति किंविशेषण : तरि हें व्रजवनौकस जन ॥ ह्मणिजे हें जें वृंदावन :

येथें वाडे करुन राहिले जे ॥४३॥ अगा ते वृंदावनवासी : त्याचिया ज्या संकटराशि ॥ नाशूनि स्वसान्निध्य त्यांसि : सौकर्यें दिधलें ॥ ४४ ॥ ह्मणोनि तुझी गा हे व्यक्ति : व्रजौकसवृजिनहार्ति ॥ असो तुं जो विलासमुर्ति : त्या तुज जे शरण ॥ ४५ ॥ त्यांतें दुःखार्णवा पासुन : सोडविसी गा सकारण ॥ ह्मणोनि घडले विशेषण : पुर्वोक्तेचि येथें ॥ ४६ ॥ असो देखोनि रमणमूर्ति : तुझा ठाइं जाली ज्यांची प्रीति ॥ तेणें तयांची चित्तवृत्ति : विरक्तीतें पावे या प्रपंचा पासुन ॥ ४७ ॥ ऐसें जें वीतराग मन : तें पावोनि तुझें सन्निधान ॥ मग सकारण हें वृजिन : नाशोनि जाये तत्काळ गा ॥ ४८ ॥ ह्मणोनि तुझी हे जे व्यक्ति : ते निजजनदुःखहर्ति ॥ आतां हे व्रजस्थ तरति : दुःखार्णवातें जियेकरिं ॥ ४९ ॥ येथें हेतु ह्मणसी काई : तरि हे विश्वमंगळमयी ॥ जें सौष्ठव्य विश्वाचा ठाईं : तें अवघें उत्तमत्व येथेंचि असे ॥ ५० ॥ न पाहातां हे तुझी मुर्ति : सुखाभास अन्येत्र स्फुर्ति ॥ धनदारादिकें भासती : सुखाचि कारणें ते समइं ॥ ५१ ॥ परि तें दुःखाचें कारण : येथें सुख काहीं नसे जाण ॥ आणि पाहातां हे रुप रमण : ब्रह्मसदनहि नावडे गा ॥ ५२ ॥ ह्मणौनि हें मंगळमुर्ति : विजनजनाचि क्लेशहार्त्ति ॥ असो विरक्तांचि संपत्ति : सच्चिदानन्द स्वरूप सकळ ॥ ५३ ॥ तरि अगा ये नन्दानन्दना : आह्मी ज्या सर्वा गोपांगना ॥ सर्वस्वें कि तुज शरणा : त्या काय व्रजवासिनी नहों ॥ ५४ ॥ अगा आमुचा काय चित्तिं : गृहादिकांची असे आसक्ति ॥ तरि कृष्णा कां आह्माप्रति : येवढा निकरु ॥ ५५ ॥ ह्मणौनि व्रजवनौकसार्तिहरणा : आम्हींहिं गा व्रजांगना ॥ त्वद्वियोगपीडितमना : तव सान्निध्यातें वांछितों ॥ ५६ ॥ हे जे वांछा आमुचे मनिं : तेचि वोडवली रोगस्थानिं ॥ तरि तुं चिकित्सक होउनि : उपाय करिं गा सत्वर ॥ ५७ ॥ प्रकटउनि आपणातें : काहिं या रोगहरणातें ॥ कृष्णा जाणसी तें आमुतें ; देइं गा औषध आतां ॥ ५८ ॥ प्रभो आम्ही व्रजवासिनि : आइत्याचि अधिकारिणी ॥ तुझी करितां चिंतवणी : बहु काळ गेले येथें ॥ ५९ ॥ आतां या रोगशमनाप्रति : तुज आयास न पडति ॥

तुं तरि सर्वज्ञाचा पति : आह्मी काय सांगावें ॥ ६० ॥ आणि गोप्या या रहस्यातें : काइ प्रकट सांगों तुतें ॥ कामरोग नाशावयातें : तुंचि गा परमौषधें किं ॥ ६१ ॥ तथापि जरि पुससी : तरि जे सांडुनि प्रपंचासि ॥ तुझे अनन्य दासदासि : एकांतभक्त जे कोन्हि (ण्हि) ॥ ६२ ॥ त्याचे हृद्रोगातें हरुन : जेणें सुखि केले ते स्वजन ॥ तें निष्कामता रसायन : आमुतेंहिं देई गा कृष्णा ॥ ६३ ॥ तुं शरणागतवत्सळ : हें काइ आतांचि केवळ ॥ नेणो राखिले किती वेळ : या हृद्रोगार्णवा पासुनि गा तुवां ॥ ६४ ॥ एवं सांडुनि कृपणतेतें : आमुचा रोगनाशा पुरतें ॥ आतां प्रकटोनि तुं येथें : कळेल तैसें वांचवि आमुतें ॥ ६५ ॥ या रोगशांतीचें कारण : जाणता नाहिं तुजवीण ॥ यालागीं सर्वस्वे शरण : आलों गा आह्मि तुजला ॥ ६६ ॥ ऐसें तो गोपिकाजन : करितां कृष्णगुणवर्णन ॥ अंतरिं ते मुर्ति सुभरोन : प्रेमसमुद्रिं बुडाला ॥ ६७ ॥ तें वोसंडुनि प्रेमपूर्ति : अश्रुधारा विशेषें श्र (स्र) वति ॥ चित्तें आळिंगुनि कृष्णमूर्ति : आरंभिलें रुदन ॥ ६८ ॥ नाना रुदन प्रसंगें करुन : प्रेमाश्रुकरिं वोसंडुन ॥ करित्या जाल्या जलश्ना (स्ना) न : हृदा (दि) स्था कृष्णातें ॥६९॥ तें रुदनयुक्तें वचनें : जे किं प्रेमोद्रेकाचिं कारणें ॥ आइकें राया सावध मनें : वर्णिताति तें ॥ ७० ॥

**यत्तो सुजातचरणांबुरुहं स्तनेषु**
**भीताः शनैः प्रिय दधीमहि कर्कशेषु ॥**
**तेनाटवीमटसि तद्व्यथते न किंस्वि-**
**त्कूर्पादिभिर्भ्रमति धीर्भवदायुषां नः ॥ १९ ॥**

अगा ये यशोदानंदना : प्रियोत्तमा प्रीतिसदना ॥ आह्मी ज्या तव शरणा : व्रजवासिनी नारी ॥ ७१ ॥ कृष्णा तियां आमुची मति : अतिशयें असे भ्रमति ॥ ते कोणें गुणें ऐसें ह्मणति : जरि काहिं स्वामि ॥ ७२ ॥ तरि हे चरणांबुज पाहिं : ऐसें सुकुमार वस्तु नाहिं ॥ या लागि सुजात हें काहिं : ह्मणतिलें तव पदातें ॥ ७३ ॥ ऐसें जे सुकुमार पाहिं : तें आमुले कुचांचा ठाईं ॥ आह्मी मर्दितां बहु काहिं : शंकिना जाजें काळिजें ॥ ७४ ॥

ह्मणोनि न लागतां आदळु : कुचें मर्दितसों हळुहळु ॥ ढका लागोनि अळुमाळु : ते दुखवेल ह्मणि ॥ ७५ ॥ विचारितां पदाचें माने : आमुचिं पद्युगें कठिणें ॥ यालागि भीतसों गा मने । स्तनावरि ठेवितां यातें ॥ ७६ ॥ तया पद्मांबुजें करुनि : अ(आ)क्रमितां वनमेदिनी ॥ असो वनातें प्रवेशोनि : फीरतां इतस्तता ॥ ७७ ॥ अगा त्या अटाविच्या ठाइं : क्षुद्रपाणादि जे कांहिं ॥ तिहिं स्पर्शोनि तुझे पाईं : व्यथेतें करिजेल ह्मणि ॥ ७८ ॥ असो तुज चालतां वाटे : खडे कुसळें आणि कांटे ॥ हे रुतती पाईं ह्मणि मोटें : ऐसी चिंता होत असे ॥ ७९ ॥ एवं अंतरोनि त्वत्पदातें : हे बुद्धी पडे मोहगर्तें ॥ केव्हां ते चरण मागुते : आह्मि देखिजेति डोळां ॥ ८० ॥ ऐशा वियोगातिसागारि : पडतसों तव कींकारि ॥ आमुतें वांचावया उरि : नसे गा तुजवांचुन ॥ ८१ ॥ असो तुं सर्वज्ञ श्रीपति : आमुचा आयुष्याची मुर्ति ॥ हे चरण धरुनि चित्तिं : वर्ततसों येथें ॥ ८२ ॥ त्या तुझिया सकुमारा पदातें : हृदइं वाहातां आमुतें ॥ शंकां होते जें ह्मणि त्यातें : कठिणता स्पर्शेल ॥८३॥ असो हें सुक्ष्म पद पाहिं : जर्‍हि गा ध्यानास्पद नाहिं ॥ तर्‍हि वाहातों हृदइं : शंकिता होत्सात्या ॥ ८४ ॥ कां जे तरावया संसृति : आणिक नाहिं येथें गति ॥ यालागि ते चरण चित्तिं : धरुनि वर्ततसों ॥ ८५ ॥ हृदइं धरितां पदातें : योग्यता नाहिं आमुतें ॥ तरि कुचस्पर्शुचि त्यातें : करावा गा श्रीकृष्णा ॥ ८६ ॥ नाना धरितां तें हृदइं : मग हृदयत्व कैचें काइं ॥ यालागिं भिउनि होंचि काहिं : विचारित होतों ॥ ८७ ॥ तवं तिरोधाना ऐसें : तुवां दाविलें वनप्रवेशें ॥ तरि तें आह्मासि आतां कैसें : साहविल कृष्णा ॥ ८८ ॥ आतां कापन्य करुनि परतें : दर्शन देउनि आमुतें ॥ असोंदे गा निजपदातें : या कुचयुक्त हृदइं ॥ ८९ ॥ अन्यथा वांचणेंचि नाहिं : कृष्णा ऐसेंहि जाण पाहिं ॥ तुजवांचुनि अन्य काइं : जीवनोपाय आमुतें ॥ ९० ॥ ऐसें सर्वा व्रजसुन्दरी : बैसोनि त्या यमुना तीरिं ॥ पडतां विरहसागरिं : स्मरत्या जाल्या कृष्णातें ॥ ९१ ॥ आपुलालिं सर्व हृद्गतें : वेगळालें तें गोपिशतें ॥ निवेदुनि

श्रीकृष्णजीतें : स्तवितीं जालि अवधि ॥ ९२ ॥ नाना त्या प्रियविरहार्णवि : कृष्णगुणकीर्तनप्लवि ॥ बैसोनि त्या मुक्तजीवी : तरलिया गोपी ॥ ९३ ॥ ऐसी हे कथा भागवती : शुकें वर्णिली रायाप्रति ॥ शौनकादिकां हेचि कीर्ति : सांगितली सूतें ॥ ९४ ॥ तेचि मातें गुरुकृपे जाणवली : मग मति पाहोनि आपुली ॥ म्याहिं आतां वर्णिलि : गुरुप्रसादें ॥ ९५ ॥ त्या आज्ञेतें वंदुनि माथां : वर्णिली हे गुणकथा ॥ नाना मज मृत्युग्रस्ता : अमृतलहरी हे ॥ ९६ ॥ असो विषयानळें तप्त मन : येथें पावोनि निमज्जन ॥ या कथामृतातें प्राशुन : निवाले बहु ॥ ९७ ॥ नाना येथें प्रसंगें करुन : श्रीकृष्णाचें रुप रमण ॥ आठवले समचरण : हृत्पीठिं जें उभे ॥ ९८ ॥ असो तें रूप मनोहर : त्यातें पाहोनि जे तत्पर ॥ तत्कथाप्लवारूढ नर : भवसिंधूतें तरति ॥ ९९ ॥ ऐसी जे स्वेच्छाविलासिनी : जे भीमातीरनिवासिनी ॥ कृष्णमूर्ति मनोल्हासिनी : ते स्मरली मातें ॥ ६०० ॥ प्रस्तुत मिं येणेचि पंथें : तरेन दुरितार्णवातें ॥ हें विषयाशा व्याघ्री मातें : उपद्रवीना कदापि आतां ॥१॥ ऐसें मिं विचारुनि मनिं : प्रवर्तलों या गुणवर्णनि ॥ जैसिया त्या गोपकामिनी : तरलिया दुरितें ॥२॥ हेंचि मिं हिं जाणोनि काहिं : शरण आलों कृष्णपाईं ॥ कां जे कृष्णजननीसि नाहीं : ताने थोर निवडुं ॥३॥ या स्वार्थातें धरुनि चित्तिं : आदरिली कृष्णकीर्ति ॥ तेथें पावला हा समाप्ति : एकत्रिंशतितम ॥ ४ ॥ यावरि हे गोपीगीतें : आइकोनि कृष्णें नंदसूतें ॥ सारोनि व्यवधानातें : प्रकटोनि तत्काळ ॥ ५ ॥ त्या गोपीचें सांत्वन : करिजेल तें अनुवादन ॥ राया परिक्षिति लागुन : करिजेल श्रीशुकेंद्रें ॥ ६ ॥ तेंहिं गुरुदया लाहोन : म्याहिं यथामति वर्णन ॥ करुनि निःपाप होउन : शोधिजेल स्ववाणी ॥ ७ ॥ आतां अनुवादिजेल काहिं : तें असो गुरुपाईं ॥ आणि त्या वर्णनाचा ठाईं : न्यूनाधिक जें ॥ ८ ॥ तें क्षमा करुत सज्जन : असोनि चित्तें सावधान ॥ नित्यानंदें शिवकल्याण : करावें निर्विघ्न ॥ ९ ॥ इतिश्रीमद्भागवते महापुराणे दशमस्कंधे पूर्वार्धे कृष्णगोपी रासक्रीडावर्णनं नाम एकत्रिंशतितमो ध्याय : ३१ ॥

**श्रीकृष्णार्पणमस्तु.**

ॐ

श्रीमद्भागवतांतर्गत

# रासपंचाध्यायी.

---

## अध्याय ४.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ आतां रासक्रीडापरायण : तो नन्दानन्दन श्रीकृष्ण ॥ गोपिकामानसमोहन : वृंदावनविहारी ॥ १ ॥ स्मरोनियां त्या हरीतें : तयाचें गुण वर्णु मागुते ॥ मग तेणें निजवाग्देवतेतें : विगतकल्मष करुं ॥ २ ॥ असो दुरितें क्षयातें धरुनि चित्तिं : आरंभिली हे गुणकीर्ति ॥ भगवत्कथा हे भागवतिं : तापोपशमनि ॥ ३ ॥ तेथें नित्यानन्दद्ये करुनि : प्रवर्तली माझी वाणी ॥ तेणें नित्यानन्द मनिं ॥ तिष्ठतुसे सर्वदा ॥ ४ ॥ जो विठ्ठलवेशातें धरुनी : कटीतें करिं कवळुनि ॥ इटेवरि समचरणि : उभा असे भीमातीरिं ॥ ५ ॥ तेणें माझिया माणसातें : करावें आपणा सवतें ॥ हे प्रपंचाची स्फुर्ति मातें : अणुमात्रही न व्हावी ॥ ६ ॥ माझें अनिवार हें मन : न व्हावें विषया अधीन ॥ कोणेहि मिषें अभिमान : न संचरो कदा ॥ ७ ॥ ऐसा स्वार्थ धरुनि चित्तिं : न विचारितां स्वव्युत्पत्ति ॥ आदरिली हे गुणकीर्ति : रामकृष्णजीचि ॥ ८ ॥ तेथें कथानुसंधान : त्या गोपिकाहि कृष्णगुण ॥ पूर्वोक्तिं वर्णिले येउन : यमुनातीराप्रति ॥ ९ ॥ यावरि तो रमेचा भर्त्ता : जाणोनि तियांची अवस्था ॥ प्रकट होउनियां स्वता : सांत्विता जाला त्यांतें ॥ १० ॥ ऐसें जे काहिं निरुपण : ये अध्यायि बादरायण ॥ रचिता जाला तें अनुवादन : रायाप्रति शुकें केलें ॥ ११ ॥ तेंचि सुतें शौनकादिकांतें : कथिलें तें म्यां वर्णिले येथें ॥ स्मरोनि नित्यानन्द गुरुतें : वक्ष्यमाण जें ऐसें ॥ १२ ॥

॥ श्री शुक उवाच ॥

**इति गोप्यः प्रगायन्त्यः प्रलपन्त्यश्च चित्रधा ॥**
**रुरुदुः सुस्वरं राजन्कृष्णदर्शनलालसाः ॥ १ ॥**

उक्त प्रकारें करुन : यमुनातीरिं असोन ॥ कृष्णाचे गुणगायन : कारितां विचित्र प्रकारें ॥ १३ ॥ स्वभावें त्या विलासयुक्ता : गात होत्या त्या गोपकांता ॥ ह्मणती हा रमाभर्त्ता : प्रकटेना कां आझुनि ॥ १४ ॥ ऐसें विलपोनि रुदन : करित्या जाल्या त्यांचे विशेषण ॥ वडलें ऐसें जाण : कृष्णदर्शनलालसा हें ॥ १५ ॥ आतां येइल श्रीकृष्ण : ह्मणोनि कंठिं धरिले प्राण ॥ मग निकरु केला जाणोन : ना रडत्या जाल्या ॥ १६ ॥ नाना वर्णितां विचित्र गुण : अंतरीं भरला कृष्ण ॥ तेणें प्रेमाश्रु वोसंडोन : रुदन केलें तिहिं ॥ १७ ॥ अगा रायातें कैसें रुदन : तरि सुस्वर हें लक्षण ॥ जें उच्चस्वरें गोपीगण : बोलोनि रडता जाला ॥ १८ ॥ किंवा तिहिं रुदनमिषें : कृष्ण स्मरला आक्रोशें ॥ अनंता जन्माचिं किल्बिसें : अंतरायरुप जें ॥१९॥ त्या दुरितातें निरसुन : श्रीकृष्णाचें कृपाळुपण ॥ खवळुनि प्रेमे करुन : प्रसन्न केला तो प्रिये ॥ २० ॥ मग तो संतुष्ट होंत्साता : देवी लक्ष्मियचा भर्त्ता ॥ श्रीकृष्ण जाला प्रकटता : तियां गोपिकां प्रति ॥ २१ ॥ हें उत्तरश्लोकें करुन : राया प्रति व्यासनंदन ॥ बोलिले तें सव्याख्यान : वर्णिजेतें आइका ॥ २२ ॥

**तासामाविरभूच्छौरिः स्मयमानमुखांबुजः ।**
**पीतांबरधरः स्रग्वी साक्षान्मन्मथमन्मथः ॥ २ ॥**

जाणोनि निजविरहार्ता : क्रंदमाना गोपकांता ॥ तयां प्रति रमाभर्त्ता : प्रकटला तो कृष्ण ॥ २३ ॥ असो शौरी नामें करुन : यादवकुळमंडन ॥ शूरसेनान्वयभूषण : लीलाविग्रहधारी श्रीकृष्ण ॥ २४ शौरी येणें ऐसें वडलें : जें गोवळत्व निवारिलें ॥ साक्षात् वैकंठिचें सावळें : अवतरलें हें ब्रह्म ॥२५॥ पुराणे जयातें गाति : उपनिषदें प्रतिपादिति ॥ असो वासुदेवत्वें ख्याति : वेदोक्त जया कृष्णाचि ॥ २६ ॥ तो त्यां निजशरणां प्रति : तया गर्वाचिया

निवृत्ति ॥ आइक राया परीक्षिति : प्रकटता जाला ॥ २७ ॥ तो कृष्ण कैसा सहज : तरि स्मयमानमुखांबुज ॥ ज्याचें सहास्य मुखपंकज : प्रसन्नवदन विग्रह ॥ २८ ॥ नातरि निकटवर्तियातें : गर्वें व्यवधान जालें होतें ॥ तेणें गमलें जें येथें : अकस्मात् प्रकटला कृष्ण ॥ २९ ॥ ज्या गर्वें केलें आवरण : त्यातें प्रकाशिलें आपण ॥ स्वता जो आवरणशुन्य : प्रकटचि असतांहिं ॥ ३० ॥ आपुलेनिचि प्रकाशें : भासविलें विलोपा ऐसें ॥ तया मिथ्याप्रतीति मिषें : प्रकट असोनिहिं स्वयें ॥ ३१ ॥ अप्रकट ऐसें भासलें : यालागि कृष्णें हांस्य केलें ॥ त्या हास्ययुक्त मिरवलें : मुखांबुज कृष्णाचें ॥ ३२ ॥ आणि आपुलिया प्रभा : आणोनि पीतांबरासि शोभा ॥ तो पीतांबरधर उभा : राहिला प्रत्यक्ष ॥ ३३ ॥ नाना पीतांबराचे कांति : त्या गोपिकांची चित्तवृत्ति ॥ आपुला ठाइंचि पुरति : अकर्षुनि घ्यावी ॥ ३४ ॥ ह्मणौनि पीतांबरधर : रूप दाउनि मनोहर ॥ भेदुनि गोपिकांचें अंतर : गोचर जाला तयांसि ॥३५॥ नातरी पीतांबराकृति : कासे काशिली निजभक्ति ॥ जियेतें आश्रुनि भगवंतिं : भजति भक्त ॥३६॥ ऐसा तो नंदकुमार : हास्यमुख पीतांबरधर ॥ प्रकट जाला मनोहर : वृंदावनि त्या गोपिकांसि ॥ ३७ ॥ आणि वनपुष्पांचियां माळा : जेणे वातलिया गळां ॥ निजरथा करुनि त्या बाळा : आपुले वेधें ॥ ३८ ॥ नातरि ते वनसुमने : गोपिकांचि शुद्ध मने ॥ त्यातें स्वीकारुनि तेणें कृष्णें : ते वाइलि कंठप्रदेशीं ॥ ३९ ॥ एवं पीतांबरवेष्टित : वनपुष्पमाळामंडित ॥ हास्यमुख जो मन्मथ : मन्मथासहि मथिता ॥ ४० ॥ तेथें जो कृष्ण प्रकटला : तो हास्यासि प्रत्ययो जाला ॥ वांचुनि सर्वदा संचला : निकटवर्त्ति ॥ ४१ ॥ त्यांचियांचि गर्वनिमित्तें : तिरोधान गमलें होतें ॥ तया गर्वनिवृत्ती त्यांतें : प्रकटताही गमली ॥ ४२ ॥ ह्मणोनि असत होंत्साता : गमली त्यांतें प्रकटता ॥ आतां असो भावार्थकथा : प्रसंगुचि वर्णु ॥ ४३ ॥ आपुले विरहनिमित्तें : शिणलिं तें गोपीशतें ॥ निजप्रियें वाचुनि त्यातें : नाळवती देहादिकें ॥ ४४ ॥ जाणोनि ऐसियेनिष्ठेतें : तेणें

मदनाचेहि मन्मथें ॥ प्रत्यक्ष केलें आपणातें : विरहशमनार्थ ॥ ४५ ॥ असो तो मन्मथमोहन : विरहशमाचें कारण ॥ श्रीकृष्णाहुनि जें आन : तें विरहकारक सर्वहि ॥ ४६ ॥ कामशमातें जे इच्छिति : ते कृष्णातें शरण येति ॥ हें नेणो लोक शीणति : कामसंकटिं येथें ॥ ४७ ॥ यालागि त्या गोपकांता : सांडुनि अन्यत्र आस्था ॥ त्या मन्मथाचिया मन्मथा : शरण आलिया ॥ ४८ ॥ असो वर्णुनि कृष्णकीर्ति : जाली प्रतिबंधनिवृत्ति ॥ मग प्रकटला श्रीपति : तेथें तत्काळ तयांसि ॥ ४९ ॥

**तं विलोक्यागतं प्रेष्ठं प्रीत्युत्फुल्लदृशोऽबलाः ॥**
**उत्तस्थुर्युगपत्सर्वास्तन्वः प्राणमिवागतम् ॥ ३ ॥**

तया मदनमोहनातें : नंदकुमारा श्रीकृष्णातें ॥ सकळ प्रेमास्पदा प्रेष्ठातें : देखोनि त्या अबला गोपी ॥ ५० ॥ कृष्ण गात होंतसात्या : वाळुवंटि बैसल्या होत्या ॥ समकाळेंचि जाल्या उठल्या : विकसितनयना ॥ ५१ ॥ त्यांचि तृषार्तें नयनचकोरें : स्पर्शीलिं कृष्णमुखचंद्रें ॥ होउनि अमृतनिर्भरें : सुटलिं दोंदें अतिसुखे ॥ ५२ ॥ असो ते तपोर्जित नयन : अन्य विषयां पासुन ॥ परतोनि ते देखिलें वदन : प्रियोत्तमा श्रीकृष्णाचें ॥ ५३ ॥ ह्मणोनि ते शोभाथिले : अतिभाग्याचे गमो आले ॥ कृष्णदर्शनामृते धाले : नावलोकिती आणिकातें ॥५४॥ जेवि सांडुनि दशा(श्या) भुमितें : पावोनि गुरुप्रसादातें ॥ दृढाभासाचेनि पंथें : संभवली जे काहिं बुद्धी ॥ ५५ ॥ त्या बुद्धीतें गुरुशास्त्रता : योजली अत्यंत सुक्षमता ॥ तथापि तिजहुनि उदारता : अन्येत्र असेना ॥ ५६ ॥ प्राकृताहुनि परतलि : ब्रह्मोपलब्धीसि पात्र जाली ॥ अति उदार मिरवली : योगियांसि योग्य ॥ ५७ ॥ तेवि देखोनि कृष्णवदना : होंतसात्या उत्फुल्लनयना ॥ साधिला वैकुंठराणा : तिहिं नयन शोभेकरिं ॥ ५८ ॥ एवं विकासितनेत्रवृंदा : कृष्णाचित्ता वृ (व्र) जप्रमदा ॥ त्या देखोनियां नंदानंदा : एकसरेंचि उठल्या ॥ ५९ ॥ नाना कृष्णि रमलें मन : तें उठलें दृश्या पासुन ॥ आणि जेथें विषयचिंतन : तें उठोनहिं पातित ॥ ६० ॥ जे कोण्ही इतस्तता वर्त्तति : प्राकृत सुखार्थ श्रमति ॥ तो

अध:पाता योग्य होति : कृष्णि न भजतां ॥६१॥ ह्मणोनि सुभगनयना : त्या देखोनि कृष्णवदना एकत्र बैसल्या अंगना : तैशाचि उठल्या ॥६२॥ कां जें सर्वांचेंहिं जीवन : सर्वत्र साम्यत्वें श्रीकृष्ण ॥ यालागि तिहिं उस्था (त्था)न : एक वेळेंचि केलें ॥ ६३ ॥ नातरि कृष्णिं जे भजति : ते जाणावे समवृत्ति ॥ आणि विषइक ज्यांची प्रवृत्ति : ते नाना वृत्तिभेद ॥ ६४ ॥ तेवि ते गोपांगनाशतें : अवघिहिं येकोचि मतें ॥ देखोनियां श्रीकृष्णजीतें : उठतिं जालिंतत्काळ ॥६५॥ जेवि प्राणाचें आगमन : होतांचि देहेंद्रियगण ॥ एकसरोंचि उठोन : सावध होय वेवहारकार्यि ॥६६॥ तेवि साक्षात् देखोनि मुर्ति : त्या युगपत्सर्वांही सति ॥ उठलिया त्या समचित्तिं : विकासितनयना ज्या ॥६७॥ मग तिहिं कृष्णजीतें : कैसे जालें भजिजेतें ॥ वश जाला कृष्ण त्यातें : कैसा तें आइक राया ॥६८॥

**काचित्करांबुजं शौरेर्जगृहेंजलिना मुदा :**
**काचिदधार तद्बाहुमंसे चंदनभूषितम् ॥ ४ ॥**

कोण्ही येकि व्रजकामिनी : जो शौरी नामे करुनि ॥ श्रीकृष्णजी पद्मणी : शूरवंशावतरण ॥ ६९ ॥ तयाच्या करपंकजातें : धारिती जाली निजहस्तें ॥ असो अंजळि जोडोनि त्यातें : करांबुजीं धारिलें ॥ ७० ॥ नाना देखोनि कृष्णवदना : सांडुनि क्षुद्र भावना ॥ असोनि हर्षसंपन्ना : कृष्ण मानिला आत्मा ॥७१॥ किंवा हर्षनिभर जाली : तारतम्यातें विसरलीं ॥ ते आळुकेपणें जडलीं : अतिसत्वर श्रीकृष्णि ॥ ७२ ॥ जेवी तृषापीडितावारि : आली अमृताचि लहारि ॥ मग अमृताचि भिड न धारि : तो सेडांचि लागे त्यातें ॥ ७३ ॥ तेवि त्या विरहपीडितेतें : देखोनि कृष्णचंद्रातें ॥ आलें प्रेमार्णव भरितें : तेणे न धरवे धीरु तियेतें ॥ ७४ ॥ ह्मणोनि तिया दोहिं हातिं : धरिला करांबुजिं श्रीपति ॥ कां जें ह्मणि हा मागुति : सांडील आमुतें ॥७५॥ नातारि मनबुद्धि दोन्हि : निक्षेपिलिं तिया श्रीकृष्णि ॥ व्यवधानातें तोडोनि : विनटली तेथें ॥७६॥ तैसीचि कोण्ही येकि कामिनी : श्रीकृष्णातें निहाळुनि ॥ निज-हस्तद्वयें करुनि : स्कंधाचा ठाई ॥७७॥ श्रीकृष्णाचया बाहुतें : धरिती जाली प्रेमार्द्रचित्तें ॥ नाना विरहर्णवि नौकेतें : जोडिलें तिया ॥ ७८ ॥ स्कंध

मर्यादा करुन : आक्रमिला तिया श्रीकृष्ण ॥ जेवि कोण्हि योगीजन : सोहंपद पावे ७९ ॥ सोंहंभावाचें अनुष्ठान : साक्षात्काराचें साधन ॥ तेवि हे स्कंधावलंबन : अधरामृतप्रापक ॥ ८० ॥ आतां अधरांमृताची प्राप्ती : सुलभ जालि ययावरौति ॥ ऐसें चित्तिं : मानिले तिया ॥८१ ॥ एवं स्कंधातें अवलंबुन : केलें श्रीकृष्णबाहुचें ग्रहण ॥ तो बाहु किंलक्षण : तरि चंदनें विलित ॥ ८२ ॥ किंवा तो जो काहिं चंदन : त्या गोपीचें प्रेमळ मन ॥ तो प्रेमाचि उपतिष्ठोन : सुपरिमळित जाला ॥ ८३ ॥ नाना स्वता ते प्रेममूर्तिं : तेथें गोपीची योजली प्रीति ॥ तेणें हरोनि चित्तवृत्ति निजस्थ केली ते ॥ ८४ ॥

**काचिदंजलिना ग्रण्हात्तन्वी तांबूलचर्वितम् ॥**
**एका तदंघ्रिकमलं संतप्ता स्तनयोरधात् ॥ ५ ॥**

कोण्ही येकि तन्वीलक्षणा : सूक्ष्मदेहा सुकुमारांगना ॥ नंदानंदना श्रीकृष्णा : भजीनली ऐसी ॥ ८५ ॥ तेणे उदारें रमालीळें : तांबुळातें जे चाविलें ॥ तया चवितातें देखिलें : त्याजितां तियेनें ॥ ८६ ॥ मग ते त्यजितिये वेळे : अंजळिपुट वोडविले ॥ तिया अंजुळी करिं स्वीकारीलें : तांबूळचर्वितातें ॥ ८७ ॥ एवं त्या तांबूळाचे मिषें : तें तृप्त जालीं अधररसें ॥ जेवि योगियाचें मानसें : वाक्यार्थामृतें ॥८८॥ नाना तेणे नित्यतृप्तें नंदसुतें : त्या गोपीचेनि निमित्तें ॥ तांबूळातें चर्विलें होतें : तें दिधलें तीतें ॥८९॥ नाना तो ब्रह्मानंदमूर्ति : तया स्वानंदातें पुढति ॥ अनुवादोनियां ते सती : निववीली नावेक ॥९०॥ जेवि सज्जन स्वानंदमूर्ति : ते आपुलि स्वरुपस्थिति ॥ अनुवादोनि उदारमति : आपुलेचि ठाइं ॥ ९१ ॥ मग तेजें त्याचें गदित : तेणे तृप्त होती तद्भक्त ॥ तयाचा ठाइं अनुरक्त : जे कोण्हिही असति ॥ ९२ ॥ तेवि त्या चर्विता तांबूळातें : सांडिले रमानाथें ॥ तेणे ते गोपीमनोरथातें : पावती जाली ॥ ९३ ॥ आणिक येकि गोपांगना : कृष्णविरहाकुळमना ॥ देखोनि नंदानंदना : अतिउत्सावातें पावली ॥ ९४ ॥ त्या महोत्सवें करुनि : पाहोनि कृष्णचरणीं ॥ त्या पदसरोजातें धरुनि : हृदइं ठेविती जाहली ते

॥ ९५ ॥ नाना त्या पदरजप्रभावातें : सिंचोनि तद्विरहजां तापातें ॥ स्पर्शोनि कुचयुगातें : शांत जाली ते ॥ ९६ ॥ किंवा कृष्णसेवानुशीळ : मनोबुद्धि कुचमंडळ ॥ तेथें धरुनि पदकुड्मळ : सांडिला तो तापु ॥ ९७ ॥

**एका भ्रुकुटिमाबद्ध्य प्रेमसंरंभविव्हला ॥**
**घ्नंतीवैक्षत्कटाक्षेपैः संदष्टदशनच्छदा ॥ ६ ॥**

आणि कोण्हि येकि वेल्हाळा : प्रेमसंरंभविव्हळा ॥ ह्मणिजे देखोनि घनसावळा : नंदानंदन श्रीकृष्ण ॥ ९८ ॥ आली जे प्रेमलहरी : तिया कोपाची दाविली परि ॥ त्या प्रणयेकोपें ते सुंदरी : अत्यंत विव्हळ जाहली ॥ ९९ ॥ असो वृत्ति विकळ जाली : तारतम्यातें विसराली ॥ तेणें क्रिया घडोनि आली : कोपा सारिखि तेथें ॥ १०० ॥ ते कोपाविष्टता जे काहिं : उमगली भ्रुकुटीचा ठाईं ॥ असो कुटिळा करुनि भवइ : अवलोकिती जाली ॥ १ ॥ व्यंकटा करुनि भ्रकुटी : कृष्णावरि ते गोरटी ॥ प्रेमकटाक्ष शरवृष्टि : वर्षती जाली ते समयिं ॥ २ ॥ स्मरोनि कृष्णाविरहातें : नेणों त्या कटाक्षशरपातें ॥ विंधिती जाली कृष्णातें : तन्मना होत्साती गोपी ॥ ३ ॥ एवं कटाक्षाक्षेपलक्षण : प्रेमकटाक्षें अवलोकन ॥ त्या कटाक्षेक्षणशरिं कृष्ण : ताडिला नेणों ॥ ४ ॥ नातरि वियोगनिमित्तें : ते पडली होती शोकगर्त्ते ॥ यालागि कोपविषयो तीतें : कृष्णचि जाला ॥ ५ ॥ असो मिथ्याभिमानडोहिं : पडोनि क्लेश जाले जे काहिं ॥ तेणेंचि संबंधें पाहिं : शीणु जो किं जाला ॥ ६ ॥ तो परमार्थवस्तु वीण : निवारील आणिक कोण ॥ यालागि कोपावसान : कृष्णिच घडलें ॥ ७ ॥ ह्मणोनि जे कोण्ही ये जनि : या श्रीकृष्णातें चुकोणि(नि) ॥ वृथा पडोनियां भ्रमणिं : शीणती इतस्तता ॥ ८ ॥ त्यांतें कोपावयासि पाहिं : कृष्णें वांचुनि ठाव नाहिं ॥ किंवा भजावयासि काहिं : आश्रो नसे दुजा ॥ ९ ॥ यास्तव ते गोपी सुंदरा : जे श्रीकृष्णविरहातुरा ॥ मनोहरा नंदकुमारा : देखतांचि तत्काळ ॥ १० ॥ प्रेमाची पडोनि भुलि : किंचित् कोपाची परि दाविलि ॥ श्रीकृष्णावरि प्रेरिलि : दृष्टि शरपातें ॥ ११ ॥ ते कोपाची रीति जे काहिं : दाविली अधराचा ठाईं ॥

त्या अधरोष्ठातें पाहिं : दशनेंकरिं दंशिलें ॥ १२ ॥ नातरि स्वर्ग निमित्तें : श्रीकृष्णें सांडिलें होतें ॥ ह्मणोनि तिया आपणातें : पीडिजेते जाहलें ॥ १३॥ असो तया प्रियोत्तमातें : देखोनि धीरु नव्हे चित्तें ॥ प्रणय पुरःसर कोपातें : दाविलें तियेनें ॥ १४ ॥

**अपरानिमिषदृग्भ्यां जुषाणा तन्मुखांबुजम् ॥**
**आपीतमपि नातृप्यत्सन्तस्तच्चरणं यथा ॥ ७ ॥**

आणिक येकि ललना : भाग्याची मृगलोचना ॥ देखोनि नन्दानन्दना : श्रीकृष्णजीतें ॥ १५ ॥ अनिमिष करुनि दृष्टीतें : प्राशिती जाली कृष्ण-मुखातें ॥ असो तृषार्त नेत्र होते : ते निववीले ये रीति ॥१६॥ नाना कृष्णमु-खचन्द्रातें : नेत्रचकोरें तृषापीडितें ॥ प्राशिति जालिं तर्‍हि तृप्तें : नव्हतीचि तियेचिं ॥ १७ ॥ एवं देखोनि कृष्णवदन : निमिषोन्मेषातें सांडुन ॥ तिये गोपीचे नयन : तटस्थ होते जाले ॥ १८ ॥ ते नेत्र कृष्णवदनातें : कोण्ही येके भाग्यें उर्जितें ॥ प्राशिते जालें तर्‍हि तयांतें : नव्हेचि पर्याप्ति ॥ १९ ॥ नाना ते नयनभृंग : कृष्णमुखांबुजपराग ॥ सेविते जाले तर्‍हि वीतराग : ते न होतीच तेथुनि ॥ २० ॥ जेवि योगा जे कोण्ही होति : करुनि साधन-संपत्ति ॥ स्वरूपानन्दातें सेविती : व्यवधानराहित्यें ॥ २१ ॥ तर्‍हि भोगितां आनन्दावाप्ति : न पवती अळंप्रतीति ॥ यावद्देहपात त्यांची प्रीति : विशेषें वाढे ॥२२॥ तेथुनि काढुनि मन : न करिती विषयां अधीन ॥ विषयानन्दें करुन : ते न क्रमिती काळ ॥ २३ ॥ असो देहस्थिती पुरती : पात्रावया उपरति ॥ स्वरूपा पासुनि परति : चित्तवृत्ति न ढळे त्यांची ॥ २४ ॥ अतृप्ताचे परि आसक्ति : विशेषें भजोनि भगवंति ॥ ते प्रेमोद्रेकेंचि क्रमिती : दैवक्षयावधि ॥ २५ ॥ तेवींचि तेही गोपकांता : कृष्णाचेचि मुख पाहातां ॥ पुनरपि न तुटे आस्था : अतृप्ताचे परि ॥ २६ ॥ नाना ज्या कृष्णमुख-पंकजातें : ते गोपीनेत्रभृंगव्रतें ॥ सेविती जाली तर्‍हि तियेतें : तृप्ति नव्हे कदापि ॥ २७ ॥ येथें दृष्टांत ह्मणसी काई : तरि या कृष्णाचा ठाई ॥ सांडुनि सर्वस्वातेहिं : भजती जे महासन्त ॥ २८ ॥ ते तृप्त जाले होंतसाते : न

पवती जेवि तृप्तीतें ॥ आदरें सेविती ते मागुतें : अतृप्त असोनि सदां ॥२९॥ तेवींचि तेंही व्रजसती : सेवितां श्रीमुखसम्पत्ति ॥ तेथुनि न पवेचि निवृत्ति : अतृप्त होंत्सातीं गोपी ॥ ३० ॥ आणि त्या मुखातें सेवितां : कोण्ही येकि गोपकांता ॥ काय वर्तली तेंहिं आतां : अवधारिं गा राया ॥ ३१ ॥

**तं काचिन्नेत्ररंध्रेण हृदि कृत्य निमील्य च ॥**
**पुलकांग्युपगुह्यास्ते योगीवानन्दनिर्भग ॥ ८ ॥**

त्यां परमप्रिया कृष्णातें : सुंदर वदनारविंदातें ॥ सांडुनि सकळ भावातें : दुसरी कोण्ही व्रजवनिता ॥३२॥ ते नयनद्वारें करुन : हृदयासनिं बैसउन ॥ लाउनियां दोन्हि नयन : व्यवहारशून्य बैसली ते ॥३३॥ असो प्रेमप्लुता निजमनि : श्रीकृष्णातें आलिंगुनि ॥ आनदंसमुद्रिं बुडोनि : असती जाली निवांत ॥३४॥ ते आनंदार्णविं बुडाली : ऐसी तुह्मी कोणां चिन्हिं लक्षिली ॥ तारें सर्वांगिं ते लियाली : स्वेदकणमाळा ॥ ३५ ॥ जेवि कृष्णध्यानतत्पर : कोण्ही येक जे योगीश्वर ॥ विसरोनि सर्व व्यापार : कृष्णनिष्ठ जे जाले ॥ ३६ ॥ ते सांडुनिया बाह्यवृत्ति : अंतरिं सुखावले राहति ॥ त्यांची जे अंतरसंपत्ति : ते सर्वांगिं प्रकटे ॥ ३७ ॥ ते पुलकांकितशरीर : तिष्ठती आनंदनिर्भर ॥ तेवि अंतरिं नंदकुमार : आळिंगुनि ते गोपी ॥ ३८ ॥ स्वेदकणिकांचिया माळा : लेउनियां ते वेल्हाळा ॥ शोभली तिया घनसावळा : साधिला कृष्ण ॥ ३९ ॥ नातरिं वृत्तिद्वाराजन्य : शास्त्रीय परोक्ष ज्ञान ॥ जालें तें योगी अभ्यासुन : अपरोक्ष करिति ॥ ४० ॥ तेविचि ते व्रजसती : न्याहाळुनियां कृष्णमुर्ति ॥ साक्षात्कारें जाली मिळती : कृष्णस्वरूपिं ४१ ॥

**सर्वास्ताः केशवालोकपरमोत्सवनिर्वृताः ॥**
**जहुर्विरहजंतापं प्राज्ञं प्राप्य यथा जनाः ॥ ९ ॥**

ऐसें वेगळाले सांगो किति : सकळ ही त्या व्रजसती ॥ देखोनि ते श्रीकृष्णमुर्ति : व्यवधाने वांचुनि तेथें ॥ ४२ ॥ श्रीकृष्णावलोकनपरा : होउनि आनंदनिर्भरा ॥ न स्मरोनिया व्यवहारा : सुखार्णावें पडलिया ॥ ४३ ॥ असो कृपाकटाक्षपातें : अवलोकुनि नंदसुतें ॥ हरुनि तयांचिं चित्तें : निजा-

नंदात्मकें केलिया ॥ ४४ ॥ नातरि तद्दर्शनपरा : विसर्जुजि अन्य व्यापारा ॥ त्या परमानंदनिर्भरा : जालिया अवाविया गोपी ॥ ४५ ॥ कृष्णविरहज्या ( जा ) तापातें : सांडिलें तिहिं परमार्थें ॥ असो नेंद (न दे) खोनि तयांतें : आधि जो अन्तरिं होता ॥ ४६ ॥ तो कृष्णावलोकनें करुन : सांडिला तिहिं निपटुन ॥ जेवि हे साधारण जन : प्राज्ञ जे निद्राअवस्था ॥ ४७ ॥ तेथे विश्वतैजस संबंधि : ह्मणिजे जागृति स्वप्न आधि ॥ तो सांडुनि निद्रानंदिं : राहाती ते निवांत ॥ ४८ ॥ नातरि साधनसंपन्न : जे कोण्ही संत योगी जन ॥ सदा ब्रह्मानंदिं निमग्न : अविद्येतें तरती जे ॥ ४९ ॥ अविद्यात्मकें अति दुःखें : नाशोनि जाती विपाकें ॥ जें कर्मप्रभवें, अनेकें : नाशती पापें निशेष ज्यांचि ॥ ५० ॥ त्या सुखाचें उदाहरण : प्राज्ञ हें दृष्टांतें करुन ॥ रायाप्रति व्यासनन्दन : अनुवादले नावेक स्वभाविक ॥ ५१ ॥ येन्हवि त्या गोपिका सती : सदा श्रीकृष्णाचिया प्राप्ति ॥ पावलिया परम तृप्ति : अपुनरावृत्तिरूप ॥ ५२ ॥ तेथें प्राज्ञप्रापिदृष्टांत : दाविला उपलक्षणार्थ ॥ तें कृष्णरुपिं गोपीजात : पावले निःसंशय ॥ ५४ ॥ किंवा प्राज्ञ शब्दें करुन : ईश्वर जो सनातन ॥ त्यातें पावोनि मुमुक्षु जन : संसारदुखें तरति ॥ ५४ ॥ अथवा प्राज्ञपदें करुन : कोण्ही येक विद्वज्जन ॥ तयाचेनि संगें आधिशुन्य : मुमुक्षु जेवि होति ॥ ५५ ॥ तेवींचि त्या व्रजवनिता : पाहोनि कमळकांता ॥ असत्या जालिया समस्ता : आधिशुन्या गोपी ॥५६॥ नातरि त्या कृष्णप्राप्ता : परि असाधना अनधीता ॥ येथें दृष्टांत पाहतां : अधिकारपरत्वें जाण ॥५७॥ कां जें कृतसाधनपंथें : हे मुमुक्षु पावती जेथें ॥ त्या गोपिका सर्वा ही तेथें : पावलिया कृष्णप्रभावेंकरिं राया ॥ ५८ ॥ आतां तिहिं समस्ति सहित : शोभला नन्दसुत ॥ तें अवधारिं गा सदृष्टांत : निवेदिजेतें राया तुजला ॥ ५९ ॥

**ताभिर्विधूतशोकाभिर्भगवानच्युतो वृतः ॥**
**व्यरोचताधिकं तात पुरुषः शक्तिभिर्यथा ॥ १० ॥**

मग त्या पूर्वोक्ता गोपिका : समस्ता हि विगतशोका ॥ भेटुनि त्या यदुनायका ; परमानंदसागरमग्ना ज्या ॥ ६० ॥ तिहिं गोपिकिं समवेत ; तो

साक्षात् श्रीभगवंत ॥ जो सर्वथा विकाररहित : अच्युतानंद परमात्मा जो ॥ ६१ ॥ असो जो सदा आत्माराम : सर्वत्र अवाप्तपुर्णकाम ॥ जो परात्पर-परम : प्रेमास्पद वस्तुव्यापक ॥ ६२ ॥ तो अधिष्ठुनि विलासातें : तियां गोपिकांचि पूर्वाचितें ॥ सांडुनि गृहादि कामातें : स्वतत्पर जें होतिं ॥ ६३ ॥ तें आकर्षुनियां पुरतिं : करुनि आपणा सवतिं ॥ व्यवधानाचिया निवृत्ति : तें स्वनिष्ठें केलिं ॥ ६४ ॥ तो तिहिं सहवर्तमान : अत्यंत जाला विराजमान ॥ जे पुरुष विशेष शून्य : शक्तिंसिं सहित ॥ ६५ ॥ असो पुरुषशब्दें करुन : परमात्मा जो संगशून्य ॥ तो जेवि स्वता विराजमान : ज्ञानादि शक्तिंसिं ॥ ६६ ॥ ते जे काहिं शक्त्यावृतता : वडली येथें आभासता ॥ तऱ्हीं त्याची एकरसता : भंगली नाहिं ॥ ६७ ॥ तेवि येणे प्रसंगें करुन : शोभला तिहिंसिं श्रीकृष्ण ॥ असो त्यांतें शोभउन : दाविला विलासु ॥ ६८ ॥ नातरि सर्वाही सत्ववृत्ति : त्या मिळोनियां एकांतिं ॥ सेविला जाल्या निज-पति : व्यवधानराहित्यें ॥ ६९ ॥ नाना तो कूटस्थानंदघन : हे शोभा तरि साधारण ॥ तथापि शक्त्यादिकिं करुन : शोभेतें प्रकटी ॥ ७० ॥ तैसा त्यां गोपिंसमवेत : अधिक शोभला श्रीकांत ॥ जो अच्युत भगवंत : षट्गुणऐश्वर्यसंपन्न ॥ ७१ ॥ पुरुष दृष्टांतें करुन : त्यां गोपिं सहवर्त्तमान ॥ रमतां हिं अच्युत कृष्ण : निर्विकार वर्णिला ॥ ७२ ॥ त्यांसिं अनुसरला श्रीकृष्ण : हें तियांसिचि जालें भान ॥ अचिंत्यशक्तिकरुन : दाविला विलासु ॥ ७३ ॥ ऐसे प्रसंगें रायातें : जाणविलें मुनिनाथें ॥ आतां कृष्णें काये जालें कारिजेतें : तें निवेदिजेल ॥ ७४ ॥

**ताः समादाय कालिंद्या निर्विश्य पुलिनं विभुः ॥**
**विकसत्कुन्दमन्दारसुरभ्यनिलषट्पदम् ॥ ११ ॥**
**शरच्चद्रांशुसन्दोहध्वस्तदोषातमः शिवम् ॥**
**कृष्णाया हस्ततरलाचितकोमलवालुकम् ॥ १२ ॥**

तो गोपिकीं परिवारित : शोभला बहु नंदसुत ॥ तेणें सर्वही गोपीजात : घेउनि समागमें श्रीकृष्णें ॥ ७५ ॥ तें जें कालिंदीचें पुलिन : तेथें सर्वही

गोपीगण ॥ मिळोनियां गुणगायन : कारित होत्साता कृष्णाचें ॥ ७६ ॥ तया यमुनापुलिनातें : गोपीं समवेत गोपीकांतें ॥ तेणें श्रीकृष्णे नंदसुतें : प्रवेशोनि स्वछंदें ॥ ७७ ॥ विशेषें शोभिजेतें जालें : हें पुर्वान्वयेंचि योजलें ॥ जें पूर्वश्लोकें बोलिलें : तुजप्रति म्यां राया ॥ ७८ ॥ तोंचि येथें पावलें संबंध : जें घेउनि सर्व स्त्रीवृंद ॥ तो नंदानंदन मुकुंद : प्रवेशोनि पुलिनातें ॥ ७९ ॥ विशेषें जाला शोभता : तो गोपिकांतें उत्सवदाता ॥ नाना शोभविल्या त्या कांता : निजशोभेकरिं ॥ ८० ॥ येन्हविं नित्यानंदाचा ठाईं : न्युनाधिक्य कैंचें काइ ॥ परि हे शोभा जे काहिं : तो तयां गोपिचा प्रेमा ८१ ॥ ह्मणोनि विभु शब्देंकरुन : जाणविलि येथें खुण ॥ असाधारणशोभासंपन्न : विशेषाचा नियंता जो ॥ ८२ ॥ असो आनंद स्वतःसिद्ध : तो गोपींसि आनंदास्पद ॥ अधिष्ठुनि गोपिकावृंद : अधिक शोभता जाला तो ॥ ८३ ॥ जेविं मुमुक्षुचिया मनिं : सद्गुरुचे कृपेकरुनि ॥ शास्त्रादिकेहिं आलेचुनि : उपजला जो काहिं बोधु ॥८४॥ तो तयाचा चित्ताचा ठाइं : विशेषें विराजला पाहिं ॥ वास्तवें विचारितां काइ : नवा बोध जाला तेथें ॥ ८५ ॥ तेवि गोपिकांचिया प्रीति : विशेषें विराजली ते मूर्त्ति ॥ तें वर्णावें आतां किति : उपमा नसे जयातें ॥ ८६ ॥ किंवा गोपिंचें शुद्ध मन : तेंचि कालिंदीचें पुलिन ॥ तेथें गोपीसहवर्त्तमान : शोभला तो विभु ॥ ८७ ॥ त्यांचिं जन्में सार्थकें जालिं : बहुं पुण्यें फळासि आलिं ॥ हे रमणमूर्ति ठसावलि : अन्तर्बाह्य त्यांतें ॥ ८८ ॥ आतां हें यमुनापुलिन : ह्मणसी तें किंविशेषण ॥ तरि तेथें विद्यमान : विकासितें कुमुदें असति ॥ ८९ ॥ तयां कमळाचिया पंक्ति : ज्या विकासिता विराजति ॥ आणि मन्दारहि असति : विकासले अत्यन्त ॥ ९० ॥ जेथें त्या सौगन्ध्यें स्पर्शित : सुगन्ध शीत मन्द वात ॥ तेणे आले बहु नादित : भ्रमरांचे समुदाये ॥ ९१ ॥ एवं ते यमुनापुलिन : उत्तमगुणि बहुं सम्पन्न ॥ जेवि शोभे विशेषें मन : श्रीकृष्णभक्तांचें ॥ ९२ ॥ आणिक पुलिनाचा ठाइं : उत्तम गुण ह्मणसी काई ॥ तरि शरत्काळिं चन्द्रहि : ज्योत्स्नावन्त ॥ ९३ ॥ त्या शरच्चन्द्राचे शुद्ध कर : जे रात्रीचा ठाइं तमो-

हर ॥ असो रात्रिगत तिमिर : तें चन्द्रप्रभेकरिं निरस्त ॥ ९४ ॥ असो शरत्कालरजनि : ते चन्द्रप्रकाशें करुनि ॥ तिये यमुनेचे पुलिनि : उपतिष्ठली विशेषें ॥ ९५ ॥ एवं त्या यमुनापुलिनिं : श्रीकृष्ण प्रभावें करुनि ॥ सर्व कल्याणाची खाणी : उघडली ते राया ॥ ९६ ॥ ह्मणसी उपचारें करुन : प्रकटले तेथें हे गुण ॥ परि जातीचें तें पुलिन : कठिण-स्वभाव सर्वदा ॥ ९७ ॥ तें स्वता निजगुणेंकरिं : पाहावें तत्र क्षोभकारि ॥ क्षुद्र पाषाणाचिया हारि : पायांतें पीडाकारक किं ॥ ९८ ॥ ऐसी काहिं करिसी चिंता : तरि ते कृष्णा कृष्णसरिता ॥ कृष्ण येईल येथें आतां : हें जाणवलें तियेतें ॥ ९९ ॥ मग तरंग जे बहुत : तेचि तियेचे अनेक हस्त ॥ त्या स्वहस्तिकरिं प्रशस्त : कोमल जे काहिं वाळु ॥ २०० ॥ तिये वाळुवेतें रचुन : मृदु केलें निज पुलिन ॥ कां जे श्रीप्रभुचे चरण : विचरोतु येथें यथेष्ट ॥ १ ॥ एवं ते कृष्णा यमुना सती : अतिशयेसिं भाग्यवती ॥ श्रीप्रभु आपुले चारिति : संतोषावा मजवरि ॥ २ ॥ ऐसें तिया मनि धरुन : कोमळे वाळुवेतें रचुन ॥ मृदु केलें निजपुलिन : कृष्णविहारा लागी ॥ ३ ॥ एवं त्या यमुनापुलिनिं : तियां वनितांतें घेउनि ॥ श्रीकृष्ण सुरासुरमणि : तो शोभता जाला बहुं ॥ ४ ॥ नाना त्या कामिनीचा मनिं : उत्तमा गुणांची श्रेणि ॥ ते अवघे गुण त्या पुलिनिं : उपतिष्ठले राया ॥ ५ ॥ त्या मृदुवाळुका पुलिनातें : प्रवेशोनि रमानाथें ॥ घेउनि सर्वे त्या गोपीतें : विराजितें जालें ॥ ६ ॥ असो त्या यमुनापुलिनिं : पूर्विचि त्या व्रजवासिनी ॥ कृष्णागमनातें इच्छुनि : गुण गाति होत्या ॥ ७ ॥ मग अधिष्ठुनि त्या प्रीतीतें : सांडुनि तिरोधानातें ॥ कृपाळुवें कमळाकांतें : प्रकटिजेतें जालें ॥ ८ ॥ तेथें गोपिकाप्रेमप्लुत : विशेषें तिहिंसिं रमानाथ ॥ शोभला ह्मणोनि येथें : पुनः प्रवेश बोलिला ॥ ९ ॥ नाना कृष्णिं जें व्यवधान : तेंचि योजलें तिरोधान ॥ आणि कृष्णिं जें समाधान : तेचि प्रकटता येथें ॥ १० ॥ मग त्याचि प्रेमळा मनिं : ते मुर्ति मनोहारिणी ॥ विवली तोचि त्या पुलिनिं : दाविला प्रवेशु काहिं ॥ ११ ॥ आतां कृष्ण-

गवेषणचित्ता : पूर्वि होत्या गोपकांता ।। तेव्हां नभिं चन्द्र होता : तवरि भ्रमलिया वनिं ।। १२ ।। मग तो सरश्मि उडुपति : जात असतां अस्ताप्रति ।। तें गोपीप्रत्यगावृत्ति : मागुत्या पुलिनि आल्या ।। १३ ।। त्या यमुनातीरिं बैसोन : केलें कृष्णगुणगायन ।। त्या गुणकथेतें आइकोन : प्रकटला कृष्ण तेथें ।। १४ ।। ऐसी कथा वर्णिली पाहिं : या पुर्वप्रसंगाचा ठाइं ।। पूर्वापर हे विचारितां काहिं : येथें सुचला विरोधु ।। ।। १५ ।। जें कारितां तीराचें वर्णन : चन्द्र बोलिला सज्योत्स्न ।। तें शोभतें जालें पुलिन : चन्द्रकिरणिं सप्रकाश ।। १६ ।। असा ते शरच्चन्द्रकर : तिहिं स्पर्शितां ध्वस्तांधकार ।। होउनि तें शोभलें तीर : चन्द्रप्रभा प्रकाशित ।। १७ ।। तरि तेचि असोनि निशि : चन्द्र गेला जो अस्तासि ।। मागुता तो चन्द्र आकाशि : उदैला हा कैंचा ।। १८ ।। ऐसा विरोध हा जो काहिं : तो श्रीकृष्णिं सर्वथा नाहिं ।। ज्याचेनि ठेविले ठाईं : वर्ततसे हें जग ।। १९ ।। आणि तो असंगोदासीन : हेंहिं असे येथें प्रमाण ।। ज्याचे आज्ञेतें पाळुन : विचारतो हा चन्द्र ।। २० ।। कां जें पुर्विं हा चन्द्र जाण : अकाळिं उदैला सम्पुर्ण ।। तैशाचि आतां अप्रमाण : कृष्णसत्तेनें आला ।। २१ ।। एवं न क्रमतां ते निशि : अस्तातें पावला तेजोराशी ।। तो कृष्णप्रभावें स्वज्योत्स्नेसि : उदैला मागुता ।। २२ ।। तेणें धवळलें पुलिन : तेथें गोपीसहवर्तमान ।। तो यशोदानन्दानन्दन : विशेषे शोभता जाहला ।। २३ ।।

तद्दर्शनाल्हादविधूतहृद्रुजो
मनोरथांतं श्रुतयो यथा ययुः ।।
स्वैरुत्तरीयैः कुचकुंकुमांकितै-
रचीक्लृपन्नासनमात्मबन्धवे ।। १३ ।।

मग तेथें त्या गोपकांता : कृष्णदर्शनाल्हादयुक्ता ।। त्यांचे मनिं हृद्रोग होता : कृष्णविरहात्मक जो ।। २४ ।। नाना जाला जो अभिमान : तेणें अंतरला श्रीकृष्ण ।। मग तो वाढला दारुण : हृद्रोग त्यांतें ।। २५ ।। नातरि गर्वव्यामें चित्तें : तर्हि न विसरोनि कृष्णातें ।। कृष्णानंदेविण गोपीतें : न

क्रमला काळु ॥ २६ ॥ येणेंचि कारणें करुन : हृद्रोग जाला वर्धमान ॥ तो आतां पावला अस्तमान : तद्दर्शनानंदें ॥ २७ ॥ जेवि पात्रतां स्वरुपता : मुमुक्षुची निवारे व्यथा ॥ तेवि त्या गोपकांता : विधूतहृद्रुज्या जाल्या ॥२८॥ असो देखोनि कृष्णजीतें : निर्धूतपापें जालिं चित्तें ॥ कृष्णप्राप्ति प्रतिबंधातें : निस्तरलिया गोपी ॥ २९ ॥ तिये कृष्णप्राप्ती लागुनी : अनेका क्लेशातें सो· सुनि ॥ मनोरथाचिया श्रेणी : विचारिल्या होत्या ॥ ३० ॥ त्या मनोरथ प्रांतातें : पावलिं तें गोपीतें ॥ असो देखोनि कृष्णजीतें : पुर्णमनोरथा जाल्या ॥३१॥ सांडुनि गृहादि आशेतें : कृष्णपरेंचि होतिं चित्तें ॥ तें पावोनि कृ-ष्णजीतें : अति शांतें जालिं ॥ ३२ ॥ या व्यवधानाचे निमित्तें : विरहव्यग्रें होतिं चित्तें ॥ यालागि कृष्णिं पुरता त्यातें : अवसर नव्हता ॥ ३३ ॥ जेवि सांडुनि गृहादिकातें : अवलंबुनि मोक्षेच्छेतें ॥ सदां मुमुक्षुचि चित्तें : स्वरुपचिंतनिं असति ॥ ३४ ॥ मग पावोनि साक्षात्कारातें : निस्तरति मनोरथातें ॥ तैसें-चि आतां गोपिकातें : घडलें राया ॥ ३५ ॥ नातरि कृष्णप्राप्ति लागुन : असावें मनोरथशुन्य ॥ कांजें चिंतेचें आधिकरण : कृष्णमय जालें ॥ ३६ ॥ कृष्णाचिया सुखप्राप्ति : मनोरथाची समाप्ति ॥ पावलिया त्या गोपिकासती : भाग्यवंता रामा ॥ ३७ ॥ जेवि अधिकारातें लक्षुन : ईश्वरातें श्रुतिगण ॥ व्यवधान अंगीकारुन : भेदप्रतिपादक जाला ॥ ३८ ॥ तेव्हां त्या ईश्वरपरा श्रुति : अपुर्णकामा ऐशा भासती ॥ आणि जेव्हां जे कोण्ही पावती : मोक्षाधिकारातें ॥ ३९ ॥ तेव्हां मोक्षसंपादका श्रुति : कर्म-प्रवृत्तीतें निस्तरति ॥ प्रवृत्तित्यागें समाप्ति : पावती ईश्वरिं ॥ ४० ॥ त्यांसि बोलावयासि कांहिं : विषयोंचे उरला नाहिं ॥ निरंतर आनंदडोहिं : पावलिया समाप्ति ॥ ४१ ॥ तेवि पाहोनि कृष्णवदन : गोपी असोनि मनोरथशून्य ॥ सकळकामसंपुर्ण : असत्या जालिया ॥ ४२ ॥ आतां जेवि कोण्हीं योगीजन : जऱ्हीं पावले समाधान ॥ तऱ्हि जंवरि आभासमान उपाधिलेश असे ॥ ४३ ॥ तंवरि प्रेमळेनि चित्तें : न सांडिति हरिभक्तीतें ॥ परमप्रेमामृतसंप्लुतें : भगवंतिं चि वर्तती ॥ ४४ ॥ भगवंताचि गुणकथा :

विशद तत्क्रमसद्वार्ता ॥ येणें करुनि उपाधिप्रांता : पावती योगी ॥ ४५ ॥ तेवि त्या गोपवनिता : जऱ्हि जाल्या प्राप्तमनोरथा ॥ तऱ्हि कृष्णेंसिं तद्वार्ता : बोलाविया कांहिं ॥ ४६ ॥ ऐसें विचारुनियां मनिं : त्या प्रेमळा व्रजभामिनी ॥ उत्तरीयां वास्त्रिं करुनि : श्रीकृष्णजी लागि ॥ ४७ ॥ तिया प्रेमळा गोपांगना : रचित्या जालिया आसना ॥ उत्तरीया त्या किंविशेषणा : तरि कुचकुंकुमयुक्ता ॥ ४८ ॥ विचारुनि कृष्णभोगातें : स्वकुचहृदयें प्रशस्तें ॥ तेथें कुंकुमें कोलिं लिप्तें : कृष्णक्रीडायोग्यें ॥ ४९ ॥ त्या कुंकुमरंजितें वसनें : तेंचि कल्पिलिं आसनें ॥ नातरि तिहिं प्रेमळें मनें : आंथुरिलिं प्रियप्रीत्यर्थ ॥ ५० ॥

**तत्रोपविष्टो भगवान्स ईश्वरो**
**योगेश्वरांतर्हृदि कल्पितासनः ॥**
**चकास गोपीपरिषद्गतोऽर्चित-**
**त्रैलोक्यलक्ष्म्येकपदं वपुर्दधत् ॥ १४ ॥**

ते जें आसनें प्रशस्ते : जें कृष्णानुरागरंजितें ॥ तो नंदानंदन कृष्ण तेथें : बैसता जाला ॥५१॥ तो कृष्ण किंविशेषण : तरि जो जगाचें अधिष्ठान ॥ हें विश्व जेनें (णें) भासमान : सर्वांचा ईश्वर ॥ ५२ ॥ ह्मणसि कृष्ण सर्वाधिष्ठान : जरि सर्वत्र विद्यमान ॥ तरि व्यर्थ कां हे जन : संसारिं सिनति ( शिणति ) ॥ ५३ ॥ ऐसें ह्मणसि येथें : तरि भगवान् या निमित्तें ॥ षड्गुण ऐश्वर्य जयातें : अनुसरोनियां असे ॥ ५४ ॥ ह्मणोनि हा भगवान् स्वता : सर्वाधिष्ठाननियंता ॥ ईश्वरत्वें हाचि रक्षिता : अनादि अनंत कृष्ण ॥ ५५ ॥ तथापि सांडुनि सर्व रति : या कृष्णातेंचि भजति ॥ त्या योगेश्वरांतर्हृदयवर्ति : राहाणें तयासि ॥ ५६ ॥ त्यांचे अंतरिं आसन : करुनि तेथें तिष्ठमान ॥ एवं तो सर्वत्र विद्यमान : तऱ्हि भक्तांसिचि प्राप्त ॥ ५७ ॥ कोण्ही इतर जे प्राणी : त्याचेचि सत्ते करुनि ॥ वर्तती तऱ्हि तो त्यां पासुनि : अतिशयें दुरि असे ॥ ५८ ॥ यास्तव योगिहृद्भुवन : तेंचि करुनि आसन ॥ राहाता तेंचि आतां कृष्ण : गोपीउपवस्त्रासनिं

॥ ५९ ॥ वैसोनि जाला शोभता : पाहा त्या केशा भाग्यवन्ता ॥ आणि योगीसाधनपंथा : अनुसरोनियां ॥ ६० ॥ तिहिं बहु क्लेशींकरिं : सेविजेतो हृद्दीवरिं ॥ तया कृष्णातें त्या सुन्दरी : भोगित्या जालिया प्रत्यक्ष किं ॥६१॥ तत्कृत आसनिं स्वस्थ : बैसोनि तत्सभांतर्गत ॥ असो तिहिसि आवृत : तो पुजिला होंत्साता ॥ ६२ ॥ अतिशयें जाला शोभता : तें वर्णावें किती आतां ॥ नन्दानन्दन लोकभर्ता : रमारमण श्रीकृष्णाजि ॥ ६३ ॥ नाना कृष्णे तेणें काळें : बहुं शोभिजेतें जालें ॥ अत्यंत सौंदर्य दाविलें : जें त्रैलोक्य दर्शनास्पद किं ॥ ६४ ॥ ऐसि त्रैलोक्यामाझारि : दर्शनीय वस्तु नसे दुसरि ॥ हा सुखाभास जेणेकरि : लक्षनि (णि ) ज्या कृष्णातें ॥६५॥ तो स्वता सुखैकमुर्त्ति : अधिष्ठुनि गोपिकापांक्ति ॥ योगीजन मानसवर्त्ति : अतिशयें शोभला तेथें ॥ ६६ ॥ नाना वनभ्रमणमिषें : तिहिं शोधिलि स्वमानसें ॥ तेणें सन्तोशोनि रमाधीशें : शोभिजेतें जालें ॥ ६७ ॥ किंवां तेंचि ध्यान फळलें : अपरोक्ष सुख जोडलें ॥ शामसुन्दर रुप देखिलें : प्रत्यक्ष ब्रह्म कृष्णाख्य ॥ ६८ ॥

सभाजयित्वा तमनंगदीपनं
सहासलीलेक्षणविभ्रमभ्रुवा ॥
संस्पर्शनेनांककृतांघ्रिहस्तयो :
संस्तुत्य ईषत्कुपिता बभाषिरे ॥ १५ ॥

मग तया आसनस्थातें : सन्मानुनि स्तोत्रें प्रशस्तें ॥ स्तवुनि तें गोपीकाहातें : बोलति जालिं ॥ ६९ ॥ तो कृष्ण किंविशेषण : तरी अनंगाचा उद्दीपन ॥ अनंगसंकेतें करुन : काम जो कंदर्प ॥ ७० ॥ होउनि कंदर्पोद्दीपन : जयाच्या ठाइं हें मन ॥ निजस्वभावातें सांडुन : विशेषें आसक्त होयें ॥ ७१ ॥ किंवा हें पाहतां वदन : विषयकामातें विसरोन ॥ विशेषें थोरावे मदन : संभोगावया कृष्णातें ॥ ७२ ॥ असो देखतां रमणरुप : नाशोनि प्राकृत कंदर्प ॥ प्रेमा उथळला अमुप : कृष्णविषइं तत्काळ ॥ ७३ ॥ ह्मणोनि तेंचि कामोद्दीपन : जेणें साधिजे श्रीकृष्ण ॥ आणि प्रपंचासक्त मन :

तो क्षुद्र काम बोलिजे ॥ ७४ ॥ एवं देखोनि कृष्णवदन : विशेषें जे काम-वर्धन ॥ तेंचि कृष्णप्राप्तिचें साधन : साधकांलागी ॥ ७५ ॥ त्या कामदीपना कृष्णातें : सन्मानुनि तें गोपिशतें ॥ स्तोत्रें समर्पुनि बहुतें : आदरिलें बोलों ॥ ७६ ॥ तें कोणे लक्षणें करुन : तरि वस्त्रासनि असोन ॥ त्या श्रीकृष्णाचे चरण : मांडियावरि ठेविले ॥ ७७ ॥ त्या चरणाचें संवाहन : केलें स्वहस्तें कवळुन ॥ आणि तत्करांतें धरुन : ठेउनि अंकावरि ॥ ७८ ॥ त्या करांचें हि संमर्दन : करित होंत्साता गोपीजन ॥ करिता जाला संभाषण : श्रीकृष्णजिसिं ॥ ७९ ॥ नाना त्या करांघ्रिस्पर्शें : शोधुनियां निजमानसें ॥ तत्प्राप्ति अनुवादमिषें : आरंभिलें बोलों ॥ ८० ॥ तया भाषणाचि पद्धति : जन्हि अंतरिं प्रीति होति ॥ तथापि कोपाचि रीति : दाविली नावेक तिहिं ॥ ८१ ॥ आतां कोपयुक्ता भामिनी : त्या कोणे लक्षणें करुनि ॥ ऐशी जरि तुमचा मनि : होइल आशंका ॥ ८२ ॥ तरि पाहोनि कृष्णवदना : हास्यमुखा होत्या अंगना ॥ आणि हांसत अवलोकणा ( ना ) : करित होंत्सात्या ॥ ८३ ॥ निज भृकुटीचा ठाईं : वक्रता दाविलि जे कांहिं ॥ त्या भृकुटीभंगें सर्वाहि : किंचित् कोपयुक्ता ॥ ८४ ॥ नाना अल्पसा हास्य-लेश : तद्युक्त भृकुटीविलास ॥ त्या भृकुटिभंगें रमेश : अवलोकिला तिहिं ॥ ८५ ॥ ह्मणोनि त्या गोपकांता : लक्षिलिया कोपयुक्ता ॥ नाना याचि विलासें स्वभर्त्ता : पूजिला तिहिं ॥ ८६ ॥ नातरि येणें नंदसुतें : निजविरहाचे निमित्ये ॥ शीणविलें तें तियांतें : हर्षामाजि स्मरलें ॥ ८७ ॥ तो विरहकोप जो काहिं : उमटला भृकुटीचा ठाईं ॥ तो तद्वारेंचि कृष्ण पाईं : समर्पिला अवघा ॥ ८८ ॥ किंवा विरहक्लेश होता : तो आणिला भृकुटि-पंथा ॥ तेणें निजविरहवेथा : सुचिली नावेक ॥ ८९ ॥ नातरि तया एकांतिं : विसर्जिलि विरहवृत्ति ॥ जेवि आत्मसाक्षात्कारिं संति : विद्यावृत्तितें सांडिजे ॥ ९० ॥ अथवा तिया कामिनी : कृष्णातें स्वमानसासनिं ॥ बैसउनि केली कडसणी : निजानिष्ठेचि ॥ ९१ ॥ असो त्या उपवस्त्राचे व्यक्ति : एकवाटुनि सर्वावृत्ति ॥ संपादिली पूजासंपत्ति : आसनरूपा ॥९२॥

तया आसनस्था कृष्णातें : पूजोनि निजप्रेमपंथें ॥ तत्प्रातीचे वीवरणातें : पुसत्या जाल्या ॥ ९३ ॥

**गोप्य ऊचुः**

**भजतोनुभजंत्येक एक एतद्विपर्ययम् ॥**
**नोभयांश्च भजंत्येक एतन्नो ब्रूहि साधु भोः ॥ १६ ॥**

कृष्णा या लोकाचा ठाइं : भजनमार्ग ऐसा काहिं ॥ देखत असों त्यामाजि पाहिं : प्रकार ऐसे ॥ ९४ ॥ कोण्ही कोणातें भजतां : तेहि त्यातें भजे माघौता ॥ एवं हा परस्परता : भजनप्रकार ॥ ९५ ॥ असो कितिएक जन : कारिती परस्परें भजन ॥ आपणातें भजे त्यावीण : इतरातें न भजति ॥ ९६ ॥ आणि कितियेकाची स्थिति : न भजत्यातेंहि भजाति ॥ न भजतांहिं तत्प्रीति : अंतरीं वाहाति ॥ ९७ ॥ असो नापेक्षुनि अन्योपकार : आपण भजती साचार ॥ ऐसा हा दुसरा प्रकार : भजनप्रवृत्तीचा ॥ ९८ ॥ आणीक कितियेक जन : उभयताही उदासीन ॥ कोण्हातोंहिं ते आपण : कदापि न भजति ॥ ९९ ॥ सुखे कोण्ही आपणातें : भजो कींवा सांडु परतें ॥ परि सर्वथा ते कोण्हातें : न भजती आपण ॥ ३०० ॥ असो भजत्या न भजत्यातें : असोनि समानचित्तें ॥ कोण्हातेंचि न भजति ते : कोणेहिं समइं ॥ १ ॥ एवं पक्षत्रया माझारि : निकें काये असे मुरारी ॥ तें सांगे गा तव कींकरी : आह्मी आइकों इच्छीतों ॥ २ ॥ ऐसें त्या कामिनी सती : कृष्ण वश व्हावा हें चित्तिं ॥ विचारुनि श्रीकृष्णाप्रति : बोलत्या जाल्या ॥३॥ नाना त्यजुनि विधिक्रमातें : त्या पावल्या श्रीकृष्णातें ॥ आतां तत्प्राप्ति प्रत्ययातें : शोधुनि पाहावें ॥ ४ ॥ ऐसें विचारुनि चित्तिं : त्या पुसत्या जाल्या कृष्णाप्रति ॥ तत्प्रश्नानुसार श्रीपति : बोलताति तिहिंसि ॥ ५ ॥

**श्रीभगवानुवाच.**

**मिथो भजंति ये सख्यः स्वार्थैकांतोद्यमाहि ते ।**
**न तत्र सौहृदं धर्म : स्वार्थार्थं तद्धि नान्यथा ॥ १७ ॥**

आइका सखिया हों य जनीं : परस्परें भजति जे कोण्ही ॥ ते आपणा वांचुनि : न भजती कोण्हातें ॥ ६ ॥ असो विचारुनि स्वार्थातें : भजती ते भजत्यातें ॥ आणि ते भजतेही त्यांतें : स्वार्थेंचि भजति ॥ ७ ॥ ऐसें परस्परें भजते : ते कोण्हि न भजती कोण्हातें ॥ लक्षुनि देहस्वार्थातें : एक-एकातें भजति ॥ ८ ॥ असो बाह्याकारें करुन : भासलें परस्परें भजन ॥ परिस्वार्थोद्यम दोवेजन(ण) : येथें अन्यथा नाहिं ॥९॥ यालागि त्या भजन-विषइं : सौजन्य सर्वथा नाहिं ॥ सौह्रदेंवीण काहिं : सुखहि नुपजे परस्परें ॥ १९ ॥ आणि स्वार्थाचेनि प्रभावें : तेथें धर्महि न सम्भवे ॥ परोपकारही स्वभावें : न घडे अणुमात्र ॥ ११ ॥ जेवि गोमहिष्यादिकांतें : जन सेविती निजस्वार्थें ॥ तेवि ते विषयसुखातें : इच्छुनि भजति ॥ १२ ॥ एवं परस्परें जे भजति : ते सदां जाणावे स्वार्थार्थी ॥ ये विषयिं संशय चित्तिं : झणिं असो तुमतें ॥ १३ ॥ असो येणें श्लोकें करुन : इतुकी दाविली खुण ॥ जें परस्परें हे भजन : तें सुखसाधक नव्हे ॥ १४ ॥ कोण्ही परमार्थ सुखातें : न पावती वो येणे पथें ॥ या सुखासि प्रस्तुत येथें : देहाचि अवसान ॥१५॥ परोपकारधर्में करुन : घडावें आत्मसाधन ॥ तें चुकोनि हें जें भजन : देहादिकिंच घडलें ॥ १६ ॥ एवं परस्परें भजन : तें परोपकारिं नसोन ॥ वृथा स्वार्थभ्रमें हे जन : आत्महितासि सदां वंचति ॥ १७ ॥ येणें लक्षणें करुन : बोलिले हें रमारमण ॥ आतां धर्मांतरातें वदोन : पुरुषार्थद्वय सूचिति ॥ १८ ॥

**भजंत्यभजतो ये वै करुणा : पितरो यथा ॥**
**धर्मो निरपवादोत्र सौहृदं च सुमध्यमा : ॥ १८ ॥**

अत्रो ये सुमध्यमा : सुंदर मध्यप्रदेशा रामा ॥ आइका भजनांतरमहिमा : पुशिला जो तुह्मी ॥ १९ ॥ न भजे जो आपणा प्रति : तयातें हिं जे भजति ॥ तयाहि भजनाची रीति : प्रकारद्वयें जाणावि ॥ २० ॥ त्यामाजि जे कृपाळुजन : सदां परार्थपरायण ॥ प्रत्युपकरातें नापेक्षुन : न भजत्यातें भजति ॥ २१ ॥ आणि स्नेहाकळितचित्तें : निजप्रजातें पाळितें ॥



ते जे त्यां प्रजांचे पिते : तयां प्रजां पासुनि ॥ २२ ॥ उपकारातें नापेक्षिति : अत्यादरें त्यांतें भजति ॥ अत्यंत स्नेहें पाळिति : स्वप्रजातें सर्व प्रकारें ॥२३॥ एवं परार्थ नापेक्षुन : द्विविधा दाविलें भजने ॥ आतां या पासुनि उत्पन्न : दोनि प्रकार होति ॥ २४ ॥ जे कोण्हीं कृपाळु होत्साते : निःकाम भजति परातें ॥ त्या भजना पासुनि त्यातें : परम धर्म प्राप्त होय ॥ २५ ॥ परहित धर्माचा ठाइं : देहादि लोभ जाला नाही ॥ या लागीच तेथुनि पाहिं : अविनाशी निफजे धर्म ॥ २६ ॥ असो मोक्षार्थाचें साधन : ऐसा धर्म होये निष्पन्न ॥ तेणें ते कृपाळु जन : तत्काळ मुक्तता पावति ॥ २७ ॥ आणि जे प्रजावत्सळ : सदां प्रजापाळनशीळ ॥ प्रजांचिया हितीं चंचळ : चित्त जयांचें सर्वदा ॥ २८ ॥ तयांचाचि ठाइं निसीम : संपादतुसे सुहृद्धर्म ॥ आपुले प्रजांचे सर्व काम : सर्व प्रकारें पुरविति ॥ २९ ॥ असो तें सौहृद्य सम्पादलें : तेंचि त्यांसि बन्धन जालें ॥ जन्ममरणाचें घडलें : मागुतें साधन ॥ ३० ॥ एवं प्रकारद्वयें पाहिं : नापेक्षुन हिं भजती जें काहिं ॥ परि बुद्धिभेदें दोघे हि : विषम फळातेंचि पावति ॥ ३१ ॥ ह्मणोनि त्यक्त विषयपंथ : अपेक्षुनि ते परमार्थ ॥ अहंममतादिरहित : परम पुरुषार्थातें वरिति ॥ ३२ ॥ भूतदयादि कर्में करुनि : तया कर्मफळा पासुनि ॥ ते सुटोनिया इये जनि : आत्मसाक्षात्कारातें पावति ॥ ३३ ॥ आणि जे स्वकुटुंबभक्त : असोनि देहाभिमायुक्त ॥ केवळ दिसति सुप्रवृत्त : विरक्ता सारिखे ते ॥ ३४ ॥ निजपत्नि आणि सुतादिक : बंधु आदि देहसंबंधी लोक ॥ त्यातें भजती ते नावेक : सांडुनि स्वार्थ ॥ ३५ ॥ परि हेंजें याचें भजन : तें देहातराचे चि साधन ॥ जर्‍हि प्रस्तुत ते उदासीन : आपुले देहिं दिसति ॥ ३६ ॥ त्या पुत्रादि द्वारें करुन : स्वदेहिं च घडलें भजन ॥ तेथें तो ममताभिमान : ते देहाभिन्नुचि अर्थता ॥ ३७ ॥ अवो या प्रवृत्तिमार्गें प्रांतिं : नव्हे देहाभिमाननिवृति ॥ त्या देहाभिमानें पुडति : देहधारणा चि पडेल ॥ ३८ ॥ एवं यणेलक्षणे करुन : तियां गोपिकांसि श्रीकृष्ण ॥ बोलोनि सुचिली ऐसी खुण : देहाभिमानाचि ॥ ३९ ॥ जें सांडुनि गृहादि प्रवृत्ति

तुह्मी आळियाति मजप्रति ॥ परि स्वदेहिं सूक्ष्मवृत्ति : जरि आसक्ति असेल ॥४०॥ तरि सर्व प्रकारें करुन : न घडे मजासि सन्निधान ॥ ऐसें जाणउनि सावधान : गोपिकातें केलें नावेक ॥ ४१ ॥ एवं श्लोकद्वयें चि करुन : प्रश्न-द्वयातें परिहरुन ॥ विरक्त आणि विषयी जन : दोवेहि दाविले ऐसे ॥ ४२ ॥ आतां जे कोण्ही आत्माराम : सर्वथा निःसंग त्यक्तकाम ॥ पावले जे परम धाम : साक्षात् आत्मस्वरुप ॥४३॥ आणि या लोकिं कितियेक जन : विषयास-क्तांहुनि हीन ॥ जे अत्यन्त दुष्टमन : आणि गुरुद्रोही जे कोण्ही ॥ ४४ ॥ एवं पुरुषत्रयाचें लक्षण : तृतीयें प्रश्नोत्तरें करुन ॥ तियां गोपिकांप्रति श्री-कृष्ण : बोलताति ऐसें ॥ ४५ ॥

**भजतोपि न वै केचिद्भजन्त्यभजतः कुतः ॥**
**आत्मारामा ह्याप्तकामा अकृतज्ञा गुरुद्रुहः ॥ १९ ॥**

अवो प्रस्तुत इये जनि : ऐसेही वर्तती जन कोण्ही ॥ जें सर्वस्वेंसिहिं देउनि : आपणयातें भजते ॥ ४६ ॥ ते तयांचया उपकारातें : स्मरतीच ना सर्वथा चित्तें ॥ कीरती ना स्वता त्यांतें : प्रत्युपकार काहिं ॥ ४७ ॥ मां न भजते आपणा प्रति : तयांतें काये ते भजति ॥ ऐसेही कितियेक वो सति : वर्तती य लोकिं ॥ ४८ ॥ ते जे दोवातेंहिं न भजते : त्यांत येक मोक्षसु-खभोक्ते ॥ आणि दुःखातें पावते : येर दोवे ॥ ४९ ॥ ते मोक्षसुखभोक्ते कवण : तरि जे आत्मबोधसंपन्न ॥ असो जे असंगोदासीन : आत्माराम ॥ ५० ॥ करुनि अविद्येची निवृत्ति : सांडुनि विषयप्रवृत्ति ॥ आत्मस्वरुपिंच रमति : अवाप्तकाम जे ॥ ५१ ॥ तयां स्वरुपरमणां प्रति : उरली नाहिं त्रि-जगती ॥ कर्तव्यार्थ काहिंच चित्तिं : राहिला नाहिं ज्यांचे ॥ ५२ ॥ ह्मणो-नि ते कर्तव्यशून्य : सर्वत्र असंगोदासीन ॥ देहाभिनिवेशविहीन : कोणातें हिं न भजति ॥ ५३ ॥ किंवा आत्मारामलक्षण ॥ जे कोण्ही समाधिसंपन्न ॥ त्यांसि भजता नसे मान्य : मां इतरतें किती येथें ॥ ५४ ॥ आणिक कोण्ही येक ज्ञानि : ते तारतम्यें वर्तती जानिं ॥ तेहिं पुर्णकाम असोनि : उदासीन सर्वत्र ॥ ५५ ॥ तेही भजत्यांतें न भजति : मां न भजते कैचे

स्मरति ॥ एवं दोवेही वर्तती : एके प्रकारें इये जानिं ॥ ५६ ॥ आणि कोण्ही येक मुढमति : विषयोन्माद चढोनि चित्तिं ॥ परोपकारातें विसरति : अकृतज्ञ जे ॥ ५७ ॥ ते कृतोपकारातें न गणिति : मां अन्येत्र कैंचे भजति ॥ ते निर्दय होंत्साते चित्ति : परदुःखें हारीति काई ॥ ५८ ॥ ऐसे ते संमोहितमन : सर्वथा जे अतिकृपण ॥ अन्तरिं लोभि दिसती उदासीन : विरक्तांचे परिं ॥ ५९ ॥ जैसे आत्माराम विचराति : तैसे ते कोठें न भजति ॥ उपकारातें वीसरति : कोण्हि केलें जे काहिं ॥ ६० ॥ असो विषयमोहितमन : तारतम्यातें विसरोन ॥ वर्तती जैसे उदासीन : योगी निस्पृहाचे परि ॥ ६१ ॥ आणि एक ते पापीजन : रजोगुणिं आसक्तमन ॥ तारतम्यातें हिं जाणोन : गुरुद्रोही होति ॥ ६२ ॥ असो जो अन्नादिकिं पाळिता : संकटकाळिं रक्षिता ॥ तोही त्यांचा शास्ता : गुरुचि बोलिजे ॥६३॥ तदुपकारातें स्मरोन : न भजे ऐसा जो कृतघ्न ॥ तो इतरांचें काइ पाळण : करील चांडाळ जो ॥ ६४ ॥ भजतयांतें न भजते : इतरांतें हिं उपक्षिते ॥ ऐसे चतुर्विध गोपीतें : ते उदासीन निवेदिले श्रीकृष्णें ॥ ६५ ॥ याचें तात्पर्य हें चि दिसतें : जें निस्तरले जे अविद्येते ॥ परमानन्दमग्नचित्तें : ते उदासीन सर्वत्रहि ॥ ६६ ॥ आणि कोण्हीं अविद्या आवृत : सदा विषयासक्तचित्त ॥ त्यांचे सर्वही आचरित : देहिंच घडतसे ॥ ६७ ॥ त्यांची वर्तती ऐसी रीति : आणि उपकारी दिसों येति ॥ परि अंतारें महां षठवृत्ति : परोपद्रवकारी ॥ ६८ ॥ आणिक कोण्ही मूढजन : आचरतांहिं कठिण ॥ सदा शिश्नोदरपरायण : दुःखरुप ते सर्वत्र ॥ ६९ ॥ आपुला ठाइं आसक्त मन : न स्मरे कोण्हाचें भजन ॥ गुरुद्रोहि आणि कृतघ्न : वर्तती येणें न्यायें ॥७०॥ ऐसें कृष्णोक्त आईकोन : तो अवघाहि गोपीजन ॥ हास्याचा अनुकार दाउन : अतिगुढाभिप्रायें ॥ ७१ ॥ परस्परें दाविती संकेत : हा कृतघ्न होये नेमस्त ॥ आह्मी सांडुनियां हिं समस्त : अनुसरलों यातें ॥ ७२ ॥ असो आह्मी आपुलिं जीवितें : अर्पिलिं सर्वस्वेंहिं यातें ॥ जान्हि नावेक गृहगतें : शरीरें मात्र होतिं ॥ ७३ ॥ मग यातेंचि अनुलक्षुन : नाना संकटें न गणुन ॥ आजि सान-

काश हें वदन : पाहावया निकट आलों ॥ ७४ ॥ शेवट येणें ते न मानुन : आमुचिं चित्तेंहिं चोरुन ॥ घेउनि गेला तो हा कृष्ण : दयाळु किं कृतघ्न आतां ॥ ७५ ॥ किंवा हा कृपाळुवांचा राणा : ऐसें हिं जाणोनि गोपांगना ॥ हांसोनि विनोदपरायणा : खुणाविति परस्परें ॥७६॥ येणें शेवटील हें युक्ति : दाविली जे किं आह्माप्रति ॥ ते घडोनि आली वो सति : याचाचि ठाइं प्रस्तुत ॥ ७७ ॥ ऐसें खुणाउनि त्या अंगना : परस्परें जाल्या हांस्यवदना ॥ मग जाणोनि त्या खुणा : बोलतुसे कृष्ण ॥ ७८ ॥ नाना जाणोनि तद्-भिप्रायरीति : तो सुजाण चक्रवर्ति ॥ दावितुसे निजस्थिति : पूर्वोक्ताहुनि विपरीत ॥ ७९ ॥ बोलिले प्रकार जे काहिं : त्यांत एकही आपुला ठाइं ॥ विचारितां कोठेंचि नाहिं : हें धरुनि निजचित्तिं ॥ ८० ॥ यावत अध्यायस-माति : हेंचि दावितुसे तयां प्रति ॥ आइक राजा चक्रवर्ति : वर्णिजेतें जें काहिं ॥ ८१ ॥

**नाहं तु सख्यो भजतोपि जंतून्-**
**भजाम्यमीषामनुवृत्तिवृत्तये ॥**
**यथाधनो लब्धधने विनष्टे**
**तच्चिंतयान्यन्निभृतो न वेद ॥ २० ॥**

सखियां हो ऐसें ह्मणोनःतियां गोपिकांतें संबोधुन ॥ श्रीकृष्णजीचें वचन : गोपिकांप्रति ऐसें ॥८२॥ ह्मणे अवो तुमचें प्रश्नोत्तर : म्या बोलिले भजनप्रकार ॥ त्या मद्वाक्याचें नेणोनि सार : तुह्मासि गमले ऐसें ॥८३॥ जें गुरुद्रुह शब्दें करुन : अकृतज्ञ पदेंहिं कृतघ्न ॥ ऐसा अत्यंत शठ कठिण : परोपकार नेणता ॥८४॥ ऐसें आचरण जें काहिं : तुह्मी नेमिलें माझा ठाइं ॥ तरि त्यांत एकही वो नाहिं : मजमाजि प्रकार ॥ ८५ ॥ असो त्या प्रश्नोतरांत काहिं : येकही नसे वो माझा ठाइं ॥ तुह्मी मानिले जे काहीं : मज अकर्तयातें ॥ ८६ ॥ ह्मणाल ऐसा तु क्रियात्मक : तरिं मीं परमकारुक (?) ॥ जो सकळहितकारक : सुहृत्तम मीं सर्वांचा ॥ ८७ ॥ परि मातें जे कोण्ही भजति : तयां भजतयां जीवां प्रति ॥ भजत नाहिं ऐसें चित्तिं : उपटलें तुमचिया ॥ ८८ ॥ तरि

हे जें माझें आचारित : तें सदा भक्तोपकारार्थ ॥ निरंतर त्यांचें चल चित्त : माझा ठाइं असावें ॥ ८९ ॥ असो या विषयाश(स)क्तिहुन : त्यांचें चित्तवृत्तीचें निवर्तनें ॥ होंउनि सदा अनुगमन : मजप्रति व्हावें ॥ ९० ॥ यास्तव बाल्यदशें करुन : दाउनि नावेक तिरोधान ॥ आपुलां स्वरूपिं तीव्र ध्यान : लावितों भक्तांचें ॥९१॥ कां जें सकृद्दर्शनें करुन : पुरतें न कळे महिमान ॥ तेणें मज पासुनि मन : विरक्तीतें पावतसे ॥९२॥ मग देहविषय मागुति : स्मरोनि पावे ध्यानच्युति ॥ ह्मणोनि तिरोधानयुक्ति : दावितों वियोगु ॥९३॥ तेणे मद्( द्रु )पीं अनुवृत्ति : प्रवर्त्तावी वो दीनुराति ॥ एवं या हेतु मिं तयां प्रति : दावितुसें परोक्षता ॥९४॥ किंवा मिं तरि स्वभावें करुन : भज्य भजनभेदविहीन ॥ परि हें जें आचरण : तें भक्तकरुणे लागि ॥९५॥ असो मद्दिलासांतःपाति : भासली हे त्रिजगति ॥ त्या माजि प्रायशा भजति : विषयांतें चि हे जन ॥ ९६ ॥ येथें भाग्याचे विरळा जन : विषयिं असोनि उदासीन ॥ मजाचि येउनि शरण : माझे जे अंकित ॥ ९७ ॥ ते अति उत्सुक होंत्सातें : पावती जर्हि मत्सांनिध्याते ॥ तथापि अल्पाभ्यासे त्यांतें : वियोगु भासे ॥ ९८ ॥ विपरीतभावनामुळ : बुद्धि होउनियां विकळ ॥ माझा स्वरुपिं मन चंचळ : न धारे कदापि ॥९९॥ असो त्या अल्पाभ्यासियांसि : जर्हि परिचयो स्थुळेंसिं ॥ तथापि मत्सांनिध्यासि : स्थुळचि फळे ॥ ४०० ॥ ह्मणोनि या रुपेंकरुन : दाउनि निजतिरोधान ॥ त्यांचे वृत्तीचे अनुवर्तन : आत्मनिष्ठ कारितुसें ॥ १ नाना या स्थुळाही पासुन : अंतरासि आणुनि मन ॥ आपुला रुपिं तिव्र ध्यान : लावितों त्यांचें ॥ २ ॥ जेवि कोण्ही अधम पुरुष : पावला धनविशेष ॥ मग होउनि धनविनाश : त्या धनातें चि चिंति ॥ ३ ॥ तो धनचिंताक्रांताचित्त : न स्मरे काहिं विषयजात ॥ त्या धनचिंतेकरीं समस्त : विसरोनि जाये ॥ ४ ॥ असो दैवयोगें करुन : धनिक जाला जो अधन ॥ तो धनचिंतापरायण : विषयांतर नेणे कदापि ॥ ५ ॥ तेवि मद्भक्तांची अनुवृत्ति : माझा रुपिं असो पुरति ॥ म्हणोनि निकट संगति : मिं परोक्ष होतों त्यांतें ॥ ६ ॥ जेवि मिं देहिंचि अ-

सोनी : देहादिकांतें हे प्राणि ॥ प्राकृत मति करुनि : प्रायशा भजताति ॥७॥ तेचि मतिनिवारणार्थ : परोक्षत्वें तत्त्वं पदार्थ ॥ दाउनि परम पुरुषार्थ : साधविजे तो वेदें ॥ ८ ॥ सोहमास्मि इया चिंता : जाउनि देहिंची अहंता ॥ पावती स्वतःसिद्ध सत्ता : ठायिंचाचि ठाइं ॥ ९ ॥ येणेंचि युक्ती करुन म्या हें दाविजेतें तिरोधान ॥ लाउनि आपुलें चिंतन : आत्माकारता देइजेते ॥ १० ॥ या अर्थातें मनिं धरुन : प्रश्नोत्तर मिषें करुन ॥ त्या गोपिकांप्रति श्रीकृष्ण : बोलिले पुर्वोक्त ॥ ११ ॥ आतां तोचि अर्थ मागुता : आकळे ऐसा या चित्ता ॥ बोलतुसे रमाभर्ता : त्या कामिनीप्रति ॥१२॥

**एवं मदर्थोज्झितलोकवेद-**
**स्वानां हि वो मय्यनुवृत्तयेबलाः ॥**
**मया परोक्षं भजता तिरोहितं**
**मा सूयितुं मार्हथ तत्प्रियं प्रियाः ॥ २१ ॥**

अवो ये अवधारा अबळा : मत्प्रिया ज्या तुह्मी प्रेमळा ॥ जिहीं हा मदर्थ सांडिला : लौकिक व्यवहार ॥ १३ ॥ असो लक्षुनि मज एकातें : तुह्मी सांडिलें लौकिकातें ॥ हे लोक काय आमुतें : ह्मणती हें न विचारिलें ॥१४॥ या लोकाचा ठाइं कोठेहिं : परधर्माचि वार्त्ता नाहिं ॥ हा दृष्टार्थुचि सर्वत्रहि : लक्षिताति मुर्ख ॥ १५ ॥ मिं जो सच्चिदानंदमूर्ति : त्या माझा ठायिं प्राकृत मति ॥ आणि मज जे कोण्ही भजति : त्यांसि बहिष्कारिती ॥ १६ ॥ विषयारागिं जे कुशळ : त्यांचें मानिली उत्तम शीळ ॥ आणि मद्भक्तातें हे बरळ : ह्मणती स्वार्थभ्रष्ट ॥ १७ ॥ आतां तुह्मी उदाराभिमानी : याचि लोकिं असोनि ॥ त्या लौकिकातें न गणुनि : भजल्याति मातें ॥ १८ ॥ हे आमुतें युक्त मानिति : किंवा अयुक्तत्वें वाळिती ॥ ऐसें कांहिंच तुमचे चित्तिं : उपजले नाहिं किं ॥ १९ ॥ अवो लौकीक तो हा किति : वेदासही न भिवोनि चित्तिं ॥ त्या वेदोक्तातें न मानुनि सति : आल्याति येथें ॥ २० ॥ लक्षुनि विषयाश (स) क्तीत : गृहमेधियांतें वेदोक्ते ॥ जें यथेष्टाचार संकोचार्थे : बोलिलें असति ॥ २१ ॥ त्या गृहादिकांची चाड काइ : ह्म-

णोनि काहिं मानिलें नाहिं ॥ निजयोग्यायोग्य काहिं : न विचारिले हें ॥ २२ ॥ अपेक्षुनि मज एकातें : तुच्छ केलें देहादिकातें ॥ तद्योगें उचितानुचितें : सांडिलिं अवधिं ॥ २३ ॥ करुनि वेदोक्त उल्लंघन : जरि होतें अन्येत्र सेवन ॥ तरि अवश्य येतें दुषण : वेदोक्तत्यागें ॥ २४ ॥ जेवि समाधिस्थ जो जाला : तो सर्व क्रिया विसरला ॥ तेथे हे प्रत्यवायज्वाळा : न स्पर्शे कदापि ॥ २५ ॥ अवो हें कर्तृत्व जरि स्मरे : तरि तेथें कर्तव्यही उरे ॥ मग विहितत्यागें संचरे : प्रत्यवाय तत्काळ ॥ २६ ॥ ह्मणौनि तुह्मी ऐसा काहिं : हा लौकिक मानिला नाहिं ॥ विचारुनि ठेविले ठाईं : हें रहस्य वेदाचें ॥ २७ ॥ कां जें उक्तक्रमें करुन : करावें उचितानुष्ठान ॥ शेवट सर्वस्वातें त्यागुन : शरण यावें मजला ॥ २८ ॥ नाना सांडुनि व्यवहारातें : सर्वस्वें अनुसरावें मातें ॥ हें वेदरहस्य वो पुरतें : तुह्मासीचि कळलेसें ॥ २९ ॥ असो हेंचि बोलावें काइ : प्रस्तुत जें या लोकाचा ठाईं ॥ तुह्मी विचारिले नाहिं : कि निंदिती हे लोक ॥ ३० ॥ कां जें तुह्मा मज निमित्त : वेदही सांडिला प्रस्तुत ॥ आणि लोक स्वजाते समस्त : स्वकुळ सोइरे ॥ ३१ ॥ त्या स्वजनाचाही ठाइं : परस्परें स्नेह काहिं ॥ तो तुह्मी त्यागुनि सर्वहि : भजलियाति वो मातें ॥ ३२ ॥ असो होउनि मत्काम : सांडिले पतिसेवादि धर्म ॥ आणि पितृपुत्रादि सुहृत्तम : टाकिले मदर्थ ॥ ३३ ॥ एवं मत्कामा समस्ता : टाकुनि लोकवेदव्यवस्था ॥ त्या तुमचा मि जो जाणता : वृत्तांत हा सर्वहि ॥ ३४ ॥ तो मि अंतर्धानाचेनि मिषें : तुह्मापासुनि दुरदेशें ॥ होतों तणें तुह्मासि ऐसें : मानिलें विपरित ॥ ३५ ॥ कां जें या प्रेमातें न मनुन : तुह्मासि गेलों वो सांडुन ॥ या अभिप्राये मि कृतघ्न : भासलों कीं ॥ ३६ ॥ तरि रचुनि म्यां हे युक्ति : अपरोक्षे होतों तुह्मा प्रति ॥ अवो मि नित्य निकटवर्ति : त्यासि जाणें कैचें ॥ ३७ ॥ नाना म्या तुमतें सांडिजेतें : तरि मदाकारेंचि चित्तें ॥ असोनि कां तुह्मि मातें : अनवरतें स्मरत्या ॥ ३८ ॥ किंवा आड वाळुनि मायेते : तेणेंचि पक्षें सांडिजेतें ॥ तथापि तुमचिं कां चित्तें : आकळितिं मातें ॥ ३९ ॥ तस्मात् विनो-

दाचिया रीति : कल्पुनि अन्तर्धानयुक्ति ।। गुप्त असोनि मुझाप्रति : निकट चिं होतों ।। ४० ।। ह्मणाल हे कां केलि युक्ति : तरि तुमची हे प्राकृत मति ।। नसोनि मदृ(द्रु)पिं अनुवृत्ति : असावी ब्रम्हत्वें ।। ४१ ।। या लागि असोनि सन्निधान : संपादिलें अंतर्धान ।। तुमचा निकट असोन : आलाप आइकिले ।।४२।। असो अंतर्धानप्रसंगि : अपरोक्षत्वेचि तुम्हा लागि ।। मिं भजीनलों वो तन्वंगि : निश्चित जाणा ।। ४३ ।। नाना साधुनि तपसं पत्तिं : मजासिं जे ऐक्ये पावति ।। त्यांचा ठाइं येचि रीति : भजतुसें मिं सर्वद्य ।।४४।। जाणोनि शास्त्ररहस्यातें : तोडोनियां भेदाभासातें ।। मजासिं ऐक्य पुरतें संपादिलें जन्हि निरन्तर ।। ४५ ।। ते निर्मुक्तअविद्यामळ : ऐक्येभावें अति प्रेमळ ।। नाशिलें भज्यभजनमुळ : तन्हि ते विशेषें भजति ।। ४६ ।। ऐसी माझी हे जे युक्ति : अवो माया ही नव्हे पुरति ।। कोण्हीं येकि अकृत्रिम भाक्ति : अखंडत्वें ते असे ।। ४७ ।। कां जे ऐसे तें न वर्तते : तरि गर्वसमुद्रीं बुडते ।। ह्मणोनि यावदेहांत त्यांतें : मिंचि ऐक्यभाक्ति देतों ।। ४८ ।। या-लागि मज प्रियातें : अंतर्धान पावतयातें ।। असूया जे इर्ष्यापंथें : ह्मणि प्रिया हों योग्यता पावाल ।। ४९ ।। असो मातें तिरस्कारुन : ह्मणिं खिन्न असो हें मन ।। प्रिया हो नव्हे मि कृतघ्न : सर्वांचा प्रिय सर्वात्मा ।। ५० ।। नातरि मातें जे भजति : त्यांसि पावावया हे भक्ति ।। फात्रे नातान्हिं मिं त्यां प्रति : बळात्कारें योजितों ।। ५१ ।। असो हे साधारण कथा : प्रस्तुत तुह्मि गोप-कांता ।। सर्व सांडुनि मज कांता : अनुसरलियाति ज्या ।। ५२ ।। सांडुनि पतिसुतादिकांतें : सदा चित्तिं वाहिलें मातें ।। असो वोपिलिं स्वजीवितें : मजलागि तुह्मी ।। ५३ ।। तें म्या सर्वहिं जाणिजेतें : तुह्मी भाविजे ह्मनि(णि) विपरितें ।। ऐसें अत्यन्त गोपिकांतें : आश्वासिलें कृष्णें ।। ५४ ।। त्या गोपिकांचे आचरणें : आभारोनि अन्तःकरणें ।। परिहारपुर्वक तेणें : बहु कांहिं समाधान केलें ।। ५५ ।। मागुती तियांचें भजन : स्तवित होत्साता श्रीकृष्ण ।। बोलिला तें सावधान : आईक राजया ।। ५६ ।।

न पारयेहं निरवद्यसंयुजां
स्वसाधुकृत्यं विबुधायुषापि वः ॥
या माभजन्दुर्जरगेहश्रृंखलाः
संवृश्च्य तद्वः प्रतियातु साधुना ॥ २२ ॥

अवो हें साधु आचरण : जें माझें एकांतिक भजन ॥ जीवितें मज लागुन : वोपिलिं तुह्मि ॥ ५७ ॥ त्याचिया उत्तीर्णतेचा पार : मिं जो किं स्वता ईश्वर ॥ तथापि न पावे निर्धार : कोणेहीं समईं ॥ ५८ ॥ तिया तुह्मि किंलक्षणा : तरि शुद्ध संयोगा अंगना ॥ ह्मणिजे सांडुनि क्षुद्र वासना : मज निकट आल्याति ॥ ५९ ॥ किवां तुमचेनि योगें करुन : मि जो किं नित्या नंदघन ॥ त्या मजही नित्य समाधान : जालें वो प्रस्तुत ॥ ६० ॥ कां जें मिं जो नित्यसंतृप्त : त्या माझा ठाईं जे अनुरक्त ॥ ते अतिशयें माझे भक्त : आवडति मातें ॥ ६१ ॥ अवो स्वाभाविक हे रीति : मज आपुलेचि ठाइं प्रीति ॥ तेणेंचिकारिं जाली प्रतीति : अभेदिं भेदाचि ॥ ६२ ॥ एवं हा जो भेदाभास : माझाचि युक्तीविलास ॥ त्यामाजि कोण्हिं माझे दास : कोण्ही विषयासक्त ॥ ६३ ॥ विषयांतें जे भजीनले : ते तद्रुपताचि पावले ॥ आणि मजकडे परतले : तोचि माझे दास ॥६४॥ यालागि आपुलिया प्रीति : माझेचि मज आवडति ॥ तेविचि तुमचीहि संगति : सुखास्पद जाली ॥ ६५ ॥ या कारणे येथें वो सति : निरवद्यसंयुजा हे ख्याति ॥ तुमची तुच्छ विषइं प्रीति : नसे कदापि ॥ ६६ ॥ या तुह्मी भजतिया मातें : या दुर्जर गृहशृंखळेतें ॥ तुह्मीं तोडिलें जें कोण्हातें : छेद्य नव्हे सर्वदा ॥ ६७ ॥ नाना या गृहळंखळेतें : भेदुति भजल्याति मातें ॥ हें नाशात्रया कवणातें : योग्ये नव्हे कदां ॥ ६८ ॥ असो हे गृहादि असाक्ति ? नीच नत्री बंधदाति ॥ जे कल्पांत येती जाति : पारि हालवेना अणुमात्र ॥ ६९ ॥ जे माझा भजनें वाचुनि : कोणाहीं उपायासि न मानी ॥ वनवासियातेंहिं वनि : गोडनि पाडि ॥ ७० ॥ जे विरक्तीचें नि अहंकोडें : विरक्तपादिंहिं श्रृंखळा पडे ॥ मां गृहमेधी तों बापुडें : निस्तरे काई ॥ ७१ ॥ ह्मणोनि तुम्ही

वो प्रेमळा : अति भाग्याचिया अबळा ॥ ते दुर्जर गृहशृंखळा : तोडुनि आलियाति ॥ ७२ ॥ हे तोडावया बंधसंगति : तुह्मी निकी विचारिली युक्ति ॥ गृहिंच असतां चित्तवृत्ति : समर्पीली मातें ॥ ७३ ॥ माझा स्मरना (णा) चा अभ्यास : जरि नित्य न करी पुरुष ॥ तरि हे गेहशृंखळा दुर्द्धष : छेदवेल कवणा ॥७४॥ या लागि भाग्याच्या वो अबळा : मत्स्मरणरता सकळा ॥ हे दुर्जरगृहशृंखळा : तोडुनि आल्याति येथें ॥ ७५ ॥ एवं तुमचा साधु आचार : तेणे जाला मज आभार ॥ मीं सर्वदा निर्वीकार : परि संतोशलों बहुं ॥७६॥ असों मज नित्य प्राप्तातें : काहिं नव्हे उपकारातें ॥ तथापि स्वयें आपणातें : सोडविलें जेणें येथुनि ॥ ७७ ॥ तें जें त्याचें साधुकृत्य : तेणे तेंहि कृतकृत्य ॥ आणि मजहि तो पुरस्कृत्य : सर्व लोकामाजि ॥ ७८॥ त्या आभाराची उत्तीर्गता: माझेनि तों नव्हे सर्वथा ॥ जया उपकारासि तत्वता : पारुचि नाहिं ॥ ७९ ॥ अवो म्या एसें विचारिलें : जें देवाचें आयुष्यें संपादिलें ॥ तऱ्हि मज जें संतोपविलें : तें फिटेना ऋण ॥ ८० ॥ सोडुनि अन्य कामातें : जे कोण्ही आराधिति मातें ॥ जें आराधन समर्पलें तें : मावौतें फिरेना ॥ ८१ ॥ जेवि समुद्रीं गंगा मिळालि : मावौति नाहिं आलि ॥ तेवि कृत्यें जें मज अर्पलिं : मदाकारें तें होति ॥ ८२ ॥ मग कोणें कोणा लागुनि : उत्तीर्ण व्हावें कैसें भामिनी ॥ तुह्मी स्वाचरितिं करुनि : कृतकृत्या असा ॥ ८३ ॥ अवो मज जे भजति : त्यांसि ब्रह्मपदें तुच्छ होति ॥ तेथें भजावया पुरति : भिन्नता कौंचि ॥ ८४ ॥ किंवा मज वेगळें कांहिं : सर्वथा सेव्य नाहिं ॥ तरि म्या तुह्मासि काई : आपणावीण द्यावें ॥ ८५ ॥ तया मज प्रियोत्तमातें : तुह्मी निजशुद्धाचारितें ॥ साधिलें मज पुरते : देणेचि नलगे आतां ॥ ८६ ॥ नाना गृहादि सोडिते वेळे : आधिं मातें अवलंबिलें ॥ त्याचि आचरणें जालें : सुखास्पद ॥ ८७ ॥ असो बहुं बोलावें किति : तुह्मी आभारिलें स्वचरिति ॥ त्याची उत्तीर्णता हेचि पुरति : जे मि संतोषलों ॥ ८८ ॥ यावीण द्यावया कांहिं : मज तवं सामर्थ्य नाहिं ॥ ऐसें श्रीकृष्ण बहुं कांहिं : निजउदारत्वें बोलिले ॥ ८९ ॥

एवं या द्वात्रिंशतितमाध्याइं : इतुकें संपादलें कांहिं ॥ त्या गोपी श्रीकृष्ण-विरहिं : पीडल्या होत्या बहु ॥ ९० ॥ त्या विरह प्राप्तीचें कारण : त्यांच्याचि कांहिं दुर्गुण ॥ तो कृष्णसंयोगिं प्रतिबंधन : वोडवला होता जो ॥ ९१ ॥ त्या प्रतिबंधाची निवृत्ति : केली वर्णुनि कृष्णकीर्ति ॥ मग प्रकटोनि ते मुर्ति : संतोपल्या त्या गोपी ॥ ९२ ॥ नातरि कृष्णें रमाकांतें : निजावियोगाभासानिमित्तें ॥ आकर्पुनि त्यांचिं चित्तें : प्रतिबंधातें तया ॥ ९३॥ निवारुनि तियां प्रति : निजप्रकटता आइति ॥ संपादुनि गोपिका सती : समजाविल्या प्रश्नोत्तरें ॥ ९४ ॥ हा गुह्याकार जो काहिं : तो श्रीशुकेंद्रें सकळहि ॥ वर्णिला या द्वात्रिंशाध्याई : परीक्षिति रायाप्रति ॥९५॥ ऐसी कथा शौनकादिकांतें : सांगीतली व्यासशिष्यें सूतें ॥ तेचिं नित्यानंदें मातें : अनुग्रहुनि स्मरविलि ॥ ९६ ॥ नाना मातें करुनि द्वारभूत : हा विलास निजचारित ॥ त्यांतें वर्णउनि माझें चित्त : शोधिलें निजकृपे करिं ॥ ९७ ॥ आतां यया निःपापा गनिं : ते : भीमातीरविलासिनी ॥ विठ्ठलमुर्ति मनोहारिणी : सदां असो प्रकट हे ॥ ९८ ॥ मिं जो विहितकर्मभ्रष्ट : त्या माझे कामादि शत्रु नष्ट ॥ तेणेंकरिं हे संसारकष्ट : त्यांतें नाशातें पावउ कृष्णमुर्ति ॥ ९९ ॥ एवं वर्णितां हे हरिकीर्ति : जगत्पवित्र जे भागवती ॥ निस्तरेन आतां मिं जन्मपंक्ति : भगवत्कृपेस्तव येथें ॥ १०० ॥ नाना करितां कृष्णकीर्त्तन : नित्यानंदि सुखावलें मन ॥ वाचा होवोनि पावन : कृतकृत्य पावलों ॥ १ ॥ आतां हे असो कथन : पुढें वर्णिजेति हरिगुण ॥ सर्वत्र असो शिवकल्याण : निर्विघ्नस्वरुप ॥ २ ॥ हें करितां कृष्णकीर्तन : श्रोतिं असावें सावधान ॥ हरिपदिं चित्त समाधान : निरंतर असावें ॥ १०३ ॥ इति श्रीभागवते महापुराणे दशमस्कंधे रासक्रीडावर्णनं (गोपीसांत्वनं) नाम द्वात्रिंशोध्याय : ॥३२॥

श्रीकृष्णार्पणमस्तु.

ॐ

श्रीमद्भागवतांतर्गत

# रासपंचाध्यायी.

---

## अध्याय १.

श्रीगणाधिपतये नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः श्रीविठ्ठलाय नमः ॥ श्रीनित्यानंदपदयुगळ : स्मरोनि चित्त करूं निर्मळ ॥ कृष्णगुण गाऊं प्रांजळ : भागवत दशमस्कंधि ॥१॥ असो श्रीकृष्णें नंदसुतें : अधिष्ठुनि रासक्रीडेतें ॥ आकर्षुनि गोपींचि चित्तें : वृंदावनाचा ठाइं ॥ २ ॥ कृष्णें क्रीडतिये वेळे : नावेक तिरोधान योजिलें ॥ तें तिरोधानचि जाले : उपकारी गोपिकांतें ॥३ ॥ कांजे त्यांसि जाली जे अंहता : तेथें संचरोनि कृष्णाचिंता ॥ त्या कृष्णाचे गुण गातां : सांडिली निशेष ॥ ४ ॥ तेणे संतोषोनि श्रीकृष्ण : देउनि निज सन्निधान ॥ करुनि प्रश्न परिहरण : समजाविल्या गोपी ॥ ५ ॥ ऐसी हे गताध्यायकथा : यावरि इये अध्याइं आतां ॥ त्या निजानुचरा वनिता : रमविल्या आपणें ॥ ६ ॥ असो अधिष्ठुनि ते मंडळि : आरंभिली वनकेळी ॥ आणि प्रवेशोनि नदिजळिं : जळक्रीडा केली ॥ ७ ॥ तें अवघें राया-लागुन : सांगते जाले व्यासनंदन ॥ तेंचि केलें अनुकथन : सुतें शौनकादिकां-प्रति ॥ ८ तो कृष्णगुणानुवाद : मिहिं प्राकृतभाषानिबंध ॥ स्मरोनि नित्यानंदपद : वदेन यथामति ॥ ९ ॥ नित्यानंदे कृपा करावी : विघ्नाचि प्रवृत्ति न व्हावी ॥ इये प्रसंगी न यावी : महंती मज लागुन ॥ १० ॥ नातरि महंतीनें हें चित्त : न व्हावें कदां विषयरत ॥ नाना न भासावें दृश्य जात : सत्यत्वें कदापि ॥ ११ ॥ मज श्रीकृष्णें वांचुन : कदा न भासो हें जन वन ॥ श्रीकृष्णिं विनटलें हें मन : मग दुःख दैन्य कैंचै ॥१२॥ जरि आंगा आली महंति : तरि तेचि दैन्याची मुर्ति ॥ मग जे काहिं

व्युत्पत्ति : ते गंधर्व नगर हुडे ॥ १३ ॥ नाना तया गर्व प्रवेशे : वोसंडिजे रमाधीशें : ॥ मग संचरोनि देहपिसें : अनेक जन्मशतें फिरवि ॥ १४ ॥ ह्मणौनि कृष्णे रमानाथें : नित्यानंदें सर्व हृदिस्थें ॥ निज चरणीं मच्चित्तातें : सुखाड करावा सर्वदा ॥ १५ ॥ मग तें चरणरजोभुक्त : तुच्छ देखोनि विषयजात ॥ सरोनि जाईल निमित्त : दंभोपक्रमाचें किं ॥ १६ ॥ नातरि मज रमानाथें : स्वीकेलें हें जाणवेल मातें ॥ जें तद्गुणवर्णना परतें : काहिं न स्मरेल जरि मज ॥ १७ ॥ यया चोखाळलिया मनिं : ते लीळाविग्रहधारिणी ॥ भीमातीरानिवासिनि : तिष्ठेल हृदइं जेव्हां ॥ १८ ॥ तेव्हां विश्वासलेनि चित्तें : वर्णितां या गुण-कीर्तीतें ॥ सर्व विघ्नाभास मातें : निर्विघ्न होईल हा ॥ १९ ॥ असो आतां हे बहु स्तुति : प्रकृत कथा वर्णु भागवति ॥ ऐसें बोलताति रायाप्रति : श्रीशुकेंद्र योगी ॥ २० ॥

### श्री शुक उवाच.

**इत्थं भगवतो गोप्यः श्रुत्वा वाचः सुपेशलाः ॥**
**जहुर्विरहजं तापं तदंगोपचिताशिषः ॥ १ ॥**

रायातें पूर्वोक्त प्रकारें : सुरसें आणि अर्थगंभीरें ॥ त्या गोपीतें प्रत्युत्तरें : बोललिं कृष्णें ॥ २१ ॥ असो पुर्वाध्यायाचा अंतिं : गोपीप्रश्नपरिहारोक्ति ॥ बोलता जाला श्रीपति : समाधानार्थ ॥ २२ ॥ तयां पवित्रा वाक्यातें : आइकोनि तें गोपीशतें ॥ कृष्णविरहसंतापातें : सांडिति जालिं ॥ २३ ॥ जेवि विद्यावृत्तीअधीन : 'ब्रम्हास्मि' हें अनुसंधान ॥ येथें वृत्ति सत्यत्वें करुन : भेदात्मक जें ॥ २४ ॥ मग तें येतां फळ दशे : वृत्ति निर्विशेषिं समरसे ॥ नातरि व्यापाराचि नाशे : ध्येयध्यानरुप ॥ २५ ॥ तो ध्येयध्यानादि समस्त : आयासुचि पावे अस्त ॥ तैसेंचि येथें हे वृत्त : वडोनि आलें ॥ २६ ॥ नावेक तिरोधानयुक्ति : रचिली व्यवधानाप्रति ॥ तेणें त्या कृष्णपरा गोपसती : चिंताक्रांत जाल्या ॥ २७ ॥ त्या चिंतनव्यापारें करुन : श्रमाचें जालें आगमन ॥ परि तेणेंचि उपशमन :

पावला सर्वही तो श्रम ॥ २८ ॥ तया श्रमाचिया निवृत्ति : प्रत्यक्ष जालि कृष्णमुर्ति ॥ किंवां कृष्णांचिया प्राप्ति : श्रमनिवृत्ति जालि ॥२९ ॥ कां जे जालियांहि सन्निधान : अपेक्षिजे कृष्णवचन ॥ त्या श्रवणे तो गोपिगण : निश्चित जाला ॥ ३० ॥ नातरि तो नंदानंदन : जगद्गुरु सर्व जीवन ॥ जालिययांते गुरुसन्निधान : तद्वाक्यश्रवण अपेक्षित ॥ ३१ ॥ कां जें तो अपरोक्ष चिन्मुर्ति : तेथें प्रमाणें न सरति ॥ लक्षणायुक्त प्रवृत्ति : कृष्णवाक्यातेंचि घडलि ॥ ३२ ॥ यालागि आईकोनि वाक्यार्था : गोपी जाल्या आधिरहिता ॥ श्रीकृष्णविरहव्यथा : सांडिली तिहिं ॥ ३३ ॥ त्या किंलक्षणा गोपकांता : तरि तदंगसंगपुर्णमनोरथा ॥ असो कृष्णांगसंग पावतां : पुर्ण कामा ज्या ॥३४॥ नाना सर्वावयवयसंपन्न : ते मूर्ति मंगळायतन ॥ देखोनि तो गोपीगण : अवाप्तमनोरथ जाहला ॥ ३५ ॥ असो देखोनि रमणमुर्ति : मनोरथांची समाप्ति ॥ पावोनि त्या गोपीसती : वाक्याधिकारिणी° जाल्या ॥ ३६ ॥ एवं त्या प्राप्तमनोरथा : प्राशूनि कृष्णमनोरथा ॥ सांडिली विरहव्यथा : श्रीकृष्णविश(ष)ईक ॥ ३७ ॥ ह्मणाल देखोनि कृष्णातें : असोनि पुर्ण मनोरथें ॥ मग तापु कैंचा त्यांतें : जो तद्वचनें सांडिला ॥ ३८ ॥ तरि पुर्णकामा होत्सात्या : तद्वियोग स्मरत होत्या ॥ तेणें विक्षिप्तचित्ता त्या : मागुत्या लक्षिल्या ॥ ३९ ॥ ह्मणोनि त्या कृष्णवचनिं : तया विक्षेपातें सांडुनि ॥ त्या विगतज्वरा भामिनी : जाल्या गोपी ॥ ४० ॥ जेवि उपजली विद्यावृत्ति : शाश्वता अविद्या निवृत्ति ॥ जाली तन्हि पुरति : वस्तुप्राप्ति नव्हेचि ॥ ४१ ॥ अहो काळत्रयाच्या ठाइं : भगवंतें वीण दुजें नाहिं ॥ तेथें प्रवृत्तिचि नसे कांहि : मां निवृत्ति कैंची काय ॥ ४२ ॥ यास्तव निवृत्तीची अस्फुर्ति : नेहटेना जवं पुरति ॥ तंवरि साक्षात् संस्थिति : भगवंति न घडे कदां ॥ ४३ ॥ येणेंचि न्यायें करुन : जालियांहिं कृष्णसन्निधान ॥ अपेक्षित जालें तद्वचन : वियोगतापशमनार्थ ॥ ४४ ॥ आतां त्या गोपी कृष्णसंगता : जान्हि जालिया अवितता ॥ तथापि देहांतपर्यंता : किंचित् व्यवहारिं होत्या ॥ ४५ ॥ उपाधि जन्हि बाध्यमान : तन्हि बाधित हें देहभान ॥

श्रीकृष्णेंसि तो गोपीजन : भेदाभासें राहिला कैसा ॥ ४६ ॥ तरि यावत् भेद समाप्ति : ते भावना न्यावया निष्कृति ॥ ऐसी काहिं विचारुनि युक्ति : रचिली कृष्णे हे ॥ ४७ ॥ अथवा गेलियां भेदभान : केवळ यावत् देहावसान ॥ भक्तांसि आपणेंचि करुन : क्रमावा काळ ॥ ४८ ॥ यालागिं योजुनि हा विलास : करुनि रासक्रीडेचेंमिष ॥ त्या गोपिसिं रमाधीश : खेळला तो ऐसा ॥ ४९ ॥

**तत्रारभत गोविंदो रासक्रीडामनुव्रतैः ॥**
**स्त्रीरत्नैरन्वितः प्रीतैरन्योन्याबद्धबाहुभिः ॥ २ ॥**

तत्र पदें ते नदी पुलिन : तेथें करुनि प्रश्नपरिहरण ॥ असतां समाहित-मन : गोपिकासमुदाय ॥ ५० ॥ असो तेथें त्या निर्विक्षिप्ता : गोपी विगत विरहव्यथा ॥ देखोनि त्यांतें रमाभर्ता : विचारुनि निजमनिं ॥ ५१ ॥ आपुला॰ टाइं अनुव्रतें : तें स्त्रीरत्नें गोपिकाशतें ॥ तिहिंसिं रासक्रीडेतें : आरंभिता जाला कृष्ण ॥ ५२ ॥ त्यां गोपिकांचें विशेषण : केलें जें सर्व स्त्रीरत्न ॥ कां जें साधारण जो स्त्रीजन : तो मूढ स्वभाव ॥ ५३ ॥ त्यां-माजि हें गोपिकाशतें : सांडुनि निजभावातें ॥ जाणोनि कामोपशमातें : श्री कृष्णिंच रतलिं ॥५४॥ कां जें कामानळ पीडितां : भगवंतुचि येक रक्षिता ॥ अन्यथा हे कामाग्नि व्यथा : कोण्हाचेनि शमेना ॥५५॥ येका श्रीकृष्णा वांचुन : या कामशमाचें साधन ॥ विषयांतरातें सेउन : काम वृद्धीतेंचि पावतसे ॥ ५६ ॥ जेवि घृताचिया आहुती : अग्नीची इच्छावी उपशांति ॥ तेवि विषयांचिया प्राप्ति : निःकामता इच्छावी ॥ ५७ ॥॰ ह्मणोनि त्या कृष्णरता रामा : मनुष्यांमाजि उत्तमा ॥ सदां असावया तृप्त कामा : शरण आल्या येथें ॥ ५८ ॥ या कारणें तिहिंसिं श्रीकृष्ण : जाला क्रीडापरायण ॥ ऐसें बोलिलें तें राया जाण : युक्तचि योजलें ॥ ५९ ॥ असो स्त्रीरत्न संज्ञें करुनि : बोलिल्या शुद्धाधिकारिणी ॥ याचि हेतु त्या प्रियचारिणी : कृष्णप्रिया ॥ ६० ॥ नाना सौंदर्याधिक्यें करुनि : प्रिया त्या कृष्णा लागुनि ॥ तरि कायेरमेहुनि : त्या सुंदरा होत्या ॥ ६१ ॥ सर्व सौंदर्यभुषण : सकळ सौष्ठव्याचें

सदन ॥ ते रमादेवी आपण : शरण आलि भगवंता ॥ ६२ ॥ परि तिजकडे जगदीश : करीचिना अवलोकलेश ॥ असो अळुमाळ तीस : पाहेचिना जो ॥ ६३ ॥ तेथें त्या राणटा स्त्रीजाति : त्यांचें सौंदर्य वाणावें किति ॥ काइतो षड्गुणसंत्ति : स्त्रीलंपट जाला ॥ ६४ ॥ तस्मात् त्या व्रजवासिनि : भक्तामाजि शिरोमणि ॥ सर्वस्वातें तिहिं सांडुनि : श्रीकृष्ण साधिला ॥ ६५ ॥ तेणेंचि इये लोकि त्यातें : स्त्रीरत्नत्व योजले निरुतें ॥ आणि कृष्णासहि त्यां परतें : प्रिय नसे काहिं ॥ ६६ ॥ ह्मणोनि ते गोपिकाशत : श्रीकृष्णाचे परम आप्त ॥ तेणेंसि तो यशोदासुत : क्रीडेसि प्रवर्तला ॥६७॥ आतां तो स्त्रीरत्नजन : श्रीकृष्णजितें आवरुण(न) ॥ तेथें राहिला तें किलक्षण : तेंहिं आइका ॥ ६८ ॥ तारि त्या सर्व गोपी येकसरें : चित्तें असोनि तदाकारें ॥ बाहु धरुनि परस्परें : मंडळाकार जाल्या ॥ ६९ ॥ नाना दाउनि बाहुबंध : तिहिं तोडोनि वृत्तिछेद ॥ आपणेंसि श्रीकृष्णनिभेद : अंतस्थ योजिला ॥ ७० ॥ कदाचित् खंडेल वृत्ति : तरि अंतरेल कृष्णमुर्ति ॥ इया हेतु त्या व्रजसती : बद्धबाहु जालिया ॥ ७१ ॥ कां जें एकदां स्वस्थें चित्तें : नव्हतिं ह्मणोनि आमुतें ॥ वंचिलें आतां कोण पां यातें : विसंबेल जिवें प्राणें ॥ ७२ ॥ या हेतु त्या सर्वा प्रमदा : परस्परें बाहुबद्धा ॥ असोनि श्रीकृष्णा गोविंदा : राहिलिया वेढुनि गोपी ॥ ७३ ॥ एवं तो नंदानंद गोविंद : तिया गोपीहस्तिं निबद्ध ॥ आदरिता जाला स्वच्छंद : रासक्रीडेतें राया ॥ ७४ ॥ ते क्रीडा ह्मणाल काइ : तरि बहु नर्तकी येकेठाइं ॥ मेळउनि मांडिजे जो काहिं : नृत्यसमारंभु तो ॥ ७५ ॥ ऐसिये रासक्रीडेतें : आरंभिल जे नंदसुतें ॥ तें सविस्तरें निवेदजेत : तुजला आइक राया ॥ ७६ ॥

**रासोत्सवः संप्रवृत्तो गोपीमंडलमंडितः ॥**
**योगेश्वरेण कृष्णेन तासां मध्ये द्वयोर्द्वयोः ॥**
**प्रविष्टेन गृहीतानां कंठे स्वनिकटं स्त्रियः ॥ ३ ॥**

यं मन्यैरन्नभस्तावद्विमानशतसंकुलम्
दिवौकसां सदाराणामौत्सुक्यापहृतात्मनाम् ॥ ४ ॥

तो रासोत्सव पुर्वोक्त : जो गोपीमंडळमंडित ॥ त्या प्रमदांसि आवृत : जेथें क्रीडला कृष्ण ॥ ७७ ॥ तयां सर्वांचें आधिष्ठान : जेणें तो रास शोभायमान ॥ तया कृष्णाजि वांचुन : अर्थता काहिं नसे ॥ ७८ ॥ ह्मणोनि सूचिलें येथें : जें श्रीकृष्णें कमळाकांतें ॥ त्या यशोदा नंदसुतें : प्रवर्तविला रास ॥ ७९ ॥ निजशोभा जे सनातन : तिया शोभा शोभउन ॥ निज प्रवेशें करुन : प्रकटिला उत्सव ॥८०॥ तो जो प्रवेश वर्णिला : तो प्रत्यक्षही प्रकट केला ॥ तेथें गोपीसमुह मिळाला : बद्धमंडळाकृति ॥ ८१ ॥ तियां दोंदोवीं माझारि : एकलाचि नटधारि ॥ प्रतियुग्मि तो मुरारि : तिष्ठला तेथें ॥ ८२ ॥ आतां त्यां दोवींदोवि मध्यें : तिष्ठोनि सश्चिदानंदें ॥ काय केलें तरि विनोदें : कंठिं धरिलें तियांतें ॥ ८३ ॥ नाना तेणें उभय हस्तें : दोविंचा गळग्रहणातें ॥ संपादुनि आपणयांतें : निकट केलें त्यांसि ॥ ८४ ॥ एवं इये प्रक्रिये करुन : त्या रासोत्सविं प्रवेशोन ॥ तो गोपीमंडळमंडन : शोभविता जाला उत्सवातें ॥ ८५ ॥ आतां जरि ह्मणाल काहिं : जें तो येकुचि सर्वां ठाई ॥ कैसा तिष्ठला तरि नाहिं : श्रीकृष्णि आश्चर्य हें ॥ ८६ ॥ प्रस्तुत तो नंदकुमार : परि योगेश्वरांचा ईश्वर ॥ जो एकलाचि जगदाकार : न होउनि जाला ॥ ८७ ॥ नाना अविष्ठुनि मायेतें : आपुला रूपिं जगातें ॥ दाउनि स्वप्रवेशें वृद्धीतें : पाववितें येणें हें जग ॥ ८८ ॥ या विशेषाकरिं पाहिं : एकरसता हालवली नाहिं ॥ किंबहुना त्याचा ठाइं : बुद्धिविलासुचि नसे ॥८९॥ हे जे काहिं नाना भाव : ते ज्याचिये मायेचा प्रभाव ॥ येथें हा कोण नवलाव : जे जे प्रतियुग्मि असणे ॥९०॥ असो जोडोनि साधनसंपत्ति : जेथें ठेउनि चित्तवृत्ति ॥ योगी योगातें साधिति : अनेक जन्मार्जितें ॥ ९१ ॥ ऐशा योगाचा जो ईश्वर : तोचि स्वता नंदकुमार ॥ तेणे आरंभिला रासप्रकार : प्रवेशोनि तेथें ॥ ९२ ॥ असो जयाचिया किं सत्ता : योगी उसंतिती योग-

पंथा ॥ तोचि योगेश्वर हा स्वाता : नंदानंदन ॥ ९३ ॥ जयातें त्या गोपि एकांतिं : एकेचि काळिं समस्ति ॥ जाणती जें हा निकटवर्ति : आपणा तेंचि असे ॥ ९४ ॥ असो अविधिया कृष्णातें : तिया आपुलालिया मतें ॥ आपआपणा परतें : देखत्या नाहिं जाल्या ॥ ९५ ॥ एवं येणें मिषें करुन : त्यां स्त्रियांचें परिछिन्न ज्ञान ॥ तोडोनि निज संनिधान : दिधलें जें काहिं ॥ ९६ ॥ त्या सांनिध्याचि उपस्थिति : वेगळाली सूचिली निगुति ॥ जेवि जीवन्मुक्त भोगिति : स्वानुभवातें ॥ ९७ ॥ किंवा स्वप्राप्ती ही वरौति : न मोडोनि ऐक्यात्मस्थिति ॥ प्रति गोपिकांचिया भक्ति : सार्थका केल्या ॥ ९८ ॥ असो कोणेही स्थितीचा ठाइं : प्राप्तीसि खंडना नाहिं ॥ या लागि सांनिध्याहुनि काहिं : भजनमार्ग विशेष ॥ ९९ ॥ आतां ऐसा उक्त रीति : तो रास आणिला आकृति ॥ तवं विमानपंक्तिशतिं : व्यापिलें आकाश ॥ १०० ॥ विमानें कोणांचिं ह्मणासि : तारिं दिवौकस जे स्वर्गवासि ॥ जाणोनि रासोत्सवासि : ते सहदार आले नभिं ॥ १ ॥ असो विमानारूढ असोन : स्वस्त्रियां सह वर्तमान ॥ आकाशीं आले देवजन : रासोत्सवदर्शनातें ॥ २ ॥ एवं जाणोनि रासोत्सवातें : पावोनि औत्सुक्यातें ॥ सपत्निक देविं नभातें : व्यापिलें आपुले विमनिं ॥ ३ ॥

**ततो दुंदुभयो नेदुर्निपेतुः पुष्पवृष्टयः ।**
**जगुर्गंधर्वपतयः सस्त्रीकास्तद्यशोमलम् ॥ ५ ॥**

मग रास भरोनि चित्तिं : आकाशगतविमानस्थि ॥ सदारदेविं तो रमापति : पुजिला निजवैभवें ॥ ४ ॥ हर्षें दुंदुभि वाजविलें : त्रैलोक्य सनादित केलें ॥ आणि आकाशिहुनि प्रेरिलें : पुष्पराशि अनेक ॥ ५ ॥ असो दिव्य सुमनमाळा : वाइल्या कृष्णाचिया गळां ॥ आणि पुष्पपुंज विखारिला : रासमंडळिं त्या ॥ ६ ॥ आणि स्त्रियांसहित तेथें : गन्धर्वपति आले होते ॥ तेही निर्मळ कृष्णयशातें : गाते जाले बहु आनंदें ॥ ७ ॥ असो गन्धर्विणींतें घेउन : आले होते गंधर्वगण ॥ तिहिं केलें बहु गायन : निर्मळा कृष्णयशाचें तेथें ॥ ८ ॥ नाना गोपींचा सत्वृत्ती : तिहिं आकार्षिली सुरपांक्ति ॥

तेचि तेथें जाली व्यापिती : गोपी हृद्गगनातें ॥ ९ ॥ तिहिं ते हृदयवर्तिनी : योगमाया विलासिनी ॥ पूजिली देवीं मुक्तसुमनिं : सच्चिदानन्दनमुर्ति ॥१०॥ असो सदार गंधर्वेश : श्रीकृष्णाचें निर्मळ येश ॥ देववाद्योसि ससंतोष : वर्णिते जाले गीत गातां ॥ ११ ॥

**वलयानां नूपुराणां किंकिणानां च योषिताम् ॥**
**सप्रियाणामभूच्छब्दस्तुमुलो रासमण्डले ॥ ६ ॥**
**तत्रातिशुशुभे ताभिर्भगवान्देवकीसुतः ॥**
**मध्ये मणीनां हैमानां महामरकतो यथा ॥ ७ ॥**

यावरि त्या व्रजयोषिता : रासोत्सवभारिताचित्ता ॥ पावोनि श्रीकृष्णाकारता : देहादीकातें विसरल्या ॥ १२ ॥ त्या कृष्णपरायणा : सांडोनि देहादि भावना ॥ जाल्या प्रेमाप्लुतमना : त्या रासमंडळाचा ठाइं ॥ १३ ॥ पुरःसरोनि कृष्णजीतें : करितां परमनृत्यातें ॥ वलय पदें कंकणातें : लागत असतां परस्परें तें ॥ १४ ॥ कंकणें चलनातें पावोनि : उमटले सुस्वर ध्वनिं ॥ आणि नुपुरें जें चरणिं : तेंहिं वाजलिं अति मधुरें ॥ १५ ॥ कांची पदें कटिमेखळा : तेथें क्षुद्र घंटिका सकळा ॥ त्या किंकिणी हिं नृत्य-वेळा : वाजत्या जालिया ॥ १६ ॥ एवं वलयें नूपुरें किंकिणी : त्यांचे जे जाले कलध्वनि ॥ ते अवघे येकवाटुनि : तुमुळ नाद जाला ॥ १७ ॥ नाना त्या कृष्णमया सती : देहादीकिं नसोनि स्मृति ॥ परि तिहिं त्या शब्दितिं : स्तविला श्रीकृष्ण ॥ १८ ॥ नादस्तोत्रें गोपीसंगगुणें ॥ तें जाले कृष्णपरा-यणें ॥ तिहिं केलिं गुणगायनें : रासरंगिं कृष्णाचिं ॥ १९ ॥ किंवा त्या कृष्णास्था जाल्या सती : तेणें तया भूषणाकृति ॥ बंदीजन गुण गाति : श्रीकृष्णजीचे ॥ २० ॥ अथवा तो नव्हे निनाद : नेणों जाला उपनिषत् शब्द ॥ तेणें स्तविला गोविंद : नन्दानन्दन ॥ २१ ॥ ह्मणोनि तो देवकी-सुत : साक्षात् श्रीभगवन्त ॥ शोभला गोपिकांसहित : रासरंगाचा ठाईं ॥ २२ ॥ देवकीसुतत्वें येथें : निवारिलें प्राकृतत्वातें ॥ भगवन्त पदें कृष्णातें : उपनिषदें प्रतिपादिति ॥ २३ ॥ असोनि तो उपाधिशुन्य : सकळ शोभेचें

सदन ॥ आपुले शोभे शोभउन : त्या गोपिकासमुदायातें ॥ २४ ॥ हा रास आणुनि रुपासि : आपण शोभला विशेषि ॥ रासरंगें स्वयें तिहिंसि : अखण्डता दाविलि ॥ २५ ॥ यालागि सप्रिय गोपीजन : आणि गोपीसह श्रीकृष्ण ॥ वर्णिला येणें करुन : शोभला रासरंगु ॥ २६ ॥ आतां गोपीसहवर्तमान : कैसा शोभला श्रीकृष्ण ॥ काइ तो गोपिकामय आपण : असता जाला ॥ २७ ॥ तरि येणें कमळानाथें : आपुलिया लीळानुपथें ॥ शोभिजेतें जालें स्वता येथें : बहुंताप्रकारें ॥२८॥ आपुला महिमा जो कांहिं : तो सर्वथा नुलंघने(णे) नाहिं ॥ सर्व होउनि सर्वा टाईं : निज महत्वें असे ॥ २९ ॥ येथें नसोनि परिछिन्न : सर्वाकार नव्हे आपण ॥ तो या गोपी मंडळातें व्यापुन : भिन्न असे ॥ ३० ॥ ऐसी अनुभवाचि खुण : ते दृष्टांतें करिं जाण ॥ जेवि सुवर्णाचे मणिगण : माळेचा टाईं ॥ ३१ ॥ तया हेममणी मध्यस्थ : जैसा शोभे महा मकरत ॥ तेवि तो देवकीसुत : गोपी मधें शोभे ॥ ३२ ॥ एवं येणें दृष्टांते करुन : दाविली असंगत्वाची खुण ॥ शोभिचाहि विशेष गुण : सूचिला ऐसा ॥३३॥ त्या गौरवर्णा हेमस्थानि : कृष्ण साममकरतमणि जेवि रत्न शोभे सुवर्णि : तैसा कृष्णगोपीसंयोगु ॥ ३४ ॥ सांडुनि देहाभिमान : तो कृष्णमय गोपी-जन ॥ परि निजरुपासि विलक्षण : नाहीं जाला कृष्ण ॥ ३५ ॥ जेवि विगलिताभिमान : जे कोण्ही जीवन्मुक्त जन ॥ ते देहानुसंधानशुन्य : ब्रह्मयाचि जाले ॥ ३६ ॥ परि निर्विशेष जें काहिं : ते जीवन्मुक्ताकार नाहिं ॥ ब्रह्म निरुपम काळत्रइं : सच्चिदानंदस्वरुप ॥ ३७ ॥ तेंचि हे कृष्णारुप ब्रह्म : जेणें क्षोभला राससंभ्रम ॥ ते न संडोनि निज वर्म : निर्विशेषेंचि राहिलें ॥ ३८ ॥ असो येथेंचि हा प्रस्तुत : एकलाचि जो नंदसुत ॥ अनेकां गोपीं समवेत : वेगळा रमता जाला ॥ ३९ ॥ ऐसे जे कांहिं बोलिलें : तें येथें विरुद्ध योजलें ॥ कां जें एक कृष्णरूप वर्णिलें : गोपी मंडळामाजि ॥ ४० ॥ तरि येथें जें एक वचन : तें दोंही प्रकारें प्रमाण ॥ कां जें सर्वगत हा श्रीकृष्ण : नाना भासेंहिं येकला ॥ ४१ ॥

प्रति गोपीसि कृष्णप्राप्ति : तेथेंहि नाहिं भिन्न रीति ॥ परस्परें कृष्ण संगति : जाणितली नसे कोण्ही ॥ ४२ ॥ जे जे कृष्णमय जाली : ते ते चि भेदातें विसरलि ॥ एकाकी चि अनुभविली : श्रीकृष्णमुर्ति तियेनें हे ॥ ४३ ॥ असो आपुलालिया मतें : येकल्या कृष्णजितें ॥ जाणितलें मग तियेतें : स्फुरेचिना काहिं अन्येत्र ॥ ४४ ॥ एवं एकत्व न संडोनि : सर्वत्र वर्ते जनि वनिं ॥ येणें न्यायें गोपिका कृष्णि : रमल्या एकत्र भावें ॥ ४५ ॥ सा गोपी सहव-र्तमान : शोभला तो नंदानंदन ॥ आतां कैसा तो गोपिजन : कृष्णेसि शोभता जाला ॥ ४६ ॥

**पादन्यासैर्भुजविधुतिभि : सस्मितैर्भ्रूविलासै-**
**र्भज्यन्मध्यैश्चलकुचपटैः कुंडलैर्गंडलोलैः ।**
**स्विद्यन्मुख्यः कबररशनाग्रंथयः कृष्णवध्वो**
**गायंत्यस्तं तडित इव ता मेघचक्रेण रेजुः ॥ ८ ॥**

श्रीकृष्णावांचुनि कांहिं : ज्यांसि कोठेंहि आवडि नाहिं ॥ निरंतरहि कृष्ण पाइं : मानसे ज्यांचि ॥ ४७ ॥ यालागि कृष्णवधुगण : त्या गोपिकांचे विशे-षण ॥ पावोनि कृष्णसंन्निधान : या रासप्रसंगें ॥ ४८ ॥ त्या शोभत्या जाल्या जें काहिं : राया वर्णावें तें किती काइ ॥ तैसा आणिक काहिं नाहिं : उपमाचि येथें ॥४९॥ तथापि काहिं सलक्षण : उपमेसहवर्तमान ॥ तें करि-जेतें निवेदन : आइकावें श्रोतिं ॥ ५० ॥ ह्मणाल त्या कोणे लक्षणिं : शोभत्या जाल्या कामिनी ॥ तरि कृष्णक्रीडास्थानि : त्या नृत्य करितां ॥ ५१ ॥ पादचलनादिकें करुन : मुखिं आले स्वेदकण ॥ तो स्वेदमुखी गोपीगण : विरजला ॥ ५२ ॥ त्या धर्माचि निमित्यें : न त्याविद्येचेनि पंथें ॥ नृत्य करितां तेथें : चळली हातपाये ॥ ५३ ॥ तेणेंचि अङ्गें करुन : करितां भावदर्शन ॥ मुख नेत्र हस्त चरण : आंग मोडिती इतस्तता ॥ ५४ ॥ संतो-षावा वैकुंठराव : ह्मणोनि दाविती हावभाव ॥ अत्यन्त रसाविर्भाव : वोडवे ज्या प्रकारें ॥ ५५ ॥ त्या नृत्यविद्यानिपुणा : कृष्णसंतोषपरा-यणा ॥ असोनि सस्मितवदना : भ्रुकुटीस्फुरणें ॥ ५६ ॥ असो

संतोषावा रमेश : ह्मणोनि दाविती विलास ॥ जेणे हा सुरस रास : वोडवे अतिशयें ॥ ५७ ॥ त्या नृत्यांगत्वें करुन : दाविलें भ्रुकुटीचळण ॥ तेथें सस्मीत गोपीजन : सघर्म मुखही शोभला ॥ ५० ॥ तो दावितां नृत्यविलास : सुक्ष्म जे त्यांचे मध्यदेश ॥ त्यातें पहातां सुरेश: गंधर्वगणंहि संतोशले ॥ ५९ ॥ असो त्या निमित्तें करुन : कटीभाग पावले चळण ॥ तेहि नावेक कारण : स्वेदाविर्भवासि जालें ॥ ६० ॥ तोचि समई सकळ : त्यांचे कुचहि जाले चंचळ ॥ कां जे तेथें प्रवेशावे तत्काळ : निजप्रिये श्रीकृष्णें ॥ ६१ ॥ असो त्या भाग्याच्या अंगना : पावोनि कृष्ण संनिधाना ॥ गोपी विगताभिमाना : विकळावयवा जाल्या ॥ ६२ ॥ प्रेमोद्रेकाचे निमित्तें : आदरिलें जें काहिं नृत्यें ॥ ते नंदानंदन हृदिस्थे : कळारुपासि आणिलि ॥ ६३ ॥ नाचतां फिरातियेवेळे : स्तनजघंन नेत्र स्फुरले ॥ वस्त्रेहि जालिं शिथिलें ॥ नेणतीचि काहिं ॥ ६४ ॥ असो आंगि भरोनि कृष्णरंग : चंचळ जालें सर्वांग ॥ वोडवला मध्य भंग : कुचकुंभहि स्फुरले ॥ ६५ ॥ तेणेंचि अंगभ्रमणें : इतस्तता गेलिं वसनें ॥ चित्तें हरिलिं नंदानंदनें : विसरालिया देहभावातें ॥ ६६ ॥ त्यां कुचपटांतें सांवारितां : तेही श्रम जाले तत्वता ॥ तेणे घर्म आले इतस्ता : मुखावरि सर्वांचा ॥६७॥ आणि त्यांचियां गंडप्रांतिं : कुंडलें हिं स्फुरत होतिं ॥ तेणें चळकुंडलगंडा सती : शोभत्या जालिया ॥ ६८ ॥ नाना संतोशाचेनि बळें : ते कुंडलें जालि विलोलें ॥ तेणेंहि कपोळ व्यापिलें : घर्मंकारें गोपिकांचे ॥ ६९ ॥ एवं तें तरुणींचि शतें : करित असतां नृत्यातें ॥ सर्वांग चलनानिमित्तें : स्वेदयुक्त मुखें जाहलिं ॥ ७० ॥ किंवा तें रुप चित्तिं भरलें : तेणें सत्वोद्रेक कोंदलें ॥ तें निवोनि स्वेदरूप जालें : उवरलिं तन्मुखें ॥ ७१ ॥ त्या किंविशेशणा सती : तरि कबररशनाअग्रंथि ॥ ह्मणिजे एकत्र केशपंक्ति :माथां बांधिले बुचंड ॥७२॥ त्यांचे सुटोनि सर्व ग्रंथि : विखरल्या केशपंक्ति ॥ आणि कटिसुत्रें जें होति : तेहिं मुक्तबंधनें जालें ॥ ७३ ॥ ह्मणोनि कबररशना : अग्रंथि बोलिल्या अंगना ॥ नाना पावोनि श्रीकृष्णा : बंधमुक्त जाल्या ॥७४॥

त्या असोनि नृत्यपरायणा : करित्या जाल्या गुणगायना ।। चित्तिं भरोनि यदुराणा : सकळा युवती ।।७५।। कृष्णगुण गातिये वेळे : प्रेमाचें भरित आलें ।। तेणे देहभाव विकळ जाले : सुटल्या ग्रंथि ।। ७६ ।। एवं त्या मुक्तबंधना : अग्रंथि कबरशाना ।। गात हों‍त्साल्या नृत्यमाना : शोभलिया रासरंगि ।। ७७ ।। पारि त्यासि शोभा जे काहिं : स्वतंत्रें जालि नाहिं ।। जेवि मेघचक्राचा ठाइं : वीजा झळकति ।। ७८ ।। तेवि तो घनश्याममुर्ति : तदाधारें त्या गोपी सती ।। विद्युत्स्थानि विराजती : शुद्ध सत्वाथिल्या ।। ७९ ।। नाना तो तरुणीजन : बाधितां भासे भिन्न भिन्न ।। भासतांहि असाधरण : कृष्णभक्तिमहिमा ।। ८० ।। एवं एकपणासि भंगु नाहिं : आणि प्रति गोपिचा ठाइं ।। एकनिष्ठत्वेंहिं पाही : बहुंधा जाला ।। ८१ पारि बहुंत्व जे भासलें : तें कृष्णि नाहिं उपतिष्ठलें ।। सकळ मेघ मिळोनि यकले : मेघचक्र जैसे ।। ८२ ।। तैशा विविधा त्या आकृति : पारि येकाचि कृष्णमुर्ति ।। तया मेघःशामिं त्या युवती : सौदामिनी नेणों ।। ८३ ।। किंग कृष्णाख्य चिद्गगनि : चिच्छक्ति अभ्रायितिनि ।। तेथें चित् द्युति सौदामिनी : शोभल्या गोपी ।। ८४ ।।असो श्रीकृष्ण प्रीत्यर्थ : तिहिं संपादिलें नृत्य ।। आणि गीतकळा यथार्थ : निवेदिली श्रीकृष्णजीतें ।। ८५ ।। तया गीताचें लक्षण : आइक राया सावधान ।। ज्या गायनें प्रेममुर्ति कृष्ण : संतोशातें पावला तो ।।८६।।

**उच्चैर्जगुर्नृत्यमाना रक्तकंठ्यो रतिप्रियाः ।।**
**कृष्णाभिमर्शमुदिता यद्गीतेनेदमावृतम् ।। ९ ।।**

त्या करित हों‍त्सात्या नृत्यातें : उच्चमाने गाइलिं गीतें ।। तिहिं आवरुनि विश्रांतीतें : प्रेमास्पदें जालिं ।। ८७ ।। असो त्या गोपी कृष्णमना : ज्या यथोक्त नृत्यमाना ।। गात्या जाल्या उच्चमाना : अनेका प्रकारें ।। ८८ ।। त्या उच्चस्वरें करुन : दुमदुमिलें भूमिगगन ।। विश्व हि गेलें हारपोन : कृष्णानन्दमय जालें ।। ८९ ।। त्या तरुणी किंविशिष्टा : तारि रागोद्गारिं रंजितकंठा ।। अतिप्रिया वैकुंठपिठा : श्रीकृष्णातें ।। ९० ।। अथवा त्या गोपजाया : कृष्णीं बहुं रतिप्रिया ।। ह्मणीजे इच्छिती भोगावया : वारंवार कृष्णातें

॥ ९१ ॥ असो करितां रागोद्वार : ते कंठ जाले रागाकार ॥ नाना तिहिं आलापिले स्वर : ते घुमघुमिले कंठि ॥ ९१ ॥ नाना स्वर जे उल्लेखिले : ते आधिं कंठि पक्क जाले ॥ मग त्या गांभिर्यें निवाले : बहि: प्रदेशीं ॥९३॥ त्या कळेतें प्रकटउन : तिहिं पूजिला श्रीकृष्ण ॥ मग कृष्णें गोपीतें संतोषान : अभिमर्शिलें स्वहस्तें ॥ ९४ ॥ जेणें त्या कृष्णाभिमर्शिता : संजादिल्या अति मुदिता ॥ जें जाल्या त्या हर्षिता : विकसितवदना ॥ ९५ ॥ नाना स्वरांचें मिश केलें : परि कृष्णातें कंठिं धारिलें ॥ तेणें माधुर्यासही आलें : माधुर्ये येथें ॥ ९६ ॥ ह्मणोनि त्या गीताविशिष्टा : कृष्णप्रेमारंजितकंठा ॥ संभोगप्रियी वैकुंठा : आवडल्या त्या ॥ ९७ ॥ मग त्या आवडीचेनि भरें : कृष्णें यशोदाकुमरें ॥ कुरवाळुनि निजकरें : परम संतोषातें पावविल्या ॥ ९८ ॥ तेणें संतोषें त्या नृत्यमाना : गात होत्साल्या अंगन ॥ तया गायनें त्रिभुवना : व्यापीलें सर्वत्र राया ॥ ९९ ॥

**काचित्समं मुकुंदेन स्वारजातीविमिश्रिता : ।**
**उन्निन्ये पूजिता तेन प्रीयता साधुसाध्विति :**
**तदेव ध्रुवमुन्निन्ये तस्यै मानं च बह्वदात् ॥ १० ॥**

त्यां माजि कोण्ही येक वनिता : श्रीकृष्णसंगें गीत गातां ॥ असो मुकुंद जो मुक्तिदाता : प्रत्यक्ष ब्रह्म ॥ २०० ॥ त्या मुकुंदेसहवर्तमान : तेथेंचि टेउनियां मन ॥ करित असतां उन्नयन : षट्ज्यादि स्वर-ज्यातिभेदाचें ॥ १ ॥ ते षड्जादि स्वर भेदें : उच्चस्वरें गाता ताल छंदें ॥ कृष्णगायनेंसिं अभेदें : नाना राग उच्चारीती जाली ॥ २ ॥ ऐसी जाणोनि निपुणता : तेणें संतोषोनि रमाभर्ता ॥ तियतें स्वरानुकारु करितां : भली भली ह्मणतिलें ॥ ३ ॥ तो स्वरोद्घोष कौलक्षण : जेणें जेणें मानवला श्रीकृष्ण ॥ तारि कृष्णें सहवर्तमान : जर्‍हि गायिलें तिया ॥ ४ ॥ तर्‍हि तियेचें तें उद्घोषित : कृष्णस्वरेंसिं आमिश्रित ॥ ह्मणजे कृष्णगायनेंसिं निवडत : अंतराळासि गेले ॥ ५ ॥ असो समागमें आलाप केले :

तऱ्हिं त्या गोपीचे स्वर निवडले ॥ उच्चमानें अतिक्रमिले : कृष्णस्वरातें तिहिं ॥६॥ राया तो सर्व कळावंत : जगद्गुरु जगन्नाथ ॥ परि त्यां स्वभक्तांतें मान देत : तयाचेनि मनःछंदें॥७॥ आपुले स्वरातें आवरुन : त्या गोपिकेचें गायन ॥ उच्चतेसि पाउनः अत्यंय शोभविलें श्रीकृष्णें ॥ ८ ॥ जेवि परीक्षेतें अनुसरोन : परमासिद्धां पासुन ॥ शिष्य निजयुक्तिबळें करी न्युन : आचार्यपक्षातें ॥९॥ मग तियाचि आचार्योपास्ति : शिष्य जो जाला सुमति ॥ त्या शिष्याचा उपपत्ती : विशेषें विराजति ॥ १० ॥ असो आचार्यकृपामंडित : शिष्यें जो केला सिद्धांत ॥ तेणें आचार्यनिगदित : शोभेतें पावतें ॥ ११ ॥ तैसीचि तेहीं गोपांगना : करिती जाली स्वरगर्जना ॥ कृष्णप्रेमाप्लुतमना : तद्गीतानुसर गातां ॥ १२ ॥ तऱ्हिं कृष्णप्रेमाबळें : तिया जें स्वरमान नेलें ॥ तें नावेकसें आगळें जालें : श्रीकृष्णस्वरमानाहुनि ॥ १३ ॥ असो तेणें भक्तवेळायितें : सदां ऐसेंचि वर्तिजेतें ॥ रथीत्व देऊनि अर्जुनातें : सारथ्य केलें आपणें ॥ १४ ॥ राजदुतागमनकाळें : उद्धवशीक्षेतें अंगीकारिलें ॥ आणि गोपाळाचेनि बोलें : न केलें काई पां ॥ १५ ॥ असो स्वताहा श्रीकृष्ण : सर्व कळांचें उत्पत्तिस्थान ॥ सकळ मंगळायतन : सच्चिदानंदमूर्ति जो ॥ १६ ॥ आणि श्रीकृष्णाचा ठाइं : बुद्धिविलासु हा जो काहिं ॥ तो अर्थता जेथें नाहिं : कोण्हेही काळें किंचित् ॥ १७ ॥ हा भज्यभजनप्रकार : बोध्यबोधकव्यवहार ॥ प्रिय आणि तो प्रियकर : ऐसें विलासलें बहु ॥ १८ ॥ हें याचें आचिंत्य महिमान : वार्णील पां किती कवण ॥ आतां प्रकृत गुणगायन : करावें श्रीकृष्णाचें ॥ १९ ॥ वर्णुनि कृष्णगुणकीर्ति : वाचा करावी शुभवती ॥ रमवावी आपुलि मति : प्रेमगंगाकल्लोळीं ॥ २० ॥ असो हे कथाचि प्रस्तुत : निजगीतेंसिं अमिश्रित ॥ तिये गोपीचें आळापित : सुरस जालें बहुंत ॥ २१ ॥ जाणोनि सुस्वर गायकेतें : निज प्रेमप्लुतें गोपितें ॥ तेणें प्रेमाळाचेनि कांतें : कृष्णें भलें भलें ह्मणतिलें ॥ २२ ॥ आतां तियेचें तें उन्नीत : सुस्वर जें उद्घोषित ॥ तेथें तदनुसार अपेक्षित : ध्रुवाख्य जो तालविशेष ॥ २३ ॥ तया ध्रुवता-

ळाचि संपादना : त्या गीताचिमाजि केली जाणा ॥ जेणें तो यदुराणा : मानवे आपणयातें ॥ २४ ॥ असो आइकोनि तें उन्नीत : तालघोष राहिले तटस्थ : परि तियातिल छंद समस्तः गीताचि माजि दाविले ॥ २५ ॥ नाना तियेचें उन्नमान : नाना नाद पावले अवसान ॥ परि स्पष्ट विचारेंचि करुण (न) : तालभेद योजिले तिया ॥ २६ ॥ असो उमटतां छंदग्राम : ताल वाजवितां अति दुर्गम ॥ परि तिया दाविलि सुगम: ताल स्वता अत्रचि ॥२७॥ एवं करितां ध्रुवगायणा (ना): तेथें तालछंदग्राममूर्छना ॥ करुनि साहित्यकल्पना : ध्रुव प्रकटिला॥२८॥ त्या ध्रुवतालातें दाविलें : तेणेंहि तें ब्रह्म सावर्ळें ॥ संतोशोनि अत्यंत मानिलें : तियें गोपिकेतें ॥ २९ ॥ अहो कृष्णाची येकि कळा : तेथें सर्वरसवृत्तिमेळा ॥ आतां ऐसा कैंचा रस उरला : जो अन्येत्र सेविजे ॥३०॥ नाना रति जाली कृष्ण पाईं: मग अन्यापेक्षा वृथा काई ॥ जरि अन्य इच्छा चि नाहिं : तरि कृष्णसुख जोडे ॥ ३१ ॥ जे पा ाे कृष्ण सुखातें : ते कां वर्तती पराकपंथे ॥ प्रवृत्तिमार्गें कैंचें तयातें : कृष्णप्रातीसंगाचें सुख ॥ ३२ ॥ हे मदनमोहन मुर्ति : सर्व कामोपशांतिकारी ॥ तेथें जडली जे चितवृत्ती : ते जरि देहादिकिं भजेल ॥ ३३ ॥ मग कृष्णभक्तीची वार्त्ता : अनवियाचि होति वृथा ॥ कृपा न ये चि भगवंता : जन्मोनि व्यर्थ जाइजे ॥ ३४ ॥ असो प्रस्तुत येथें: त्या गोपीनें गाइलि कृष्णगीतें ॥ तेथेंचि छंदग्रासतालातें : दाविलें कौशल्य ॥ ३५ ॥ त्या गोपिकेसि नंदसुतें : सर्व कौशल्ये कळवंतें ॥ संतोषोनि त्या रमाकांतें : बहु प्रकारें सन्मानिलें ॥ ३६ ॥ ते जे सप्त स्वरप्रकारः निषाद ऋषभ गांधार ॥ षड्ज मध्यम धैवत स्वर : पंचम इत्यादि सप्त स्वर हे ॥ ३७ ॥ एवं नृत्यगीतादि करुन : श्रीकृष्णातें संतोषवुन ॥ त्या गोपी पावोनि सन्मान : काये केलें तें आइकावें ॥ ३८ ॥

**काचिद्रासपरिश्रांता पार्श्वस्थस्य गदाभृतः ॥**
**जग्राह बाहुना स्कंधं श्लथद्वलयमल्लिका ॥ ११ ॥**

त्या माजि कोन्हि येकि सती : प्रसन्न देखोनि कृष्णमुर्ति ॥ अथवा नाहि जालि जाणति : कृष्णेसिं भिन्नत्व ॥ ३९ ॥ कांजें भिन्नत्वाचें कारण :

होतां देहादि अभिमान ॥ त्या देहभावातें सांडुन : ऐक्यता पावली कृष्ण ॥ ४० ॥ यावरि प्रारब्धानुवर्ति : जे काहिं भेदाची आकृति ॥ तिनुकीचि देहस्थितिगति : उरलि दृश्याकारें ॥ ४१ ॥ ऐशा व्यवहाराच्या ठाइं : कृष्णापरतें सेव्य नाहिं ॥ ग्राह्यग्राहकता जे काहिं :ते कृष्णसेवोपकारि मात्र ॥ ४२ ॥ यास्तव बाह्यवृत्ति करुन : केलें नृत्यगीत सलक्षण ॥ प्रसंन्न होतांचि श्रीकृष्ण : अलौकिका जालि ॥ ४३ ॥ नाना नृत्यादिकें करुन : श्रम आले जे घडोन ॥ त्या श्रमेविकारि समाधान : कृष्णि पावलि तत्काळ ॥ ४४ ॥ तया समाधान तेथें : ते सरली तारतम्यांतें ॥ तथापि संस्कारें कृष्णातें : आलिंगावया गोलि ॥ ४५ ॥ असो निजबाहुकरुन : देवों गेलि आलिंगन ॥ तव अवचितें जालें ग्रहण : कृष्णस्कंधाचें ॥ ४६ ॥ ते होती जिया कृष्ण सत्ता : तो कृष्ण पाठिसिं उभा होता ॥ त्याच्या स्कंधातें ते श्रान्ता : धरिती जाली ॥ ४७ ॥ येथें पार्श्वस्थ बोलोनि कृष्ण : सूचिलें प्रत्यक्ग्रहण ॥ वृत्तीचें विश्रान्ति सदन : दाविलें प्रत्यग्रुपिं ॥ ४८ ॥ राया ह्मणसि ते सुंदरा : रत जाली नंदकुमारा ॥ तरि ते कैसि कामाचारा : प्रत्यकूत्वें भजी-नली कृष्णि ॥ ४९ ॥ तरि तो नव्हे नंदकुमार : साक्षात् विष्णु गदाधर ॥ केवळ नारायणावतार : श्रीकृष्णाकार ब्रह्ममूर्ति ॥ ५० ॥ ऐसें जाणोनि ते युवति : कृष्णि योजली पराक्स्थिति ॥ तियेची नाहीं जाली मति : जें हा नन्दकुमार कृष्ण ॥ ५१ ॥ असो ग्राम्यबुद्धी करुन : तो नहिं रतला गोपी-जन ॥ कृष्ण जाणोनि कामोपशमन : शरण आला त्यातें ॥ ५२ ॥ श्रीकृ-ष्णाचेनि सांगातें : मदन पावावया वृद्धीतें ॥ त्या नाहिं आल्या येणें मतें : शरण श्रीकृष्णातें ॥ ५३ ॥ त्या प्राकृत भावें असत्या : तरि कां कृष्णातें आवडत्या ॥ गोपी आप्ता कां होत्या : अवाप्तसर्वकामातें ॥ ५४ ॥ ह्मणोनि ते गोपी श्रांतचित्तें : पार्श्वस्था श्रीकृष्णाजितें ॥ वश जाली त्याचिया खांदाते : धरुनि निजहस्तें ॥ ५५ ॥ येथें उत्प्रेक्षा जे केलि : ते साच चि घडोनि आलि ॥ तिहिं सगुण रुपेंचि साधिली : सायोज्यता ह्मणोनि ॥ ५६ ॥ अहो अनादरुनि सगुण : साधु ह्मणती शास्त्रज्ञ ॥

तेणें पाविजे समाधान : हे काय वडे सर्वथा ॥ ५७ ॥ सेविली नाहिं रमण मूर्ति : तवं निरसेना देहाहंकृति ॥ जन्ममरणाचिया पंक्ति : निरसती ना तंवरि ॥ ५८ ॥ येणें निमित्तें ते युवती : नृत्यगीतश्रांत होंत्साती ॥ स्कंधातें जाली धरिती : पार्श्वगत श्रीकृष्णाचिया ॥ ५९ ॥ देहभावातें विसरली : तीं कैसी येथें जागवली ॥ तरि कंकणें शिथिळें जाळिं : सुटलिया मल्लिका ॥ ६० ॥ असो करितां रास नर्तन : श्रीकृष्णिंग विराले मन ॥ ते जाली गळिताभिमान : सांडिला कटाक्ष हा ॥ ६१ ॥ तेणें कंकणें श्लथें जालिं : सुटली माथाचीं पुष्पावळि ॥ जेवि युत्थाना पावुनि आली : समाधीसि वृत्ति ॥ ६२ ॥

**तत्रैकांसगतं बाहुं कृष्णस्योत्पलसौरभम् ॥**
**चन्दनालिप्तमाघ्राय हृष्टरोमा चुचुम्ब ह ॥ १२ ॥**

तवं त्यांत येकि युवती : पावोनि तांडवोपरति ॥ कृष्ण बाहुतें हुंगीत होंत्साती : चुम्बिती जाली तेथें ॥ ६३ ॥ ह्मणसी तांडव निवृत्ती : ते पावली कृष्णिंग विश्रान्ति ॥ मग बाहुचुम्बनि प्रवृत्ति : कां जाली तियेंची ॥ ६४ ॥ तरि तो बाहु निजसंगत : प्रवृत्ती अपेक्षारहित ॥ प्रमादादि विगलित : स्वरूपानुभवीं जेवि असे ॥ ६५ ॥ तेवि ते असतां नृत्यवती : कृष्णें कवळिली होती ॥ कृष्णस्पर्शसि संगति : पूर्वीव असतांहिं ॥ ६६ ॥ तया निजस्था बाहुतें : अवघ्राणोनि चुम्बिलें तेथें ॥ जेवि समाधिस्थ योगी वस्तुतें : स्वानुभवें सेविती ॥६७॥ विशेषणान्तरें करून : त्या बाहुचें आइका लक्षण ॥ तरि तो वनमाळी कृष्ण : कमळमाळायुक्त ॥ ६८ ॥ त्या कमळिं निजद्युति : कृष्णदेहिं अर्पिली होती ॥ त्या सुगंधा बहुतें युवती : हुंगोनि चुंबिती जाली ॥ ६९ ॥ नाना गोपीचित्तें प्रेमळें : कृष्णकंठिं होतिं कमळें ॥ तया सौगंध्यें वेधिलें : सर्व शरीर कृष्णाचें ॥ ७० ॥ त्या सुगंधा बाहुसेवेप्रति : पात्र जाली ते युवती ॥ येन्हविं सेव्यसेवनगति : कृष्णाचा ठाईं कैंचि ॥ ७१ ॥ असो तें जें बाहुचुंबन जाण : केलें अवघ्राण करून ॥ कां जें कृष्णांगिं विलेपण (न) ; चंदनाचें सर्वत्र ॥ ७२ ॥ तया सचंदना बाहुतें : अवघ्राणुनि

चुंबनातें ॥ करुनि ते विश्रांतीते : पावली गोपिका ॥ ७३ ॥ जेवि सदाचारें करुन : ईश्वरें भजती भक्तजन ॥ भगवंतिं असोनि शरण : बहु तरले सन्मार्गें ॥ ७४ ॥ विचारुनि सप्रंदायातें : भक्त भजती श्रीहरीतें : तेवि भक्तार्पितचंदनातें : हुंगोनि ते गोपी ॥ ७५ ॥ हृष्टरोमा होत्साती : कृष्णबाहुतें जाली चुंबिती ॥ असो अत्यंत श्रमली होती : कृष्णवियोगें ॥ ७६ ॥ आजि साधुनि कृष्णातें : निस्तरली जन्मशतकृतें ॥ वोवाळिलें आपणातें : त्या सुखा वन्हुनि ॥ ७७ ॥ एवं ते गोपिकाशतें : श्रीकृष्णावरुनि जीवितें ॥ वोवाळुनियां तयातें : आप्त जालि बहु ॥ ७८ ॥ आतां त्या आप्तत्वाचें उचित : जाणोनि तेणें त्वरित ॥ काय केलें तें प्रस्तुत : अवधारिं राया ॥७९॥

**कस्याश्चिन्नाट्यविक्षिप्तकुंडलत्विषमंडितम् ॥**
**गंडं गंडे संदधत्या अदात्तांबूलचर्वितम् ॥ १३ ॥**

राया कोण्ही येकि युवती : तांडवा पासुनि निवृत्ति ॥ पावोनियां जाली भजती : अति निकट कृष्णेसिं ॥ ८० ॥ ॥ जियेचि नाचतां दोन्हि : कुंडलें झळकालें कानी ॥ ते कुंडलप्रभा येउनि : गंडस्थळि विराजली ॥ ८१ ॥ ते कुंडलप्रभामंडित : गंडस्थळ जें प्रभान्वित ॥ असो जें तेजस्कर संमत : कृष्णगंडेसि जालें ॥ ८२ ॥ असो हे नृत्यगीतलहरी : ते कृष्णप्रेमासागरिं ॥ उठिली तेणें ते व्रजसुंदरी : अतिशयें शोभली ॥ ८३ ॥ तया प्रेमोद्रेकबळें : आंदोळलिं दोन्हीं कुंडलें ॥ तें कुंडलतेज विस्फोरलें : गल्लप्रदेशाचा ठाईं ॥ ८४ ॥ ते सतेज गंड जें काहिं : ठेविलें कृष्णगंडाचा ठाईं ॥ तें कृष्णकपोलहि पाहिं : उक्तविशेषणयुक्त चि ॥ ८५ ॥ अनुसरोनि गोपीनृत्यातें : कृष्णेंहिं नृत्य केलें होतें ॥ त्या नृत्य वेगें चलनातें : पावलिं कुंडलें तें हिं ॥ ८६ ॥ त्या कुंडलाची जे दीप्ति : ते आली गंडस्थळाप्रति ॥ नाना कुंडलप्रभा ते किंतिः कृष्णप्रभेचा पाडें ॥ ८७ ॥ या लागी कृष्णें निजकान्ति : संर्पीली कुंडलां प्रति ॥ तें कुंडलें हिं जालिं आर्पिति : ते चि प्रभा कृष्णातें ॥ ८८ ॥ तवं ते गोपी नृत्यवति : पाहों गेली तत्प्रभासंपत्ति ॥ तत्काळ तें निजविस्मृति : विसरली नृत्यातें ॥ ८९ ॥ जेवि सूर्याचिया दीप्तीं :

निवडेचिना चंद्रज्योति ॥ ना तरि चंद्रोदयीं संपत्ति : निवडेना नक्षत्रांचि ॥ ९० ॥ जेवि पाहतां कृष्णवदन : निज विलासातें विसरोन ॥ कृष्ण शोभेमाजि मिळोन : गेली ते तत्काळ ॥ ९१ ॥ जेवि चिदाभासाचेनि ह्यातें : देहगेहादि दृश्यातें ॥ चैतन्यें प्रकाशिजेतें: आपुले प्रकाशेंकरिं ॥ ९२ ॥ त्या चैतन्यें जीवत्वभूतें : देहिंच जालें शोभिजेतें ॥ मग तो जिव निज रुपातें: अवलोकितां चि ॥ ९३॥ सांडुनि तें जीवपण : निजसत्तेसि जाये मिळोन ॥ जेथें प्रकाश्यप्रकाशकभान: हारपोनि जाये सर्वहि ॥ ९४ ॥ तैसेंचि येथेंहिं काहिं : योजिलें गोपिकेसि पाहिं ॥ कृष्णगंडस्थळाचा ठाइं : निज गंडातें ठेउनियां ॥ ९५ ॥ निज शोभेचिया संपात्ति : लाजोनि ते गोपयुवती ॥ श्रीकृष्णि जाली मिळती : मिष करुनि काहिं एक ॥ ९६ ॥ असो हे गुढार्थ व्युत्पत्ति : प्रकट कथा वर्णु आइती ॥ तिया कृष्णमुखाप्रति : आणिलें आपुलें मुख ॥ ९७ ॥ अपेक्षुनि तांबूलचर्वितातें : वोडविलें निज मुखातें ॥ अपेक्षुनि महांवाक्यातें : मुमुक्षु जेवि वर्तती काहिं ॥ ९८ ॥ गुरुचिया मुखा निकट : शिष्य आणिति श्रवणपुट ॥ तेविचि येथेंहि प्रकट : योजलें त्या गोपीकेतें ॥ ९९ ॥ मग राया तेणें रमाकांतें : तांबूल जे चाविले होते ॥ ते त्या मुखनिकटे गोपीतें : देईजेते जाहले ॥ ३०० ॥ नाना तेणें मिषें करुन : त्या निजरुंछें गोपी लागुन ॥ आपुलें अधरामृतपान : करविजेतें जाले कृष्णें ॥ १ ॥ कां जें तो कृपाळुवांचा नाथ : जाणोनि तियेचा भावार्थ ॥ त्या भावासि उचितार्थ : तांबुल हि दिधले ॥ २ ॥ जेवि देखोनि शिष्यभावार्थ : सद्गुरु जे करुणावंत ॥ त्या शिष्यातें निजानुभूतार्थ : आत्मत्वें अर्पिति ॥ ३ ॥ तेवि तो रमारमण : तिये गोपिके करउन ॥ करविता जाला चर्वण : चर्विता तांबूळाचें ॥ ४ ॥

**नृत्यंती गायती काचित्कूजन्नूपुरमेखला ॥**
**पार्श्वस्थाच्युतहस्ताब्जं श्रांताधात्स्तनयोः शिवम् ॥ १४ ॥**

अन्य येकि गोपी नाचती : आणि गातही होंत्साती ॥ वर्णितां कृष्ण गुणकीर्ति ; प्रेमोत्सुका जाली ॥ ५ ॥ असो जाणोनि तन्माहिमान :

उत्सुक जालें गोपीमन ॥ जें या सुखरूपीं मिळोन : सर्व प्रकारें असावें सदां ॥ ६ ॥ यावत् उपाधिबाध : हा जो आभासिक भेद ॥ त्याचा होउनि अपवाद : तुटोनि जावो आतां सत्वर ॥ ७ ॥ ऐसी उत्सुक जाली चित्तिं : परि यावत्प्रारब्धनिवृत्ति ॥ काहिं येक भेदाची आकृति : न मोडे कदां ॥ ८ ॥ तथापि औत्सुक्यें करुन : निजपार्श्वस्थ जो श्रीकृष्ण ॥ जिये सत्तेकारें आपण : क्रीडत होती ॥९॥ त्याचा हस्ताब्जाचा ठाइं : लीलापद्म होतें जें कांहिं ॥ त्या अच्युतहस्ताब्जातें पाहीं : धरुनि स्वकरें ॥ १० ॥ निजकुचयुगाचा ठाइं : ते ठेविती जाली पाहिं ॥ नाना त्या हस्ताब्जाते हृदईं : धरिलें तिया ॥ ११ ॥ नातरि ते लीळाकमळ : श्रीकृष्णाचें कौतुहळ ॥ जेणें मिषें हे जगजाळ दाविलें निजांगिं ॥ १२ ॥ नाना त्या कमळाकृति : हे विश्वलीलांत : पाति ॥ ते लीळा दावि निज-हास्तिं : स्वकटाक्षलेश ॥ १३ ॥ असो ते लीलाविडंबन : दाविलें आपणा अधीन ॥ आणि सर्व सांडुनि शरण : आपणासि जे येति ॥१४॥ तयांप्रति हें जगजाळ : निजमायाकौतुहळ ॥ ऐसे दावावया तें कमळ : गोपीहस्तगत केलें तेणें ॥१५॥ असो कृष्णि मिळाली सती : तेणें कमळ आलें हातिं ॥ त्यातें जाली धरिती : निज हृदयाचा ठाइं ॥१६॥ त्या कमळासि कृष्णसंग : म्हणोनि केला परिष्वंग ॥ त्या आळिंगनें निजअनंग : लाजविला तिया ॥१७॥ असो ते हृदइं धरुन : उपशमीला स्वमदन ॥ तें कमळ म्हणाल किंलक्षण : तरि शिव जे सुखरुप ॥ १८ ॥ ह्मणिजे सदानन्दरूप : स्पर्श मात्रें सर्व सन्ताप ॥ नाशोनि श्रीकृष्णस्वरुप : भजतयां भक्तांतेंकारे ॥ १९ ॥ कां हें जे विशेषवृत्ति : कृष्णीं न मिळे प ती ॥ तंवरि कैंचि सुखप्राप्ति : विषयलंपटा जीवातें ॥ २० ॥ म्हणोनि ते गोपीसुजान (ण) : स्वकुचिं कमळातें धरुन ॥ स्वता श्रीकृष्णिं मिळोन : पावलि आनन्द ॥ २१ ॥ कां जें कृष्णप्राप्तीचें लक्षण : जें सन्तापाचें शमन ॥ या कारणें त्यातें आलिंगुन : फेडिला सन्ताप ॥ २२ ॥ नाना तें गोपिकाशतें : पाहोनि कृष्णवदनातें ॥ पूर्वि च तापनिवृत्तीतें : पावलिं होतिं अवधिं हिं ॥ २३ ॥ परि उत्सुकता जे काहिं :

तोचि जाली तापाचा ठाई ॥ मग कमळातें हृदई : धरुनि नाशिला सन्तापु ॥२४॥ एवं शिवरूप म्हणोन : कमळाचें केलें विशेषण ॥ त्याचें ऐसें दाविलें लक्षण: काहिं एक यथामति ॥२५॥आतां कमळ कुचिं धरिती : ते किंविशिष्टा युवति ॥ तरि नुपुरें पाईं होतिं : आणि मेखळा जे कटिसुत्र ॥ २६ ॥ तांडव कारितिये वेळे : त्या नूपुरिं गजर केले ॥ आणि मेखळासंबंधि जाले : क्षुद्रघंटिकानिनाद ॥ २७ ॥ ह्मणोनि ते व्रजबाळा : कूजन्नूपुरमेखळा ॥ प्रिया ही जाली तमाळनीळा : कुचिं पद्म धारणें ॥ २८ ॥ एवं आधिष्ठुनि रमाभर्ता : क्रीडत्या जाल्या गोपकांता ॥ त्या वर्णि पूर्वोक्ता : दोनि चारि मुख्य मुख्या ॥ २९ ॥ आतां येणें लक्षणें करुन: तो अवघा हि गोपीजन ॥ क्रीडला तें हिं वर्तमान : संक्षेपें आइक राया ॥ ३० ॥

**गोप्यो लब्ध्वाच्युतं कांतं श्रिय एकांतवल्लभम् :**
**गृहीतकंठ्यस्तद्दोर्भ्यां गायंत्यस्तं विजह्रिरे ॥ १९ ॥**

ऐशा सर्वा ही कृष्णकामिनी: भाग्याच्या व्रजवासिनी ॥ इच्छाकांतातें पावोनि : नंदानंदना कृष्णातें ॥३१॥ त्या कृष्णातें गात होंत्सात्या: रासरंगी जाल्या रमत्या ॥ श्रीकृष्णप्रेमातें भोगित्या : एकसरें यथेष्टा ॥ ३२ ॥ किंविशेषणा त्या सुंदरी : तरि कृष्णें निजबाहुकरिं ॥ तिष्ठोनि दों दोवीं माझारि: दों दों हास्तिं वेगळाल्या ॥ ३३ ॥ कंठि धारल्या होंत्सात्या : तया कांतातें गात गात्या ॥ तेणेंचि जाल्या क्रीडत्या : रासरंगा माझारि गोपी ॥ ३४ ॥ एवं भगवत्प्राप्ति ही वारि : भक्तांची वर्तती हेचि पारि ॥ भगवत्सेवनें चि नरिं : क्रमावा काळ सर्वदा ॥ ३५ ॥ निजऐक्यत्वें करुन : श्रवण मनन कीर्तन ॥ भगवंताचे चि अनुचिंतन : कारिती भगवद्भक्त ॥ ३६ ॥ राया बाधिता भासमुळ : मुक्ताचें असावें हेंचि शीळ ॥ या हेतु गोपीमंडळ: रमविलें श्रीकृष्णें ॥ ३७ ॥ नातारि येणेंचि निमित्तें : निदिध्यासाचें दृढतेतें ॥ अनुलक्षुनि गोपिकांतें : खेळविलें रंगिं ॥ ३८ अन्यथा हे बाधित भान : विक्षेपाचें चि कारण ॥ ह्मणुनि हरिगुणवर्णन : निर्विक्षिप्त असावें ॥ ३९ ॥ या चि हेतु तो गोपीजन : असोन हिं तत्संनिधान ॥

नृत्यगीतादिकिं करुन : संतोशविता जाला ॥ ४० ॥ ह्मणसी कृष्णसंगें कांता : त्या पावलिया निजार्था ॥ मग कां संनिध असतां : क्षोभकारिणी जाल्या ॥ ४१ ॥ ऐसें ह्मणसी प्रस्तुत : तरि तो साक्षात् किं अच्युत ॥ जो काळभइं विपरित : आपुले निष्ठसि नव्हे ॥ ४२ ॥ राया लोकत्रयाचा ठाइं : कृष्णें वांचुनि सत्य नाहिं ॥ आतां निज-विलासिं काइ : तो आसक्त होइल ॥ ४३ ॥ नाना हें हिं असो आतां : तो श्रीवल्लभ लोकभर्त्ता ॥ ज्यातें एकांतिं सिंधुसुता : सेवित असे निरंतर ॥ ४४ ॥ तेथें नव्हे जो आसक्त : त्यासि हें काये गोपीशत ॥ तरि भक्ति बळें जाले आप्त : तें विकारास्पद कैसें ॥ ४५ ॥ असो कृष्णाचे जे नव्हति : तेथें कामादिप्रवृत्ति ॥ आणि कृष्णातें जे स्मरति : ते निःकाम जाणावे ॥४६॥ त्यासि गोपिकांचेनि संगें : काइ क्षोभविजेल अनंगें ॥ त्यांतें भोगुनि निज रंगें : अवाप्तकाम जो ॥ ४७ ॥ एवं तें कृष्ण कामिनीशतें : गाउनिया कृष्ण गीतें ॥ कृष्णप्रेमाभरितचित्तें : क्रीडतिं जालिं कृष्णसंगें ॥ ४८ ॥ ऐसें पुर्वोक्त लक्षण : केलें रासरंगाचें वर्णन ॥ आतां प्रकारांतरें करुन : वर्णिजेतें तें चि ॥ ४९ ॥

**कर्णोत्पलालकविटंककपोलघर्म-**
**वक्त्रश्रियो वलयनूपुरघोषवाद्यैः ॥**
**गोप्यः समं भगवता ननृतुः स्वकेश-**
**स्रस्तस्रजो भ्रमरगायकरासगोष्ठ्याम् ॥ १६ ॥**

तरि आतां त्या कृष्णमनाः व्रजवासिनी गोपांगना ॥ ज्या वदनशोभासंपन्नाः तिये रास सभेचा ठाइं ॥ ५० ॥ श्रीकृष्णाचेनि सांगातें : करित्या जाल्या नृत्यातें ॥ त्या माजि सर्वांहिं कळातें : दावित होत्सात्या ॥ ५१ ॥ त्यात मुखशोभेचि निमितें : तें हिं वार्णिजेताति येथें ॥ जिया मुखशोभा रासातें ॥ आणिलि शोभा ॥ ५२ ॥ तरि त्यांचिया कर्णप्रांतिं : कमळें जे खोविलिं होतिं ॥ त्या पद्मशोभा मुखकांति : विकसली बहु ॥ ५३ ॥ तें पद्मशोभाविकासितें : सुंदरें मुखें प्रशस्तें ॥ आणि केशभुषांगें शोभिनें :

कपोळें जें मुखाचि ॥ ५४ ॥ असो त्या कुरळांचि हारि : आली गंडस्थळा वारि ॥ ते तेथें भूषणाचे परि : मिरविले कुरळ केश ॥ ५५ ॥ तें जें केश-युक्तें कपोळें : तियें मुखश्रीयेतें प्रकटिलें ॥ आणि घर्मबिंदुही आले: तयां मुखाच्या ठाईं ॥ ५६ तें जें घर्मयुक्तें वदनें : जालिं श्रियेचि सदनें ॥ जयातें देखोनि मदने : लज्जेतें पाविजेतें तत्काळ ॥५७॥ असो त्या गोपी कृष्णचित्ता : श्रीकृष्णाचे गुण गातां ॥ कृष्ण प्रेमरंगिं नाचतां : महोत्सवें भरलिया ॥५८॥ तया महोत्सवाचेनि बळें : तिये शोभेसि अंकुर आले ॥ ते अवघे उपतिष्ठले : वदनाचा ठाईं ॥५९॥ तिया वदनशोभामंडना : रासप्रसंगिं गोपललना ॥ शोभल्या कृष्णप्रेमसंपन्ना : महासंभ्रमयुक्ता ॥६०॥ आनि(णि) कां त्या व्रजवनिता : ह्मणसि किंविशेषणयुक्ता ॥ त्या रासोत्सवि नाचतां : सुटले जे केश ॥ ६१॥ त्या अलकां पासुनि सकळा : सुटलिया सुमनमाळा ॥ त्या मुक्तपुष्पकेशा अबळा : शोभलिया बहु ॥ ६२ ॥ असो कृष्णसंगातें इच्छुनि : मनोवृत्ती येकवटुनि ॥ सम्पादिली अव्यभिच्यारिणी : साधनस्वरूपा भक्ति ॥ ६३ ॥ परिच्छिन्न स्वभावें करून : जालें जें कृष्णावलम्बन ॥ तेंचि भक्तिरूप साधन : आभासनिवृत्तीचें ॥ ६४ ॥ एवं ते परिछिन्नमति : तदाकारें ते अळकग्रंथि ॥ सुटोनि त्या सुमनोवृत्ती : मिळालिया श्रीकृष्णिं ॥ ६५ ॥ ऐसेया लक्षणें करुनि: तयां मुक्तकेशा पासुनि ॥ त्या सुमनमाळा सुटोनि : श्रीकृष्णिं समर्पलिया ॥ ६६ ॥ एवं त्या केशस्रस्तस्रजा : गात होत्सात्या नंदात्मजा ॥ अविष्टुनि राससमाजा : नाचत्या जाल्या गोपी ॥ ६८ ॥ किंवा नेच्छुनि सहायातें : रास पावला उत्सवातें ॥ परि अपेक्षित जाला तेथें : पुष्पांचा अति वर्षाव ॥ ६९ ॥ यास्तव केशग्रंथा पासुनी : विलंबिनी माळा सुटोनी : त्या येथें पुष्पवृष्टिस्थानिं : योजलीया राया ॥ ७० ॥ आतां कातिं त्या तांडवातें : वाद्यें हिं जालिं अपेक्षितें ॥ तेहिं संपादलिं समस्तें : त्या नृत्याचाचि ठाईं ॥ ७१ ॥ तरि संपादिता नृत्यकळा : करिं होत्या कंकणमाळा ॥ त्या चळण पावतां उठिला : त्यां पासुनि नाद ॥ ७२ ॥ तो जो काहिं वलय-ध्वनि : रंगिं योजला वाद्य स्थानि ॥ आणि नूपुरें होतिं चरणिं : तियां गोपी-

कांचिया ॥ ७३ ॥ ते हिं पावतां चळनातें : प्रसवलिं सुस्वरा नादातें ॥ तो नादहि योजला तेथें : वादित्र जे सारंगिस्थानिं ॥ ७४ ॥ तैसाचि घोषपदें करुनि : कटिसुत्रिं होत्या किंकीणी ॥ त्या क्षुद्रघंटिका पासुनि : उत्पन्न जाला घोष ॥७५॥ तो जो घागारिया घोष : योजला मृदंगाविशेष ॥ इत्यादि ध्वनितिं संतोष : पावविला श्रीकृष्ण ॥ ७६ ॥ एवं वलयादि वाद्ये तिन्हि : ताळवीणामृदंगस्थानिं ॥ तिहिंसिं तिया कामिनी : नाचत्या जाल्या ॥ ७७ ॥ नाना कृष्णिं समर्पुनि चित्तें : कारित्या जाल्या नृत्यातें ॥ अनाहत नाद तेथें : प्रकटले अकस्मात ॥ ७८ ॥ असो सम्पादिता कृष्णप्राप्ति : मुख्य साधन : कृष्णप्रीति ॥ त्या प्रितीमाजी सम्पादति : साधनें अवघिं ॥ ७९ ॥ श्रीकृष्णिं भाक्ति जडली : तरि हे यात्राचि सफळ जाली ॥ कर्तव्यताचि सरोनि गेलि : मग श्रम कैंचे ॥ ८० ॥ राया त्यां भक्ताचा ठाइं : प्रचार जो भासतसे पाहिं ॥ त्या माजि न संचरे कांहिं : स्वधर्मत्यागदोष ॥ ८१ ॥ ते भक्त कार्मिं नसोनि रति : सर्वत्र उदास असति ॥ सांडुनि भगवद्भक्ति : नव्हती विधितत्पर ॥ ८२ ॥ ऐसे जे अनासक्तशीळ : त्याचा विधिहि नव्हे विकळ ॥ वेदाज्ञेसि प्रतिकुळ : नव्हती सर्वथा ॥ ८३ ॥ स्वजातिचिया भेदेंकारिं : ते नव्हती परधर्माचारि ॥ ज्या धर्माचा जो अधिकारिं तेथेंचि वर्ते ॥ ८४ ॥ हे असो विस्तारकथा : त्या कृष्णचित्ता गोपकांता ॥ नृत्यातें कारित असतां : त्या राससभेमाजि ॥ ८५ ॥ अनायासें चि करुनि : सम्भवले वलयादि ध्वनि ॥ ते योडवले वादित्रस्थानिं : सुस्वर वीणाताळबद्ध ॥ ८६ ॥ आतां त्या सभेच्या ठाइं : शोभा वर्णिली जे कांहिं ॥ ते सभाविशेषण काइ : किंलक्षण जारि ह्मणसि ॥८७॥ नाना नृत्य यावया व्यक्ति : योजली वाद्यसंपत्ति ॥ परि गायकहि पाहिजेति : त्या तांडवसमईं ॥ ८८ ॥ तरि नाचतां त्या वेल्हाळा : सुटल्या त्या पुष्पमाळा ॥ त्या कुसुमाश्रमें जो आला : भ्रमर समुदाये तेथें ॥ ८९ ॥ तो स्वार्थातें विसरोन : त्या नृत्याचा ठाईं लुब्धमन ॥ श्रीकृष्णाचें गुणगायन : कारिता जाला सुस्वर ॥९०॥ असो ते भ्रमरपांक्ति : तो महोत्सव भारोनि चित्तिं ॥ वर्णिता जाली गुणकिर्ति :

राया श्रीकृष्णाची ॥ ९१ ॥ ते स्वभावें जन्हि मूढ : तान्हि गायक योजले प्रौढ ॥ तेणें तो रचला सुदृढ : समारंभ नाट्याचा ॥ ९२ ॥ ते जाचि मुढमति : परि भक्तांचिया संगती ॥ सांडुनि विषयांची रति : अत्यंत सुबुद्धि जाले ते ॥ ९३ ॥ नाना तिहिं नृत्यसंबंधि : संपादिला गायनविधि ॥ मुढ स्वभाव परिसुबुद्धि : ते जाले भक्त समागमें ॥ ९४ ॥ त्या मतिकौशल्यें करुन : शोभलें तांडवगायन ॥ तेणें तिहिं साविला श्रीकृष्ण : त्या गोपिकाचेनि समागमें ॥ ९५ ॥ एवं तो गोपिकाजन : भगवंतें सहवर्तमान ॥ नाचता झाला सगायन : वल्यादि संगे रासरंगाचा ठायीं ॥ ९६ ॥ नाना सर्वत्र असे कृष्णसंग : परि गोपीचा तेथेंचि अनुराग ॥ तेणें विशेषें तो रंग : वोडवला तेथें राया ॥ ९७ ॥ अहो कृष्णेंसिं संगति नाहिं : ऐसा पदार्थ असे काई ॥ परि प्रीति न जोडे कृष्णपाईं : उबगोनि विषयातें ॥ ९८ ॥ तंवरि कृष्णसंगाचें सुख : नेणती विषयासक्त मुर्ख ॥ या कारणें धन्य होचि देख : कृष्णिच रतले ॥ ९९ ॥ असो हा भाग्याचा गोपीजन : श्रीकृष्णे सहवर्तमान ॥ तो रासमहोत्सव संपन्न : नृत्य करिता जाला ॥ ४०० ॥ एवं रासरंगामाझारि : श्रीकृष्णाचिये शोभेकरिं ॥ शोभलिया त्या व्रजसुंदरी : तें वाखाणिलें ऐसें ॥ १ ॥ असो हारिविलास जो काहिं : यासि अणुहि स्वातंत्र्य नाहिं ॥ भगवन्मायाप्रवाहिं : जैसें हें जग शोभतें ॥ २ ॥ तैसें चि हें हीं क्रीडाजात : येथें सत्ताभूत भगवंत ॥ कृष्ण परमार्थें प्रस्तुत : विचारितां निर्विशेष वस्तु हे ॥ ३ ॥ त्यासि हा विलास शोभवणें : तो मायाप्रवाह आचरणें ॥ परि स्वता हें जें करणें : तें अकर्तृत्व सत्तेकरिं ॥ ४ ॥ आतां उत्तरश्लोकें करुन : ऐसेंचि दाविलें महिमान ॥ तिहिंसिं रमला नंदानंदन : तें आइक राया ॥ ५ ॥

**एवं परिष्वंगकराभिमर्शन-**
**स्निग्धेक्षणोद्दामविलासहासैः ॥**
**रेमे रमेशो व्रजसुन्दरीभि-**
**र्यथार्भकः स्वप्रतिबिम्बविभ्रमः ॥ १७ ॥**

एवं या प्रकारें करुन : जैसा काहिं तो गोपिकाजन ॥ भगवंतेसिं विराजमान : क्रीडला रासरंगाचा ठाइं ॥ ६ ॥ तैसाचि तोही त्या सुन्दरिसिं : बहु शोभला कृष्ण सुखराशि ॥ जैसा उडुगणेंसिं शशी : विराजतसे गगनिं ॥७॥ असो त्यां गोपिकांसि मिळोन : तो रमेश नन्दानन्दन ॥ श्रीकृष्ण लक्ष्मीपरिणयन : रमता जाला रासरंगि ॥ ८ ॥ येथें रमाधीश हे खुण : दाविला असंगोदासीन ॥ त्या कृष्णासिं हा गोपीजन : भक्तित्वें चि आवडला ॥ ९ ॥ रमा जेथें पदसंवाहिनी : तेथें काय व्रजवासिनी ॥ केवळ राणटा गौळिनी : सौन्दर्य तें किति ॥ १० ॥ पारि कृपाकलितचित्तें : रमेश वश होउनि त्यातें ॥ व्रजसुन्दरिंचेनि सांगातें : रमता जाला येथेष्ट तो ॥ ११ ॥ येन्हविं त्या प्रेमास्पदीं काहीं : रमात्रया दुजेंचि नाहिं ॥ तेणें रमिजे आणिके ठाइं : ऐसें काय वस्तु असे येथें ॥ १२ ॥ येणें अभिप्रायें रमेशें : तिया प्रेमळांचेनि सौरसें ॥ रमिजेते जालें काहिं ऐसें : भासोनि आलें नावेक ॥ १३ ॥ तें जें संभोगलक्षण : तरि परिष्वंग जो आळिंगन ॥ त्यां गोपीतें प्रेमें करुन : पोटेसिं दृढ कवळिलें जें ॥ १४ ॥ आणि जो कराभिमर्ष : ह्मणजे केला कुचयोनिस्पर्श ॥ तैसाचि स्निग्धेक्षण लेश : जें प्रेमावलोकन ॥ १५ ॥ असो पाणिस्पर्शें त्यांतें : सूचिलें निज संभोगातें ॥ जेविं करस्पर्शें अनुभवातें : शिष्यासि दाविती गुरु ॥ १६ ॥ आणि अवलोकन मिषें : वारिलें भिन्नभावपिसें ॥ आपण वेगळें सर्व त्यांतें : दाविलें अर्थ शुन्य विश्व ॥ १७ ॥ नातरि करस्पर्श करुन : त्यांतें केलें सावधान ॥ अवलोकनें त्यांचें मन : आणिलें आपुले ठाइं ॥ १८ ॥ आणि दृढालिंगनरीती : दाविली निजसंगप्रतीति ॥ आणि उद्दाम विलासगति : सूचिलें संभोगातें ॥ १९ ॥ असो उदारभोगविलास : जे अधरकुचिं नखदंतदंश : जिहिं विरतांचें मानस : उत्सुकता पावतें ॥ २० ॥ जिहिं विलासिं करुन : प्राकृता विषयांहुनि मन ॥ विरमोनि सेविति सदन : भगवत्पदें करत योगी ॥ २१ ॥ जेविं गुरु स्वानुभवातें : वेदशास्त्ररहस्यातें ॥ प्रकटउनि सच्छिष्यातें : परमनिष्ठेतें पावविति ॥ २२ ॥ तेवींचि तो

चक्रपाणी : अद्भुत आचरणें करुनि ॥ निजस्था केलिया कामिनी : विपरीत-भावनानाशें ॥ २३ ॥ आणि हास्य जे प्रकटिलें : तेणें उक्तार्थातें दृढ केलें ॥ निजरुपिं बळकाविलें : त्यांचिया चित्तवृत्तीतें ॥ २४ ॥ किंवा न मोडोनि स्वस्थिति : हे विचित्राकार प्रतीति ॥ जाणोनि मायाविलासगति : हास्य केलें श्रीकृष्णें ॥ २५ ॥ नाना त्या हास्यें करुन : दाविली संतोषाची खुण ॥ हा सुखाभासु तो संपूर्ण : निजानंदाचा लेश ॥ २६ ॥ आपण सुखानुभवमूर्ति : जेथुनि सुखलहरिया येति ॥ आणि पावती समाप्ति : आनंद-सागरिं त्या ॥ २७ ॥ ऐसेनि आत्म-परामर्षे : घडोनि आलें हांस्या ऐसें ॥ ह्मणोनिया प्रसंगिं रमेशे : हास्ये दाविलें नावेक ॥ २८ ॥ तें हास्य करितिये वेळे : सर्व शोभेसि अंकुर आले ॥ जिया शोभा हें धवळिलें : रासमंडळ अवघें हिं ॥ २९ ॥ एवं आलिंगनादि करुन : व्रजसुंदरीसिं मिळोन ॥ रमेश जो नंदानंदन : रमता जाला रासप्रसंगिं ॥ ३० ॥ असो तो रमेश श्रीकृष्ण : व्रजसुंदरींसिं मैथुन : करिता जाला सलक्षण : उक्त प्रकारें रासोत्सावें ॥ ३१ ॥ ह्मणसी श्रीकृष्ण आत्म्येकरुन : जरि ब्रह्म सनातन ॥ केवळ एकाकी भेद-शुन्य : निर्विकार ॥ ३२ ॥ अहो तया कृष्णाचा ठाईं : हें विरुद्ध नव्हे काइ ॥ जेथें कर्तृत्वादि विशेष नाहिं : येथें हे क्रीडा कैंची ॥ ३३ ॥ ऐसें असेल तुझा मनिं : तरि आइक राजशिरोमणि ॥ अर्भक दृष्टांतें करुनि : हें घडतें तेथें ॥ ३४ ॥ अगा बाळक जैसा काहिं : निज प्रतिबिंबाचा ठाईं ॥ अहंममता जऱ्हि नाहिं : तथापि खेळतसे तेथें राया ॥ ३५ ॥ असो तो जैसा संकल्पशुन्य : प्रतिबिंबेसिं रममाण ॥ तैसा येथें रमारमण : क्रीडला गोपिकांसि गा ॥ ३६ ॥ तियां गोपांगनि सहित : हा समारंभु काहिं जो अद्भुत ॥ हे अवघें मिळोनि भात : जैसा तंदुळांचा ॥ ३७ ॥ तैसा एक कृष्ण जनिवनिं : त्या जळिं विश्वप्रतिबिंबस्थानि ॥ त्या माजि हे ही एक वेल्हावणी : रासरंग हा ॥ ३८ ॥ सर्वांही कळाचें कौशल : सौगंध्यादि गुण निर्मळ ॥ सौष्ठव्य जें किं सकळ : आकारलें जें येथें ॥ ३९ ॥ आणि जे निजप्रभा सर्वगत : ते समर्पुनि अवघी

येथें ॥ त्या रासोत्सवीं रमानाथ : संभोग करित असतां ॥ ४० ॥ तो श्रीकृष्ण आत्माराम : जो स्वप्रतिबिंबविभ्रम ॥ अर्भकआचारितोपम : क्रीडतां जाला तिहिंसि ॥ ४१ ॥ असो हा विस्तार आतां : प्रस्तुत त्या गोपवनिता ॥ ज्या त्यक्तविषया समस्ता : शरण आल्या कृष्णातें ॥ ४२ ॥ तिहिंसि रमारमण : संभोग करितां सलक्षण ॥ असो करितां त्यांतें मैथुन : शोभल्या अपुर्व त्या ४३ ॥ त्या संभोगलक्षणलक्षिता : एकसरेंच समस्ता ॥ कैशा जाल्या ते ही अवस्था : अवधारिं राजया ॥ ४४ ॥

तद्गंसगंप्रमुदाकुलेन्द्रियाः
केशान्दुकूलं कुचपट्टिकां च ॥
नांजः प्रतिव्योढुमलं व्रजस्त्रियो
विस्रस्तमालाभरणाः कुरूद्वह ॥ १८ ॥

तें जें काहिं उक्त लक्षण : कृष्णें सम्पादिलें मैथुन ॥ तेणें जालें वीर्यपतन : व्रजस्त्रियांसि सम्भोगसमईं ॥ ४५ ॥ असोनि तो अच्युतरता : त्या केल्या रेतस्खळिता ॥ तेणें सर्वाहि व्रजकांता : विकळेंद्रिया जाल्या ॥ ४६ ॥ राया कृष्णांगसंगप्राप्ता : त्या गळितवीर्या समस्ता ॥ महाआनन्दभरिता : भक्तिप्रेमसंपन्ना कार्ष्णि ॥ ४७ ॥ असो त्या गोपिकांचें चित्त : अन्यविषयाशारहित ॥ आनन्दप्रेमोद्रेकप्लुत : मुराले श्रीकार्ष्णि ॥ ४८ ॥ तेणें सर्व इंद्रियें गळालिं : देह कटाक्षें सांडवलिं ॥ विषयभाव विसरालें : कृष्ण सम्भोगाकलितें ॥ ४८ ॥ या कारणें त्या व्रजांगना : बोडवल्या विकळमना ॥ पावतां कृष्णमैथुना : स्खलितवीर्या सुखावल्या तेथें ॥ ५० ॥ आतां इंद्रियें विकळें जालिं : ते कोणें लक्षणें लक्षिलिं ॥ तारे भूषणादिकें होतिं धरिलि : पूर्वि अनेकें जें ॥ ५१ ॥ तें अवघें विकळें जालिं : त्यांत कटीचा पुष्पावळी ॥ ते कटाक्षें नाहीं धारिलि : पुर्विलियाचे परिं तिहिं ॥ ५२ ॥ तैसिंच रत्नादिखचितें : भूषणे कण ( न ) कमण्डितें ॥ तेहिं श्लथें जालिं समस्तें : मैथुन सरतिये समइं ॥ ५३ ॥ असो पुष्पमाळां पासुनि : मुक्त जाल्या सुमनश्रेणी ॥ जेवि गृहमेधी जे कोण्हि : त्या गृहस्थांचि मनें ॥५४॥

तें लाहोनिया सत्संगति : गृहापासुनि मुक्त होति ॥ तेवींचि त्या ही कुसुमजाति : माळा बंधमुक्ता जाल्या ॥ ५५ ॥ लाहोनि श्रीकृष्णसंगातें : अवावेंचि वोडवलि श्लथें ॥ नाना येणें चिन्हें गोपीशतें : बंधमुक्तें लक्षिलि ॥ ५६ ॥ तैसिंचि कंकणादि समस्तें : भूषणेंहि पावलि श्लथतेतें ॥ एवं येणें चिन्हें गोपीशतें : बहुं शोभालिं ॥ ५७ ॥ एवं त्रिश्रस्तमाळाभरणा : त्याशोभलिया गोपांगना ॥ आतां अनुमानांतरें विकळमनां ॥ लक्षिल्या ऐशा ॥ ५८ ॥ केशबंध होते जे शिरिं : ते नाहिं बांधिले पुर्वील्या परिं ॥ मुक्तकेशा त्या सुंदरी : संभोगसुखिं रतल्या ॥ ५९ ॥ आणि तेव्हां ते गोपकलत्रें : नेसालिं होतिं पट्टवस्त्रें ॥ आणि पांघुरति विचित्रें : वसनें जें होतिं ॥ ६० ॥ ते हिं तेथेंचि गळालिं : परि तिहिं नाहिं सांभाळालिं ॥ आणि कुचपट्टिका ते काळिं : सुटोनि गेल्या ॥ ६१ ॥ असो कुच झांकिति वस्त्रें : संभोग करिता कळासुत्रें ॥ तेहिं सुटलिं परि कृष्णतंत्रें : नेणती चि तें ते काळीं॥६२॥एवं केशादि भूषणातें : यथावस्थित धरावयातें ॥ सावध न होतीच गोपीशतें : कृष्णमैथुनें सुखावलिं ॥६३॥ कृष्णसंभोगें गोपीजन : आनंदार्णवीं जाला मग्न॥ तेणें त्यांचा इंद्रियगण : विकळ वोडवला तेव्हां ॥६४॥ असो कृष्णाचिया संगति : गळित जालि अहंकृति ॥ सुटोनि गेलि चिदाचिद्ग्रंथि : कार्य ग्रंथि सहित ॥ ६५ ॥ कृष्णिं जरि पुरतें मन : तरि कैंचा हा देहाभिमान ॥ मग तत्सुखिं जें प्रतिबंधन : त्यातें तोचि निवारील ॥ ६६ ॥ कृष्णिं जडतां चित्तवृत्ति : जालि जे प्रतिबंधप्राप्ति ॥ तरि त्या विघ्ननाशा प्रति : कृष्णेवीण अन्योपाय न चले ॥६७॥ ह्मणोनि भले जे सज्जन : श्रवण स्मरणादि करुन श्रीकृष्णातें संतोषउन : संकट निवारण करिति ते ॥ ६८ ॥ मां या तंव साक्षात् कृष्णभक्ता : सदां सुरतप्रेमें आसक्ता ॥ त्या मुक्तबंधना काममुक्ता : येथें नवल काईसें ॥ ६९ ॥ सदां होतां सुरतप्रसंग : सर्वेंद्रियांगिं त्यासि कृष्णसंग ॥ तेणे होऊनि गलितअनंग : सुखें काळ क्रमिती त्या ॥ ७० ॥ असो हें रहस्यकथन : आतां बोलों कथानुसंधान ॥ कृष्णसंगें तो गोपीकाजन : सुरतप्रसंगाचा ठाईं तेथें ॥ ७१ त्यांच्या गळाल्या चित्त-

वृत्ति : सुटलिया केशवस्त्रग्रंथि ।। मुक्त माळाभरणा त्या सती : कृष्णसुखें शोभल्या राया ।। ७२ ।। ते कैसी ह्मणाल विकळता : तरि कृष्णें त्यांसि संभोगितां ।। त्या जाल्या मदनच्युता : रेतस्राव उसळले तेव्हां ।। ७३ ।। तिहिं निवांत डोळे झांकिले : हात पाय ही पसरिले ।। श्रीकृष्णसुखिं चित्त मुरालें : तेणे निवांत राहिल्या ।। ७४ ।। नाना या कृष्णसुखाचि जाति : तु हीं जाणसि गा कुरुपती ।। तुज भागवतोत्तमाप्रति : दुर्गमं असे काइ राया ।। ७५ ।। असो त्या ज्या गोपवनिता : साक्षात् कृष्णाकाळितिचित्ता ।। या सुरत योगें क्रिडतां : निवाल्या कृष्णसंगें सदां ।।७६।। ऐशा त्या कृष्णसुखभरा : जाल्या विकळेंद्रियशरीरा ।। हें कायी राया कुरुप्रवीरा : नवल जालें रासोत्सविं ।। ७७ ।। पाहावया रासोत्सवातें : विमानारुढ आकाशगतें ।। आलिं होतिं देवांगनाशतें : कृष्णात्मकें होत्साति ।। ७८ ।। त्यासि जे काहिं जाली अवस्था : तेंहि राया परिस आतां ।। आस होवावा रमाभर्ता : हे उत्सुकता जाली ।। ७९।।

**कृष्णविक्रीडितं वीक्ष्य मुमुहुः खेचरस्त्रियः**
**कामार्दिताः शशांकश्च सगणो विस्मितो भवत् ।।१९।।**

त्या सुरस्त्रिया देवकांता : खेचरा ज्या आकाशगता ।। जाल्या कृष्णकामपिडिता : ते सम्भोगक्रिया देखोनि ।। ८० ।। त्या असोनि विकळमना : जाल्या त्या कामोद्भवसम्पन्ना ।। प्रसन्न होउनि यदुराणा : सुरत करो आमुसिं ।। ८१ ।। पाहा आम्ही स्वर्गवासिनी : श्रीमन्ता भोगविलासिनी ।। सुन्दरा चतुरा देवकामिनी : परि हें सुख नाहिं ।। ८२ ।। आम्ही सम्पादुनि बहु सुकृतें : पावलों अमर सम्पत्तीतें ।। परि पाहोनि कृष्ण सुरताते : अति तुच्छा वोडवलों ।। ८३ ।। पाहा या राणटा गौळिनी : भाग्याच्या कैशा व्रजभामिनी ।। नित्य कृष्णसगें मैथुनि : रमताति गोपी कैशा ।। ८४ ।। कोणींकडे हा रमाभर्त्ता : कोणकिडे राणटा वनिता ।। गोपी कैशा आवडल्या आतां : संभोगतां कृष्णातें ।। ८५ ।। असो रमेसि वंचुनि पांहिं : महत्व हि ठेविलें ठाई ।। ब्रह्मादिका जें सुख नाहिं : तें दिधलें गोपिकातें ।। ८६ ।।

साक्षात् वैकुण्ठरमण : ज्यातें सेविति रमा आदि करुन ॥ योगी आणि ब्रह्मेशान : तो कैसा पां वश जाला यांतें ॥ ८७ ॥ ऐसें विचारुनि सुरांगना : त्या कृष्णकामार्दितमना ॥ देखोनि कृष्णभोगरचना : विकळ जालिया अतिशयें ॥ ८८ ॥ एवं देखोनि कृष्ण क्रिडिता : खेचरा स्त्रिया कामार्दिता ॥ असोनि कृष्णचिंतनाचित्ता : मोहातें पावलिया त्या ॥ ८९ ॥ तैसाचि शशांक जो चंद्र : आकाशीं उदैला तो सुभद्र ॥ नक्षत्रि सहित आला विनिद्र : कृष्णरासदर्शनातें ॥ ९० ॥ देखोनि कृष्णक्रीडित : असोनि तोहि विस्मितचित्त ॥ नक्षेत्रेंसिं रासंसंभ्रमभरित : मोहातें पावला महोत्सवें ॥ ९१ ॥ असो तोहि रासदर्शनासक्त : असता जाला सुविस्मित ॥ गगनि असोनि तो मोहित : अस्तातें विसरला किं ॥ ९२ ॥ नातरि त्या गोपीकांचि मनें : कृष्णें केलि निज अधीनें ॥ त्या मनोभवें चंद्रें तेणें : निजगति विचारिलि कृष्णि ॥ ९३ ॥ असो श्रीकृष्णें नंदसुतें : इया गोपिकाचेनि सांगातें ॥ मज आन केलें ऐस्या (शा) चंद्रातें : भरवसा जाला चित्तिं ॥ ९४ ॥ येणें निमित्तें तो उडुपति : असतां जाला कुंठितगति ॥ रासोत्सव स्वचित्तिं : विस्मयातें पावला तो ॥ ९५ ॥ एवं उक्त लक्षणें करुन : तियां सुंदरींसहित श्रीकृष्ण ॥ प्रति युग्मि असोनि समान : रमता जाला तेथें ॥ ९६ ॥ तोचि तेथें उपसंहारार्थ : बोलिलानि अर्थु प्रस्तुत ॥ बोलिजे तो आणि तन्निमित्त : या क्रिडचें काइ ॥ ९७ ॥ ते निमित्त संकेतें करुन : आईक राया सावधान ॥ एकलाचि तो नंदानंदन : बहुधा कां जाला ॥ ९८ ॥

**कृत्वा तावन्तमात्मानं यावतीर्व्रजयोषितः ॥**
**रेमे स भगवांस्ताभिरात्मारामोऽपि लीलया ॥२२॥**

तो येकलाचि रमाभर्ता : आणि अनेकी त्या गोपककांता ॥ तियां बहुतेंसि तो क्रीडतां : अनेके स्वरूपें धरिलिं ॥ ९९ ॥ तें बहुत्व संपादितें वेळे : साधनांतर नापेक्षिलें ॥ आपणेचि स्वता भासविलें : आपणातें क्रीडावया बहुधा ॥ १०० ॥ जेवि यया विश्वाचा सृजनि : निमित उपादान दोन्हि ॥ एकलाचि आपण असोनि : प्रकटिलें हें विश्व ॥ १ ॥ तेवीचि

रासोत्सवि येथें : तेणें स्वताचि आपणयातें ॥ जितुकिं तें गोपिकाशतें : तितुकिया रुपें प्रगटिलें ॥ २ ॥ आपुलेचि लीळे करुन : त्या सुंदरीं सहवर्तमान ॥ तो साक्षात् वैकुंठरमण : रमता जाला सुरत-प्रसंगें तेथें ॥३॥ तो जन्हि अवाप्तसर्वकाम : विष्णु साक्षात् आत्माराम ॥ जो सुखस्वरुप निःसीम : तन्हि क्रीडला तो राया ॥ ४ ॥ आतां अपि यणें संकेतें सुचिलें ऐसें काहिं येथें ॥ जें त्या सुन्दरिचिं प्रतिश्रुतें : राहिलिं होतिं वरप्र-दानें ॥५॥ तिहिं त्या कात्यायनीतें : आराधुनि प्रार्थिलें होतें ॥ जें अवो कात्या यनि आमुतें : वर देइं नंदसुत ॥६॥ असो देवीचें मिष केलें : पारि कृष्णातेंचि प्रार्थिलें ॥ ऐसें जाणोनि कृष्णें दिधलें : वर प्रदान गोपीतें ॥७॥ जें आतां तुह्मीं जा गृहाप्रति : पुढें माझे संगें रमाल रातिं ॥ एवं प्रत्यकें निजप्राप्ति : नेमिली प्रतिज्ञा त्यांतें ॥८॥ येन्हवि तो कृष्ण आत्माराम : जो आवाप्तसकळकाम ॥ पारि या निमित्तें हा संभ्रम : संपादुनि रमला ॥ ९ ॥ एकलीचि कृष्णमुर्ति : बहुधा जाली अनेकि प्रति ॥ नाना त्या प्रेमळांचि प्रीति : तदाकारें योजली ॥ १०॥ एवं तो श्रीकृष्ण भगवान : षड्गुण· ऐश्वर्य संपन्न ॥ तो क्रीयाप्रयो-जनहीन : आत्मानंदभरें ॥ ११ ॥ याचि जो क्रियेचा प्रचार : तो भक्तानुग्रहानुसार ॥ श्रीकृष्ण स्वता निर्विकार : भक्तैकभावन ॥ १२ ॥ एवं आत्माराम भगवान : व्रजयोषितांसिं मिळोन ॥ तितुकिं हिं रुपें धरुन : लीळेकारिं रमला रासरंगिं कृष्ण ॥ १३ ॥ आणि अनुसरोनि कृष्णातें : तिहिं वोपिलि निजजीवितें ॥ न देखोनि कृष्णापरतें : वेंचिलें सर्व आपुलें काइंग ॥ १४ ॥ आपुलें चारितें संपुर्ण : करित्या जालिया कृष्णार्पण ॥ तेणें संतोषिला तो सुजाण : सर्वात्मा श्रीकृष्ण तिहिं ॥ १५ ॥ मग कृपाळुवें रमाकांतें : संभोगुनि त्यां योषितातें ॥ क्रीडाश्रम जाला तो स्वहस्तें : निवा-रिला ऐसा राया ॥ १६ ॥

**तासामतिविहारेण श्रांतानां वदनानि सः ।**
**प्रामृजत्करुण : प्रेम्णा शंतमेनाग पाणिना ॥ २० ॥**

तिहिं केला क्रीडाविहार : जो नृत्यसुरतादि प्रकार ।। जेणें प्रसंगें तो गदाधर : संतोषविला रासोत्सविं ।। १७ ।। त्या संतोषातें अवलंबुन : रंगि शोभविला गोपीजन ।। चित्तें त्यांचिं आकर्षुन : आत्मनिष्ठें केलिं तेणें ।। १८ ।। त्या विहारें गोपवनिता : असत्या जाल्या अतिश्रांता ।। त्या श्रमातें जाला निवारिता : रमाकांत कृष्ण ।। १९ ।। असो वदनांतें परिमार्जिता : ह्मणिजे मुखिं घर्म आला होता ।। तो निजहस्तें पुशिता : जा ा कृपाभरें ।। २० ।। जाणोनि तें शुभाचरण : खवळलें कृपाळुपण ।। तयां कृपातुषारिं सिंचोन : श्रम परिहारार्थ गोपींचिया ।। २१ ।। मुखावरि श्रमघर्म आले : त्या स्वेदमुखातें पुसिलें ।। कृपेंकारिं कुरवाळिलें : प्रेमभरें निजहस्तें करुन २२ ।। तया हस्ताचें केलें लक्षण : शंतम ऐसें विशेषण ।। सकळ सुखाचें अवसान : परम सुखाची मुस ।। २३ ।। तेणें सुखात्मकें निजहस्तें : तियां सांताचिया मुखांतें ।। परिमार्जिलें सप्रेमचित्तें : कृपाळुवें श्रीकृष्णें ।।२४।। किंवा दिर्घमैथुन श्रमें : त्यांचिं मुखें जालिं सघर्में ।। त्या मुखातें पुसोनि करुणें प्रेमें : कुरवाळिलें स्वहस्तें ।। २५।। दीर्घ काळ कारितां मैथुनें : त्यांचि सघर्में जालिं वदनें ।। प्रेमें पुसोनि कृष्णें करुणें : सुखहस्तें स्पर्शिलें त्यांतें ।।२६ ।। असो करुण ऐसें जे लक्षण : कृष्ण सुचिला कामपुर्ण ।। तो स्वता आत्माभिरमण : निर्विकार भक्तप्रिय ।।२७।। त्यासि त्या रासोत्सवाचा ठाइं : सर्वथा प्रयोजन नाहिं ।। तथापि भक्तप्रियत्वें पाहिं : अनादि विलास असे ।।२८।। यया भक्तप्रेमासि मुळ : तो सदा आत्म प्रेमाशीळ ।। त्या स्वप्रेमें निजवत्सल : आवडति भगवंतातें सदां ।।२९।। जे भगवंतिं न भजति : त्या वारि तो कदा न करि प्रीति ।। या लागि सांडुनि अहंकृति : भगवंतिं प्रीति जयांसि ।। ३० ।। त्यां निजवत्सळां भक्तांतें : भगवंते हिं भजिजेतें ।। भक्तद्वारें हिं आपणा परतें : नावडेचि भगवंतासि ।। ३१ ।। यास्तव त्या विहारश्रांता : वर्णिल्या ज्या व्रजवनिता ।। त्या आवडोनि निजभक्ता : तेणें कुरवाळिल्या हस्तें ।। ३२।। नाना हस्त स्पर्शें करुन : त्या गोपींचें श्रमनिवारण ।। करुनियां त्यांसि समाधान : निज रुपें दिधलें ।। ३३ ।। जेवि साधनश्रांता प्रति :

आइती लाभे स्वरुपस्थिति ॥ तेवि त्या व्रजवासिनी सति : कृष्णहस्तें स्पर्शील्या ॥ ३४ ॥ नाना करस्पर्श करुन : विप्रतिपत्तीतें निवारुन ॥ निजस्वरुपिं समाधान : पावविलें गोपीतें कृष्णें ॥ ३५ ॥ जेवि अधिष्ठुनि विद्यावृत्ति : अविद्येचि करुनि निवृत्ति ॥ शीघ्र पावति भगवंति : भगवद्भक्तसानिध्य ॥ ३६ ॥ किंवा तेणें करुणाहस्तें : त्यां श्रमाक्रांता गोपीकांतें ॥ सावध केलें जेवि निद्रितातें : उठविजे सावधें ॥ ३७ ॥ आतां कृष्णपाणिस्पर्शिता : त्या सहर्षा गोपकांता ॥ निजचारितिं भगवंता : पूजिल्या जाल्या ऐशा ॥ ३८ ॥

> **गोप्यः स्फुरत्पुरटकुंडलकुंतलत्विड्**
> **गंडश्रिया सुधितहासनिरीक्षणेन :**
> **मानं दधत्य ऋषभस्य जगुः कृतानि**
> **पुण्यानि तत्कररुहस्पृश उत्प्रमोदाः ॥ १२ ॥**

त्या पूर्वोक्ता गोपकांता : बहु आवडल्या नंदसुता ॥ स्वकरें कुरवाळुनि आस्था : ज्या केल्या श्रीकृष्णें ॥ ३९ ॥ तया कृष्णकरा पासुन : जाले जे उत्पन्न नखगण ॥ तिहिं त्या स्पर्शिल्या ह्मणोन : तत्कररुहस्पृशा गोपी ॥ ४० ॥ तत्कररुहस्पृशा होत्सात्या : उत्कृष्ट प्रमोदातें पावल्या ॥ जें अतिसुखसंपन्न त्या : मान देत्या ऋषभासि ज्या ॥ ४१॥ असो लाधोनि करस्पर्शातें : कृष्णिं असोनि चित्तें ॥ आलें जें काहिं आनंदभरितें : तें न सांवरे त्यांतें ॥ ४२ ॥ यालागि त्या आनंदभरिता : सर्वस्वें असोनि कृष्णस्था ॥ तिहिं तो आपला भर्ता : पूजिला होत्सात्या ॥ ४३ ॥ असो ऋषभशब्दें पति : जगदीश जो रमणमुर्ति ॥ त्याचियें पूजेते धरुनि चित्तिं : मानिल्या स्वाभिनें ॥ ४४ ॥ त्या निजपतिचिये पूजेते : करितिं जालिं गोपीशतें ॥ तें जरि तुह्मी ऐसे ह्मणाल येथें : किमात्मका ते पुजा ॥ ४५ ॥ तरि त्यांचिया श्रवणिं : प्रत्येकें कुंडलें दोनि दोनि ॥ तें दिव्य सौवर्णे आंदोलोनि : सुप्रभेतें प्रसवलिं जैं ॥ ४६ ॥ नाना अंतःप्रेमाचेनि बळें : तें कुंडलें जालिं चंचळें ॥ तेणें त्यांचिं तेजें

बहळें : फांकालिं गंडस्थळांचा ठाईं ॥ ४७ ॥ ते जे कुंडलप्रभा आली : तिया गंडस्थळें शोभविलिं ॥ नातरि गल्हातें व्यापुनि गेली : सर्वी मुखां वरि ॥ ४८ ॥ कुंतळ शब्दें केशावळी : ते केशांवरि ही पसरली ॥ तिया कुंतळ-श्रीयाही विराजली : कपोळें तियांचि ॥ ४९ ॥ त्या ज्या कुटिल कुंतळाच्या हारी : त्या येउनि कपोळांवरि ॥ तेणें शोभल्या सुंदरी : कुंडलकुंतळदीप्तगंडा त्या ॥ ५० ॥ असो कपोळांचिया प्रभा : कुरळासि आलि ते शोभा ॥ जेवि मेघवृंदें चंद्रबिंबा : समागमे शोभा पावति ॥ ५१ ॥ तियां केशपंक्ति आवृत : शोभले उभय गंडप्रांत ॥ एवं कुंडलकुंतलमंडित : कपोळश्री विराजली ऐसी ॥ ५२ ॥ त्या उत्कृष्ट श्रियेकरिं कांता : पूजिता जाल्या रमानाथा ॥ असो स्वसौभाग्यें निजभर्ता : पूजिला गोपिकिं ॥ ५३ ॥ तैसिंचि कृष्णें मनें हरिलिं : तें आनंदार्णवीं बुडालिं ॥ तें हास्य मिषें बाहीरि आलिं : निजपतिपुजे लागिं ॥ ५४ ॥ कृष्ण प्रेमाचेनि सुरवाडें : शोभलें अमृताचेनि पाडें ॥ तें सुधित हास्य कृष्णा पुढें : उपायन संपादिलें तिहिं ॥ ५५ ॥ ऐसें सुधितें हास्यं करुन : पुजिला आपुला रमण ॥ असो क्रिया मात्र कृष्णार्पण : जाली त्या गोपिकांची ॥ ५६ ॥ आणि त्यांचें जें निरीक्षण : म्हणिजे विलासावलोकन ॥ तेणेंहिं तिहिं स्वामिपुजन : संपादिलें निजप्रेमें ॥ ५७ ॥ एवं प्राकृतातें वीसरोन : श्रीकृष्णि तो युवतीजन ॥ अंतरिं रंगला तें लक्षण : बाहिर लक्षिलें किं ऐसें ॥ ५८ ॥ येणें आचरणें करुन : त्यांचें अंतर्बाह्य जालें कृष्णार्पण ॥ तेंचि महत्पुजन : स्वामिचें योजिलें राया ॥ ५९ ॥ येऱ्हवि त्या मंगळमायीं : गोपीची शोभा ते किती काई ॥ जे श्रीरमा ज्या कृष्णपाईं : लोळतसे सर्वकाळ ॥ ६० ॥ तेथें या ललनांचि रीति : कृष्णपाइं काइ होईल सरति ॥ या लागि अर्पुनि स्वप्रीति : निजविलासें पुजिला पति ॥ ६१ ॥ जेवि त्या योगीयांचें मन : अमानित्वादि चिन्हें करुन ॥ अनुलक्षिजेतें संस्थान : पावले जे स्वरुपीं ॥ ६२ ॥ तेची त्यांची समर्पे पुजा : तेवि तिहिं हा यदुराजा ॥ पुजिला तेणें अधोक्षजा : परम संतोष

जाला ॥ ६३ ॥ मग तेणें सर्वज्ञ समर्थें : परम कांतें गोपीनाथें ॥ स्विकरु-
नि तिये पुजेतें : स्मरण प्रेरिलें कीर्त्तिनें ॥ ६४ ॥ तेणें संतोष प्रबळें :
त्या गोपिकांचें हृदये द्रवलें ॥ त्या प्रेमोद्रेकें त्यांसि स्मरलें : कृष्णाचे गुणप्रसंग
॥ ६५ ॥ ते जे निजकांताचे गुण : पावनासि हि अतिपावन ॥ त्या पुण्यें
कर्माचें कीर्त्तन : करित्या जाल्या गोपि ॥ ६६ ॥ जन कृपा कळवळुन :
कृष्णें केलें तनुधारण ॥ जें सर्व सौभाग्याचें सदन : पवित्रतास्वरुप ॥६७ ॥
याचि अवतारिं स्वकौतुकें : कर्में जें केलिं अलौकिकें ॥ जें सकळदुःखनाशकें:
श्रवणस्मरणकीर्तनमात्रें ॥६८॥ जें पूतनादि वधात्मकें : जें इंद्रादिगर्वमोचकें ॥
जें विरिंच्यादिस्तुतिकारकें : आणि व्रजजनार्तिहर्ति ॥ ६९ ॥ जें काळिया
मथनपरें : जें दावाग्निप्राशनकरें : उचलोनि गोवर्धन करें: गाइगोपी गोपाळादिरक्षणें
॥७०॥ जें वृंदावन विहरणें : उत्प्रसंगे दैत्यनाशनें ॥ गाइगोपाळवत्स पाळणें :
वत्सपाळ•वत्सरुपधरें ॥ ७१ ॥ जें मुरलिवादनपरें : जे गोपिकाविरहहरें ॥
जें रासोत्सवक्रीडाकरें : गोपीसुरतप्रसंगें ॥ ७२ ॥ त्या पावना कर्मातें
स्मरोन : सर्वत्वातें विसरोन ॥ करित्या जाल्या गुणगायन : कामशमनावें
॥ ७३ ॥ असो पावोनि करस्पर्शातें : छेदुनि हृदयग्रंथितें ॥ गुण वर्णिले
सुप्रशस्तें : निजकांता कृष्णाचे ॥ ७४ ॥ आतां कृष्णप्राप्तिचें लक्षण :
होउनि सक्ताभिमान ॥ सर्व कर्तव्यातें सारुन : कृष्णाचे गुण वर्णावे
॥ ७५ ॥ नाना त्या कर्तव्यशुन्या प्रति : विशेषें नाहिं विधिशास्ति ॥
परि अनादि स्वप्रकृति : उगे राहों नेदि ॥ ७६ ॥ म्हणोनि कर्तव्य
सरलें : तरिहि आत्माराम जे जाले ॥ तथापि नाहिं सांडिलें : हरि-
भजन कोण्हि ॥ ७७ ॥ येणेंचि विचारें करुन : लब्धप्रसाद गोपी-
जन ॥ करिता जाला गायन : श्रीकृष्णगुणाचें ॥ ७८ ॥ आतां तया
पुजा प्रभावता : तो श्रमहर्ता रमाभर्ता ॥ संतोषोनि निजवशता : दाविली
त्यातें ॥ ७९ ॥ तें काहिं येक लक्षण : निजकामोद्रेकआविष्करण ॥
दाउनि सारशेरण : प्रकटली वशता ॥ ८० ॥ ऐसें हि कृष्णाचें आचरण :
उत्तर श्लोकें करुन ॥ आइक राया सावधान : निवेदिजेतें ॥ ८१ ॥

ताभियुतः श्रममपोहितुमगसंग-
घृष्टस्रजः स कुचकुंकुमरंजितायाः ।
गंधर्वपालिभिरनुद्रुत आविशद्वाः
श्रांतो गजीभिरिभराडिव भिन्नसेतुः ॥ २३ ॥

त्या रासोत्सवप्रसंगें करुन : केलें जें नृत्य बहु मैथुन ॥ तेणें जो श्रम तन्निवारण : विचारुन चित्तिं ॥ ८२ ॥ असो त्या गोपिकां लागुन : संपादुनि स्वसन्निधान ॥ तिहिंसि जाला क्रीडमान : रासरंगउत्सवें ॥ ८३ ॥ त्या उत्सवि तें गोपीशतें : अनुसरोनि श्रीकृष्णातें ॥ करिति जालिं नृत्यादिकातें : स्वामिपुजे लागिं ॥ ८४ ॥ तेणें जो प्रेमा उसळला : तो श्रमरूपें जाणवला ॥ त्या श्रमनिवारणातें प्रवेशला : जलाशयातें कृष्ण ॥ ८५ ॥ ते जें जळप्रवेशलक्षण : तरि परस्परें कळवुन ॥ त्या कामिनीसिं परिवारुन : यमुना डोहीं प्रवेशला ॥ ८६ ॥ आधिं रासप्रसंगें करुन : करुनि चुंबन स्तनमर्दन ॥ आलिंगनादि दीर्घ मैथुन : संपादिलें जें काहिं ॥ ८७ ॥ त्या परस्परें अंगसंगकाळिं : कंठि होत्या मुक्तादि रत्नावळी ॥ पुष्प माळाहि मिरवलि : अंगसंगवर्षणें ॥ ८८ ॥ ते माळाशोभा किंलक्षण : तरि कारितां अंगवर्षण ॥ गोपींचें कुचकुंकुमलेपन : तें कृष्णकुचांसि लागलें ॥ ८९ ॥ त्या कुचकुंकुमे माळावाळि : अत्यंत लोहित रंगली ॥ आणि सुवासितही जाली : विशेषें ते समइं तेथें ॥ ९० ॥ तिया माळासुगंधें करुन : तेथें मिळाले भ्रमरगण ॥ त्या भ्रमरासिं उपमान : गंधर्वपतिचें घडलें ॥ ९१ ॥ जेवि निजपतितें लक्षुन : गंधर्व कारिती गायन ॥ तेवि ते भ्रमर प्रधानगण : मिरवले निज समुदायेसिं ॥९२॥ श्रीकृष्णातें अनुसरोन : कारिते जाले गुणगायन ॥ बहुं गुंजारवें करुन : सुनादित होंसाते सन्निध ॥९३॥ तया भ्रमरिं गीयमान : त्यां युवतिं सहवर्तमान : करावया श्रमनिवारण : प्रवेशला यमुना ह्रदजळिं॥९४॥नाना कृष्णि भक्तसंग : तिये निर्विशेष जो अनुराग ॥ त्या अनुरागिं मुनिभृंग : अनुभवरसलुब्ध जे ॥९५॥ ते पावोनि परम शांति : भगवंताचे क्रीडागुण गाति ॥ त्यां भक्तिं परिवारित श्रीपति : शांतिरुपें

शोभला ॥ ९६ ॥ तेथें अनुभव समाधान : तेंचि सांचिनलें जीवन ॥ तेथें प्रवेशला नारायण : मनोवृत्तीसहित ॥ ९७ ॥ किंवा तत्प्रीतीतें अनुसरोन : धरुनियां रुप रमण ॥ तिहिंसि क्रीडोनि आपण : फळरुपही जाला ॥ ९८ ॥ तें जें कौतुकाचें विश्रमण : निजस्वरुप सनातन ॥ सकळांचें जें कि जीवन : त्या स्वरुपात्मकें जळीं ॥ ९९ ॥ तया भक्तवृंदेसहित : प्रवेशला तो नंदसुत ॥ नाविक भाव दाविला निश्चांत : परि तो विशेष आकर्षिला ॥ ६०० ॥ ऐसा परमार्थ जो काहिं : तो दाविला गोपिचा ठाइं ॥ कांजे श्रीकृष्णिं विभागु नाहिं : विशेष निर्विशेष ॥ १ ॥ येथें जे काहिं क्रीडती स्थिति : तेचि विश्रांतिचि विश्रांति ॥ साक्षात् हे कृष्णमुर्ति : उपनिषदर्थ जे ॥ २ ॥ वाग्जाळातें घेउनी मन : परतलें जया पासुन ॥ तेंचि प्रत्यक्ष रुप रमण : राया श्रीकृष्णाचें हें ॥ ३ ॥ शास्त्रीय प्रक्रिया जे काहिं : ते या विलासिं विरुद्ध नाहिं ॥ या श्रीकृष्णाजिचा पाइं : परापरताचि नसे ॥ ४ ॥ असो हा सर्व परमार्थ : कथान्वयोचि धरुं प्रस्तुत ॥ त्या भ्रमरिं गीयमान सुगीत : सुंदरिंसिं सह ॥ ५ ॥ करावया श्रमनिवारण : विलासिया तो नंदानंदन ॥ प्रवेशता जाला जीवन : त्या यमुना नदीचें ॥ ६ ॥ तया श्रीकृष्णाचें विशेषण : भिन्नसेतु ऐसें ह्मणोन ॥ तिये विषइं उपमान : मदगजाचें दिधलें ॥ ७ ॥ इभराट् इया ख्याति : जैसा तो मदोन्मत गजपति ॥ येउनि जळाशयाप्रति : हस्तिनिसहवर्तमान ॥ ८ ॥ श्रमनिराकरण निमित्तें : प्रवेशला जळाशयातें ॥ तोडोनि पदगळ बंधनातें : क्रीडतसे महांनदीजाळें ॥ ९ ॥ तिथे क्रीडायुक्त कलोळिं : जळमर्यादा आप्लाविली ॥ किंवा जळनिरोधार्थ केलि : होती सेतुरचना ॥ १० ॥ तोडोनि जळबंधारातें : तेणें गजिनीसि क्रीडिजेतें ॥ तैसीचि येथेंहिं नंदसुतें : सेतुमर्यादा तोडिली ॥ ११ ॥ तेथें सेतुबंध ह्मणाल काइ : तरि वेदमर्यादा जे काहिं ॥ मन प्रशांत जालें नाहिं : श्रीकृष्ण स्वरुपिं ज्यांचें ॥ १२ ॥ तयां विषय लंपटांप्रति : स्वकर्मप्रेरका त्या श्रृ(श्रु)ति ॥ यथेष्टाचारनिवारणार्थि : प्रवर्तलिया असति ॥ १३ ॥ तें जें काहिं विधिवचनें : साक्षात् कृष्णिंग अप्रयोजनें ॥

ह्मणोनि गोपिचिं आचरणें : पवित्रता पावलिं तें ॥ १४ ॥ त्यांचिं मनें असोनि कृष्णस्थें : न देखती विधिभंगातें ॥ कांजें कृष्णेंवीग त्यांतें : स्फुरलेंचि नाहिं दुजें ॥ १५ ॥ मग त्या ललनाचा ठाइं : विधीसि अवसर नाहिं ॥ आणि श्रीकृष्णि तों काहिं : प्रवृत्ति ना निवृति ॥ १६ ॥ असो श्रीकृष्णि अन्यथा मति : तंवरि भेदप्रतीति ॥ भेदमुळें विषय असती : तेथें विधी वचनें ॥ १७ ॥ अहो पावलियां कृष्णातें : विधिवाक्यें न सरति तेथें ॥ या विषया पासुनि चित्तें : उपरमालिं ज्यांचि ॥ १८ ॥ कर्तव्यचि सरोनि गेलें : विध्युक्त अप्रयोजक जालें ॥ तेगें भिन्नसेतुत्व घडलें : श्रीकृष्णातें ऐसें ॥ १९ असो कृष्णि मिळते वेळे : विधिनिषेध हारपले ॥ आणि कृष्ण तों पाहिलें : सेतुचि नसे मां बंध कैचा ॥ २० ॥ तथापि यणे प्रसंगवशें : घडोनि आलें नाविकसें ॥ परमार्थे काहिंच नसे : आभास मात्र हा ॥ २१ ॥ असो अनुसरोनि कृष्णातें : फेडुनि ठेविलें वस्त्रातें ॥ नग्न असोनि क्रीडेतें : आरंभिलें तिहिं ॥ २२ ॥ नग्न प्रवेशोनि जळातें : गोपिसिं क्रीडतां कृष्णातें ॥ सेतुबंध घडला तो येथें : विरुद्ध नव्हे कदापि ॥ २३ ॥ कां जें अवलंबुनि कृष्णातें : जिहिं सांडिलें सर्वस्वातें ॥ भिन्नसेतु भासे परि येथें : तो विरुद्धचि नव्हे ॥ २४ ॥ एवं भिन्न सेतु ह्मणोन : जया कृष्णाचे केलें विशेषण ॥ तो गोपीसहवर्तमानः नग्न क्रीडला राया ॥ २५ ॥ अतां प्रवेशोनियां जळिं : तेगें कैसी केली जळकेळि ॥ आणि कैशा त्या गोपबाळी : भजल्या कृष्णातें ॥ २६ ॥

**सोंभस्यलं युवतिभिः परिषिच्यमान :**
**प्रेम्णेक्षितः प्रहसतीभिरितस्ततोंग ॥**
**वैमानिकैः कुसुमवर्षिभिरिड्यमानो**
**रेमे स्वयं स्वरतिरत्र गजेंद्रलील : ॥ २४ ॥**

अता ये अंगा परिशिलि : उत्कृष्टग श्रीपति ॥ त्यां कामिनीं सहित सप्रीति : तो प्रवेशला त्या जळिं ॥ २७ ॥ सारतिं ह्मणे कहा : श्रीकृष्ण आत्माभिरमण ॥ जो प्रवृत्तिनिवृत्तिशून्य : अवताराण ॥२८॥ तो तिहिं परि-

षिच्यमान : त्या जळामाजि असोन ॥ क्रीडता जाला रमारमण : गोपीसिं युक्त ॥ २९ ॥ असो त्या ज्या गोपयुवती : उक्तलक्षण व्रजसती ॥ कृष्णस्था असोनि तत्प्रीती : नीच नवी ज्यांचि ॥३०॥ तिहिं समस्ति युवतीं : शिंपिला होंत्साता श्रीपति ॥ अविष्ठुनि त्याची मीतीः क्रीडला तिहिंसिं ॥ ३१ ॥ आणिक तों किंविशेषण : तरि समस्ता गोपी मीळोन ॥ तिहिं स्वप्रेमावलोकन : समर्पिलें जयातें ॥ ३२ ॥ असो सर्वाहि प्रेमसंपन्ना : भाग्याच्या पुण्यनयना : ज्या प्रेमकटाक्षइक्षणा : तिहिं प्रेमें पाहिला जो ॥ ३३ ॥ नाना त्यांचं प्रेम जें प्रजळ : नेत्रिं योजलें प्रेमजळ ॥ त्या जाळें तो जळदनीळ : प्रेमाथिला होंत्साता ॥ ३४ ॥ ते अविष्ठुनि त्या गोपबाळी : तो खेळतां जळ कल्लोळिं ॥ भाग्याचा त्यासि वनमाळि : फावला प्रत्यक्ष ॥ ३५ ॥ नाना तिहिं प्रिया लागुन : केलें प्रेमजळें स्नपन ॥ आणि प्रेमेक्षणे संमर्पुन : योजिली पुजा प्रियाची ॥ ३६ ॥ आतां त्या गोपी किंविशेषणा : जिहिं पुजिला तो यदुराणा ॥ तरि त्या प्रहसितानना : सुखावल्या तत्संगें ॥ ३७ ॥ अथवा गोपीकांची जे प्रीती : ते कृष्णिं सरपिली पुरति ॥ तेणे संतोषलि ते मूर्ति : तिया प्रेरिलें हास्य ॥ ३८ ॥ त्या सुखभरें हास्ययुक्ता : प्रसन्नवदना योषिता ॥ तिहिं त्या जळें इतस्तता : सिंचिला होंत्साता कृष्ण ॥ ३९ ॥ तिहिंसि तो यमुनाजळिं : करिता जाला जळकेळि ॥ स्वसुखें त्यातें वनमाळी : रमवीत होंत्साता तेथें ॥ ४० ॥ आणिक तो गोपीरमण : ह्मणाल किंविशेषण ॥ तरि विमानस्थ देवगण : तेथें जे आले होते पुर्वी ॥ ४१ ॥ ते लक्षुनि रासोत्सवातें : अधिष्ठुनि विमानशतें ॥ कृष्णदर्शनलालसे तेथें : उत्साहें आकाशगत होते जे ॥ ४२ ॥ ते स्वर्गा पासुनि येउन : पुष्पसंभारातें घेउन ॥ पुजिते जाले अमरगण : पुष्पवृष्टिकरिं श्री कृष्णातें ॥ ४३ ॥ तिहिं वैमानकिं स्तूयमान : करितां गुणगायन ॥ तो स्वतां क्रिडापरायण : रमता जाला तत्प्रेमजाळें ॥ ४४ ॥ असो नभगतें सुरशतें : अविष्ठुनिया विमानातें ॥ वर्षत होंत्साति कुसुमातें : कृष्णगुण गात गातां ॥ ४५ ॥ तें महोत्साहभरितचित्तें : निर्मळा कृष्णयशातें ॥

अपेक्षुनि निजकल्याणातें : वर्णित असतां ॥ ४६ ॥ तो नंदानंदन वनमाळी : त्या युवतीप्रेमकल्लोळीं ॥ करिता जाला आनंदकेळि : आत्माराम असोन हिं ॥ ४७ ॥ असो तो नित्यानंदघन : सच्चिदानंद परिपूर्ण ॥ तथापि भक्ता लागि सकरुण : अनादि स्वभाव याचा ॥ ४८ ॥ त्या भक्त प्रेमाचिया लालसा : तो रमला प्राकृता ऐसा ॥ हस्तिनीं सहित जैसा : मदोन्मत्त हस्ती रमतसे ॥ ४९ ॥ त्या मदोन्मत्ता गजाचे परिं : गजिनीतुल्य त्या सुंदरी ॥ तिहिंसि तो बाळ ब्रह्मचारि : रमला कौतुकें ॥ ५० ॥ तो गज आसक्त जैसा काहिं : रमतां गजिनींचा ठाइं ॥ तैसा हा आसक्त नसोन हिं । रमला भक्तिप्रेमें ॥ ५१ ॥ परि दाउनि आसक्तरीती : रंजविल्या व्रजयुवतीं ॥ आपुला ठाइं त्यांची पुरती : चित्तवृति वळकाविली तेणें ॥ ५२ ॥ एवं दाउनि गजेंद्रलीळा : जाळें तिहिंसि तो क्रीडला ॥ वाचरि वृत्तांत वर्तला : तोही आइक सावध ॥ ५३ ॥

**ततश्च कृष्णोपवने जलस्थल-**
**प्रसूनगंधानिलजुष्टदिक्तटे ॥**
**चचार भृंगप्रमदागणावृतो**
**यथा मदच्युद्द्विरदः करेणुभिः ॥ २५ ॥**

त्या जळक्रीडेतें संपादुनः तियां गोपी सह्वर्तमान ॥ नदानंदन श्रीकृष्णः विचरता जाला कृष्णोपवनिं ॥ ५४ ॥ असो त्या जळक्रीडेवारि : तो गोपीरमण मुरारी ॥ यमुना उपवना माझारि : फिरता जाला सर्वत्र ॥ ५५ ॥ तें यमुनेचें उपवन : जारि ह्मणाल विलक्षण ॥ तरि त्या वनातें आश्रुन : जळाशय जे होते ॥ ५६ ॥ तत्संबंधी त्या पुष्पजाति : अति सुगंधातें प्रसवति ॥ आणि तेथेंचि वनस्पति : होते पुष्पसंपन्न ॥५७॥ त्या कुसुमाकरांचि द्युति : बहु सौगंध्याचि संपत्ती ॥ ऐसे जळाश्रयें वनस्पति : सुमनसुगंधित ते ॥ ५८ ॥ तेणें सुगंधें तेथें पवन : राहिला दिशातें व्यापुन ॥ त्या पवनेंकरीं उपवन : सुगंधित जाळें ॥ ५९॥ आणि तट या पदें संज्ञीत : त्या उपवनाचे जे प्रांत ॥ तेहि सुगंध-वायुस्पर्शित : असते जाले ॥ ६० ॥ एवं ते यमुनोपवन : अत्यंत सुगंधें

संपन्न ॥ तेथें तो सुगंधित पवन : व्यापला सर्वत्र ॥६१॥ त्या सुगंध पवनें स्पर्शित : उपवनाचे दिशाप्रांत ॥ ते दिग्भेद जाले सुगंधित : भवंताले अव-घेही तेणें ॥ ६२ ॥ असो या सुगंधें करुनि : दुरस्थही प्राणी असोनि ॥ अनायासेंचि तेथुनि : विश्रांतीतें पावति ॥ ६३ ॥ तया उवपना माझारि : घेउनियां व्रजसुदंरी ॥ तो यशोदानंदन श्रीहरी : क्रीडता जाला ॥ ६४ ॥ नाना तो उत्सव प्रकटउनि : तयां निजभक्तां लागुनि ॥ तो आपुलीया प्रेमाजीवनि : रमविता जाला ॥ ६५ ॥ यावरि दैव-निबंधन : प्राप्त जालें जें विहरण ॥ तें करावया दैवक्षपण : बाहेरि आ-णिल्या ॥ ६६ ॥ जेवि कोण्ही योगीजन : अविद्येतें निवर्तउन ॥ गुरुशा-स्त्रवीचारें करुन : पावती समाधीतें ॥ ६७ ॥ तथापि प्रारब्धप्रेरित : ते देहयात्राक्षपणार्थ ॥ स्वरुपीं असोनि चित्त : व्यवहारिं वर्तति ॥ ६८ ॥ परि त्यांचें तें विहरण : समाधीसिही समाधान ॥ असोनि करी संन्निधान : स्वरुपेंसिं ॥ ६९ ॥ तेवि गोपिकातें मुरारि : यमुनाजीवना बाहेरी ॥ आ-णुनि तियेचाचि तीरीं : उपवना माजि क्रीडला तो ॥ ७० ॥ तेणें भक्तांचिया करुणें : सकळांतर्गतें सुजाणें ॥ यशोदानंदनें श्रीकृष्णें : तियां ललनातें घे-ऊनि तेथें ॥ ७१ ॥ आपुलेनि छंदें त्यां सांगातें : सुखें जालें विचरिजेतें ॥ तेचि विचरण गोपींतें : समाधिस्थानि योजिलें॥७२॥अहो भलते प्रकारें चित्तिं सदां असावी कृष्णमुर्ति ॥ मग तेथे समाधि ते किति : सर्वोपरमस्वरुप ॥७३॥यया अर्थातेंचिं लक्षुन : वर्णिलें कृष्णाचें विचरण॥आणि येथें तेहिं उपवन : समहिमान वर्णिजें असे ॥७४॥तो उपवनिं विचरता : जो श्रीरमादेवीचा भर्त्ता॥ तो श्रीकृष्णजी प्रथमता : स विशेषण वर्णिला असे येथें ॥ ७५ ॥ त्या सुंदरीं सहवर्तमान: ऐसी पुर्वींचि दाविलि खुण ॥ तो जो काहिं प्रमदागण: त्या प्रमदा-गणेंसिं आवृत ॥ ७६ ॥ असो उपवना माझारि : भवंताल्या प्रमदांच्या हारी ॥ तो नंदानंदन कृष्ण हरी : विचरता जाला निजविलासें ॥ ७७ ॥ नातरि त्या तरुणीं सहित : तो क्रीडता जाला रमानाथ ॥ येणें सुचविला संकेत : निष्कि-यत्वाचा कृष्णविषइं ॥ ७८ ॥ पुरःसरुनि प्रमदांतें : क्रीडणें घडलें श्रीकृष्णा

तें ॥ कां जें भक्तवात्सल्या परतें : त्यासि प्रयोजनचि नाहिं ॥ ७९ ॥ अनादि विलासें करून : दाउनि देवभक्तपण ॥ आपुलेचि ठाइं तो आपण : भक्तत्वें हिं भजत असे ॥ ८० ॥ तेथें भेदासि नसोनि ठाव : हा अनादि लीलास्वभाव ॥ जऱ्हीं क्रियेचा असंभाव : तऱ्हि भक्तनिमित्तें घडलें हें ॥ ८१ ॥ यास्तव हे जे काहिं प्रवृत्ति : ते भक्तांचि केवळ प्रीति ॥ त्या अवाप्तकामासि ये रीति : विहार घडला ॥ ८२ ॥ असो तो अवाप्तपुर्णकाम : परि भक्तकामकल्पद्(द्रु)म ॥ तो स्वता असोनि निष्कर्म : तिहिंसिं रमला येथें ॥ ८३ ॥ या रासोत्सव प्रसंगें : कृष्ण क्रीडता जाला आंगे ॥ किंवा याअनंगाच्या अनंगें : क्रीडविल्या गोपी ॥ ८४ ॥ तो क्रियाप्रचार जो काहिं : भासला श्रीकृष्णचा ठाइं ॥ परि त्यासि घडला नाहिं : क्रियाभिमान ॥ ८५ ॥ एवं तो नंदयशोदासुत : अंगीकारुनि भक्तभावार्थ ॥ प्रमदागणआवृत : विचरला त्या वनि ॥ ८६ ॥ परि त्या वीचरणीं काहिं : त्यासि कर्तृत्वाभिमान नाहिं ॥ ये विषइं दृष्टांत असे तोहि : आइक राया ॥ ८७ ॥ जैसा काहिं तो मदच्युत : महा गज अत्यंत मत्त ॥ गंडापासूनि मद श्रवत : ऐसा मदोन्मत्त हस्ती ॥ ८८ ॥ तेणें मदान्वितें गजें काहिं : विधि अविधि जाणनें नाहिं ॥ परि उगेंचि याति प्रवाहिं : गजिनी सवें ॥ ८९ ॥ त्या वनोपवनाचा ठाइं : तेंगें उगेंचि फिरावें सर्वत्रहि : तैसाचि येथें श्रीष्ण-हि : विचरला तिहिंसिं ॥९० ॥ आणि सुगंधित पुष्पमाळा : होत्या कृष्णाचिया गळां : लुब्ध होत्साते परिमळा : भ्रमर होते निकट ॥९१॥ ते भ्रमतां गंध-लोलुप : गुंजित होत्साते समीप ॥ कृष्णगुण गाउनि मधुप : काळ क्रमिति कृष्णसंयोगें ॥९२॥ त्यां भ्रमारिं तो गीयमान : तिहिंसिं सह वर्तमान ॥ मदगजाचे परि नंदनंदन : विचरला गोपीं सहित तो ॥ ९३ ॥ एवं भ्रमरप्रमदावृत : जागिजे भृंगि गोपीं सहित ॥ तो नसोनि कोठें आसक्त : फिरला इतस्तता तेथें ॥ ९४ ॥ जो स्वरुपानंदभरित : सर्व काल विशेषरहित ॥ सर्वथा हे अनात्म दृश्यजात : उपकरेना जेथें कदापि ॥ ९५ ॥ त्यासि या प्रचाराचा काहिं : अणुमात्र अनुगम नाहिं ॥ हें विश्वचि ज्याचा ठाइं : अभासोनि अर्थ-

ता नसे ॥ ९६ ॥ अथवा तो सत्ता साधारण : अवधेचि ठाइं जो समान ॥ कृष्णेंसि हा भृंगगोपीजन : निर्विशिषें उपचरला ॥ ९७ ॥ या लागि अधिष्ठुनि मायतें : तिहिंसिं कृष्णें विचरिजेतें ॥ पारि हें तेणें परमार्थें : काहिंचि अंगी केलें नाहिं ॥ ९८ ॥ तो स्वता निःकाम असोन : गोपिचें केलें कामशमन ॥ ऐसें काहिं आलें घडोन : पारि तो सदा अनासक्त ॥ ९९ ॥ कां जयाचि अभिप्रायातें : इयेचि ग्रंथि मुनिनाथें ॥ सुचिलें तेंहिं पुढें प्रशस्तें : वाखाणिजेल प्रसंगें ॥ ७०० ॥ प्रस्तुत कथानुसंधान : केलें रासोत्सव वर्णन ॥ त्या उत्सवाचें उपसंहरण : अवधारिं राज चुडामणि ॥ ७०१ ॥

**एवं शशांकांशुविराजिता निशाः**
**स सत्यकामोऽनुरताबलागणः ।**
**सिषेव आत्मन्यवरुद्धसौरतः**
**सर्वाः शरत्काव्यकथारसाश्रयाः ॥ २६ ॥**

एवं पुर्वोक्त लक्षण : त्यां गोपीं सहवर्तमान ॥ तो सत्यसंकल्प श्रीकृष्ण : क्रीडला जो येथें ॥ २ ॥ अधिष्ठुनि रासक्रीडेतें : सेविता जाला त्यां रात्रीतें ॥ असो रात्रिलक्षणें येथें : एकांत सुचिला ॥ ३ ॥ नातरि तो जो गोपीजन : जो गृहादिकिं आशाविहिन ॥ सर्व सांडुनि त्यांचें मन : कृष्णपर जालें ॥ ४ ॥ त्या एकनिष्ठा चित्तवृत्ति : वृत्तिरुपें शोभल्या राति ॥ तियां रात्रीतें तो श्रीपति : सेविता जाला ॥ ५ ॥ जर्‍हि तो सुजान श्रीकृष्ण : सदां सर्वत्र विद्यमान ॥ तथापि तत्प्राप्तीचें स्थान : शुद्धांतःकरण राया ॥ ६ ॥ ह्मणोनि त्यांच्या चित्तवृत्ति : त्या वृत्तिस्वरूपा या राति ॥ रात्रि संकेतें त्या एकांतिं : आप्त केल्या कृष्णें ॥ ७ ॥ तियां शोभना रात्रीतें : सेविलें तेणें नंदसुतें ॥ त्या रात्री सविशेषणा तुतें : निरोपिजताति राया ॥ ८ ॥ तरि शशांक जो निशापति : तत्संबंधी ज्या रश्मिपंक्ति ॥ तिहिं उज्वालिता शोभति : भक्त चित्ताचे परिं ॥ ९ ॥ तेणें निशाभिनिवेश केला : तो आजि सार्थक योजला ॥ स्वचरितिं संतोषविला : वैकुंठीचा राणा कृष्ण ॥ १० ॥ कींवा मनोभिमान धरीला : तोही आजिचि सार्थ जाला ॥

जो गोपमिनें आराइला : कृष्णप्राप्ति लागि ॥ ११ ॥ यास्तव रासोत्सवाचा ठायिं : उपकार जाला चंद्राचाहि ॥ परि कृष्णिं सत्यत्वें नाहिं : उपकरे ऐसें येथें ॥ १२ ॥ एवं चंद्रांशुमंडिता निशा : नावेक प्रिय जाल्या रमेशा ॥ जेथें त्यां गोपींची आशा : फळदशेसि आली ॥ १३ ॥ आत त्या रात्रिचें लक्षण : विशेषणांतरें करुन ॥ जियां रात्रितें रमारमण : सेविता जाला गोपीसवें ॥ १४ ॥ तरि शरत्काळसंभव गुण : जे कवीश्वरिं कथ्यमान ॥ निर्मळां जाळिं संपुर्ण : जलाशय जेथें होते ॥ १५ ॥ तयां जळाशयांतर्वर्ति : कमळांचिया शुद्ध पंक्ति ॥ त्या विकासलिया विराजति : आणि वायुही जेथें ॥ १६ ॥ आणिक ही उचित गुण : जिहिं एकांतासि येतें मन ॥ ज्यातें वर्णिती कवीजन : या शरत्काव्यकथा ज्या ॥ १७ ॥ तेथें जे काहिं रसोत्पत्ति : तद्रसाश्राया शारदीया राति ॥ ज्या सर्व गुणाच्या संपत्ति : कृष्णप्राप्तिकरा ॥ १८ ॥ जेवि योगियांचिं चित्तें : स्वरुपलब्धिचे निमित्तें ॥ नाशोनियां दुष्टा गुणातें : शुद्ध गुणें शोभति ॥ १९ ॥ तेवि त्या उत्तमगुणा निशा : प्रीतिकरा जाल्या रमेशा ॥ ज्यां माजि सांडु सर्वांशा : अबळासमुदाय तो ॥ २० ॥ वोवाळुनि निज जीवितें : तो प्रिय जाला कृष्णजीतें ॥ या लागि ह्मणतिलें त्यांतें : जें अनुरताऽबळागण ॥ २१ ॥ ह्मणिजे अबळा ज्या वनिता : त्या सांडुनि गृहादि आस्था ॥ कृष्णिव ज्या अनुरक्ता : तिहिंसि युक्त तो ॥ २२ ॥ सर्वें वेढुनि गोपजाया : पूर्वोक्ता ज्या रात्री तिया ॥ शरत्काव्यकथारसाश्रया : सेविल्या त्या श्रीकृष्णें ॥ २३ ॥ एवं उत्सवातें अधिष्ठुन : त्यां गोपीं सहवर्तमान ॥ रमता जाला नंदानंदन : त्यांचिया इच्छानुरुप कृष्ण ॥ २४ ॥ तरिहि आत्मनिष्ठे पासुन : सर्वथा न पवे स्खलन ॥ ह्मणोनि सौरत जें मैथुन : तें करितां त्या गोपींसि ॥ २५ ॥ प्राकृतां पुरुषांचा ठाईं : साधारण मदन जो काहिं ॥ जो सुरत प्रांतसमई : वीर्यरूपें च्यवन पावतो ॥ २६ ॥ परि कृष्णें भोगितां गोपींगण : न पवेच वीर्य च्यवन ॥ त्या सौरताचें संरोधन : करिता जाला कृष्ण ॥ २७ ॥ स्वता असोनि कामपूर्ण : त्यांसि पावउनि रेतच्यवन येणें न्यायें सत्यकाम कृष्ण : रमला गोपिकांसि तेथें

॥ २८ ॥ किंवा सत्यकाम हें संज्ञा : जें पूर्वीं त्यांसि केली संभोगाज्ञा ॥ ते केली सत्य प्रतिज्ञा : या रासप्रसंगीं ॥ २९ ॥ असो तो स्त्रीकाम जो काहिं : रोधिला आपुलें ठाइं ॥ न भंगोनि पुर्णत्व पाहिं : कृष्णें भोगिल्या गोपी ॥ ३० ॥ तो अवाप्तसकळकाम : तेथें कैंचा स्त्रीकामागम ॥ परि त्यांसि दाविला हा संभ्रम : कामकळा सौरतसुखाचा ॥ ३१ ॥ असो स्वता असोनि निःकाम तो भक्तकामकल्पदृ (द्रु)म ॥ निजजनमनविश्राम : योगमाया विलासिया ॥ ३२ ॥ तो भक्तकाजकैवारि : भक्तां लागि काय न कारि ॥ या प्रसंगें सुंदरी : गोविल्या निजस्वरूपिं ॥ ३३ ॥ किंवा सौरत जें आत्मप्रीति : आत्मत्वें भक्तांची रति ॥ त्या प्रीतीस्तव निजसुरतिं : त्या आत्मानिष्ठा केलिया ॥ ३४ ॥ एवं त्या गोपीकां सांगातें : रमिजेतें जालें रमाकांतें ॥ आणि त्याही सांडुनि स्वपतितें : वश जाल्या कृष्णासि ॥ ३५ ॥ ऐसें जें घडोनि आलें : तेणें रायाचें मन सकोचलें ॥ हा अधर्म ऐसें भासलें : साशंकित जाला येथें ॥ ३६ ॥ ह्मणोनि श्रीशुकेंद्रा प्रति : करिता जाला प्रश्नोक्ति ॥ जे आइकतां रुशि (ऋषि) पंक्ति : अनुवर्णिली सूतें हिं ॥ ३७ ॥

॥ राजोवाच ॥

**संस्थापनाय धर्मस्य प्रशमायेतरस्य च**
**अवतीर्णोहि भगवानंशेन जगदीश्वर : ॥ २७ ॥**

तेणें रायें अभिमन्युसुतें : या परीक्षितें भागवतें ॥ संबोधुनि श्रीशुकातें : बोलिलें ऐसें जें ॥ ३८ ॥ अगाये ब्राह्मणा आइकें मात : तो साक्षात् श्रीभगवंत ॥ जगदीश्वर जगन्नाथ : निजांशें अवतरला ॥ ३९ ॥ येथें अंश संज्ञे करुनि : माया जाणावी चिद्रूपिणी ॥ तिये मायतें अधिष्ठुनि : धर्मसंस्थापना लागि यथें ॥ ४० ॥ आणि धर्माहुनि इतर : अधर्म जो अशास्त्राचार ॥ ज्या अधर्मीं रत पामर : निरयार्णविं पडती दुर्जन ॥४१॥एवं धर्माधर्म जे यथोक्त त्यांत धर्मपाळणार्थ ॥ आणि अधर्मनिरासार्थ : अवतरला जो आपण ॥ ४२ ॥ तो सांडुनि निज धर्मातें : अवलंबुनि ज्यार कर्मातें ॥ उपेक्षुनि

वेदवर्मातें : कैसा पां प्रवर्तला तो दुराचरणीं ॥ ४३ ॥ तो निषिद्धाचार किंलक्षण : तरि परदाराभिमर्शन ॥ मेळउनि परस्त्रीजन : संभोगिला आपणें ॥ ४४ ॥ असो अधर्मी माजि पाहीं : सामान्य आचरला नाहिं ॥ परम अन्याय जो काहीं : परस्त्रीसंगचि हा ॥ ४५ ॥ त्या परदाराभिमर्शीतें : कैसें जालें अनुष्ठिजेतें ॥ ह्मणाल अवडित ही घडतें : प्रमादास्तव कांहिं ॥ ४६ ॥ तरि न्याय किंवा विपरीत : असती अवघे शास्त्रोक्त ॥ तया शास्त्रेंसि भगवंत : वेगळा नसे सर्वथा ॥ ४७ ॥ ते उक्त धर्म इये जनीं : बोलिले जे सेतुस्थानीं ॥ त्या सेतुतें लंघिती जे कोण्हि : ते दंड्य भगवंतातें ॥ ४८ ॥ कां जे त्या धर्मसेतुचा कर्ता : आपण त्या धर्मांचा वक्ता ॥ आणि उक्त धर्मांचा पाळिता : स्वताचि भगवंत ॥ ४९ ॥ असो तो शास्त्रयोनि : आणि शास्त्रवक्ते जे कोण्हि ॥ त्याचे बुद्धिमाजि प्रवेशोनि : आपण वक्ता ॥ ५० ॥ आणि शास्त्रद्वेष्टे जे कोण्हि : तेथें न्यायेंरुप होउनि ॥ त्या अधर्मियांतें दंडोनि : धर्मातें संरक्षिता ॥ ५१ ॥ त्या सर्वद्रष्टया कृष्णातें : प्रमाद काइसा आला येथें ॥ परि प्रत्यक्ष धर्मातें : उच्छेदिलें दिसतें ॥ ५२ ॥ येथें आणिक विचारुं आतां : जें तो धर्माचा वक्ता कर्त्ता ॥ जन्हिं स्वधर्म पाळिता : या लोकाचा ठाईं ॥ ५३ ॥ तथापि तो होउनि कामी : जरि प्रवर्तला या अधर्मी ॥ तरि त्याचा ठाईं कामोर्मी : अघटिता सदां ॥ ५४ ॥ ऐसें विचारुनि स्वचित्तें : मागुती राजा परीक्षिति ॥ त्या विप्रेंद्रा शुका प्रति : बोलतुसे ऐसें ॥ ५५ ॥

**स कथं धर्मसेतूनां वक्ता कर्ताभिरक्षिता ॥**
**प्रतीपमाचरद्ब्रह्मन्परदाराभिमर्शनम् ॥ २८ ॥**

आइक विप्रेंद्रा विनती : तो पुर्णकाम यदुपति ॥ अधिष्ठुनि हे मायाशक्ति : अवतरला येथें ॥ ५६ ॥ अवलंबिला नराकार : परि तो ईश्वरांचा ईश्वर ॥ जिया सत्ता हें चराचर : वर्तत असे सकळही ॥ ५७ ॥ जेथें कामाची उभारणी : तैसा नव्हे तो क्षुद्रज्ञानी ॥ अवघियांहिं सुखांची खाणी : परम आनंदाचि मुर्ति ॥ ५८ ॥ जेणें आपुलिये सत्तें : रविरें येणेंडिया विश्वातें ॥ परि तो आपणा परतें : न देखेचि काहिं तेथें ॥ ५९ ॥ ह्मणोनि

तो सदां आत्मतृप्त : आपुलेचि ठाइं नित्य रत ॥ सकळकामसंप्राप्त : आपणेंचि करिं त्यासि ॥ ६० ॥ असो त्या कृष्णाहुनि परतें : कृष्णा सारिखें कैंचें येथें ॥ जें आवडेनि तयातें : क्षोभकारि होईल ॥ ६१ ॥ ज्या कृष्णाचिया अनोळखि : कामाचि प्रवृत्ती या लोकीं ॥ आणि कृष्णेंकरिं जे सुखी : ते निःकाम सदां ॥ ६२ ॥ त्या कृष्णासि कामें आकळिलें : हें कैसें घडोनि आलें ॥ त्याहि वरी कैसें योजलें : अत्यंत निंद्य कर्म हें किं ॥ ६३ ॥ कामी जे कोण्हीं असति : ते ही निंद्यकर्मि न प्रवर्तति ॥ मां कृष्ण तो धर्ममुर्ति : तेथें हें कैसें योग्य ॥ ६४ ॥ अहो निंद्य कर्मानिमित्त : विकारीही नव्हती आसक्त ॥ मां श्रीकृष्ण सदां तृप्त : त्यासि हे न घडावें ॥ ॥ ६५ ॥ याचा अभिप्राय जो काहिं : आह्मासि तों न पडे ठाइं ॥ बहु विचारिलें परि पाहिं : संशयो न तुटेचि ॥ ६६ ॥ आतां तुह्मि स्यामि सुव्रत : संदेह छेदानें समर्थ ॥ ह्मणोनि आमुचा प्रस्तुत : छेदावा संशयो ॥ ६७ ॥ एवं राजा तो परिक्षिति : सर्वज्ञ श्रेष्ठ कुरुपति तथापि लोकसंदेहनिवृत्ति : पुसता जाला हे ॥ ६८ ॥ तेणें प्रश्न केला पुर्वोक्त : त्या प्रश्नाचिया परिहारार्थ ॥ बोलतुसे मुनिनाथ : ते आवधारोतु सज्जन ॥ ६९ ॥ त्याचि अर्थाचि पुनरुक्ति : आइकतां ते ऋषि पंक्ति ॥ सूत बोलिला शौनकां प्रति : नैमिषारण्यि हें ॥ ७० ॥

॥ श्रीशुक उवाच ॥

**आप्तकामो यदुपति : कृतवान्वै जुगुप्सितम् ।**
**किमभिप्राय एतं नः संशयं छिंधि सुव्रत ॥ १९ ॥**

अगा ये राया परीक्षिति : तुवां केलि जे प्रश्नोक्ति ॥ तेचि आइक प्रत्युक्ति : निःसंदेहचित्तें ॥ ७१ ॥ तरि जे तपोज्ञानें संमृद्ध : ईश्वर जे पुराणप्रसिद्ध ॥ जे कोण्हीं समर्थ सुसिद्ध : देवऋष्यादिजन ॥ ७२ ॥ त्यांचा जो धर्मव्यतिकर : कदाचित् घडला संकर ॥ भासला जन्हि दुराचार : तन्हि तो विरुद्ध नव्हे कदा ॥ ७३ ॥ व्यास अगस्ति पाराशर : दुर्वासादि ऋषि थोर थोर ॥ असोनहिं ते विधिकिंकर : शापानुग्रहसमर्थ स्वता ॥ ७४ ॥ असो तपोबळें संपन्न : मृत्युलोकिं जे वर्तमान ॥ विश्वामित्रा-

दिक्षषिजन : विधि विषयही असोनि ॥ ७५ ॥ ते सामर्थ्यवंत होत्साते : उल्लंविते जाले धर्मातें ॥ तरि तो विधिव्यतिक्रम त्यांतें : बाधक जाला काइ येथें ॥ ७६ ॥ तिहिं तपोत्कर्षतेजोबळें : उद्भूत दोषांतें जाळिलें ॥ निरहंकृति कर्म घडलें : तें अकर्मचि जाणावें ॥ ७७ ॥ किंवा अनुसंधान नसोनि : अकस्मात् आलें घडोनि ॥ तें पेटउनि ज्ञानाग्नि : जाळिलें तिहिं निःशेष ॥ ७८ ॥ असो जे पुनः सृष्टीतें कर्ते : येवढिया सामर्थ्यातें धर्ते ॥ मग विधिव्यतिक्रम त्यांतें : बाधील काइ राया ॥ ७९ ॥ आतां तो देव महां पिता : प्रजापति जो सृष्टिकर्त्ता ॥ तो हि देखोनि निजदुहिता: कामातुर जाला तत्सौंदर्यें ॥ ८० ॥ तो जो व्यतिक्रम घडाला : तो काइ तेणे विधीभंग केला ॥ कां जे विधीच न प्रवर्तला : तेथें विधिभंग तो काइ ॥ ८१ ॥ असो विधीच जेथें नाहीं : त्यासि अविधि तो काइ ॥ प्रयोजनेवीन तें कांहिं : त्यापासुनि न घडे सर्वहि ॥ ८२ ॥ आणि इंद्रचंद्रादि अमर : कर्मभुमीहुनी इतर ॥ त्यांचा ठाइं जो काहीं प्रचार : निषिद्धा ऐसा देखिला कीं ॥ ८३ ॥ परि तें जें कर्म घडलें : तें काय त्यांसि बाधक जालें ॥ कां जे विधीनें नाहीं गोविलें : इंद्रचंद्रादिकांते ॥ ८४ ॥ असो त्यां स्वर्गस्थांप्रती : नाहिं कर्मशास्त्र प्रवृत्ति ॥ यास्तव केलें कर्म मागुति : अदृष्टफळातें नेदि ॥ ८५ ॥ एवं जे कोण्ही तपोधन : जे ब्रह्मादि- तेजसंपन्न : त्यांचा दुराचार त्यालागुन : दोषास्पद न करी तो ॥ ८६ ॥ जेवि सकळभक्षक अनळ : पेटविला जो प्रबळ ॥ त्यासि समर्पेलें तें सकळ : भस्मीभूत होत असे ॥ ८७ ॥ त्या माजि पडलें जें काहिं : तें त्यासि विचारणें नाहीं ॥ तेवि तपोवंताचा ठाइं : जरि निषिद्धाचार जाला ॥ ८८ ॥ त्या तपोवन्हिमाजि पडला : तो तात्काळ भस्म जाला ॥ तो फळार्थ नाहिं उरला : ते जो तपसामर्थ्यें ॥ ८९ ॥ एवं ईश्वरांवें इये जनि : संपादित सामर्थ्य जे कोण्हि : तपोनिष्ठ आणि ज्ञानि : ख्यात जाले जे जे ॥ ९० ॥ तिहिं निषिद्ध ही जें केलें : तें त्यांसि फळ नाहिं जालें ॥ मां कृष्ण तों ब्रह्म सावळें : इश्वरांचा इश्वर ॥ ९१ ॥

मनुष्माकारें हि विशेषिं : सर्व सामर्थ्याचि राशि ॥ त्याहुताशाचाही हुताशिं : विरुद्ध तें काइसें ॥ ९२ ॥ आणि अमरत्वें हि पाहतां : जो पितामहाचाही पिता ॥ जन्हि तो धर्मवक्ता शास्ता : तन्हि विधिकींकर नव्हे ॥ ९३ ॥ अमरत्वाचेनि सामर्थ्यें : न बाधीजे त्या अमरातें ॥ तें अमरेश्वरा श्रीकृष्णातें : बाधील कोने न्यायें राया ॥९४॥ हा यशोदानंदानंदन : श्रीकृष्ण लीळावतरण ॥ उभयें प्रकारेंहिं करुन : दोषभागी नव्हे तो.॥९५॥ जैं कल्पांतजळीं पहुडला : तैं ब्रह्मा नाभिपद्मि जाला ॥ मग तेथुनि विस्तारला : हा जगदाकार येव्हडा ॥ ९६ ॥ तेथे अमर आणि ऋषिपंक्ति : त्याचा लेखा तो काइ किति ॥ तया कार्ष्णिं विधिशास्ति : घडेल पां कैसि ॥ ९७ ॥ तोचि हा जो यदुनंदन : कृष्णमुर्ति मनोरमण ॥ जो पृथ्विभारापहरण : अलौकिककर्मा प्रस्तुत ॥ ९८ ॥ त्या यमसदना पासुनि : ज्या गुरुपुत्रातें आणुनि ॥ गुरुदक्षिणेतें निस्तरोनि : अऋणी जाला आपण ॥ ९९ ॥ अतिक्रमुनि विप्रशापाते : निजभृत्या उद्धवातें ॥ उपदेशुनि निजज्ञानातें : संप्रदायार्थ ठेविलें येथें ॥ ८०० ॥ भंगुनि त्या इंद्राचा मान : मखिं यजिला गोवर्धन ॥ मगइंद्रकोपा पासुन : रक्षिले निजव्रजस्थ ॥ १ ॥ काळियातें निष्काशुन : शुद्ध केलें यमुनाजीवन ॥ तेणें वांचविले प्राण : गाई वत्स गोपाळांचे ॥ २ ॥ पुतना तृण बकासुर : अघ केशिक धेनुक खर ॥ केशनरकादि निशाचर : अनायासें मारिले हे ॥ ३ ॥ आणिक हि सांगावें किति : शरण येउनि प्रजापति ॥ लाजोनि करितां स्तुती : भयभीत जाला तो ॥४॥ तया इश्वरेश्वराप्रति : हे विधिभंग कैसे बाधिति ॥ तेणें भक्तेंहि एके रिति ॥ तारावीं दीनजनें ॥ ५ ॥ त्यासि भक्तकृपेवीण काहिं : सर्वथा कर्तव्यचि नाहिं॥ त्या पुर्णकामासि कोठें हिं : इच्छा चि नसे ॥ ६ ॥ अहो रविचिया राउळिं : काइ दीपें करावी दीवाळि ॥ किंवा क्षीरोदवीसी नव्हाळी : अजादुग्धाचि ॥ ७ ॥ अथवा पक्वान्नें भुकेळिं : गंगेसि तृशा उपजळि ॥ काइ चंद्रकळा उबेजली : व्यजनातें इछिळ ॥ ८ ॥ तरि तो आत्माभिराम : अवाप्तसकळकाम ॥ स्वता अपेक्षुनि गोपिसंगम ; कामी होईल ॥ ९ ॥ एवं तो यशोदा

नंदन : असोनि मदनमोहन ॥ परी तो तेणें गोपीका जन : रंजविला नावेक ॥१०॥ परि इये क्रीडेचा ठाइं : तो कृष्ण कामि जाला नाहिं ॥ तथापि येथें जें काहिं : भासलें विरुद्धसे ॥११॥ इश्वरत्वें कृष्णाच्या ठाइं : तें विरुद्धचि नसें कांहिं ॥ आतां आणिक ये विषईं : तुज होईल आशंका हे ॥ १२ ॥ कां जे प्रस्तुत इये लोकिं : श्रेष्ठ जें जें आचरती कीं ॥ त्या त्या तें पाहोनि आणिकीं : वर्तिजेतें तैसें तैसेंचि कर्म ॥ १३ ॥ यालागि येणें हि करुन : श्रेष्ठांचे जें दुराचरण ॥ तेंचि धर्मोच्छेदाचें कारण : जाणावें सर्वत्र इये सृष्टी मधें ॥ १४ ॥ ऐसें जरि ह्मणसी येथें : तरि आइक याहि उत्तरातें ॥ जें श्रेष्ठोक्त मान्य सर्वांतें : परि आचरण कृताकृत किं ॥ १५ ॥

नैतत्समाचरेज्जातु मनसापि ह्यनीश्वरः ।
विनश्यत्याचरन्मौढ्याद्यथा रुद्रोऽब्धिजं विषम् ॥ ३१ ॥

राया जो कोण्ही अनीश्वर : केवळ जो विधिकिंकर ॥ जो सर्वदा विषयतत्पर : इंद्रिया अधीन वर्तत असे ॥ १६ ॥ तेणें करावें शिष्टवचन : परि नाचरावें दुराचरण ॥ सामर्थ्यवीण उलंघन : स्वकर्माचें न करावें मुर्खत्वें ॥ ॥ १७ ॥ जरि तेणें कोणे हिं काळें : कदाचित दुष्कर्म केलें ॥ तरि सर्व स्वार्थातें दवडिलें : अधःपतन पाविजेल किं ॥ १८ ॥ अहो या सेतुभंगाचा ठाइं : आणिकासि अधिकार नाहिं ॥ हा इंद्रियग्राम जिहिं : जिंकिला असेल ॥ १९ ॥ ते जे तपोज्ञानें समर्थ : शापानुग्रहिं सामर्थ्यवंत ॥ ईश्वरत्वें त्यातेंचि उचित : हा अलौकिकाचार ॥ २० ॥ इतर जे तपोज्ञानहिन : जे असमर्थ मुर्ख जन ॥ ते आचरतां दुराचरण : नाशातें पावती तत्काळ किं ॥ २१ ॥ जैसा तो रुद्र जो भगवंत : तेणें विष जें समुद्रोद्भूत ॥ तें गिळुनि केलें कंठगत : स्वस्थ असोनि स्वानंदें ॥ २२ ॥ त्याहूनि जो इतर जन : तें प्राशितांचि विष दारुण ॥ तत्काळ पावेल तो मरण : स्पर्शमात्रें निश्चयेंसि ॥ २३ ॥ असो रुद्राहुनि जे हीन : तिहिं केलें विष प्राशन ॥ तरि त्यांसि पावतां मरण : विलंब नलगे काहिं ॥ २४ ॥ तैसा अविचारें जो कोण्ही : आपुलेचि ठायीं मुक्त मानी ॥ तो सर्वथा विरुद्धाचरणें : पावेल

नाश राया ॥ २५ ॥ असो उक्तक्रमें करुन : जालें जर्न्हि निजात्मज्ञान ॥ भाग्येंकरिं वासनाविहीन : जाला कदाचित् ॥ २६ ॥ तथापि संस्कारें करून : राहिलें जरि तारतम्यभान ॥ काहिं विहिताविहितज्ञान : उरलें जववरि ॥ २७ ॥ तंवरि हें पापाचरण : सर्वथा पावती पतन ॥ विरुद्ध फळतें भोगउन : कष्टवील अनुजर्न्मि ॥ २८ ॥ ज्याचें काळावरि शासन नाहिं : त्यासि काळ सोडील काइ ॥ नेणत पाडील पाइं : कृतकर्मबेडि ॥ २९ ॥ यांलागि ईश्वराचा आचार : केवि आचरती अनीश्वर ॥ आचरती तरि पामर : पडतील अपाइं ॥ ३० ॥ ह्मणसि श्रेष्ठाचार लक्षुनी : वर्तांव इतरिं सुजनिं ॥ हा जो शास्त्रार्थ कैसेनि : प्रमाण होइल ॥ ३१ ॥ असो जें जें आचरती ज्ञातें : तेंचि प्रमाण आणिकातें ॥ तरि उक्त निरूपण येथें : विरुद्ध होईल ॥ ३२ ॥ ऐसें गमेल तुझा चित्तीं : तरि येचि विषइं पुढति : आइक धर्माचरणाप्रति : शास्त्रचि प्रमाण ॥ ३३ ॥

ईश्वराणां वचः सत्यं तथैवाचरितं क्वचित् ॥
तेषां यत्स्ववचोयुक्तं बुद्धिमांस्तत्समाचरेत् ॥ ३२ ॥

जयांचि ईश्वरत्वें ख्याति : हे शास्त्रें जयांचिया उक्ति : आचारासि प्रमाणें होति : तत्शास्त्रवचने येथें ॥ ३४ ॥ जे कोण्ही शास्त्रप्रसिद्ध : वशिष्ठादिक वृद्ध वृद्ध ॥ जयाचिया उक्ती निर्विवाद : सर्वत्र संमता जनासि ॥३५॥ हेंचि ईश्वराचें आचरण : तरि तें करावें लोकिं प्रमाण ॥ जरि यगेसि तयाचें वचन : ऐक्यता पावे धर्मशास्त्रिं ॥ ३६ ॥ आणिक तत्कर्म जें काहिं : जेथें वचन संमत नाहिं ॥ तें कोण्हासही कदापि हि : कर्तव्यचि नसे ॥ ३७ ॥ एवं ईश्वर जें सलक्षण : त्यांचें वचनाचि प्रमाण ॥ तें जें काहिं बोलिलें तें जाण : मानावें सत्यत्वें ॥ ३८ ॥ आणि त्यांचें जें आचरित : तें कदाचित् मानावें सत्य ॥ जें काहिं तद्वाक्यसंमत : असेल लोकमान्य ॥ ३९ ॥ म्हणोनि येथें बुद्धिवंति : त्यां इतरांची वर्तती रीति ॥ न विचारुनि ते जे बोलति : तेंचि आदरावें जनिं ॥ ४० ॥ एवं थोराचें आचरित : जें काहिं शास्त्रेंसि संमत ॥ तें घ्यावें आणि विपरीत : तें न करावें सर्वथा ॥ ४१ ॥ तें अत्यंत

सामर्थ्यबळें : त्यांसि बाधक नाहिं जालें ।। पारि आणिकें जरि आचरिलें : तरि संकटिं पाडिल ।।४२।। कां जें तपोज्ञानेंसंपन्न : ते असोनि विकारशुन्य ।। कदाचित् विधिउल्लंघन : कोण्हे एके निमित्तें घडे ।। ४३ ।। तरि अचिंत्य तेजोबळें : त्यासि तें विरुद्ध न जालें ।। आणि तें तत्कीर्तीसि योजलें : सर्व जना माजि महत्वें ।। ४४ ।। तस्मात् इश्वरांचें जें उक्त : ते सर्वांसि प्रमाणभूत ।। पारि त्यांचे सामर्थ्याचरित : असाध्य तें आणिकातें ।। ४५ ।। एवं यणे उक्त प्रकारें करुन : राजप्रश्नाचें परिहरण ।। केलें तेंचिं सविशेषण : बोलताति मुनिनाथ ।। ४६ ।।

**कुशलाचरितैस्तेषामिहस्वार्थो न विद्यते ।।**
**विपर्ययेण चानर्थो निरहंकारिणां प्रभो ।। ३३ ।।**

तो राजा राजचूडामणी : भागवतां माजि तो अग्रणी ।। या लागि हे प्रभो ह्मणोनि : संबोधिलें श्रीशुकेंद्रें ।। ४७ ।। प्रभो आइक परीक्षिती : त्यां ईश्वरांची वर्तती स्थिति ।। पूर्वग्रंथें जें कांहिं तुजप्रति : निवेदिलें कृताकृत ।।४८।। तयां ईश्वरांचा ठाइं : विहिताचा नियम नाहिं ।। किं अनियताचा त्यांसि कांहिं : अस्वार्थही नसे येथें ।। ४९ ।। स्वरुपानंद लाभेंकरुन : ते सर्वत्र त्यक्ताभिमान ।। हें अविद्याकृत दृश्यभान : नसे त्यांसि सर्वथा ।। ५० ।। असा हा प्रपंच जो कांहिं : तो सकारण जेथें नाहिं ।। मग त्यांसि प्रयोजन काइ : ग्रहणत्यागविषयिक ।। ५१ ।। किंवा सदाचारें जें व्हावें : तत्स्वरूपचि ते स्वभावें ।। आतां अकर्में संभवावें : विरुद्ध फळ त्यांसि कांहिं ।। ५२ ।। तरि त्यां ईश्वराचा ठाइं : या दृश्याची वार्ता ही नाहिं ।। परंतु उगाचि हा जो कांहिं: प्रकृतिप्रवाह यांचा ।। ५३ ।। तें जरि प्रवाह पतित : विधिसि जाले विपरीत ।। तरि तें विरुद्धाचरित : आणिकांसि प्रमाण नव्हें ।। ५४ ।। ते जे तिहिं साहस केले : ते प्राकृता योग्य नाहीं जाले ।। जैसें समुद्रिं वर्षलें : मेघां पासुनि उदक हें ।। ५५ ।। एवं कृष्णाहुनि इतर : महत्प्रभावें जे जे इश्वर ।। ब्रह्मेंद्र चंद्रादि अमर : किंवा वसिष्ठ विश्वामित्रादि ऋषि ।। ५६ ।। त्यांचे जें प्रवाहचरित : न्याय अथवा विपरित : तें त्यांसि न जालें फळवंत : कदा-

चित काहिंहिं ॥ ५७ ॥ मां साक्षात् श्रीकृष्णाचा ठाइं : राया हे आश्चर्य काई ॥ तुवां काय आइकिला नाहिं : कृष्णाचा महिमां ॥ ५८ ॥

**किमुताखिलसत्वानां तिर्यङ्मर्त्य दिवौकसाम् ।**
**ईशितुश्चेशितव्यानां कुशलाकुशलान्वयः ॥ ३४ ॥**

राया हा नंदानंदन : हें याचें मायाविडंबन ॥ परि हे चराचर जन : सर्वही प्राणी ॥ ५९ ॥ हें विश्व जयाचिया सत्ता : पात्रलें असे सर्वसंस्था ॥ ह्मणोनि हा कृष्ण शास्ता : सकळांचाहि ॥ ६० ॥ सर्व प्राणी ते कोण कोण : तरि पशु पक्षी सर्पादि गण ॥ पर्वत वृक्ष लता तृण : आकाशादि तत्वें ॥ ६१ ॥ आणि देव गंधर्व किंन्नर : यक्ष राक्षस असुर ॥ खेचर नर जळचर : इत्यादि चराचर सकळ सत्वें ॥ ६२ ॥ जो या विश्वाचा येक शास्ता : जो सकळांचाही रक्षिता ॥ तोची श्रीकृष्ण क्रीडता : जाला गोपी सवें ॥ ६३ ॥ त्या ईश्वराचिं ईशितव्यें : धर्मसंरक्षणकर्त्तव्यें ॥ जें भक्तांसि होती स्मर्त्तव्यें : प्रारब्धक्षया लागि ॥ ६४ ॥ त्यां कर्त्तव्यामाजि काहिं : कुशलाकुशलन्वयो नाहीं ॥ शुभाशुमचि त्याचा ठांई : गणना चि नसे ॥ ६५ ॥ अंगीकारुनि मायतें : त्या निज मायेचेनि हातें ॥ जें जें कर्त्तव्य भासलें तेथें : तें कर्त्तव्यचि नव्हे त्याचें ॥ ६६ ॥ अहो कर्तृत्व चि नाहिं ॥ तेथें पापपुण्यें लेखा काइ ॥ कुशलाकुशलान्वयो काहिं : कृष्णक्रीडेमाजि नसे ॥ ६७ ॥ तो श्रीकृष्णजी किलक्षण : तरि आइक तो समहिमान ॥ त्याचें जें लीळाक्रीडण : तें बंधक नव्हे त्यातें ॥ ६८ ॥

**यत्पादपंकजपरागनिषेवतृप्ता योगप्रभावविधुताखिलकर्मबंधाः ॥**
**स्वैरं चरंति मुनयोपि ननह्यमानास्तस्येच्छयात्तवपुषः कुत एव बंधः ३५**

जयाचे पदपद्मपराग : सेवित जाले ऋषिभृंग ॥ होउनि सर्वत्र वीतराग : पदसरोजिं जडले ॥ ६९ ॥ असो ज्या पदरजिं तृप्त : ह्मणोनि ते सर्वत्र विरक्त ॥ तोचि योगियांसि यथोक्त : परम योग घडला ॥ ७० ॥ तया योगप्रभावबळें : सर्व कर्मबंधातें धुतलें ॥ मग प्रारब्ध जें उरलें : देहोपा-

धिसंगें ॥ ७१ ॥ त्या बाधितप्रवाहेंकरिं : ते असती यथेच्छाचारी ॥ सर्व प्रयोजनशून्य तन्हि : उपाधिप्रवाहें वर्तती ॥ ७२ ॥ जेवि जन्हि वायुवेग गेला : तान्हि वृक्षिं डोल उरला ॥ किंवा लक्ष्य भेदुनि पुढें नेला : संधानबळें शर जैसा ॥ ७३ ॥ तेवि अज्ञान नाशाही वरि : प्रारब्धप्रवाहेंकरिं ॥ ते वर्तती निजाचारिं : इतरां ऐसे ॥ ७४ ॥ तोही त्यांचा प्रचार जो काहिं : तो सर्वत्र समान नाहिं ॥ भूमिकाभेदेचि पाहिं : ते यथेच्छ वर्तती ॥ ७५ ॥ कोण्हीं उन्मत्त जडा ऐसे : वर्तती भूमिकाविशेषें ॥ नेणतीच त्यांचीं मानसें : तारतम्यातें ॥ ७६ ॥ बाधितही भेदभान : नेणेचि जयाचें मन ॥ त्यां प्रति विधि तो कोण : निषेध तो काइ येथें ॥ ७७॥ सदां शुष्कपर्णासमान : ते सर्वत्र संकल्पशुन्य ॥ वर्ततांहिं त्यांचें अंतःकरण : क्रियालिप्त नव्हेचि सर्वथा ॥ ७८ ॥ वसतिस्थान ना स्वनाम : विवेकु ना निजसंभ्रम ॥ समान अथवा हें विशम : आठउचि नसे जयांसि काहीं ॥७९॥ ऐसिये अवस्थेचा ठाइं : विधि आणि निषेध तो काई ॥ उगाचि पतितप्रवाहिं : विधि घडो किंवा निषेध ॥८०॥ तो कर्माभास काहिं त्यातें : सर्वथा न पाववी फळांतें ॥ आतां जाणति जे तारतम्यातें : अधिकारपरत्वें ॥ ८१ ॥ ते निषेध्य नसोनि चीत्तीं : परि निषिद्ध नाचरति ॥ आणि कार्येंवीणहिं करिति : जें शास्त्रीय असे तेंचि ॥ ८२ ॥ तें करूनहिं त्या कर्माचा ठाइं : आदर विशेषें नाहिं त्यांत कर्तव्यही जें काहीं : देहसंबंधाचि पुरतें ॥ ८३ ॥ द्रव्यार्जनादि व्यवहार : सांडुनि असत्यादि विकार ॥ केवळ देहस्थिति प्रकार : ते वर्तती उदासीन ॥ ८४ ॥ ऐसें जें काहिं संपादलें : तें शुभकर्मा ऐसें भासलें ॥ परि त्यांसि तें नाहिं जालें : कर्म फळदातें ॥ ८५ ॥ कां जें जन्हि ते कर्म शरीरिं : तान्हिं तत्पद सेवेचि करिं ॥ ते वर्तती स्वैर विहारी : मुक्तबंध होंत्साते ॥ ८६ ॥ किंवा त्यांसि नसे कहिं आस्था : स्वेच्छाचार हाचि आतां ॥ परि परमार्थें विचारितां : ते आत्मनिष्ठ ॥ ८७ ॥ जयांचिया चित्ताचा ठाइं : कर्मफळाचि इच्छा नाहिं ॥ तरि त्यांचें कर्म तें काई : बंधन होईल ॥ ८८ ॥ यास्तव ते ननहामान : ह्मणिजे वर्तती निर्बंधन ॥ तेय

दच्छालाभसंपन्न : मुक्त बंध सदा ॥ ८९ ॥ एवं ज्या पदरजोलेशा : लुब्ध जाले त्याचि हे दशा ॥ मां श्रीकृष्ण रमाधीशा : कर्मबंधी मानावा कैसा ॥ ९० ॥ जो नसोनि कर्माअधीन : स्वेच्छा वपुतें धरून ॥ केवळ भक्त परिपाळण : अवतारासि निमित्त ॥ ९१ ॥ राया तया कृष्णाचा ठाईं : कर्मबंधाची वार्त्ता कायि ॥ सर्वथा त्यासि आलि नाहिं : सेतुभगंता कर्माचि ॥ ९२ ॥ आतां कृष्णस्वरुपलक्षण : आणि कैसा तो मुक्त-बंधन ॥ आईक राया सावधान : तेहिं सांगतों ॥ ९३ ॥

**गोपीनां तत्पतीनांच सर्वेषामेव देहिनां ॥**
**योंतश्चरति सोध्यक्षः क्रीडनेनेह देहभाक् ॥ ३७ ॥**

या ज्या प्रेमळा गोपी सती : ज्या वर्णील्या किं तुज प्रति ॥ आणि त्यांचे मुख्य पृति : गोपाळ जे ॥ ९४ ॥ आतां होंचि ह्मणावें काइ : देहधारी जितुका कांहिं ॥ त्यामाजि कृष्णेवीण नाहीं : परमार्थ वस्तुगत्या ॥ ९५ ॥ तयां सर्वांचिया अंतरिं : स्वता असोनि सुत्रधारि ॥ आपुले योगमायेकरिं : बुद्धींद्रियचाळक ॥ ९६ ॥ ययां सर्वांतें भासउन : आपण जाला अधि-ष्ठान ॥ अणुमात्रहि कृष्णेविण : स्थितिगतीते न पवे कांहि ॥ ९७ ॥ ह्म-णोनि सर्वाध्यक्ष्यसंज्ञ : सर्वसाक्षी जो संगशुन्य ॥ तो नव्हे देहधारी श्री-कृष्ण : या क्रीडणेंकरिं ॥ ९८ ॥ राया अवधारिं प्रस्तुत : जेवि शुक्ति नव्हे-गा रजत ॥ सूर्योपाधि योगें भासत : रौप्याकारें शिंपि हे ॥ ९९ ॥ तेवि श्री-कृष्णाचा ठाईं : योगमायोपाधिप्रवाहिं ॥ भासलें जर्हि उदंड काहिं : तथापि तो प्रत्ययसाक्षी ॥ १०० ॥ तें साक्षित्व ही जें काहिं : भासलें कृष्णाचाचि ठाईं ॥ परि विचारितां तेथें नाहिं : साक्ष्यसाक्षित्वासि थारा ॥ १ ॥ परमार्थें असती साक्षिता : तरि अवश्य येती विकारता ॥ आतां हें जे क्रीडाप्रवाहता : तो वृत्तिविलास अववा ॥ २ ॥ ते चिद्विलासवृत्ति काहिं : श्रीकृष्णेंसि पृथक् नाहिं ॥ जैसी उष्णता अनुभवितां हिं : अग्नीसिं भिन्न नसे ॥ ३ ॥ तेवि विकारि जितुके काहिं : श्रीकृष्णेसिं भिन्न नाहीं ॥ परि कृष्णासि तें कधींहिं : विकारी न करि ॥ ४ ॥ ऐसी जे स्वरुपस्थिति : तेचि हे कृष्ण मंगळमुर्ति ॥ तेथें हे काय

उपतिष्ठति : तदाभासिक धर्म ॥ ५ ॥ हें अवघें चि असो आतां : या पर-दारा गोपकांता ॥ परियांसि जे कांहिं परता : ते गोपाळ संबंधे चि ॥ ६ ॥ तरि गोपिसहवर्तमान : गोपाळत्वें हिं तोचि कृष्ण ॥ हें कृष्णमायाविडंबण : जें येर्कि अनेक भासलें ॥ ७ ॥ एवं श्रीकृष्णेंवीण पाहिं : कोण्हासहि स्वतंत्रता नाहिं हा परापर भास जो काहिं : तो जीवदशेसि ॥ ८ ॥ जेवि घटादिकातें काहीं : मृत्तिकेसि परत्व नाहीं ॥ अनेकाकारें भासतां हिं : मृत्तिकाचि अवधि ॥ ९ ॥ तेवि श्रीकृष्णाचा ठाइं : गोपीगोपाळ आणि विश्वहि ॥ अभिन्नत्वें भासलें परी काहिं : कृष्णेंवीण नसे ॥ १० ॥ आतां हें भान जें मिथ्याभूत : तें जीवन्मुक्तासि चि अनुभूत ॥ श्रीकृष्ण तों वेदविख्यात : साक्षात् ब्रह्म ॥ ११ ॥ तया श्रीकृष्णाचें जें नव्हे : ऐसें एथें काय आहे ॥ तरि गोपिकांतें चि हें पाहे परत्व कैंचे आलें राया ॥ १२ ॥ एवं सर्वगत श्रीकृष्ण : असोनि सर्वांचेहिं जीवन ॥ बोलिलें विशेष वचन : जें गोपी आणि तत्पती ऐसें ॥ १३ ॥ याचा आशय ऐसा असे : जें गोपीसंगसुरतसें ॥ श्रीकृष्णासि घडला नसे : परदाराभिमर्श ॥ १४ ॥ येवढें हें जें जगद्भान : तें कृष्णेसिं नसे भिन्न ॥ ह्मणोनि तो संगविहीन : निर्विकार वस्तु किं ॥ १५ ॥ हा जगदाभास जो काहिं : तो दृश्यप्रतीतीचा चि ठाइं ॥ परि कृष्णेसिं किंचित् हि : व्यवधानें नसे हा ॥ १६ ॥ आतां भेद नसे जेणेसिं : तेथें हे प्रवृत्ति जालि कैसि ॥ तरि अधिष्ठुनि मायेसि : घडला हा क्रीडाविलास ॥ १७ ॥ या क्रिडा प्रसंगें करुन : भक्तकृपेतें अनुसरोन ॥ मनुष्यनाट्यानुकारण : दाविलें श्रीकृष्णें स्वता ॥ १८ ॥

**अनुग्रहाय भूतानां मानुषं देहमाश्रितः ॥**
**भजते तादृशीः क्रीडा याः श्रुत्वा तत्परो भवेत् ॥ ३८ ॥**

हें श्रीकृष्णाभिधानें करुन : केलें मनुष्यतनुधारण ॥ स्वता नसोनी प्रयोजन : भक्तानुग्रहार्थ ॥ १९ ॥ अनादियोगमायावशें : जेथें हा भेद नसोनि असे ॥ त्या प्रकारेंचि नावेकसें : हें हिं तनुधारण ॥ २० ॥ त्या मनुष्यदेहानुसार : दाविले हे क्रीडाप्रकार ॥ तेथें असोनि निर्विकार : सच्चिदानंदानुभवें ॥ २१ ॥

जो स्वस्थितीसि भंगकर : तो चि जाणावा पापाचार ॥ आतां हा जो क्रिडानुकार : कृष्णें जो दाविला ॥ २२ ॥ तेणें हा विकारि असता : जरि असती विषयास्था ॥ प्राकृताचे परि क्रीडता : अनुसंधानें वांचुन ॥ २३ ॥ तरि आइकतां या कथेतें : कैसे पां हे लोक तरते ॥ मागुती संसार दुःखातें : न भोगिते कैसे पां ॥ २४ ॥ अगा राया प्रस्तुत येथें: आइकोनि कृष्णक्रिडा ते ॥ तरोनि सकळ दुरितातें : तत्पर होति सर्व जन ॥ २५ ॥ तस्मात् हें पावनाचरण : नव्हे धर्मच्छेदाचें कारण ॥ या श्रवणमात्रेंकरुन : दुरितकोटीतें तरति नर ॥ २६ ॥ ह्मनसि सत्कर्में करुन : कां न तरती दीन जन ॥ करुनिया स्वधर्माचें श्रवण : पापक्षय नव्होचि काई ॥ २७ ॥ ऐसें गमेल गा प्रस्तुत: तरि कृष्ण सर्वांचाही आप्त ॥ या लोकत्रयाचा जो नाथ : ब्रह्मादिकांचा गुरु ॥ २८ ॥ अधिकारपरत्वेंकरुन : अवघेचि करावे स्वजन ॥ त्यांत कोण्ही साधनसंपन्न : आणि विषयरत ॥ २९ ॥ यां सर्वांसही सेव्य असावें : सर्वि हिं तत्पर होअवें ॥ या अभिप्रायें वासुदेवें : क्रीडिजेते जालें ॥ ३० ॥ जे श्रगांररसिं आसक्त : त्यांसि हाचि रस प्रस्तुत ॥ सेव्य असोनि त्यांचें चित्त : स्वनिष्ठ करावें॥ ३१ ॥ जे कोण्ही सारवस्तुवेत्ते : त्यांसि तें हिं प्राप्त असे येथें : ते जाणोनि क्रीडातत्वातें : कृष्णतत्पर होति ॥ ३२ ॥ त्या कथरसाचे सेवन : करुनि मुक्त मुमुक्षु जन ॥ ते यथाधिकारें करुन : सुखेंकरिं असति ॥ ३३ ॥ असो या विनोदें करुन : ज कोण्ही बहिर्मुख जन ॥ त्या बहिर्मुखाचें हिं मन : आपुले ठाईं असावें ॥ ३४ ॥ ह्मणोनि इयां रासरंगिं : ठाण मांडुनियां त्रिभंगी ॥ मुरलीनादें त्यां तन्वंगी : रंजवील्या कृष्णें ॥ ३५ ॥ त्या कामासक्तें हिं चित्तें : नापेक्षितीचि आणिकातें ॥ आपणेवीण अन्य त्यांतें : न मानावेंचि कांहिं ॥ ३६ ॥ ऐसें विचारुनि तत्वतां : श्रीकृष्ण सर्वांतरवेत्ता ॥ अनुसरोनि श्रृंगारपंथा : आत्मनिष्ठा केल्या ॥ ३७ ॥ एवं भलतेंहि आचरित : तें सर्वभूतानुग्रहार्थ ॥ ते असो विधीसि उचित : किंवा विपरित असो ॥ ३८ ॥ परमार्थे त्याचा ठाइं : या दोहिंचें प्रयोजन नाहिं ॥ परि भक्तानुग्र हिं सर्वाहिं : योग्य असे कृष्णातें

॥ ३९ ॥ नाना अंचित्य शक्तिबळें : सर्व ही योग्यता पावलें ॥ जें अशुभाकारें भासलें : तें चि शुभत्वासि आलें ॥ ४० ॥ त्या शुभकथाश्रवणलेशें : श्रीकृष्णि बुद्धि प्रवेशे ॥ या अभिप्रायें रमाधीशें : क्रीडिजेते जाले ॥ ४१ ॥ आतां उत्तर श्लोकें करुन : त्या अचिंत्य शक्तीचें लक्षण ॥ रायाप्रति व्यासनन्दन : प्रकटिताति ऐसें. ॥ ४२ ॥

**नासूयन् खलु कृष्णाय मोहितास्तस्य मायया ॥**
**मन्यमानाः स्वपार्श्वस्थान्स्वान्स्वान्दारान्व्रजौकसः ॥ ३८ ॥**

राया त्या गोपी गोपकांतां : कृष्णा जवळि असतां ॥ त्यांच्या भर्त्तारांच्या चित्ता : नव्होचि क्षोभु ॥ ४३ ॥ असो ते गोप व्रजौकस : द्वेषिती चि ना श्रीकृष्णास ॥ न भासे त्यांच्या मनास : निजदारावियोगु ॥ ४४ ॥ त्यांसि त्या निजवनिता : जाणवल्या निज पार्श्वस्था ॥ ह्मणिजे तिहिं मानिलें स्वकांता : पाठीसि निजेल्या ॥ ४५ ॥ असो त्या गौळियांसि : त्या ज्या गेल्या कृष्णापासि ॥ हें कळलें नाहिं निजशय्येसि : त्या जवळि देखिल्या तिहिं ॥ ४६ ॥ येथें होइल कल्पना : जें पुर्वी त्या गोपललना ॥ येतां कृष्णसन्निधाना : निवारिलिया भ्रतारिं ॥ ४७ ॥ न मानुनि त्या निवारणातें : त्या आल्या कृष्ण होता तेथें ॥ तरि हें काये त्यां गोपांतें : चोजवलें नाहिं ॥४७॥ ऐसें मानेल काहिं : तरि इश्वरिं आश्चर्य नाहिं ॥ हे अचिंत्य शक्तीचा ठाईं : काय काय न घडे ॥ ४९ ॥ ते कृष्णमायेने मोहिले : हें मुळिंच असे सुचिलें ॥ कोण कोण नाहिं भ्रमले : कृष्णमायामोहित जन ॥ ५० ॥ एवं मायामोहित होंत्साते : पृष्ठिभागिं निजदारांतें : ते गोपाळ जाले जाणते : आपुले आथुरणावारि ॥ ५१ ॥ ह्मणोनि श्रीकृष्णाचा ठाइं : त्यासि द्वेष जाला नाहिं ॥ नाना सकळात्मा तो काई : द्वेषासि विषयो ॥ ५२ ॥ किंवा सर्वात्मया श्रीकृष्णातें : पात्रतांचि निजदारांतें ॥ गोपाळिं आपणयांपरतें : देखिलेंचि नाहिं त्यांसि ॥ ५३ ॥ यास्तव तो सर्वात्मा कृष्ण : द्वेषासि नव्हे भाजन ॥ येया आचिंत्य शक्तीकरुन : जर्‍हि दाविला असे भेद ॥ ५४ ॥ राया तुवां जो केला प्रश्न : जें ह्या शिष्टाचार प्रमाण :

तेणें हे साधारण जन : वर्तती ऐसे चि सर्वत्र यथें ॥ ५५ ॥ तरि ते विषयासक्तमन : कर्मानुबंधी जीव जन ॥ ते उपजले दैवाअधीन : काळग्रस्त सर्व ही प्राणी ॥ ५६ ॥ ऐसें ते प्राकृत देहधारी : धर्मसेतुतें भंगिती जरि ॥ तरि ते महांनरक घोरिं : पडतिल तेंच समई ॥ ५७ ॥ न विजारुनि स्वतपोबळ : न पाहोनि निजकुळशील ॥ वर्तती विषयव्याकुळ : उल्लंघोनि जे धर्मातें ॥ ५८ ॥ जरि करिती स्वेच्छाचरण : तरि पावती अधःपतन ॥ ते मानुनियां मुढ जन : श्रीकृष्णतुल्य आपणातें ॥ ५९ ॥ ते जाणावे असुरासमान : जे नेणती कृष्णमहिमान : ज्यांसि नसे शास्त्रज्ञान : मां विज्ञान कैंचे ॥ ६० श्रीकृष्ण सर्वांसि अभिन्न : पारि हें नसे कृष्णासमान ॥ ऐसें काहिं गुप्तज्ञान : नेणती ते ॥ ६१ ॥ होउनि अज्ञान-निवृत्ती : जरी जाली आत्मप्रतिति ॥ तारि विधिनिषेधिं प्रवृत्ति : नसो कदाचित् ॥ ६२ ॥ पारि यावद्देहपतन : प्रारब्धाचा क्षय नसोन ॥ शरीरसंबंधें करुन : कर्मप्रवृत्ति ही घडली काहिं ॥ ६३ ॥ त्या शरीरोपाधीचा ठाइं : तार्तम्य तों मांडलें नाहिं ॥ त्या तार्तम्यानुसार पाहिं : कर्मतार्तम्य हिं मानावें ॥ ६४ ॥ कां जें अन्य देहाचें सामर्थ्य : अन्य देहिं नसे उमटत ॥ हें नेणोनि जन उन्मत्त : येथेष्टाचारिं प्रवर्ततसे ॥ ६५ ॥ या कर्मजन्या देहाकृति : स्वेच्छादेहि केवि तुल्य होति ॥ या स्वेच्छादेहि प्रवृत्ति : वेदशास्त्रांची ही नाहिं ॥ ६६ ॥ एवं जे देहाद्यभिमानी : हा सूक्ष्म विचार ने-णोनि ॥ वर्तती शास्त्रातें उल्लंघोनि : ते नरकार्णवि पडति ॥ ६७ ॥ अहो अचिंत्य शक्तिबळें : तें कृष्णिंच शोभेसि आले ॥ कां जें हे साक्षात् ब्रह्म सावळे : श्रीकृष्णाकारें ॥६८॥ राया येचि प्रसंगाचा ठाइं : आणिक ही नवल पाहिं ॥ हे कृष्णगोपीक्रीडा जें काहिं : ते जालीचि नाहिं नेणो ॥ ६९ ॥

**ब्रह्मरात्र उपावृत्ते वासुदेवानुमोदिताः ॥**
**अनिच्छंत्यो ययुर्गोप्यः स्वान्गृहान्भगवत्प्रियाः ॥ ४० ॥**

राया उक्तलक्षणयुक्त : त्या कृष्णसंगें गोपीजात ॥ क्रीडत असतां अकस्मात : ब्राम्ह मुहुर्त आलें ॥ ७० ॥ ब्रह्मरात्र पदें करुन : ब्राम्ह्यमुहुर्तांचें

अभिधान ॥ ह्मणजे रात्रिचें अवसान : उषःकाळ जाला ॥ ७१ ॥ असो गोपिकेच्छाशार्वरी : तें शोभली कृष्णेच्छाचंद्रकरी ॥ कृष्णेच्छा होती जंवरि : तंवरि राहिलि ते निशा ॥ ७२ ॥ मग क्रीडोपरम इच्छिला : तेव्हांचि उषःकाळ जाला ॥ एवं काळ नसतां योजला : ऐसें इच्छेस्तव जालें ॥ ७३ ॥ भगवत्प्रिया गोपिका त्या : कृष्णानुमोदिता होत्सात्या ॥ इच्छा नव्हती परि जात्या : जाल्या आपुलाल्या गृहांप्रति ॥ ७४ ॥ किंवा आतां जावों गृहांप्रति : हे त्यांसि इच्छाचि नव्हति ॥ परि अकस्मात् पाहाती : तवं स्वस्वगृहिं च होत्या नेणो ॥ ७५ ॥ त्यां सर्वांमाजि कोणातें हिं : चालणें जाणवलें नाहिं ॥ केवळ कृष्णेच्छेकारिं पाहिं : संपादलें ऐसें हें ॥ ७६ ॥ एवं भगवत्प्रिया समस्ता : त्या वासुदेवेच्छाप्रेरिता ॥ स्वचित्तिं इच्छा ही नसतां : निजगृहिं च होत्या ऐसें जालें ॥ ७७ ॥ असो त्या गोपी गोपांगना : सांडुनि गृहादि भावना ॥ कृष्णानुमोदिता तन्मना : तत्सुखें सुखावल्या ॥ ७८ ॥ तव मागुती दैवप्रेरकें : वासुदेवें यदुनायकें ॥ त्रिभुवनाचेनि आदिजनकें : श्रीकृष्ण आत्मारामें ॥ ७९ ॥ प्रेरुनि विशेष वृत्ति : प्रविष्टउनि गृहां प्रति ॥ निज रुपिं लाउनि प्रीति : स्वाचारिं प्रवर्तविल्या ॥ ८० ॥ जेवि कोण्ही योगीजन : श्रवणादि क्रमें करुन ॥ असोनि भगवत्परायण : भगवदासक्तचित्त जाले ॥ ८१ ॥ तथापि ते तन्निष्ठ होत्साते : प्रारब्ध क्षपणनिमित्तें ॥ अवलंबुनि देहोपाधीतें : काळक्रमण करिति ॥ ८२ ॥ तेवि त्या गोपवनिता : पुष्कळ कृष्णप्रेम भोगितां ॥ नावेक होउनि उपाधिगता : कृष्णानुमोदनें सकळा हि ॥ ८३ ॥ इच्छिलें हिं नसोनि तिहिं : पावोनि आपुलाल्या गृहिं ॥ चित्तें ठेउनि कृष्णपाइं : वर्तत्या जाल्या व्यवहारिं ॥ ८४ ॥ एवं इत्यादि येणें ग्रंथें : वर्णिलें रासक्रीडेतें ॥ जें श्रीकृष्णें व्रजयोषितांते : आत्मनिष्ठ केलें जेथें ॥ ८५ ॥ या कथेचा श्रवणिं पठणिं : ज्या श्रेयातें पावती प्राणी ॥ ते यथावत बादरायणीं : वर्णिताति ऐसें ॥ ८६ ॥

**विक्रीडितं व्रजवधूभिरिदंच विष्णोः श्रद्धान्वितोनु**

**श्रृणुयादथ वर्णयेद्यः ॥ भक्तिं परां भगवति प्रतिलभ्य**
**कामं हृद्रोगमाश्वपहिनोत्यचिरेण धीरः ॥ ४१ ॥**

हें विष्णुगोपीविक्रीडित : जें काहिं अलौकिकाचरित ॥ जेथें कृष्ण गोपिसमवेत : रमला रासरंगी ॥ ८७ ॥ या क्रीडितातें जो कोण्हीं : परम आदरें करुनि ॥ श्रद्धायुक्त असोनि : आइकेल किंवा वर्णिल ॥ ८८ ॥ तो परम भगवद्भक्तीतें : पावेल श्रवणसामर्थ्यें ॥ आणि मननिदिध्यासपंथे : तत्कृपा होइल ॥ ८९ ॥ भगवंताहुनि जे अन्य : ते जाणावे अर्थविहीन ॥ केवळ तन्मायाविडंबन : बुद्धिविलासु हा ॥ ९० ॥ यालागि तेथुनि ते वृत्ति : काढुनि लाविजे भगवंतीं ॥ तेथें उपजउनि प्रीति : तदाकार होये॥९१॥ असो सांडुनि बुद्धिकृतें : बुद्धिसाक्षी भगवंतातें ॥ जाणोनि भजता तेथें : मग वृत्तित्व कैंचें ॥ ९२ ॥ ऐसी जे परा भक्ति : वेदांती ह्मणती हे चतुर्थी ॥ आइकतां पठतां हरिकीर्ति : त्या भक्तीतें पावेल नर ॥ ९३ ॥ मग पावोनि त्या भक्तीतें : नाशिजेल स्वहृद्रोगातें ॥ हृद्रोग जो विषयास्थेतें : सांडिजेल श्रवणमात्रें ॥ ९४ ॥ आतां विषयो असतां चित्तीं : श्रवणिं कैसी होय प्रवृत्ति ॥ तरि स्वधर्मे चित्तवृत्ति : प्रवर्तेल श्रवणादीकीं ॥ ९५ ॥ पुण्यातिशयसामर्थ्यें : शमउनि हृद्रोगकामातें ॥ श्रवणादीकीं बुद्धि प्रवर्तें : भगवद्भक्तिप्रभावेंकरिं ॥ ९६ ॥ श्रवणादि अभ्यासें जन : होउनि विषय कामहीन ॥ मग पराभक्तिहुताशन : प्रकट होइल तत्काळ ॥ ९७ ॥ तो त्या कामादि तृणगणातें : जाळील आपुले सामर्थ्यें : हें अर्थास्तव घडलें एथें : परि मग काम कैंचा ॥ ९८ ॥ जरि सूर्यतेज प्रभाकरिं : वसों येईल शार्वरि ॥ तरि हरिभक्ति जालियावरि : कामादिक राहातील ॥९९॥ कामबीजाचें होतां भर्जन : भगवंतिं जडेल मन ॥ भक्तिकरिं करितां भजन : मनोलय होये क्रमें करुन ॥ १००० ॥ एवं धीर जो नर या जनिं: जो अहंकारातें सांडुनि ॥ या कथा श्रवणिं पठणिं : असक्त होंत्साता निरंतर जो ॥१॥ पावोनि भगवद्भक्तीतें : सांडिजे सकळ कामातें ॥ नेणों तो नव्हताचि येथें : आभासमात्र होता जो कांहिं ॥ २ ॥ ह्मणोनि हें कथा कल्याणवृत्ति : पावन जे भागवती ॥ सेव्य जाली सकळां प्रती : भक्तजन

हृद्रोग विनाशिनी हे ॥ ३ ॥ ऐसी राया परीक्षितीप्रति : हे पावन भगवत्कीर्ति ॥ वर्णिता जाला तो योगमूर्ति : विप्रशापें प्रायोपशमनाचा ठाई ॥ ४ ॥ जे कथा परम पावन : जेथें गोपीसवें श्रीकृष्ण ॥ रासरंगीं रमला ते गुणगण : प्रकट केले सर्व लोकत्रयांत ॥ ५ ॥ एकोनत्रिंशतितमा पासुन . त्रयत्रिंशति तमावसान ॥ ह्मणीजे एकुणतीसादि जाण : तेहतीसांत पांच अध्याये ॥ ६ ॥ शुकें वर्णिली मृत्युसंजीविनी : जे कृष्णकथा कल्याणी ॥ तेचि सुतें नैमिषारण्यिं : शौनकादिकां प्रति ॥ ७ वर्णिली तेथूनि प्रकटली : ते परंपरागत आली ॥ तेचि प्रस्तुत मज प्रेरिलि : नित्यानंद गुरुराजें ॥ ८ ॥ ते भगवद्गुण पावन : निजपापक्षयालागुण ॥ हेंची चित्तशुद्धीचें साधन : विचारुनि वर्णिली ॥ ९ ॥ जे यथाधिकारे वर्णिली : तिया पापें क्षयातें पावलिं ॥ आतां प्रसन्न असो माउलि : कृष्ण मुर्ति मज ॥ १० ॥ नाना माझा हृदयभुवनिं : विठ्ठलाकृति मनोहारिणि ॥ कटीतें हस्तिं कवळुनि : तिष्ठसो सदा ॥ ११ ॥ तेथेंचि जडो माझें मन : सांडुनि इतर वणवण ॥ हा जो मिथ्या देहाभिमान : तो न नो मज आतां ॥ १२ ॥ जरि कृपा न करी रमेश : तरि हो ज्ञानाचा आभास ॥ तो आणुनि ज्ञानगर्वास : नाशील कृतश्रमातें ॥ १३ ॥ जें कर्मक्षयाचें कारण : तेंचि होइल प्रतिबंधन : मेळउनि हे अज्ञानजन : वाढवील महंती लोकामाजि ॥ १४ ॥ ह्मणोनि कृपाळुवें श्रीनाथें : दीनाचेनि दयावंतें ॥ श्री नित्यानंदें भगवंतें : राखावे मज दिना लागि ॥ १५ ॥ वर्णितां हे गुणकीर्ती : नाशावि माझि चिदाचिद्ग्रंथि ॥ निस्तरोनि संसारविपति : असावें निवांत ॥ १६ ॥ असो आतां हे विनवणी : कृपा करावी साधुजनि ॥ या भगवंताचा गुण वर्णनि : अनुमोदन असावें ॥ १७ ॥ या पंचाध्यायक्रीडेवरी : तो नंदानंदन मुकुंद हरी ॥ निजभक्तजनकैवारि ॥ वर्तता जाला काइ आतां ॥ १८ ॥ जें वर्णील व्यासनंदन : उत्तरग्रंथें गुणकथन ॥ तेंचि प्राकृत बंधें करुन : मि हिं वर्णीन यथामति ॥ १०१९ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे दशमस्कंधे रासक्रीडावर्णनं नाम त्रयस्त्रिंशतितमोध्यायः ॥ ३३ ॥

**श्रीकृष्णार्पणमस्तु.**